भट्टोजी दीक्षितकृत

# प्रौढ मनोरमा

व

त्या ग्रंथावरील शब्दरत्ननामक टीका
यांचे स्त्रीप्रत्ययान्त

विस्तृत विवरणासह व प्रक्रियेसह
मराठी

# सुबोध भाषांतर

## भाग ४ था

(विसर्गसन्धि, स्वादिसन्धि व अजन्तपुल्लिङ्गप्रकरण
'सर्वादीनि सर्वनामानि' पर्यंत)


विवरणकर्ता

कै० रावबहादुर ना. दा. वाडेगावकर, एम्. ए.
[illegible] ट्रिक्ट व सेशन्स जज्ज, नागपूर.


[illegible]मत रु. ११

# मनोरमा व शब्दरत्न

यांचें

# मराठी भाषांतर

## भाग ४ था

## अनुक्रमणिका

विसर्गसन्धिप्रकरणम्

अजन्तपुल्लिङ्गप्रकरणम्

॥ श्रीगुरुः शरणम् ॥

रा. रा. रावबहादुर ना. दा. वाडेगावकर यानी प्रौढ मनोरमा व शब्दरत्न या ग्रंथाचें जें स्त्रीप्रत्ययान्त विवरण केले आहे त्याचा बराचसा भाग मी वाचला. या ग्रन्थात प्रथम प्रत्येक पक्तीचा अक्षरार्थ देऊन पुढें क्रमात त्या पक्तीचे विस्तृत व मार्मिक विवरण केले आहे व आवश्यक ठिकाणी पूर्ण प्रक्रिया दिली आहे त्यामुळें ग्रन्थाचा बोध होण्यास साधारण बुद्धीच्या विद्यार्थ्याला देखील माझ्या मतें काही अडचण येऊ नये. या ग्रन्थात ठिकठिकाणी भाष्य, प्रदीप, उद्योत, काशिका, पदमञ्जरी इत्यादि ग्रन्थातून समर्थक उतारे दिले असल्यामुळें हा ग्रन्थ आदर्शभूत झाला आहे व युनिव्हर्सिटीसारख्या संस्थानी हा माननीय ग्रन्थ संग्रही ठेवण्यास अत्यत लायक आहे. विद्यार्थीवर्गाच्या हिताकरितां हा ग्रन्थ जितक्या लवकर छापला जाईल तितकें बरें व या ग्रन्थाचे हिन्दींत भाषान्तर करून ते छापल्यास यु. पी., पंजाब, बंगाल वगैरे प्रातांतील विद्यार्थ्यांना फार फायदा होईल. मी हा ग्रन्थ वाचून फार प्रसन्न झालो आहे व एवढे कठिण व्याकरणशास्त्राचे ग्रन्थ महाराष्ट्र भाषेंत उतरविणें दुष्कर असून देखील रा. ब वाडेगांवकर यांनीं हें जें काम सरळ व सुंदर भाषा लिहून प्रशसनीय रीतीनें केले आहे त्याबद्दल मी त्यांचे मनःपूर्वक अभिनन्दन करितों.

बनारस
ता. ६–१२–४४

गोपाल शास्त्री नेने
व्याकरणाध्यापक, स. सं. कॉलेज, बनारस

॥ श्रीगुरुः शरणम् ॥

संस्कृत भाषेंतील शास्त्रीय ग्रन्थाचे मराठी भाषेंत यथार्थ भाषान्तर करणें हे कार्य सगळ्यानाच उत्तम रीतीनें साधते असे, नाहीं. प. आचार्य भक्त विष्णुशास्त्री बापट, दीक्षित, भाऊशास्त्री लेले, म. म. प. वासुदेव शास्त्री अभ्यंकर प्रभृति दिवंगत व विद्यमान प. धुण्डिराज शास्त्री उर्फ बापू दीक्षित, बापट, पाचगावकर प्रभृति ग्रन्थकारानी केलेली भाषातरे वजा करिता बहुतेक भावार्थानु-वादात्मकच भाषातरे आहेत म्हणावयास हरकत नाही. भाषातरित ग्रन्थात सुद्धा वेदान्तादि शास्त्रीय ग्रन्थाची भाषातरे लोकात प्रचलित असलेल्या दृष्टातादिकानी सुरुचिर तरी करिता येतात. परतु सर्वथा नीरस व क्लिष्ट अशा व्याकरण शास्त्रातील विशिष्ट टीकाग्रन्थाचे भाषातर सुव्यवस्थित व यथार्थ रीतीनें करणे हें कार्य अति अवघड व फारच कष्टसाध्य असे आहे. म्हणूनच जेथें वेदान्त, धर्मशास्त्र वगैरे शास्त्रातील दहा दहा ग्रन्थाची भाषातरे झालेली मिळतात, तेथें व्याकरणशास्त्रातील दोन तीनच ग्रन्थाची भाषातरे झाली आहेत याचे कारण उघडच आहे. प्रस्तुत ग्रन्थकारानी काही वर्षांपूर्वी श्री. नागोजीभट्ट काळे यानी केलेल्या परिभाषेन्दुशेखर नावाच्या ग्रन्थाचे मराठीत सुदर भाषातर केलेले प्रसिद्ध आहेच. आता प्रकृत ग्रन्थकारानी शब्दरत्न मनोरमेचे अव्ययान्त भागाचे मराठीत भाषान्तर केले आहे. ते मी बरेच स्थळी आपाततः व एकाध प्रकरण अक्षरशः संपूर्ण वाचून पाहिलें आहे. त्यामुळें मला निश्चयानें असे सागता येतें की सदरहू भाषांतर प्राचीन परपरेला व मूळातील गभीर अर्थाला कोठेंहि न सोडता उत्तम रीतीनें केलेले आहे. व्याकरणासारख्या नीरस, क्लिष्ट शास्त्रातील अति कठीण टीकाग्रन्थाचे उत्कृष्ट भाषातर करिता येतें याकरिता हा ग्रन्थ सर्वदा उत्कृष्ट उदाहरण म्हणून दाखविता येण्यासारखा आहे. असतु ज्याना व्याकरणशास्त्राचे अध्ययन करण्याची आवड आहे परतु गुरुकडे जाऊन अध्ययन करिता

येणे शक्य नाही; तसेच गुरूजवळ अध्ययन करूनहि ग्रन्थ स्पष्ट होण्याकरिता पुन. चिंतनाची आवश्यकता आहे अशा उभयविध जिज्ञासूना या ग्रन्थानें फार उपयोग होणार आहे.

७५ चे आतबाहेर वय, इंद्रियें एका काळीं आपली असूनहि आपली नाहीत अशी साक्ष पटवीत आहेत. या कालातील सांसारिक सुख, अशा परिस्थितीत १५–१५ तास दिवसा तसेच रात्रीहि व्याकरणशास्त्रासारख्या नीरस क्लिष्ट विषयात एकाग्रचित्तानें विचार करीत समाधि स्थितीत असलेल्या श्रीमान पंडित बाबासाहेब वाडेगावकराना पाहिले म्हणजे प्राचीन विद्वानांची वर्णनें प्रत्यक्ष डोळ्यासमोर उभी राहतात. असो. हा ग्रन्थ लवकरच प्रसिद्ध होण्याचा योग यावा व मराठी भाषेत एका उत्कृष्ट भाषांतराची भर पडावी अशी सदिच्छा प्रकट करितो.

पौष वद्य दर्श बुधवार
ता. ६–१२–४४, काशी

पं. अनंत शास्त्री फडके
व्याकरणाचार्य, मीमांसातीर्थ
प्रा. ग. स. कॉ., काशी

———

॥ श्री विश्वनाथो विजयते तमाम् ॥

रा ब श्री ना दा वाडेगावकर यानी 'प्रौढ–मनोरमा आणि शब्दरत्न' ह्या व्याकरण शास्त्रावरील जटिल दोन ग्रंथाचे जें महाराष्ट्र भाषेंत विस्तृत विवरण केले आहे त्याचा काही भाग मी वाचला हा ग्रंथ सर्वांगसुंदर जाहला आहे. जसा एखादा वैयाकरणमूर्धन्य आपल्या प्रियतम विद्यार्थ्यांस प्रत्येक पंक्तीचे विशद विवरण करून ग्रंथाचे गूढ ग्रन्थिरहस्य एकान्तात सांगतो तसे हे 'भाषान्तर' वाचकास चटकन ग्रंथ प्रमेय सांगते यात प्रत्येक पंक्तीचा अक्षरार्थ प्रथम देऊन नंतर कंसात त्याचे विस्तृत विवरण केले आहे व जेथें प्रक्रिया देणे आवश्यक आहे तेथें सूत्रें देऊन सविस्तर प्रक्रिया दिली आहे आणि ठिकठिकाणी भाष्य, काशिका, प्रदीप, उद्योत, शब्देन्दुशेखर, पदमंजरी इत्यादि ग्रंथातील समर्पक उतारे दिले आहेत, त्यायोगें ग्रंथ समजण्यात अडचण जात नाही माझी पूर्ण खात्री आहे की ज्याने कौमुदीचे अध्ययन केले आहे त्याला शिक्षकाच्या सहाय्याशिवाय हा ग्रंथ वाचल्यानें मनोरमा व शब्दरत्न यातील पंक्ति उत्तम रीतीनें समजू शकते असा सर्वोत्कृष्ट ग्रंथ लिहिल्याबद्दल मी रावबहादुर यांचे सप्रेम हार्दिक अभिनंदन करितो. महाराष्ट्र प्रान्तात व्याकरणशास्त्राचा विशेष प्रचार विरल आहे. उत्तर (हिंदुस्थानात) भारतात व्याकरणशास्त्राचा विशेष प्रचार असल्यामुळें या ग्रंथाचे हिन्दीत भाषान्तर होणें आवश्यक आहे तसे भाषान्तर केल्यास व्याकरणशास्त्राध्ययन करणाऱ्या छात्रवर्गावर फार उपकार होतील

| | |
|---|---|
| बनारस<br>कार्तिक शु १३ सोमवार<br>ता १३-११ ४४ | सदाशिव शास्त्री मुसलगांवकर<br>माजी प्रिन्सिपल, संस्कृत कॉलेज,<br>ग्वाल्हेर |

॥ श्री ॥

श्री. रा. ना. दा. वाडेगावकर यानी प्रौढ मनोरमा व शब्दरत्न या गहन ग्रन्थाचे महाराष्ट्र भाषेंत जें स्त्रीप्रत्ययान्त विवरण केले आहे त्याची तीन प्रकरणे मी वाचली. या विवरणात प्रत्येक पक्तीचा प्रथम अक्षरार्थ देऊन पुढें कसात विस्तृत विवेचन केले आहे व अवश्य ठिकाणी सूत्रें व सूत्राङ्क देऊन पूर्ण प्रक्रिया दिली आहे, आणि तसेच भाष्य, प्रदीप, उद्योत, शब्देन्दुशेखर, काशिका, पदमञ्जरी इत्यादि ग्रंथातून आवश्यक स्थली समर्पक उतारे दिले असून त्याचा भावार्थहि दिला आहे. त्यामुळें प्रत्येक पक्तीचा उत्तम रीतीनें अर्थबोध होतो. हा ग्रंथ सरल व सुंदर भाषेंत लिहिला असल्यामुळें सामान्य बुद्धीच्या विद्यार्थ्याला देखील ग्रंथबोध होण्यात काही अडचण येऊ नये. शब्दरत्नाची भाषा फार अवघड आहे व त्या ग्रंथाचा गूढार्थ मराठी भाषेंत पूर्णपणे उतरविणे हे दुष्कर असून देखील या विवरणात ते उत्तम रीतीनें केले. सारांश हे विवरण अत्यन्त सुंदर, बोधप्रद व आदर्शभूत झाले आहे व या उतारवयात शरीर रोगग्रस्त झाले असून देखील वाडेगावकर साहेबानी जो एवढा प्रचण्ड व सुंदर ग्रन्थ निर्माण केला आहे त्याबद्दल त्यांचे जितके कौतुक व अभिनंदन केले तितके कमीच आहे.

दिवाकर शास्त्री जोशी,
व्याकरणाचार्य,
व्याकरण शास्त्राध्यापक, गवर्नमेण्ट संस्कृत
कॉलेज व स्या. जैन विद्यालय, बनारस.

ता. ६-१२-६४

# भोंसला वेदशास्त्र महाविद्यालय

## (संशोधन व प्रकाशन मंडळ)








पत्रव्यवहाराचा पत्ता :–

श्री. कृ. मा. चौरीकर

कार्यवाह,

भोंसला वेदशास्त्र महाविद्यालय,

सर्कल ६, अयाचित रोड, नागपूर २




॥ श्री ॥

## मनोरमा व शब्दरत्नाचा मराठी अनुवाद.

# नम्र निवेदन

माझे परमपूज्य तीर्थ कै. रा. ब. ना. दा. वाडेगावकर यांनी प्रौढ मनोरमा व शब्दरत्न या संस्कृतव्याकरणविषयक ग्रंथाचे जे स्त्रीप्रत्ययान्त विवरणात्मक मराठी भाषांतर करुन ठेवले आहे ते प्रसिद्ध करण्याच्या दृष्टीने मार्च १९५१ मध्यें मी या प्रचंड ग्रंथाचा पहिला भाग ईशदयेनें प्रकाशित केला. यानंतर माझे बंधु रा. सा. वामनराव व श्री. रा. विश्वनाथराव, संपादक, 'उद्यम', यांनी अनुक्रमे दुसरा भाग आगस्ट १९५७ व तिसरा जानेवारी १९६१ मध्यें प्रकाशनाचा सर्व खर्च सोसून प्रकाशित करविला. या दहा वर्षांत केवळ तीनच भाग प्रकाशित होऊ शकले व हस्तलिखिताची केवळ ११९८ पानेंच खर्ची पडली असून सुमारे २१०० पानें हस्तलिखित प्रकाशित होणें आहे. हे संपूर्ण कार्य कसें व केव्हां होणार या विवंचनेत असता, भोसला संस्कृत महाविद्यालय, नागपूर ही संस्था अनपेक्षितपणे माझे सहाय्यार्थ धावून आली व हा संपूर्ण ग्रंथ यत्या ५।६ वर्षांत तिनें प्रकाशित करण्याचे ठरविले. यामुळ मी फार मोठ्या जबाबदारीतून मोकळा झालो. दर वर्षी मकरसंक्रातीचे

सुमारास एक या हिशेबानें संस्थेनें उर्वरित संपूर्ण ग्रंथ ५ भागांत १९६६ अखेर प्रकाशित करण्याचें ठरविलें आहे या अमोल सहायाबद्दल संस्थेचे – विशेषतः तिचे अध्यक्ष श्री. रा. बाळशास्त्री हरदास यांचे – कृतज्ञताबुद्धीनें मन-पूर्वक आभार मानण्यास माझेजवळ पुरेसे शब्द नाहीत असें मी प्रांजलपणें कबूल करतो संपूर्ण ग्रंथ प्रकाशित करण्यानें माझे जबाबदारीतून तर संस्थेनें मला मुक्त केलेंच पण त्या बरोबर या विषयाचे जिज्ञासु व अभ्यासु वर्गावर संपूर्ण ग्रंथ पुढील पांच वर्षांत प्रकाशित करून फार मोठे उपकार केले आहेत. आजपर्यंत झालेल्या प्रगतीच्या मानानें कदा-चित २५ वर्षांतहि जें काम मजकडून होऊं शकलें नसतें तें संस्थेनें अंगावर घेऊन ५ वर्षांत पूर्ण करण्याचें ठरविलें या-बद्दल संस्थेस द्यावेत तितके धन्यवाद थोडेच होतील. ही संस्था देखील जनतेच्या सहानुभूति व सहकार्यावरच चालणारी संस्था असल्यामुळें या प्रकाशनामुळें संस्थेस किंचितहि आर्थिक घस सोसावी लागूं नये या बाबतींत संस्थेचे *हितचिंतक व संस्कृतचे अभिमानी अवश्यमेव* जाग-रूक राहतील याबद्दल मला मुळींच शंका वाटत नाहीं. आजवर ज्यांनीं ज्यांनीं एवढी मजल गांठीपावतों मला निरनिराळ्या प्रकारें सहाय्य केलें त्या सर्वांचा मी अत्यंत ऋणी आहे.

माझे वडिलांनी नप.श्चर्याबिजा संस्कृत व मराठी वाङ्मय-याची जी सेवा केली ती ईश्वरास मान्य असेल व आमचा पितृ-ऋण फेडण्याचा योगच असेल तर सत्यसंकल्पाचा दाता भग-

वान स्वत च हे सकृतदर्शनी अवघडच नव्हे तर अशक्यप्राय वाटणारे कार्य लीलया परिणत करवून घेईल असा मला भरवसा आहे दहा वर्षांपूर्वी या ग्रंथाबद्दल मी एक लहान पुस्तिका प्रसिद्ध केली होती तीत शेवटी हा भरवसा व्यक्त केला होता तो माझा विश्वास आज फलद्रूप होऊन त्या दयाघनाचे प्रेरणेनेच सस्थेनें हें प्रचड कार्य हाती घेतले असे मी समजतो.

हे सर्व ज्या ईश्वराच्या एकमेव कृपेमुळे घडून आले त्याचे चरणी वदन करून हें निवेदन सपवितो

— खं. ना. वाडेगांवकर

---



कैं० रावबहादुर ना. दा. वाडेगावकर, एम्. ए.
सेवानिवृत्त डिस्ट्रिक्ट व सेशन्स जज्ज नागपूर

# प्रस्तावना



— लेखक —

महामहोपाध्याय बाळशास्त्री हरदास, साहित्याचार्य

नागपूर

पंडित श्रेष्ठ कै. रावबहादूर ना. दा. वाडेगावकर यांच्या या महान् कृतीचे तीन खंड यापूर्वी त्यांचे सांक्षेपी चिरंजीव श्री. ख. ना. वाडेगावकर यांनी प्रसिद्ध केलेले असून त्यावरून या कृतीचे महत्व किती आहे हे सर्वांना कळलेलेच आहे. त्यांच्या या ग्रंथराजाचा प्रस्तुतचा चवथा खंड व यानंतरचे सर्व खंड भोसला वेदशास्त्र महाविद्यालयाच्या संशोधन व प्रकाशन मंडळाने प्रकाशित करावयाचे ठरविलेले असून तदनुसार त्या मंडळाच्या वतीनें हा खंड आज प्रकाशित करण्यात येत आहे. भोसला वेदशास्त्र महाविद्यालयाच्या संशोधन व प्रकाशन विभागाचा अध्यक्ष म्हणून हें कार्य पार पडताना मला जसा कर्तव्यपूर्तीचा आनंद होत आहे असाच व्यक्तिशः मला गुरु सेवा घडत असल्याचाहि आनंद वाटतो. कारण कै. रावबहादूर नारायणराव वाडेगावकर हे माझे व्याकरणशास्त्राचे गुरू

होते मी व माझे मित्र डॉ. विनायक वामन करबेळकर त्याच्याजवळ सिद्धातकौमुदी शिकावयास जात होतो

रा व वाडेगावकर याचा विद्याव्यासग हा एक अलौकिक चमत्काराचा विषय होय इग्रजी विद्या हस्तगत करून न्यायमूर्ति पदासारख्या श्रेष्ठ पदावर अधिरूढ होऊनहि त्याची वैदिक धर्मावरील श्रद्धा व सस्कृत विद्येची उपासना जाज्वल्य राहिली भारतीय विद्येचा अलौकिक व्यासग करून सस्कृत शास्त्रावरील आकर ग्रथाची निर्मिति करणारे वैय्याकरणकेसरी सदाशिव भट्ट घुले याच्यासारखे श्रेष्ठ ग्रथकार नागपूरला झाले पण ते केवळ आजन्म सस्कृत विद्येचाच व्यासग करणारे व त्याहून अन्य कोणत्याहि व्यवसायात नमलेले असे होते रा व वाडेगावकर हे अशा कालखडात जन्म पावले की ज्या कालखडात वावरणारा पाश्चात्य विद्याविभूषित व उच्चपदाधिष्ठित पुरुष हा सामान्यत सुधारणावादाकडे कल असलेला व भारतीय विद्या आणि कला याच्याकडे सामान्यत तुच्छताबुद्धीने पाहणारा असावयाचा रा व वाडेगावकर याच्या बाबतीत हा सकेत खोटा ठरला आणि विद्येचा – विशेषत सस्कृत व्याकरणशास्त्राचा एखाद्या व्यसनासारखा ध्यास घेऊन त्यानी आपल्या अपूर्व ग्रथनिर्मितीने मराठीचे दालन समृद्ध केले

, कै वाडेगावकर हे नागपूरचे वैय्याकरणकेसरी व उत्तररामचरिताचे प्रसिद्ध टीकाकार कै म म भट्टजी-शास्त्री घाटे याचे शिष्य होत भट्टजीशास्त्री घाटे हे नाग-

पूरचे चालते बोलते असे श्रेष्ठ विद्यापीठच असून या विद्यापीठातूनच कै. म. म. डॉ. केशवरावजी ताम्हन, कै. म. म. पंडितसम्राट कृष्णशास्त्री घुले, कै पंडितवर्य गोपाळराव गर्दे, कै म. म. सदाशिव जयराम देहाडराय, कै. वैय्याकरण केसरी बाळशास्त्री घाटे, कै. पंढरीनाथ-शास्त्री घाटे प्रभृति स्नातक बाहेर पडले. कै वाडेगावकर हे याच महान् विद्यापीठातील स्नातक होत.

इ. स. १९२६ मध्ये डिस्ट्रिक्ट व सेशन्स् जज्जाच्या जागेवरून निवृत्त झाल्यावर त्यांनी थकल्या काळची हक्काची विश्रांति घेण्याऐवजी आपल्या आवडीच्या विद्या-व्यासंगाला स्वतःला वाहून घेतले. सेवानिवृत्तीनंतर काशीला जाऊन त्यांनी आपल्या विद्येला आलेली मलिनता झाडून टाकली. त्यानंतर नागपूरला स्थिरपद होऊन त्यांनी आपले मित्र कै. पं. गोपाळराव गर्दे यांच्या समवेत व्याक-रणशास्त्राच्या सखोल मननचिंतनात स्वत.ला निमग्न करून घेतले. त्यांच्या याच चिंतनातून मराठीला ललामभूत ठर-णारे दोन ग्रंथ निर्माण झाले एक परिभाषेंदुशेखराचा मराठी अनुवाद व दुसरा प्रौढ मनोरमा व शब्दरत्न यांचा स्त्रीप्रत्ययान्त विवरणात्मक मराठी अनुवाद होय.

जिच्या अनुवादाचा चौथा खंड भोसला वेदशास्त्र महाविद्यालयाच्या वतीने प्रकाशित होत आहे ती मनोरमा म्हणजे भट्टोजी दीक्षितांनी स्वत.च्या सिद्धांत कौमुदी या ग्रंथावर स्वत.च लिहिलेली टीका होय. सिद्धांत कौमुदी

हा व्याकरणशास्त्रातील अलौकिक ग्रंथ असून त्या ग्रंथाच्या उदयाबरोबर इतर पठण पाठण बंद पडून त्या ग्रंथाच्या द्वारेच संस्कृत व्याकरणशास्त्राच्या अध्ययन अध्यापनाची परंपरा सुरू झाली. कौमुदीच्या वर्णनाचा पुढील श्लोक, तिची श्रेष्ठता यथार्थपणे प्रगट करतो.

> "कौमुदी यदि कंठस्था वृथा भाष्यपरिश्रमः ।
> कौमुदी यद्य कंठस्था वृथा भाष्यपरिश्रमः ॥"

भट्टोजी दीक्षितांनी सिद्धांत कौमुदीची रचना केल्यावर तिच्यावर आक्षेप घेणारे अनेक वैय्याकरण झाले. त्या सर्वांचे खंडन करून कौमुदीत व्यक्त केलेल्या मताचे समर्थन करण्यासाठी मुख्यतः त्यांनी प्रस्तुत प्रौढ मनोरमा लिहिली आहे. भट्टोजींच्या या ग्रंथात त्यांची कठोर कर्तव्यनिष्ठा उत्कटतेने प्रगट झालेली आहे. त्यांनी प्रस्तुत ग्रंथात काशिका, न्यास, पदमंजरी, प्रक्रियाकौमुदी इत्यादि ग्रंथातील अपप्रतिपादनाचा तर समाचार घेतला आहेच पण आपले गुरु शेषश्रीकृष्ण यांच्याहि मताचे खंडन केले आहे. शास्त्रनिष्ठेला अतिरेकी व्यक्तिनिष्ठेचे कसे वावडे असते याचे भट्टोजींची प्रौढ मनोरमा हे एक उदाहरणच होय.

कै. रा. ब. वाडेगावकर हेहि न्यायनिष्ठुर व कठोर शास्त्रनिष्ठ होते. या समानधर्मत्वामुळे भट्टोजींच्या ग्रंथाकडे रा. ब. आकर्षिले गेले असले तर ते अत्यंत योग्यच होय.

भट्टोजीच्या प्रौढ मनोरमेवर अनेक व्याकरणज्ञानी टीकाची झोड उठविली या टीकाकाराच्या मनाचे खडन करणाऱ्या ज्या अनेक टीका प्रौढ मनोरमेवर झाल्या त्यात भट्टोजी दीक्षिताचा नातू, हरि दीक्षित याची शब्दरत्न ही टीका सर्वश्रेष्ठ मानली जाते ही टीका वस्तुत हरि दीक्षितानी लिहिलेली नसून ती त्याचे विख्यात कीर्ति शिष्य नागोजी भट्ट यानी लिहिलेली आहे हे आता विद्वानाना मान्य झालेले आहे

व्याकरणशास्त्रावरील या श्रेष्ठ व महत्वाच्या ग्रथाचा विवरणात्मक अनुवाद आजवर कोणत्याहि भाषेत झालेला नाही या दृष्टीने कै रा ब नारायणराव वाडेगावकर याची कामगिरी केवळ अपूर्व होय त्यानी केवळ महाराष्ट्र शारदेचे दालनच या आपल्या कृतीने समृद्ध केले असे नव्हे, तर आतर भारतीय भाषात मराठीला सर्वश्रेष्ठ वैभव प्राप्त करून दिले आहे महाराष्ट्र सारस्वत त्याचे सदैव ऋणी राहील यात शका नाही

प्रस्तुत ग्रथाचे तीन खड कै वाडेगावकर त्याचे ज्येष्ठ चिरजीव श्री. खडेराव वाडेगावकर यानी प्रकाशित केले आहेत प्रस्तुत चौथ्या भागापासूनच्या पुढील सर्व भागाच्या प्रकाशनाचे दायित्व श्री वाडेगावकर यानी करारपत्राने भोसला वेदशास्त्र महाविद्यालयाकडे सोपविले असून महाविद्यालयाच्या सशोधन व प्रकाशन विभागाने ते दायित्व सपूर्णपणे स्वीकारले आहे श्री खडेराव वाडे-

गावकर यानी कै रा ब. नारायणराव वाडेगावकर याच्या सेवेची ही सुसंधी महाविद्यालयाला प्राप्त करून दिल्याबद्दल त्याना मी अत करणपूर्वक धन्यवाद देतो तसेच त्याचे बधु व उद्यम प्रसचे सचालक श्री वि ना वाडेगावकर यानी निश्चित कालखडात ग्रथाचे मुद्रण व अन्य गोष्टी उत्कृष्टपणे करून दिल्याबद्दल सस्था त्याची आभारी आहे

सर्वारम्भास्तडुला प्रस्थमूला " या न्यायानें या ग्रथप्रकाशनाला आर्थिक सहाय्य लाभले नसते तर हे प्रकाशन कार्य सिद्धीस जाणें दुर्घट होते राजसत्तेने अशा महत्कार्याला सहाय्य करण्याची भारताची परपरा आहे विजयनगरच्या साम्राज्याच्या व शिवछत्रपतीच्या स्वराज्याच्या काळात भारतीय विद्येला आलेला बहर या गोष्टीची साक्ष द्यावयास पुरेसा आहे. शिवछत्रपतींची राज्यमुद्रा महाराष्ट्र राज्यानें स्वीकारलेली आहे छत्रपतीच्या परपरेचे अभिमानी व "पैशाच्या अभावी शस्त्रविद्या आणि शास्त्राध्ययन या कार्यांचा अगिकार केलेल्या सस्थाना मी या राज्यात नामशेष होऊ देणार नाही" असे बाणेदार उद्‌गार काढणारे महाराष्ट्र राज्याचे मुख्य मत्री श्री यशवतरावजी चव्हाण याना आम्ही सहाय्यार्थ अभ्यर्थना केली या स्वरूपाच्या कार्यांना सजीवन देण्यासाठी मा चव्हाण यानी राज्य सरकारच्या वतीने साहित्य व संस्कृति मडळाची निर्मिति करून क्रातिकारक पाऊल टाकले आहे या मडळाच्या द्वारे महाराष्ट्र राज्य सरकारनें

प्रस्तुत ग्रंथाच्या या खंडाच्या प्रकाशनासाठी तीन सहस्त्र रुपयाचे अनुदान देऊन आम्हाला अत्यंत ऋणी केलें आहे. महाराष्ट्र राज्याचे मुख्य मंत्री माननीय यशवंतराव चव्हाण, डॅ. शेषराव वानखेडे, राज्य सरकारच्या साहित्य व संस्कृति मंडळाचे अध्यक्ष तर्कतीर्थ प. लक्ष्मणशास्त्री जोशी व मंडळाचे अन्य सर्व सदस्य यांचा ऋणनिर्देश करणें आमचे कर्तव्य होय. महाविद्यालयाच्या या स्वरूपाच्या उपक्रमांना त्यांचे सदैव सहकार्य असावे अशी आमची अपेक्षा आहे

व्याकरणासारख्या विषयावरील हा ग्रंथ असल्यामुळें तो अत्यंत शुद्ध स्वरूपातच प्रकाशित होणे अगत्याचे होते. त्यादृष्टीने या ग्रंथाची प्रुफे व्याकरण तज्ञाकडून तपासली जाणे आवश्यक होते. महाविद्यालयाच्या संशोधन व प्रकाशन मंडळाचे सन्मान्य सदस्य व विदर्भातील एक विख्यात संशोधक श्री. श. गो. चट्टे, एम्. ए. यांनी याबाबतीत अतिशय कष्ट घेतले व महाविद्यालयाचे कार्यवाह श्री. दादासाहेब चोरीकर यांनी त्यांना कष्टपूर्वक सर्व प्रकारचे सहकार्य दिले या दोन व्यक्तींच्या सहकार्याशिवाय ग्रंथप्रकाशन इतके शीघ्र होणें अशक्य होते. त्यामुळे त्यांचा ऋणनिर्देश होणे अत्यावश्यक आहे. प्रस्तुत ग्रंथाच्या प्रकाशन समारंभाला लोकनायक डॉ. मा. श्री. उपाख्य बापूजी अणे यांच्यासारखा भारतीय कीर्तीचा व वैदिक धर्मावर प्रखर निष्ठा आणि भारतीय शास्त्रावर अधिकार असलेला लोकनेता अध्यक्ष म्हणून लाभला हे आमचें सद्भाग्य होय.

महाराष्ट्र सारस्वताचे दालन सर्व दृष्टीनी अत्यत समृद्ध करणाऱ्या या ग्रथाचे स्वागत महाराष्ट्रातील साक्षेपी विद्वानाकडून होईल यात शका नाही.

दि. ८ मार्च १९६२
फाल्गुन शुद्ध तृतीया
शके १८८३

बाळशास्त्री हरदास
अध्यक्ष, भोसला वेदशास्त्र महाविद्यालय
सशोधन, प्रकाशन विभाग, नागपूर

॥ श्रीगणेशाय नमः ॥

# ॥ अथ विसर्गसन्धिप्रकरणम् ॥

**मनोरमा**— शर्परे सत्वादेरयमपवादः । यदि तु शर्परे नैत्येवोच्येत तर्हि प्रकृते सत्वे निषिद्धेऽपि कुप्वोः ≍क≍ पौ स्याताम् । वासः क्षौमम्, अद्भिः प्सातमिति । विसर्जनीयवचनात्तु विकारमात्र बाध्यते इत्याशयेनाह–न स्वन्यदिति । तदेव स्फुटयति । इहेति ॥

'शर्परे विसर्जनीयः' सू. १५० हे सूत्र सत्व इत्यादिकाचे, म्हणजे 'विसर्जनीयस्य सः' सू. १३८ या सूत्रानें होणाऱ्या सत्वाचे व तसेच 'कुप्वोः ≍क ≍ पौ च' सू. १४२ या सूत्रानें होणाऱ्या जिव्हामूलीय व उपध्मानीय याचे, अपवादक आहे ('शर्परे विसर्जनीय' असे सूत्र न करिता त्या ऐवजी पाणिनीनें) 'शर्परे न' असेच सूत्र पठित केले असते तर, जरी ('विसर्जनीयस्य सः' या सूत्रानें होणाऱ्या व त्या सूत्रात) प्रकृत असलेल्या सत्वाचा निषेध झाला असता तरी, 'वासः क्षौमम् अद्भिः प्सातम्' या स्थली (विसर्गापुढें शर्पर 'क्षय्' असल्यामुळें, 'कुप्वोः' या सूत्रानें विसर्गाचे जागी) जिव्हामूलीय व उपध्मानीय आदेश अनुक्रमें झाले असते परंतु प्रकृत सूत्रात 'विसर्जनीय' हे पद घातले असल्यामुळें, म्हणजे 'शर्परे विसर्जनीयः' असे प्रकृत सूत्र पठित केले असल्यामुळें, विसर्गाचे जागी कोणत्याहि प्रकारचा विकार—आदेश—होण्याचा बाध होतो, म्हणजे विसर्गाचे जागी इतर कोणताहि आदेश न होता विसर्ग विसर्गरूपानेंच कायम राहतो, आणि हा आशय मनात धरूनच प्रकृत सूत्रावरील कौमुदीत 'न त्वन्यत्' असे म्हटले आहे व याचेच स्पष्टीकरण 'इह यथायथं सत्वं जिव्हामूलीयश्च न' या कौमुदीतील पुढील पङ्क्तीत केले आहे ('वासः क्षौमम्' या स्थली विसर्गापुढें ककार असल्यामुळें 'कुप्वोः' या सूत्रानें विसर्गाचे जागी जिव्हामूलीयाची प्राप्ति होणे आणि

अद्भि प्सातम्' या स्थली विसर्गापुढें पकार असल्यामुळें विसर्गाचे जागी उपध्मानीयाची प्राप्ति होते, व तसेच ककार व पकार हे 'खर्' असल्यामुळें या दोन्ही स्थली 'विसर्जनीयस्य स' या सूत्रानें सत्वाची प्राप्ति होते परंतु वरील दोन्ही उदाहरणात ककार व पकार या 'खर्' पुढें अनुक्रमें असणारे षकार व सकार हे 'शर्' असल्यामुळें व प्रकृत सूत्रात 'विसर्जनीय' हें पद मुद्दाम घातले असल्यामुळें, विसर्गाचे जागी इतर कोणताहि आदेश न होता विसर्गच झाला आहे, म्हणजे विसर्ग विसर्गरूपानेंच कायम राहिला आहे 'इह यथायथम्' इत्यादि जी पंक्ति प्रकृत सूत्रावरील कौमुदीत दिली आहे ती 'कः त्सरु' व 'घनाघन क्षोभण' या उदाहरणा-सबधानें लिहिली आहे प्रथम उदाहरणात सत्वाची प्राप्ति असून द्वितीय उदाहरणात जिह्वामूलीयाची प्राप्ति आहे पण त्या उदाहरणात 'खर शर्पर' असल्यामुळें सत्व व जिह्वामूलीय न होता. विसर्ग विसर्गरूपानेच कायम राहतो )

शब्दरत्न—नेत्येवोच्येतेति । "कुप्वो" इत्यत्रापि चेन सत्व नेत्ये-वानुवृत्त्यमिति भाव । स्यातामिति । सत्वनिषेधे "खरवसानयोः" इति विहितविसर्गस्य सत्वावेति भाव । विकारमात्रमिति । तत्सामर्थ्याद्विधानेन तस्यैव प्रत्यापत्तावपि न ताविति भाव । एतेनैतद्विहितस्य स्थानेऽपि तौ स्याताम् । किं चास्यैव तौ स्याता "खरवसानयो –" इति विहितस्य त्वेतयोरसिद्धत्वात् "विसर्जनीयस्य" इति सत्वमेव स्यादित्यपास्तम् । अर्थाधिकारेण "खरवसानयो" इति विहितविसर्गस्यैवातिदेशाच्च । विसर्जनीयस्य सोऽशर्परे इति तु न सूत्रं कृतम् । "वा शरि" इत्यनेन सत्वस्य विकल्पेन सिद्धावपि "कुप्वो." इत्यत्राशर्परे इत्यननुवृत्त्या तयोः शर्परेऽप्रवृत्तावपि "कुप्वो –" इति सूत्रे चाद्विसर्गलाभानापत्तेः ॥

('शर्परे विसर्जनीय' असें सूत्र पठित न करिता त्या ऐवजी पाणिनीनें) 'शर्परे न' असें सूत्र पठित केलें असते तर, 'कुप्वो.' या

पुढील सूत्रात देखील त्या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'च' या पदानें प्रकृत सूत्रातील 'न = सत्व न' याचेच अनुकर्षण झालें असतें असा दिक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे ('विसर्जनीयस्य स =' या सूत्राच्या ल्गेंच पुढें 'शर्परे विसर्जनीय' हें प्रकृत सूत्र अष्टाध्यायीत पठित केलें आहे व जर 'शर्परे न' असें प्रकृत सूत्र पठित केलें असतें तर त्या सूत्राचा 'शर्परे स न' असा अर्थ झाला असता आणि त्यामुळें 'कुप्वो ≍क ≍ पौ च' या पुढील सूत्रातील 'च' नें 'स न = सत्व न' याच अनुकर्षण झालें असतें व त्यामुळें 'कुप्वो' या सूत्रानें, जरी सत्वाचा निषेध झाला असता व विसर्गाचे जागीं जिव्हामूलीय व उपध्मानीय आदेश झाले असते तरी, त्या सूत्रातील 'च' नें, प्रकृत सूत्रातून 'विसर्जनीय' हें पद गाळल्यानें, त्या पदाचें अनुकर्षण होऊं शकलें नसतें व त्यामुळें विसर्गाचे जागीं विसर्गरूप पाक्षिक आदेशाची प्राप्ति झाली नसती ही आपत्ति टाळण्याकरिता देखील प्रकृत सूत्रात 'विसर्जनीय' या पदाचें मुद्दाम ग्रहण केलें आहे व तसें ग्रहण केलें असल्यामुळें, 'कुप्वो' या सूत्रातील 'च' या पदानें त्या सूत्रात विसर्जनीयाचें अनुकर्षण होतें आणि त्यामुळें त्या सूत्रानें विसर्गाचे जागीं विकल्पेंकरून विसर्ग देखील होतो) 'सत्वे निषिद्धेऽपि कुप्वोः ≍क≍पौ स्याताम्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे की, ('शर्परे न' असें जर प्रकृत सूत्र पठित केलें असतें तर 'विसर्जनीयस्य स' सू १३८ या सूत्रानें होणाऱ्या) सत्वाचा जरी निषेध झाला असता तरी, 'खरवसानयोर्विसर्जनीय' सू ७६ या सूत्रानें होणारा विसर्ग (सकारादेशाच्या अभावामुळें) विद्यमान राहत असल्यामुळें, त्या विसर्गाचे जागीं जिव्हामूलीय व उपध्मानीय आदेश होण्याची आपत्ति आली असती, (कारण 'शर्परे न' असें सूत्र केल्यानें 'न' या पदाचा 'सत्व न' एवढाच अर्थ झाला असता व 'कुप्वो' या पुढील सूत्रानें विसर्गाचे जागीं जी जिव्हामूलीय व उपध्मानीय या आदेशाची प्राप्ति आहे त्याची निवृत्ति झाली नसती व त्यामुळें विसर्गाचे जागीं ते आदेश होण्याची

आपत्ति आली असती ही आपत्ति टाळण्याकरिता देखील प्रकृत सूत्रात 'विसर्जनीय' या पदाचे मुद्दाम ग्रहण केले आहे ) आणि जरी प्रकृत सूत्रानें 'खरवसानयोर्विसर्जनीय' या सूत्रानें होणाऱ्या विसर्गाचीच प्रत्यापत्ति–पुन प्राप्ति–होते तरी, प्रकृत सूत्रात "विसर्जनीय" या पदाचें ग्रहण केले असल्यामुळें त्या ग्रहणसामर्थ्यानें त्या विसर्गाचे जागी (जसा सकारादेश होत नाही त्याच प्रमाणे ) जिव्हामूलीय व उपध्मानीय हे आदेश देखील होत नाहीत ( व विसर्ग विसर्गरूपानेंच कायम राहतो ) असा मनोरमेंतील विकारमात्र बाध्यते' या पदतीचा भावार्थ आहे (शब्दरत्नातील 'प्रत्यापत्तावपि' या पदाचा भैरवीत 'प्राप्तस्य विकारस्य निरसनपूर्वकस्वस्वरूपावस्थानेऽपि' असा अर्थ दिला आहे आता शंकाकार अशी शंका करतो की, ) 'शर्परे विसर्जनीय या प्रकृत सूत्रानें होणाऱ्या विसर्गाचे जागी देखील 'कुप्वो' या सूत्रानें होणारे जिव्हामूलीय व उपध्मानीय हे आदेश होण्याची प्राप्ति आहे आणखी असे की, 'शर्परे विसर्जनीय' या सूत्रानें होणाऱ्या विसर्गाचेच जागी जिव्हामूलीय व उपध्मानीय हे आदेश होऊ शकतात 'खरवसानयोर्विसर्जनीय' या सूत्रानें होणाऱ्या विसर्गाचे जागी ते आदेश होऊ शकत नाहीत, कारण 'विसर्जनीयस्य स' या त्रैपादिक पूर्व सूत्राच्या दृष्टीनें 'कुप्वो' हे त्रैपादिक पर सूत्र असिद्ध असल्यामुळें ('खरवसानयो' या सूत्रानें होणाऱ्या विसर्गाचे जागी 'विसर्जनीयस्य स' या सूत्रानें होणारा ) सकारादेशच होऊ शकतो पण (शब्दरत्न-कार म्हणतात की) 'विकारमात्र बाध्यते' असे जें मनोरमेंत विवेचन केले आहे त्यावरून शंकाकारानें केलेली शंका चूक ठरते ('खरवसानयोर्विसर्जनीय' ८ ३ १५ या सूत्रानंतर 'विसर्जनीयस्य स' ८ ३ ३४ हे सूत्र पठित असून त्यानंतर 'शर्परे विसर्जनीय' ८ ३ ३५ हे सूत्र पठित आहे व त्याच्याहि पुढें 'कुप्वो' ८ ३ ३७ हे सूत्र पठित आहे असा या त्रैपादिक सूत्राचा अष्टाध्यायीत पाठक्रम असल्यामुळें व 'पूर्वत्रासिद्धम्' हे वचन असल्यामुळें शंकाकार असे म्हणतो की, 'खरवसानयो' या सूत्रानें

होणाऱ्या विसर्गाचे सत्वच होऊ शकते व त्या विसर्गाचे जागी जिव्हामूलीय व उपध्मानीय हे आदेश होऊ शकत नाहीत, कारण 'विसर्जनीयस्य स' या पूर्व सूत्राच्या दृष्टीनें 'कुप्वो' हे परसूत्र असिद्ध आहे आणि म्हणून ते त्रैपादिक परसूत्र सत्वकार्याचा बाध करू शकत नाही व स्वतः प्रवृत्त होऊ शकत नाही पण 'विसर्जनीयस्य स' या पूर्वत्रैपादिक सूत्राच्या दृष्टीनें 'शर्परे विसर्जनीय' या त्रैपादिक परसूत्रानें होणारा विसर्ग असिद्ध ठरत असल्यामुळें व तो विसर्ग झालाच नाही असे मानावे लागत असल्यामुळें, त्या विसर्गाचे त्या पूर्व त्रैपादिक सूत्राने होणारे सत्व होऊ शकत नाही व 'कुप्वो' या पर त्रैपादिक सूत्रानें होणारे जिव्हामूलीय व उपध्मानीय हे आदेशच त्या विसर्गाचे जागी होऊ शकतात म्हणून 'विकारमात्र बाध्यते' असे जें दीक्षितानी मनोरमेंत म्हटले आहे तें बरोबर नाही व वास्तविक प्रकृत सूत्रानें होणाऱ्या विसर्गाचे जागी केवळ सकारादेश होऊ शकत नाही, पण जिव्हामूलीय व उपध्मानीय हे आदेश होण्यात काही प्रत्यवाय येत नाही या शकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, 'विकारमात्र बाध्यते' असे मनोरमेंत सिद्ध करून दाखविले असल्यामुळें वरील शका चूक ठरते दीक्षितानी जसा प्रकृत सूत्राचा 'शर्परे खरि विसर्जनीयस्य विसर्जनीय एव नत्वन्यत' असा अर्थ केला आहे तसाच अर्थ काशिकाकार व प्रक्रियाकौमुदीकार यानी देखील केला आहे व काशिकेंत तर 'नेति वक्तव्ये विसर्जनीयस्य विसर्जनीयादेशविधान विकारनिवृत्त्यर्थम । तेन जिव्हामूलीयोपध्मानीयौ न भवत' असे स्पष्ट म्हटले आहे काशिकाकार, प्रक्रियाकौमुदीकार व दीक्षित यानी प्रकृत सूत्राचा वरप्रमाणे जो अर्थ केला आहे तसा अर्थ करण्याचे कारण हे की, 'विसर्जनीयस्य स' या पूर्वसूत्रातून 'विसर्जनीयस्य' हें पद प्रकृत सूत्रात अनुवृत्त होत असून 'विसर्जनीय' हे पद या सूत्रात विधेयाशामध्यें घातले असल्यामुळें, 'शर्परे खरि विसर्जनीयस्य विसर्जनीय' असा प्रकृत सूत्राचा अर्थ होतो पण विसर्गाचे जागी विसर्ग होतो असे विधान

करणे निष्फळ असल्यामुळें, या अर्थीतून 'विसर्जनीयस्य विसर्जनीयः एव भवति न त्वन्यत्' असा अर्थ निष्पन्न होतो व त्यामुळें, प्रकृत सूत्र 'विसर्जनीयस्य स.' या सूत्रानें होणाऱ्या सत्वाचे व तसेच 'कुप्वो' या सूत्रानें होणाऱ्या जिव्हामूलीय व उपध्मानीय या आदेशाचें अपवादक ठरतें म्हणून अपवादत्वाचा विचार न करिता सूत्राचा केवळ पूर्वपरभाव मनांत धरून शकाकारानें जी शंका केली आहे ती अयोग्य ठरते व अपवादत्वामुळें जिव्हामूलीय व उपध्मानीय या आदेशाचा बाध होत असल्यामुळें, प्रकृत सूत्रानें होणाऱ्या विसर्गाचे जागी ते आदेश मुळीच होऊ शकत नाहीत व प्रकृत सूत्रातील 'विसर्जनीयः' या पदाच्या सामर्थ्यानें विसर्ग विसर्गरूपानेंच कायम राहतो असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. शब्दाधिकार मानण्यास कोणतेंहि प्रमाण नसल्यामुळें) अर्थाधिकार मानल्यानें, 'खरवसानयो' सू ७६ या सूत्रानें होणाऱ्या विसर्गाचाच ('कुप्वो' या सूत्रात) अतिदेश केला आहे हें सिद्ध होते, म्हणजे 'कुप्वो' सू १४२ या सूत्रानें ज्या विसर्गाचे जागी जिव्हामूलीय व उपध्मानीय आदेश होण्याचे विधान केले आहे तो विसर्ग 'खरवसानयो' या सूत्रानेंच होणारा विसर्ग आहे हे स्पष्ट होते, (कारण प्रकृत सूत्रात विसर्ग होण्याचे वास्तविक विधान केले नसून विसर्ग विसर्गरूपानेंच कायम राहतो याचे विधान केले आहे व 'खरवसानयो.' या सूत्रानेंच विसर्ग होण्याचे विधान केले आहे. म्हणून त्या सूत्रानें होणाऱ्या विसर्गाचे जागीच 'कुप्वो' या सूत्रानें होणारे जिव्हामूलीय व उपध्मानीय आदेश होऊ शकतात. त्यामुळें प्रकृत सूत्रानें होणाऱ्या विसर्गाचेच जागी जिव्हामूलीय व उपध्मानीय आदेश होऊ शकतात असें जें अप्रमाण शब्दाधिकार मानून शकाकारानें म्हटलें आहे तें चूक ठरतें. कारण जेथें दृढ प्रमाण उपलब्ध आहे तेथेंच शब्दाधिकार मानता येऊ शकतो व प्रकृत स्थली तसें कोणतेंहि प्रमाण उपलब्ध नसल्यामुळें अर्थाधिकारानुरोधानेंच सूत्रार्थ —रणे योग्य आहे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे )

'विसर्जनीयस्य सोऽशर्परे' असे ('विसर्जनीयस्य स' व प्रकृत सूत्र या दोन सूत्रा ऐवजी पाणिनीनें एकच) सूत्र पठित केलें नाहीं तसें सूत्र पठित केलें असतें तर, जरी 'वा शरि' सू. १५१ या सूत्रानें विसर्गाचे जागीं विकल्पेंकरून सकार व विसर्ग झाला असता व तसेच 'कुप्वोः' या सूत्रात 'अशर्परे' या पदाची अनुवृत्ति केल्यानें, 'शर्पर खर्' पुढें आला असता विसर्गाचे जागीं जिव्हामूलीय व उपध्मानीय आदेश झाले नसते तरी, 'कुप्वोः' या सूत्रातील 'च' या पदानें ('अशर्परे' या पदाचेच अनुकर्षण झाले असते व वर सुचविलेल्या सूत्रात 'विसर्जनीय' या पदाच्या अभावामुळें विसर्गाचें अनुकर्षण झाले नसते) व त्यामुळें विसर्गाचे जागीं विकल्पेंकरून विसर्गरूप आदेश न होण्याची आपत्ति आली असती (साराश वर मागितल्याप्रमाणे एकच सूत्र पठित केले असतें तर त्या सूत्रात 'विसर्जनीयः' हें पद नसल्यामुळें, विसर्गापुढें 'अशर्पर खर्' आला असता विसर्गाचे जागीं 'कुप्वोः' या सूत्रानें जिव्हामूलीय व उपध्मानीय हेच आदेश झाले असते व विकल्पेंकरून जो विसर्गरूप आदेश होणें इष्ट आहे तो आदेश मुळीच होऊ शकला नसता ही आपत्ति टाळण्याकरिता 'विसर्जनीयस्य स.' व 'शर्परे विसर्जनीय' अशी दोन भिन्न सूत्रें पाणिनीनें केली आहेत व अशी सूत्रें केली असल्यामुळें 'कुप्वोः' या सूत्रातील 'च' या पदानें 'शर्परे विसर्जनीय' या सूत्रातील 'विसर्जनीय.' हें पद अनुकृष्ट होते आणि त्यामुळें 'कुप्वोः' या सूत्रानें विसर्गाचे जागीं विकल्पेंकरून विसर्गरूप आदेश देखील होतो असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे )

मनोरमा — सोऽपदादौ ॥ अपदाद्योरिति । सूत्रे तु व्यत्ययेनैकवचनम् । यदि तु खर् विशेष्यतेऽपदादौ खरीति तदा यथाश्रुतं साधु । किं तु 'खरि' इति मण्डूकप्लुत्याऽनुवर्त्यमिति क्लेशः । न चानुवृत्तेरुत्तरत्राप्यावश्यकता । खरं विना विसर्गस्य दुर्लभत्वेन तदनुवृत्तेर्निष्फलत्वात् । पाशकल्पककाम्येष्विति वृत्तिः ।

सम्भवप्रदर्शनमेतन्न तु परिगणनम् । अन्यस्यासम्भवात् । प्रातः कल्पमिति । अधिकरणशक्तिप्रधानस्यापि प्रातःशब्दस्येह वृत्तिविषये शक्तिमत्परत्वम् । दोषाभूतमहः, दिवाभूता रात्रिरितिवत् । गीः काम्यतीति । इह "इण षः" इति षत्वं न । तत्रापि "काम्ये रोरेव" इत्यस्यानुवृत्तेः । यदि तु तत्रैवेद पठ्येत तर्हि षत्वमात्रप्रतिषेधेऽपि पूर्वेण सत्वं स्यात् ।।

( 'सोऽपदादौ' सू १५२ या सूत्रात 'कुप्वो' या पूर्व सूत्रातून 'कुप्वो' या द्विवचनान्त पदाची अनुवृत्ति होत असल्यामुळें आणि त्या अनुवृत्त पदाचे प्रकृत सूत्रातील 'अपदादौ' हें पद विशेषण होत असल्यामुळे, कौमुदीत 'अपदादौ' याचा 'अपदादो' असा द्विवचनामध्ये विपरिणाम केला आहे, कारण विशेष्य द्विवचनान्त असल्यामुळें त्याचे विशेषण देखील द्विवचनान्त असलें पाहिजे म्हणून वास्तविक पाणिनीनें 'सोऽपदादो' असें प्रकृत सूत्र पठित करावयास पाहिजे होतें पण 'छन्दोवत्सूत्राणि भवन्ति' असें भाष्यवचन असल्यामुळें व 'व्यत्ययो बहुलम्' सू. ३४३३ असें सूत्र असल्यामुळें ) प्रकृत सूत्रात द्विवचनाचे जागी एकवचनाचा प्रयोग व्यत्ययानें–वचनात फरक करुन–केला आहे. जर ( 'खरवसानयोर्विसर्जनीय' या पूर्व सूत्रातून जशी 'विसर्जनीयस्य स' व 'शर्परे विसर्जनीय' या सूत्रात 'खरि' या पदाची मण्डूकप्लुतीनें अनुवृत्ति केली आहे तशी प्रकृत सूत्रात ) 'खरि' या पदाची अनुवृत्ति केली व त्या अनुवृत्त 'खरि' या पदाचे 'अपदादौ' हे विशेषण मानून 'अपदादौ खरि' असा अन्वय केला तर प्रकृत सूत्रातील 'अपदादौ' हा एकवचनाचा प्रयोग साधु ठरतो. परंतु तसे केल्यास प्रकृत सूत्रात 'खरि' या पदाची मण्डूकप्लुतीनें अनुवृत्ति करावी लागते व तशा तऱ्हेची अनुवृत्ति करण्यात क्लेश–दोष–होतो. ( प्रकृत सूत्राच्या पुढील सूत्रात 'खरि' या पदाच्या अनुवृत्तीची आवश्यकता असती तर प्रकृत सूत्रात त्या पदाची मण्डूकप्लुतीनें अनुवृत्ति करणे क्षम्य झाले असते परंतु) उत्तर सूत्रात 'खरि' या पदाची अनुवृत्ति करणे आवश्यक नाही ( कारण उत्तर सूत्रात विसर्गाला

कार्य होणे सांगितले आहे व) 'खर्' पुढें असल्याशिवाय विसर्ग होऊंच शक्त नसल्यामुळें, उत्तर मूत्रात 'खरि' या पदाची अनुवृत्ति करणे व्यर्थ ठरते (म्हणून तशी दोषयुक्त मण्डूकप्लुतीनें अनुवृत्ति न करिता कौमुदीत जसा एकवचनाचा व्यत्यय करून प्रकृत मूत्राचा अर्थ केला आहे तसेंच करणे योग्य आहे असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे या पक्तीचें अधिक विवरण शब्दरत्नात करण्यात येईल ) 'पाशकल्पककाम्येपु' ( हे वार्तिक नसून ) काशिकाकाराची वृत्ति आहे ( कारण असे वार्तिक भाष्यात पठित नाही ) तसेंच हे परिगणन नव्हे, पण हेच प्रत्यय पुढें येण्याचा संभव आहे असें या वचनात प्रदर्शित केले आहे, कारण या चार प्रत्ययाखेरीज दुसरा कोणताहि ( ककारानें किंवा पकारानें सुरु होणारा ) प्रत्यय पुढें येण संभवत नाही ( जर या चार प्रत्ययाखेरीज ककारानें किंवा पकारानें सुरु होणारे इतर प्रत्यय पुढे येण संभवनीय असते तर परिगणन करणे आवश्यक ठरलें असतें आणि तशा स्थितीतच 'पाशकल्पककाम्येपु' हे काशिकेतील वचन परिगणन मानता आले असत ) 'प्रात कल्पम्' या उदाहरणातील 'प्रात' हे अव्यय जरी अधिकरणशक्तिप्रधान, म्हणजे 'प्रात काले' या सप्तम्यर्थाचे वाचक आहे तरी, 'प्रात कल्पम्' या शब्दाची वृत्ति करतेवेळी ( 'प्रातः' हा शब्द अधिकरणार्थक–सप्तम्यर्थाचा वाचक–न मानता कालवाचक, म्हणजे 'प्रात काल' या अर्थाचा वाचक, मानल्यानें व अशा रीतीनें त्यास समस्यमान होण्याची ) शक्ति आहे असे मानल्यानें वृत्ति करता येते ( 'ईषदसमाप्तौ कल्पब्देश्यदेशीयर' सू २०२२ या सूत्रानें 'प्रातर्' या अव्ययाहून 'कल्पप्' प्रत्यय झाला आहे व 'खरवसानयो' सू ७६ या सूत्रानें 'प्रातर्' यातील अन्त्यरेफाचा विसर्ग होऊन 'प्रात कल्पम्' हे रूप सिद्ध झाले आहे आणि 'ईषदसमाप्तः प्रात काल प्रात कल्पम्' अशी या शब्दाची वृत्ति आहे 'कल्पप्' प्रत्यय लावतेवेळी 'प्रात' हा शब्द अधिकरणार्थाचा–सप्तम्यर्थाचा–वाचक मानल्यास, वर सामानाधिकरण्यानें केलेली इष्ट वृत्ति होऊ शकणार

नाही म्हणून तो शब्द 'प्रात काल' या कालरूप अर्थाचा वाचक मानणे आवश्यक आहे या स्थली 'प्रात' हे अव्यय असल्यामुळें व 'अनव्ययस्येति वाच्यम्' हे वार्तिक असल्यामुळें, प्रकृत सूत्रानें प्राप्त होणारे विसर्गाचे सत्व झाले नाही ) 'दोपाभूतमह, दिवाभूता रात्रि' या स्थली जशी वृत्ति केली जाते, म्हणजे जरी 'दोषा' व 'दिवा' ही अधिकरणशक्तिप्रधान अव्ययें असून देखील वृत्ति करते-वेळी ते कालार्थाचे वाचक होतात, तशीच 'प्रात कल्पम्' या स्थली वृत्ति केली पाहिजे 'गी काम्यति' या उदाहरणात 'इण प' सू १५३ या सूत्रानें होणारे विसर्गाचे षत्व होत नाही, कारण त्या सूत्रात देखील 'काम्ये रोरेव' या वार्तिकाची अनुवृत्ति आहे ('गृ निगरणे' या धातूहून क्विप् प्रत्यय केला असता 'ऋत इद्धातो' सू २३९० या सूत्रानें धातूतील ऋकाराचा इकार होऊन व 'उरण्-रपर' सू ७० या सूत्रानें त्या इकारापुढें रकार होऊन 'गिर्' असे रूप झाल्यावर 'गिरमात्मन इच्छति' या अर्थामध्यें 'काम्यच्' सू २६६३ या सूत्रानें काम्यच् प्रत्यय होऊन व 'र्वोरुपधाया दीर्घ इक' सू ४३३ या सूत्रानें उपधेतील इकार दीर्घ होऊन आणि 'खरवसानयो' सू ७६ या सूत्रानें 'गीर्' यातील अन्त्यरेफाचा विसर्ग होऊन 'गी काम्यति' हें रूप सिद्ध होते या उदाहरणात झालेल्या विसर्गापूर्वी जरी 'ई' हा 'इण्' आहे व त्या विसर्गापुढें ककार आहे तरी तो विसर्ग रुस्थानिक नसून 'गीर्' यातील रेफाचे जागी झालेला विसर्ग असल्यामुळें व 'काम्ये रोरेव' हें प्रकृत सूत्रावर पठित केलेले वार्तिक 'इण प' या सूत्रात अनुवृत्त होत असल्यामुळे, येथें विस-र्गाचे षत्व झाले नाही ) जर 'काम्ये रोरेव' हे वार्तिक ( प्रकृत सूत्रात पठित न करिता ) 'इण प' या उत्तर सूत्रातच पठित केले असते तर, जरी केवळ षत्वाचा प्रतिषेध झाला असता तरी ( 'सोऽपदादौ' या प्रकृत ) पूर्व सूत्रानें विसर्गाचे सत्व होण्याची आपत्ति आली असती ( ही आपत्ति टाळण्याकरिताच ते वार्तिक वार्तिककारानें 'सोऽपदादौ' या प्रकृत पूर्व सूत्रात पठित केले आहे

आणि त्यामुळें 'गी काम्यति' या स्थली विसर्गाचें सत्व देखील होत नाहीं. तें वार्तिक 'इण- षः' या उत्तर सूत्रात अनुवृत्त होत असल्या- मुळें वरील उदाहरणात विसर्गाचें षत्व देखील होत नाही हे वर सांगितलेंच आहे. )

शब्दरत्न— व्यत्ययेनेति । सौत्रत्वादिति भावः । इति क्लेश इति । किं च पूस्तरेत्यादौ षत्वादिवारणाय "कुप्वोः" इत्यनुवर्त्यं तदन्तर्गते खरीति व्याख्याने सुतरां क्लेश इत्यपि बोध्यम् । अन्यस्या- सम्भवादिति । अयं भावः । अपदे, इत्येव "कुप्वोः" इत्यनुवर्त्यं "यस्मिन्विधिः—" इति परिभाषया कुपवर्गादौ अपदे इत्यर्थेन सिद्धे आदिग्रहणमपदस्यैवादिरित्यर्थलाभार्थम् । तेनोरः कायतीति विग्रहे सुबुत्पत्तेः पूर्वं समासेऽप्युरःकेणेत्यादौ न सत्वम् । आदिग्रहणसामर्थ्येन तल्लक्षणपरिभाषयारणेन च पदत्वयोग्यप्रातिपदिकावयवस्यैव ग्रहणादिति । शक्तिमत्स्वरत्वमिति । अप्ययत्वं तु भूतपूर्वगत्या बोध्यमिति भावः । षत्वं नेति । सत्वं नेत्यपि बोध्यम् । तत्रापि–षत्व विधावपि । एवं चात्र पाठात्तत्रानुवृत्तेश्चोभयमपि नेति बोध्यम् ॥

'व्यत्ययेनैकवचनम्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचें कारण हें की, ('अपदादौ' हा) सौत्र प्रयोग, म्हणजेच 'छन्दोवत् सूत्राणि भवन्ति' या भाष्यवचनान्वयें छान्दस प्रयोग आहे. प्रकृत सूत्रात ('सरजसानयोः' या सूत्रांतून) 'खरि' या पदाची मण्डूक- प्लुतीनें अनुवृत्ति करण्यात क्लेश–दोष–तर आहेच, पण त्याशिवाय 'पूस्तरा' इत्यादि स्थली ('इणः षः' सू. १५३ या सूत्रानें होणाऱ्या) षत्वाचें निवारण करण्याकरितां त्या सूत्रांत ('कुप्वोः' या पूर्व सूत्रांतून) 'कुप्वोः' या पदाची अनुवृत्ति करणे आवश्यक आहे. (त्यामुळें त्या सूत्रापूर्वी पठित असलेल्या प्रकृत सूत्रात देखील 'कुप्वोः' या पदाची अनुवृत्ति करणे आवश्यक आहे. प्रकृत सूत्रात 'कुप्वोः' या पदाची अनुवृत्ति न केल्यास, 'इणः षः' या पुढील सूत्रांत त्या पदाची मण्डूकप्लुतीनें अनुवृत्ति करण्याचा दोष येईल.)

व तशी अनुवृत्ति करून पुन्हा प्रकृत सूत्रात 'खरि' या पदाची अनुवृत्ति करणे आणि कवर्गात व पवर्गात अन्तर्भूत असलेलाच अपदादि–पदाचा आदि नसणारा–'खर्' विसर्गापुढें आला असता विसर्गाचे सत्व होते असा प्रकृत सूत्राचा अर्थ करणे यात अधिकच क्लेश आहेत ('कुप्वो' या सूत्रातील 'कुप्वो' ही औपश्लेषिक सप्तमी आहे व जर 'कुप्वो' आणि 'खरि' या दोन्ही पदाची प्रकृत सूत्रात अनुवृत्ति केली तर प्रकृत सूत्रात 'कुप्वो' ही निर्धारणे सप्तमी मानावी लागेल, म्हणजे 'कवर्गातील व पवर्गातील 'खर्' पुढे असताच असा निर्धारणरूप अर्थ करावा लागेल, व असे करण्यात अधिकच क्लेश आहेत हे उघड आहे सारांश प्रकृत सूत्रात 'खरि' या पदाची अनुवृत्ति न करिता 'कुप्वो' या पदाची अनुवृत्ति केल्यानेंच इष्टसिद्धि होऊ शकत असल्यामुळें व 'खरि' या पदाची देखील त्याशिवाय अनुवृत्ति केल्यानें तोच अर्थ निष्पन्न होत असल्यामुळें, 'खरि' या पदाची प्रकृत सूत्रात मण्डूकप्लुतीनें अनुवृत्ति करणे जशी वर सांगितल्याप्रमाणे दोषयुक्त ठरते तशीच ही व्यर्थ देखील ठरते, कारण 'खर्' पुढें असल्याशिवाय विसर्ग उपलब्ध होऊ शकत नाही आणि ज्याअर्थी प्रकृत सूत्रानें विसर्गाचे सत्व आणि 'इण ष' या पुढील सूत्रानें विसर्गाचे षत्व होणे सांगितले आहे त्याअर्थी त्या विसर्गापुढें 'खर्' असलाच पाहिजे हे आपोआपच सिद्ध होते व त्यामुळें त्या दोन्ही सूत्रात 'खरि' या पदाची अनुवृत्ति करण्याची काहीच आवश्यकता नाही व 'कुप्वो' एवढ्याच पदाची अनुवृत्ति करणे आवश्यक व योग्य आहे आणि तशी अनुवृत्ति केल्यानें 'पूस्तरा' या स्थली 'इण ष' या सूत्राने होणाऱ्या षत्वाचे निवारण होते. 'इयमनयोरतिशयेन पूः पूस्तरा' अशी 'पूस्तरा' या शब्दाची वृत्ति आहे या स्थली 'पूर्' या शब्दाहून 'द्विवचनविभज्योपपदे तरबीयसुनौ' सू २००५ या सूत्रानें 'तरप्' प्रत्यय होऊन नंतर 'टाप् = आ' हा स्त्रीत्वबोधक प्रत्यय झाला आहे 'पूर् तरप् टाप्' अशा स्थितीत 'पूर्' या

पदाच्या अन्ती रेफ असून त्या रेफापुढें तकार हा 'खर्' असल्यामुळें, 'खरवसानयो' सू ७६ या सूत्रानें त्या रेफाचा विसर्ग होऊन व नतर 'विसर्जनीयस्य स' सू १३८ या सूत्रानें विसर्गाचा सकार होऊन 'पूस्तरा' असे रूप सिद्ध होतें जर 'इण प' या सूत्रात 'कुप्वो' या पदाची अनुवृत्ति न करता 'खरि' या पदाची अनुवृत्ति केली असती तर, वरील उदाहरणात 'ऊ' या 'इण्'पुढें विसर्ग असून त्या विसर्गापुढें तकार हा 'खर्' असल्यामुळें, विसर्गाचें षत्व झालें असतें व 'पूस्तरा' असें इष्ट रूप सिद्ध न होता 'पूष्टरा' असें अनिष्ट रूप होण्याची आपत्ति आली असती पण त्या सूत्रात 'कुप्वो' या सूत्रातून 'कुप्वो' या पदाची अनुवृत्ति केल्यानें वरील उदाहरणात विसर्गापुढें कवर्गातील किंवा पवर्गातील वर्ण नसून तकार असल्यामुळें ती आपत्ति टळते आणि त्या सूत्रात 'कुप्वो' या पदाची मण्डूकप्लुतीनें अनुवृत्ति करण्याचा दोष न यावा याकरिता, त्या सूत्राच्या व 'कुप्वो' या सूत्राच्या मध्यें जें प्रकृत सूत्र पठित आहे त्या प्रकृत सूत्रात देखील 'कुप्वो' या पदाची अनुवृत्ति मानणें आवश्यक आहे व ती मानल्यानें पूर्वी सांगितल्याप्रमाणे प्रकृत सूत्रात व 'इण प' या सूत्रात 'खरि' या पदाची पुन्हा अनुवृत्ति करण्याची काही गरज राहत नाही, कारण जरी कवर्गातील व पवर्गातील प्रथम दोनच वर्ण 'खर्' असून बाकीचे तीन वर्ण 'असर्' आहेत तरी, तथा 'असर्' वर्णापूर्वी विसर्ग येणें शक्य नसून त्या दोन वर्गातील 'खर्' वर्णापूर्वीच तो येणे शक्य असल्यामुळें, वरील दोन सूत्रात 'कुप्वो' या पदाची अनुवृत्ति केल्यावर पुन्हा 'खरि' या पदाची अनुवृत्ति करणे व्यर्थ आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा भावार्थ आहे ) 'अन्यम्यासम्भवात्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे की, 'सोऽपदे' असें जरी प्रकृत सूत्र पठित केलें असतें तरी त्या सूत्रात 'कुप्वो' या पदाची अनुवृत्ति केल्यानें, 'यस्मिन्विधिस्तदादावल्ग्रहणे'—परि ३३—या परिभाषान्वयें 'कुप्वो' या पदाचा 'कपवर्गादौ' असा

अर्थ झाला असता व 'कुप्वर्गादौ अपदे परे सति विसर्जनीयस्य स स्थान' असा त्या सूत्राचा अर्थ झालाच असता असे असून देखील ('अपदे' असा शब्द न घालता 'अपदादौ' असा जो शब्द प्रकृत सूत्रात घातला आहे व त्या शब्दात) 'आदि' या शब्दाचे जें ग्रहण केले आहे ते अशाकरिता केले आहे की, कुप्वर्गातील वर्ण हा अपदाचाच आदि असावा असा प्रकृत सूत्राचा अर्थ व्हावा असा प्रकृत सूत्राचा अर्थ केल्यानें 'उरः करोतीति उरः कः तेन उरः केण' या उदाहरणात सुबुत्पत्ति होण्यापूर्वी जरी समास होतो तरी विसर्गाचे जागी सकार होत नाही. प्रकृत सूत्रात 'आदि' या शब्दाचे ग्रहण केले असल्यामुळें व त्या शब्दाच्या ग्रहणसामर्थ्यानें 'अपदस्यैव' असा अवधारणरूप अर्थ सिद्ध होत असल्यामुळें, प्रकृत सूत्रातून असा अर्थ निघतो की, विसर्गापुढें येणारा कवर्गातील किंवा पवर्गातील वर्ण पदसंज्ञा होण्यास योग्य असलेल्या प्रातिपदिकाचा देखील आद्य अवयव नसावा ('कै शब्दे' या धातूहून 'आतोऽनुपसर्गे कः' सू. २९१५ या सूत्रानें 'क = अ' प्रत्यय केला असता, 'आदेच उपदेशे' सू. २३७० या सूत्रानें 'कै' चा 'का' होऊन व 'आतो लोप इटि च' सू. २३७२ या सूत्रानें 'का' यातील आकाराचा लोप होऊन 'क + अ = क' असे कृत्प्रत्ययान्त प्रातिपदिक होते. या 'क' शब्दाचा 'उर' या शब्दाशी समास करतेवेळी 'गतिकारकोपपदानां कृद्भिः सह समासवचनं प्राक् सुबुत्पत्तेः'—परि ७६—या परिभाषान्वयें 'क' या शब्दाहून विभक्तिप्रत्यय होण्यापूर्वीच समास होतो. या स्थली 'क' हें पद नसून प्रातिपदिक आहे व त्यात ककार आदि आहे म्हणून 'उरः कः' या स्थली प्रकृत सूत्रानें विसर्गाचा सकार का होऊ नये ? या प्रश्नाचे उत्तर हें आहे की, जरी समास करतेवेळी 'क' हें पद नसून प्रातिपदिक आहे तरी, त्याहून सुबुत्पत्ति झाल्यावर त्याला पदसंज्ञा होण्याची योग्यता आहे त्यामुळें 'उरः' यातील विसर्गाचा प्रकृत सूत्रानें सकार होत नाही व विसर्गाचा सकार झाला नसल्यामुळेंच, 'शर्द्वृष्यान्तुम्व्यवायेऽपि' सू. १९७ या सूत्रानें 'उर

केण' या स्थली नकाराचे णत्व झाले आहे. पण 'व्यूढोरस्केन' या उदाहरणात 'व्यूढोर.' या शब्दापुढें 'उरः प्रभृतिभ्यः कप्' सू. ८८९ या सूत्रानें झालेला समासान्त 'कप् = क' प्रत्यय आला असल्यामुळें व 'अर्थवदधातुरप्रत्ययः प्रातिपदिकम्' सू. १७८ या सूत्रान्वयें त्या 'कप्' प्रत्ययाला प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकत नसल्यामुळें आणि म्हणून त्याहून सुबुत्पत्ति होणे अशक्य असल्यामुळें व अशा रीतीनें त्याचे ठिकाणी 'सुप्तिङन्तं पदम्' सू. २९ या सूत्रानें होणारी पदसंज्ञा होण्याची मुळीच योग्यता नसल्यामुळें, या द्वितीय उदाहरणात प्रकृत सूत्रानें विसर्गाचा सकार होतो व अशा रीतीनें सकाराचा व्यवाय–व्यवधान–होत असल्यामुळें, नकाराचे णत्व होत नाही.) 'प्रातः कल्पम्' या उदाहरणात 'प्रात.' या शब्दाला भूतपूर्वगतीनें, म्हणजे तो पूर्वी अव्ययसंज्ञक असल्यामुळे, अव्ययसंज्ञा होते हें ध्यानात ठेवावे. ( 'प्रातःकल्पम्' या स्थली 'प्रात.' या शब्दाचा 'प्रात. काल.' असा अर्थ होत असल्यामुळें तो शब्द अव्ययसंज्ञक मानता येत नाही, कारण अधिकरणार्थवाचक, म्हणजे 'प्रात. काले' या अर्थाच्या वाचक, 'प्रात.' शब्दालाच 'स्वरादि निपातमव्ययम्' सू. ४४७ या सूत्रानें अव्ययसंज्ञा होते, कारण तसा अधिकरणार्थवाचक 'प्रातर्' शब्द स्वरादिगणात पठित आहे. म्हणून 'अनव्ययस्य' या वार्तिकान्वये 'प्रातःकल्पम्' या स्थली विसर्गाचे सत्व का होऊ नये अशी शंकाकाराची शंका आहे. या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, जरी वृत्ति करतेवेळी 'प्रात' हा शब्द कालवाचक होत असून अधिकरणार्थवाचक राहत नसल्यामुळें अव्ययसंज्ञक मानता येत नाही तरी, वृत्ति करण्यापूर्वी तो अधिकरणशक्तिप्रधान 'प्रातर्' शब्द अव्ययसंज्ञक होता आणि म्हणून 'साम्प्रतिकाभावे भूतपूर्वगतिः'–परि. ७७–या परिभाषान्वयें त्याच्या पूर्वी असलेल्या अव्ययसंज्ञेचा आश्रय केल्यानें, म्हणजेच भूतपूर्वगतीनें, तो शब्द अव्ययसंज्ञक ठरतो आणि अशा रीतीनें वृत्ति करतेवेळी तो शब्द कालवाचक असून देखील 'कावदत् देवदत्तस्य गृहम्' या न्यायान्वयें अव्ययसंज्ञक मानला जाऊ शकत

असल्यामुळें व 'अनव्ययस्य' हे निषेधक वार्तिक असल्यामुळें, 'प्रात' यातील विसर्गाचे प्रकृत सूत्रानें होणारे सत्व होत नाही. ) 'गी काम्यति' या उदाहरणात ( जसें 'इण ष' या सूत्रानें होणारे विसर्गाचे षत्व होत नाही तसेंच 'सोऽपदादौ' या प्रकृत सूत्रानें होणारे विसर्गाचे ) सत्व देखील होत नाही ( कारण 'काम्यच्' प्रत्यय पुढें आला असता 'स'चे जागी होणाऱ्या विसर्गाचेच षत्व किंवा सत्व होणें व पूर्वी सांगितल्याप्रमाणे 'गी' या स्थली जो विसर्ग झाला आहे तो 'स' स्थानिक नसून 'गीर्' यातील रेफाचे जागी झाला असल्यामुळें, त्याचे सत्व किंवा षत्व होऊ शकत नाही ) मनोरमेंतील 'तत्रापि' या पदाचा 'षत्वविधावपि,' म्हणजे 'इण ष' या षत्वविधायक सूत्रात देखील, ( 'काम्ये रोरेव' या वार्तिकाची अनुवृत्ति असल्यामुळें ) असा अर्थ आहे सारांश 'सोऽपदादौ' या प्रकृत सूत्रावर 'काम्ये रोरेव' हें वार्तिक पठित असल्यामुळें व 'इण ष' या उत्तर सूत्रात त्या वार्तिकाची अनुवृत्ति होत असल्यामुळें 'गी काम्यति' या उदाहरणात ( सस्थानिक नसणाऱ्या विसर्गाचे ) षत्व व सत्व ही दोन्ही होत नाहीत हें ध्यानात ठेवावे

मनोरमा— "इण ष." पूर्वस्यापवाद. । इह सूत्रं "सः" इति च द्वयमपि उत्तरत्रानुवर्तते । यथा सम्भवमिण. परस्य षोऽन्यस्य स इति विवेक ।

'इण ष' सू १५३ हे सूत्र 'सोऽपदादौ' सू १५२ या पूर्व-सूत्राचे अपवादक सूत्र आहे 'इण ष' हे प्रकृत सूत्र व 'सोऽपदादौ' या सूत्रातील 'स' हे पद उत्तर सूत्रामध्यें अनुवृत्त होते. जेथें उत्तर सूत्राच्या उदाहरणात 'इण्' पुढें विसर्ग आला असेल तेथें विसर्गाचे षत्व होते व जेथें इण्भिन्नापुढें विसर्ग आला असेल तेथें विसर्गाचे सत्व होते असा या दोन स्थली फरक होतो. ( उदाहरणार्थ 'सर्पिष्पाशम्, पुरस्करोति' इत्यादि )

मनोरमा—पुरः प्रवेष्टव्या इति । पृ पालनपूरणयोः "भ्राजभास-" इत्यादिना क्विप् । तदन्ताज्जस् । जसन्ततां स्फुटीकर्तुं पूः पुराविरयुपन्यस्तम् ॥

('नमस्पुरसोर्गत्योः' सू. १५४ या सूत्रावरील कौमुदीत 'अगतित्वान्नेह । पूः पुरौ पुरः प्रवेष्टव्याः' हें जें प्रत्युदाहरण दिलें आहे त्यांतील) 'पुरः' हा शब्द 'पृ पालनपूरणयोः' या धातूहून 'भ्राजभास' सू. ३१५७ या सूत्रानें क्विप् प्रत्यय होऊन व त्या क्विबन्ताहून 'जस्' हा विभक्तिप्रत्यय होऊन सिद्ध झाला आहे. हा जसन्त शब्द आहे (व गतिसंज्ञक 'पुरः' हा प्रकृत सूत्रांत निर्दिष्ट असलेला 'पुरः' हा शब्द नव्हे) हें स्पष्ट करण्याकरितां 'पूः पुरौ पुरः' असा वरील प्रत्युदाहरण देतेवेळी कौमुदीत उपन्यास केला आहे. ('पृ' धातूहून 'भ्राजभास' या सूत्रानें क्विप् प्रत्यय केला असतां, 'उदोष्ठ्यपूर्वस्य' सू. २४९४ या सूत्रानें 'पृ' यांतील ऋकाराचा उकार होऊन व 'उरण्रपरः' सू. ७० या सूत्रानें त्या उकारापुढें रकार होऊन 'पुर्' असें क्विबन्त प्रातिपदिक सिद्ध झाल्यावर त्या प्रातिपदिकाहून प्रथमेच्या बहुवचनाचा 'जस् = अस्' प्रत्यय केल्यानें 'पुर् + अस् = पुरः' असें प्रथमेच्या बहुवचनाचें रूप सिद्ध होतें. हा अव्यय नसणारा 'पुरस्' शब्द गतिसंज्ञक नसल्यामुळें, 'नमस्पुरसोर्गत्योः' या सूत्रानें होणारें विसर्गाचें सत्व 'पुरः प्रवेष्टव्याः' या उदाहरणांत झालें नाहीं.)

मनोरमा—"इदुदुपधस्य" ॥ इदुतौ उपधे यस्य समुदायस्य तस्यावयवो यो विसर्जनीय इति वैय्यधिकरण्येन सम्बन्धः । "अप्रत्ययस्य" इति तु अप्रत्ययो यो विसर्ग इति सम्बद्ध्यते । सम्भवति सामानाधिकरण्ये वैयधिकरण्यस्यान्याय्यत्वात् । न च विसर्गस्य प्रत्ययत्वमप्रसिद्धमिति वाच्यम् । अग्निः करोतीत्यादौ स्थानिवद्भावेन तत्प्रसिद्धेः । न चातिदेशं प्रति त्रिपाद्या असिद्धत्वं शङ्क्यम् "अप्रत्ययस्य" इति निषेधेनैव सिद्धत्वज्ञापनात् । अत

एवाग्निरित्यादौ रोविसर्गं सिद्ध्यति। अन्यथाऽपदान्तत्वान्न स्यात्। विसर्गविधिस्तु पुनरित्यादौ चरितार्थः। ज्ञापकं च विशेषापेक्षम्। तेन "अच परस्मिन्–" इति त्रिपाद्यां न प्रवर्तते। एवं च "पूर्वत्रासिद्धे न स्थानिवत्" इति सिद्धान्त उक्तयुक्तिमूलको न तु वाचनिक इति प्रपञ्चितं शब्दकौस्तुभेऽस्माभिः। नन्वेवं मातुः कार्यमित्यादौ षत्वं स्यादिति चेन्न। कस्कादिषु भ्रातुष्पुत्रशब्दस्य पाठेन इसिउसोः अत उकारात्परस्य षत्वं नेति ज्ञापनात्। एवं च अप्रत्ययस्य इत्येतदपि व्यधिकरणमेवेति हरदत्तेनोक्तं नालोचादर्तव्यम्। मातुरिति। अत्र हि "ऋत उत्" इत्येकादेशशास्त्रं विसर्गं प्रति परम्परया प्रयोजकम्। आकरे तु एकादेशशास्त्रनिमित्तात्" इति प्रचुर. पाठः। तत्र एकादेशशास्त्रं निमित्तं यस्य उकारस्य तस्मादित्यर्थः॥

मुहुः कामेति। इह "कुप्वोः ≍क≍पौ" इति प्रवर्तते। वृत्तौ मुहुस्कामेति सकारं क्वचित् पठ्यते, तत्प्रामादिकमिति हरदत्तः।

'इदुदुपधस्य चाप्रत्ययस्य सू १५५ या सूत्रातील 'इदुदुपधस्य' या पदाचा 'इदुतौ उपधे यस्य समुदायस्य' असा विग्रह होऊन त्याचा 'तस्यावयवो या विसर्जनीय' असा 'विसर्जनीय' या पदाशी वैयधिकरण्यानें अन्वय होतो (प्रकृत सूत्रात 'विसर्जनीयस्य स' या पूर्वसूत्रातून 'विसर्जनीयस्य' हें पद अनुवृत्त होतें व 'इदुदुपधस्य' याचा 'विसर्जनीयस्य' या पदाशी सामानाधिकरण्यानें अन्वय केल्यास, 'इदुतौ उपधे यस्य विसर्जनीयस्य' असा अर्थ होईल. परंतु 'उपधा' या अवयववाचक शब्दानें अवयवीचा, म्हणजे समुदायाचा, आक्षेप होत असल्यामुळें, 'इदुदुपधस्य' हें 'समुदायस्य' याचे विशेषण होतें व 'समुदायस्य' ही अवयवषष्ठी मानल्यानें तशा समुदायाचा अवयव जो विसर्ग असा वैयधिकरण्यानें अन्वय होतो) प्रकृत सूत्रातील 'अप्रत्ययस्य' हे पद (अनुवृत्त असलेल्या 'विसर्जनीयस्य' या पदाचे विशेषण होत असल्यामुळें) 'अप्रत्ययो यो विसर्गः' असा त्या दोन पदाचा सामानाधिकरण्यानें अन्वय होतो (व 'प्रत्ययावयवभिन्नो यो विसर्गः'

असा वैयधिकरण्यानें अन्वय होत नाही,) कारण जेथें सामानाधिकरण्यानें अन्वय होणें संभवत तेथें वैयधिकरण्यानें अन्वय करणं अयोग्य आहे ('इदुदुपधस्य' या समुदायवाचक पदाचा 'विसर्जनीयस्य' या पदाशी सामानाधिकरण्यानें अन्वय होणें संभवत नसल्यामुळें, दीक्षितानीं त्या दोन पदाचा वैयधिकरण्यानें अन्वय केला आहे परंतु 'अप्रत्ययस्य' व विसर्जनीयस्य' या दोन पदाचा सामानाधिकरण्यानें अन्वय होणें संभवत असल्यामुळें व तसा अन्वय जेथें होऊं शकतो तेथें वैयधिकरण्यानें अन्वय करणें बरोबर नाही असा न्याय असल्यामुळें, त्यानी या दोन पदाचा सामानाधिकरण्यानेंच अन्वय केला आहे आणि त्यामुळें 'इदुदुपधस्य समुदायस्य अवयवरूप प्रत्ययभिन्नो यो विसर्गः तस्य षः स्यात् कुप्वोः परयोः' असा त्याच्या मतं प्रकृत सूत्राचा अर्थ होतो ) विसर्ग प्रत्ययरूपानें कोठेंहि प्रसिद्ध नाही हे म्हणणं बरोबर नाही, कारण 'अग्निः करोति' इत्यादि स्थली तो प्रत्ययरूपानें, स्थानिवद्भाव केल्यानें, आढळतो ('अग्नि + सु' या स्थली 'ससजुषो रुः' सू. १६२ या सूत्रानें 'सु' प्रत्ययाचे जागीं 'रु' होऊन व 'खरवसानयो:' सू. ७६ या सूत्रानें त्या 'रु' चा विसर्ग होऊन तो रुस्थानिक विसर्ग स्थानिवद्भावानें प्रत्यय मानता येतो व अशा रीतीनें, जरी विसर्ग हा प्रत्ययरूपानें पाणिनीनें साक्षात् पठित केला नाही तरी, जेव्हां तो प्रत्ययाच जागीं होतो तेव्हा त्याला स्थानिवद्भावानें प्रत्यय मानता येते, म्हणजे त्या विसर्गाचे ठिकाणी स्थानिवद्भावानें प्रत्ययत्व हा धर्म येतो ) 'स्थानिवदादेश' सू. ४९ या अतिदेशविधायक सापादिक शास्त्राच्या दृष्टीनें त्रिपादी असिद्ध आहे (व त्यामुळें त्रैपादिक सूत्रानी 'सु' प्रत्ययाचे जागीं झालेला 'रु'स्थानिक विसर्ग स्थानिवद्भावानें प्रत्यय आहे असें मानता येत नाही) अशी कोणी शंका केल्यास, ती शंका बरोबर नाहीं, कारण प्रकृत सूत्रातील 'अप्रत्ययस्य' या निषेधानेंच, 'स्थानिवदादेश' या सूत्राच्या दृष्टीनें त्रिपादी सिद्ध आहे, हें ज्ञापित होतं (विसर्ग प्रत्ययरूपानें त्रिपा [illegible]

अष्टाध्यायीत कोठेंहि पठित नाही. 'सु = स्' असा प्रत्यय व तसेच 'जस्, शस्, भिस्, भ्यस्' इत्यादि सान्त प्रत्ययच अष्टाध्यायीत पठित आहेत व त्या प्रत्ययरूप किंवा प्रत्ययातील अन्त्य सकाराचे जागी 'रु' व विसर्ग हे 'ससजुषो रुः' व 'खरवसानयोर्विसर्जनीयः' या त्रैपादिक सूत्रांनीच होतात व त्या विसर्गाचे ठिकाणी 'स्थानिव-दादेश' सू ४९ हे सापादिक सूत्र प्रवृत्त केल्यासच त्या विसर्गाला स्थानिवद्भावानें प्रत्यय किंवा प्रत्ययावयव मानता येते. आणि प्रकृत सूत्रात त्रैपादिक कार्याचा आश्रय करून 'अप्रत्ययस्य विसर्गस्य' हीं पदें घातली असल्यामुळे त्यावरूनच हे सिद्ध होते की, 'स्थानिव-दादेश' या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें त्रिपादी असिद्ध ठरत नसून ते सूत्र त्रिपादीत देखील प्रवृत्त होते व त्यामुळें त्या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें त्रैपादिक सूत्रानी प्रत्ययाचे जागी झालेला विसर्ग सिद्ध ठरून स्थानिवद्भावानें प्रत्ययरूप ठरतो.) असे आहे म्हणूनच 'अग्निर्' इत्यादि स्थली 'रु' चा विसर्ग होऊ शकतो. स्थानिवद्भाव न मानल्यास, तो 'रु' अपदान्त ठरून त्याचा विसर्ग न होण्याची आपत्ति येईल. ('अग्नि + सु' या स्थली 'ससजुषो रुः' या त्रैपादिक सूत्रानें 'सु' प्रत्ययाचे जागी 'रु' होऊन 'अग्निर्' अशी स्थिति झाल्यावर जर 'सु' प्रत्ययाचे जागी झालेल्या 'रु' ला स्थानिवद्भावानें प्रत्यय मानले नाही तर 'सुप्तिङन्तं पदम्' सू. २९ या सूत्रानें होणारी पदसंज्ञा 'अग्निर्' याला होणार नाहीं व त्यामुळें 'खरवसानयोः' या सूत्रानें पदान्ती असलेल्या 'र' चे जागी जो विसर्ग होणें सांगितले आहे तो 'अग्निर्' यातील अन्त्य 'र' चे जागी होऊ शकणार नाहीं व 'अग्निः' असें विसर्गान्त इष्ट रूप सिद्ध होऊ शकणार नाहीं. 'स्थानिवदादेश' हें सूत्र त्रिपादीत देखील प्रवृत्त होतें व त्याच्या दृष्टीनें त्रिपादी असिद्ध ठरत नाहीं असें मानल्यानेंच तसें विसर्गान्त इष्ट रूप सिद्ध होऊ शकतें.) 'पुनर्' इत्यादि स्थली विसर्गविधि चरितार्थ ठरतो. (स्वरादि-गणात 'पुनर्' असें रेफान्त अव्यय पठित आहे. या शब्दाच्या

अन्ती असणारा रेफ 'ससजुषो रुः' या सूत्रानें झालेला 'रु' नसून मूळचा रेफ आहे व 'पुनर्' या अव्यायाहून सुवुत्पत्ति केल्यावर 'अव्ययादाप्सुपः' सू ४५२ या सूत्रानें जरी विभक्तिप्रत्ययाचा लुक् होतो तरी, 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' सू २६२ या सूत्रान्वयें 'पुनर्' याला पदसंज्ञा होते व त्या पदाच्या अन्ती असलेल्या रेफाचा 'खरवसानयोः' या सूत्रानें विसर्ग होतो व अशा रीतीनें या उदाहरणात अन्त्य रेफाचे ठिकाणी पदान्तत्वरूप धर्म आणण्या-करिता स्थानिवद्भाव मानण्याचा प्रसंगच येत नाही व स्थानिवद्भाव न मानता 'खरवसानयोः' हें विसर्गाचें विधान करणारे सूत्र या स्थली चरितार्थ ठरतें पण 'अग्निर्' इत्यादि स्थली, वर सांगितल्याप्रमाणे, 'सु' प्रत्ययाचे जागी झालेला 'रु' स्थानिवद्भावानें प्रत्यय आहे असें मानल्याशिवाय त्याचे ठिकाणी पदान्तत्व येत नाहीं व त्यामुळें पदान्ती असलेल्या 'रु' चा विसर्ग होतो असें विधान करणारे 'खरवसानयोः' हें सूत्र प्रवृत्त होऊ शकत नाहीं म्हणून अशा ठिकाणी स्थानिवद्भाव मानणे आवश्यक आहे ) 'अप्रत्ययस्य' हें प्रकृत सूत्रातील पद विशेषापेक्ष ज्ञापक आहे, म्हणजे 'स्थानिवदादेशः' हें अतिदेशविधायक स्थानिवद्भावाचें सापा-दिक शास्त्र त्रिपादीत प्रवृत्त होतें एवढ्याचेच ज्ञापक आहे त्यामुळें 'अच परस्मिन् पूर्वविधौ' सू ५० हें ( स्थानिवद्भावाचें विधान करणारें सापादिक ) सूत्र त्रिपादीत प्रवृत्त होत नाही, आणि म्हणूनच 'पूर्वत्रासिद्धे न स्थानिवत्' हा सिद्धान्त वर सांगितलेल्या युक्तीनेंच सिद्ध होतो व त्याच्या सिद्धीकरिता तें वार्तिक मान-ण्याची काही गरज नाही हें शब्दकौस्तुभात आम्ही सिद्ध करून दाखविलें आहे ('अच परस्मिन्' या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें, 'पूर्वत्रासिद्धम्' या वचनान्वयें, त्रिपादि असिद्ध असल्यामुळें, तें सूत्र त्रिपादींत प्रवृत्त होऊ शकत नाहीं व त्यामुळें त्रैपादिक कार्य कर्तव्य असता, अजादेशाचे ठिकाणी स्थानिवद्भाव होऊ शकत नाहीं हें आपोआपच सिद्ध होतें आणि म्हणून त्याच्या सिद्धीकरिता

'पूर्वत्रासिद्धे न स्थानिवत्' हे वार्तिक मानण्याची काही गरज नाही. कारण जें युक्तीनेंच सिद्ध होते त्याच्याकरिता स्वतन्त्र वार्तिक मानण्याची गरज काय असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे 'न पदान्त' १ १ ५८ या सूत्रावरील शब्दकौस्तुभात 'पूर्वत्रासिद्धे न स्थानिवत्' हे वचन पठित करून दीक्षितांनी या वचनास्वरसानें 'न्यायसिद्धं चेदम् । अच परस्मिन्नित्यतिदेशप्रति त्रिपादीस्थस्यासिद्धतया तस्मिन् कर्तव्येऽतिदेशाप्राप्ते । न चैवं स्थानिवत्सूत्रस्याप्यप्रवृत्तौ राम इति विसर्गो न स्यादिति वाच्यम् । प्रत्यय परश्चेत्यादि निर्देशैर्भोभगोअघो इति सूत्रेऽग्रहणेन च तत्प्रवृत्तेर्ज्ञापितत्वादित्यवधेयम्' असे म्हटलें आहे.) 'प्रत्ययभिन्नस्य विसर्गस्य' असा सामानाधिकरण्यानें अन्वय केल्यास, 'मातु कार्यम्' इत्यादि स्थली प्रकृत सूत्रानें विसर्गाचे षत्व होण्याची आपत्ति येते असे कोणी म्हटल्यास, ते म्हणणे बरोबर नाही, कारण कस्कादिगणात 'भ्रातुष्पुत्र' या शब्दाचा पाठ केला असल्यामळें त्यावरून हे ज्ञापित होतें की, (ऋदन्त शब्दापुढें) 'ङसि' व 'ङस्' हे प्रत्यय आल्यास ऋकाराचे व प्रत्ययातील अकाराचे जागी 'उ' हा जो एकादेश होतो त्याच्यापुढें येणाऱ्या विसर्गाचे षत्व होत नाही ('मातृ + ङस् = मातृ + अस्' या स्थली 'ऋत उत्' सू. २७९ या सूत्रानें 'मातृ' यातील ऋकाराचे व 'ङस् = अस्' प्रत्ययातील अकाराचे जागी उकार हा एकादेश होतो व 'उरण्रपर' सू. ७० या सूत्रानें तो उकार रपर होऊन 'मातुर्स्' अशी स्थिति झाली असता 'रात्सस्य' सू २८० या सूत्रानें अन्त्य सकाराचा लोप होऊन 'मातुर्' असे रूप झाल्यावर 'खरवसानयो' सू ७६ या सूत्रानें अन्त्य रेफाचा विसर्ग होऊन 'मातु' असे रूप सिद्ध होतें. 'मातु कार्यम्' या उदाहरणात 'मातु' यातील 'उ' या उपर्वे-पुढें जो विसर्ग आहे तो अप्रत्ययरूप. म्हणजे प्रत्ययाचे जागी झालेला विसर्ग नसून 'उरण्रपर.' या सूत्रानें जो 'उ' या एकादेशापुढें रेफ झाला आहे त्या रेफाचे जागी झालेला, विसर्ग असल्यामुळें

व त्यापुढें 'कार्यम्' यातील ककार असल्यामुळें, प्रकृत सूत्रानें त्या विसर्गाचें षत्व का होऊ नये अशी शकाकाराची शंका आहे. या शंकेवर दीक्षित असें उत्तर देतात की, कस्कादिगणात 'भ्रातुष्पुत्र' या शब्दाचा पाणिनीनें मुद्दाम पाठ केला असल्यामुळें त्यावरून हें ज्ञापित होतें की, एकादेशशास्त्ररूप निमित्तामुळें निष्पन्न झालेल्या 'उ' या उपधेंतील वर्णापुढें येणाऱ्या विसर्गाचें षत्व होत नाहीं, व 'मातुः कार्यम्' या स्थली 'मातुः' या रूपात जो उकार झाला आहे तो, वर सांगितल्याप्रमाणें, 'ऋत उत्' या एकादेशशास्त्रानें निष्पन्न झाला असून तशा उपधारूप उकारापुढें विसर्ग आला असल्यामुळें, जरी त्या विसर्गापुढें ककार आला आहे व उपधेंत उकार आहे तरी, त्या विसर्गाचें प्रकृत सूत्रानें होणारें षत्व होत नाहीं. 'मातुः' हें पद जसें 'मातृ' या ऋदन्त शब्दाचें षष्ठीचें एकवचन आहे तसेंच 'भ्रातुः' हें पद 'भ्रातृ' या ऋदन्त शब्दाचें षष्ठीचें एकवचन आहे व वर दिलेल्या ज्या प्रक्रियान्वयें 'मातुः' हें रूप सिद्ध होतें त्याच प्रक्रियान्वयें 'भ्रातुः' हें रूप देखील सिद्ध होतें. 'भ्रातुः पुत्रः' या स्थली देखील 'भ्रातुः' यातील विसर्ग 'उ' या उपधेपुढें असून त्यापुढें पकार असल्यामुळें 'इदुदुपधस्य चाप्रत्ययस्य' या सूत्रानें त्या विसर्गाचें षत्व होऊं शकलेंच असतें व त्यामुळें 'कस्कादिषु च' सू १४४ या सूत्रान्वयें षत्व होण्याकरिता 'भ्रातुष्पुत्रः' या शब्दाचा जो कस्कादिगणात पाठ केला आहे तो पाठ करण्याची काहीच गरज नव्हती पण ज्याअर्थी त्या शब्दाचा कस्कादिगणात पाणिनीनें मुद्दाम पाठ केला आहे त्याअर्थी तो पाठ व्यर्थ न ठरता सार्थक ठरावा याकरिता हें मानणें आवश्यक आहे कीं, एकादेशशास्त्रानें निष्पन्न झालेल्या उपधारूप उकारापुढें विसर्ग आल्यास, त्या विसर्गाचें षत्व होत नाहीं पण 'भ्रातुष्पुत्र' या स्थलीं षत्व होणें इष्ट असल्यामुळें, त्या शब्दाचा कस्कादिगणात मुद्दाम करावा लागला आणि अशा रीतीनें तो पाठ वरील नियमाचा ज्ञापक ठरत असल्यामुळें, त्या नियमान्वयें

'मातुः कार्यम्' या स्थली प्रकृत सूत्रानें होणारे विसर्गाचे षत्व होत नाही ) 'सम्भवति सामानाधिकरण्ये वैयधिकरण्यस्य अन्याय्यत्वात्' असा नियम असल्यामुळें, 'अप्रत्ययस्य इत्येतदपि व्यधिकरणमेव'—म्हणजे 'अप्रत्ययस्य' या शब्दाचा 'विसर्गस्य' या अनुवृत्त होणाऱ्या पदाशी 'प्रत्ययभिन्नस्य विसर्गस्य' असा सामानाधिकरण्यानें अन्वय न करिता, जसा 'इदुदुपधस्य' या पदाचा 'विसर्गस्य' या पदाशी वैयधिकरण्यानें अन्वय केला आहे तसाच 'अप्रत्ययस्य' व 'विसर्जनीयस्य' या पदाचा देखील प्रत्ययावयवभिन्नस्य विसर्जनीयस्य' असाच वैयधिकरण्यानें अन्वय करावा — असे जें हरदत्तानें म्हटले आहे तें विशेष आदराला पात्र नाही. (या पक्तीची शब्दरत्नात विस्तृत चर्चा करण्यात येईल ) 'मातु कृपा' या स्थली 'ऋत उत्' सू. २७९ हे एकादेशशास्त्र विसर्गाचे (साक्षात् निमित्त नसून) परंपरेनें निमित्त आहे (कारण तें एकादेशशास्त्र एवढेंच सांगते की, ऋदन्त अङ्गापुढें पञ्चमीच्या व षष्ठीच्या एकवचनाचा 'ङसि' किंवा 'ङस्' — म्हणजे 'अस्'— प्रत्यय आल्यास, 'ऋ' व 'अस्' प्रत्ययातील अकार या दोहोंचे जागी 'उ' असा एकादेश होतो. 'उ' हा एकादेश रपर व्हावा व पदान्ती असलेल्या सर्वा रेफाचा विसर्ग व्हावा याचे विधान तें एकादेशशास्त्र मुळीच करीत नाहीं 'उरण्रपर' सू ७० या सूत्रान्वयें 'उ' हा एकादेश रपर होतो व तो रपर झाल्यावर त्यातील अन्त्य रकार पदान्ती येत असल्यामुळें, त्या रकाराचा 'खरवसान-योर्विसर्जनीय.' सू. ७६ या सूत्रानें विसर्ग होतो. सारांश 'खरवसानयो' हें सूत्र विसर्ग होण्याचे साक्षात् प्रयोजक निमित्त आहे. तरी पण एकादेशशास्त्र जोपर्यंत प्रवृत्त होत नाही व 'उ' असा एकादेश होत नाही तोपर्यंत 'उरण्रपरः' व 'खरवसानयोर्विसर्जनीय' या सूत्रांची प्रवृत्ति होणें असंभवनीय असल्यामुळें, तें एकादेशशास्त्र विसर्गाचे परंपरेनें निमित्त ठरतें असा दीक्षिताच्या म्हणण्याचा मानस आहे. ) परंतु भाष्यांत 'एकादेशशास्त्रनिमित्तात्' असा

अनेक स्थली पाठ आढळतो व 'एकादेशशास्त्र निमित्त यस्य उकारस्य तस्मात्' असा त्याचा अर्थ आहे. (दीक्षितांनी प्रकृत सूत्रावरील कौमुदीत 'एकादेशशास्त्रनिमित्तकस्य-विसर्गस्य-न षत्वम् । कस्कादिषु भ्रातुष्पुत्रशब्दस्य पाठात्' असे म्हटले आहे. याला प्रकृत सूत्रावरील भाष्य प्रमाण आहे. या भाष्यात भाष्यकार म्हणतात– 'एवं तर्हि भ्रातुष्पुत्रग्रहणं ज्ञापकमेकादेशनिमित्तात् षत्वप्रतिषेधस्य । यदयं कस्कादिषु भ्रातुष्पुत्रशब्दं पठति तज्ज्ञापयत्याचार्यो नैकादेशनिमित्तात्षत्वं भवतीति ।' ) 'मुहु कामा' या स्थली ( 'मुहुस. प्रतिषेध.' हें वार्तिक असल्यामुळें जरी 'इदुदुपधस्य' हें सूत्र प्रवृत्त होत नाही व विसर्गाचे षत्व होत नाही तरी ) 'कुप्वो.' सू. १४२ हे सूत्र प्रवृत्त होऊ शकतें ( व त्यामुळें विसर्गाचे जागीं विकल्पेंकरून जिह्वामूलीय आदेश होऊ शकतो. ) काशिकावृत्तीच्या काहीं प्रतींत 'मुहुस्कामा' असा जो सकारयुक्त पाठ आढळतो तो पाठ चूक आहे असे हरदत्तानें म्हटले आहे. ( कारण 'कुप्वो' सू. १४२ हे सूत्र 'विसर्जनीयस्य स' सू. १३८ या सूत्रानें होणाऱ्या सत्वाचे बाधक सूत्र आहे हे पूर्वी सांगितलेच आहे. )

शब्दरत्न—समुदायस्येति । "अलोऽन्त्यात्–" इति सूत्रे अवयववाचकान्त्यशब्देन समुदायस्याक्षेपेण उपपादस्य समुदायनिरूपितत्वादिति भावः । इदुदुपधस्य विसर्गान्तस्य पदस्येति सामानाधिकरण्येनान्वयः । षत्वं तु "अलोऽन्त्यस्य" इत्यनेन विसर्गस्यैवेत्यर्थे । व्याख्यास्यद्दर्शितरीत्याऽऽह –अप्रत्ययो य इति । तत्प्रसिद्धेरिति । विसर्गस्य प्रत्ययत्वाप्रसिद्धेरित्यर्थः । न स्यादिति । रोरसुप्त्वेन पदत्वाप्रवृत्तेरिति भावः । चरितार्थं इति । ननु तत्रापि पुनर् स् इत्यवस्थाया ज्ञानपदत्वस्यातिदेशेनैव सुलोपे कृते आनयनमिति को विशेषः । न चैकदेशविकृतन्यायेन सिद्धिः । अग्निरित्यत्रापि समत्वात् । न चाग्निरित्यत्रादेशस्यातिदेशलभ्यकार्यस्य चासिद्धत्वमत्र तल्लभ्यकार्यस्यैवेति विशेष इति वाच्यम् । सर्वथा अतिदेशापेक्षणेन तस्याकिञ्चित्करत्वात् । किं च दत्वा-

सिद्धत्वेनाग्निरित्यत्र पदत्वं सुलभम् । किं च विसर्गस्यान्यल्रूप-रेफवृत्तिप्रत्ययत्वस्य स्थान्यल्धमत्वेन तदतिदेशाप्रवृत्तिरिति प्रत्ययरूपो विसर्गो दुर्लभ । स्पष्टा चेयं रीतिः "भोभगो-" इति सूत्रे भाष्ये । किं चैव सामानाधिकरण्ये "असो." इति वक्तव्ये ऽप्रत्ययग्रहणं व्यर्थं स्यात । किं चैव "नित्यं समासे-" इति सूत्रे "अनुत्तरपद-स्थस्य" इत्यस्य वैयर्थ्यम् । परमसर्पि कुण्डिकेत्यादावनेन षत्वस्य दुर्वारत्वात् । किं चैव "नित्यं समासे-" इति सूत्रस्थभाष्यासङ्गतिः । तथा हि-अथाव्युत्पन्न प्रातिपादिक सर्पिरादि ततो नित्ये प्राप्ते "इसुसो सामर्थ्ये इति विभाषा आरभ्यत इति तत्रोक्तम् । प्रत्यय-स्थपर्याप्त्यधिकरणभिन्नस्येत्यर्थे तु व्युत्पत्तिपक्षेऽपि नित्यषत्वप्राप्तेर-थाव्युत्पन्नमित्यादेरसङ्गति स्पष्टैव । अत्र भाष्येऽथेति यद्यर्थे । तेन सर्पिषा यजुषेत्यादौ षत्वसिद्धये व्युत्पत्तिपक्ष एव न स्वसादिति सूचितम । तस्मादत्र प्रत्ययपद सत्सम्बन्धिपर प्रत्ययसम्बन्धिभि-न्नस्य विसर्गस्येत्यर्थ उचित । अत एव कविभि कृतमित्यादौ न दोष । "नित्यं समासे-" इति सूत्रस्थानुत्तरपदस्थस्येत्यस्य, कस्कादिषु सर्पिष्कुण्डिकाशब्दपाठस्य चैतदर्थज्ञापकत्वबोधितेति घेसत्यम् । व्याख्यादर्शानुसारेणैतद्ग्रन्थसत्त्वात्तत्र व्यतयप्रदयति-नातोऽवासंख्यमिति ।

'अलोऽन्त्यात्पूर्वं उपधा' सू. २४९ या उपधासंज्ञाविधायक सूत्रात जो अवयववाचक 'अन्त्य' शब्द आहे त्यानें समुदायाचा-म्हणजे अवयवीचा-आक्षेप होत असल्यामुळें, 'उपधा' तसा समुदायाचा बोध करते (समुदायातील अन्त्य वर्णाच्या एगेच पूर्वी असणाऱ्या वर्णास 'उपधा' ही संज्ञा असल्यामुळें, 'उपधा' या शब्दानें ज्याची ती उपधा आहे तसा समुदायाचा आक्षेप होतो, आणि म्हणूनच 'इदुतौ उपधे यस्य समुदायस्य तस्यावयवो यो विसर्जनीय इति वैयधिकरण्येन सम्बन्ध ' असं दीक्षितांनी मनोरमेंत म्हटलें आहे परंतु दीक्षितांनीं जसा वर सांगितल्याप्रमाणे वैयधि-करण्यानें अन्वय केला आहे तसा अन्वय न करिता) इतर वैयाकरण

'इदुदुपधस्य विसर्गान्तस्य पदस्य' असा सामानाधिकरण्यानें अन्वय करितात आणि 'अलोऽन्त्यस्य' सू ५२ ही परिभाषा प्रवृत्त करून अन्त्य विसर्गाचें षत्व करितात ('इदुदुपधस्य' हें प्रकृत सूत्र 'पदस्य' या अधिकारात पठित असल्यामुळें त्यात 'पदस्य' हें पद अनुवृत्त होतें आणि 'विसर्जनीयस्य स' या पूर्वसूत्रातून 'विसर्जनीयस्य विसर्गस्य' हें पद प्रकृत सूत्रात अनुवृत्त होतें, आणि ते वैयाकरण 'विसर्गस्य' हें पद 'पदस्य' या पदाचें विशेषण मानतात व 'येन विधिस्तदन्तस्य' सू ९६ या सूत्रान्वयें 'विसर्गस्य' याचा 'विसर्गान्तस्य' असा अर्थ करून वर प्रमाणें प्रकृत सूत्राचा अर्थ करितात या पक्षांत 'अन्ये' हें अरुचि प्रदर्शक पद घातलें असल्यामुळें, हें मत म्हणजे अशा तऱ्हेनें अन्वय करणें शब्दरत्नकाराम मान्य नाही हें सूचित होतें, व याचें कारण हें कीं, 'पदस्य' ८–१–१६ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी 'पदस्य' ही स्थानषष्ठी न मानता विशेषणषष्ठी मानली आहे व या वैयाकरणाचें मत बरोबर मानल्याम व 'पदस्य' ही विशेष्यषष्ठी मानून स्थानषष्ठी मानल्यास, त्या भाष्याशी विरोध येतो त्या भाष्यात भाष्यकार म्हणतात– 'पदस्येति नैषा स्थानषष्ठी। का तर्हि ? । विशेषणषष्ठी · अथवा यदय न लोप प्रातिपदिकान्तस्येत्यन्तग्रहण करोति तज्ज्ञापयत्याचार्यो विशेषणषष्ठयेषा न स्थानषष्ठीति।') व्याख्यादर्शीत जसें प्रकृत सूत्राचें व्याख्यान केलें आहे त्या व्याख्यानाला धरूनच 'अप्रत्ययो यो विसर्ग' असे दीक्षितानी व्याख्यान केलें आहे (शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, 'अप्रत्ययो या विसर्ग' असें जें दीक्षितानी व्याख्यान केलें आहे तें वास्तविक दीक्षिताचें मत नसून व्याख्यादर्शात केलेला अर्थ दीक्षितानी दिलेला आहे, व याची विस्तृत चर्चा शब्दरत्नकार पुढें करणार आहेत ) मनोरमेंत 'तत्प्रसिद्धे' असें जें म्हटलें आहे त्याचा 'विसर्गस्य प्रत्ययत्व प्रसिद्धे' असा अर्थ आहे 'अन्यथाऽपदान्तवाश्च स्यात्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ

हा आहे की, ('स्थानिवदादेश:' या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें त्रिपादी असिद्ध ठरते व त्यामुळें ते सूत्र त्रिपादीत प्रवृत्त होऊ शकत नाही असे मानल्यास, 'ससजुषो रुः' सू. १६२ या त्रैपादिक सूत्रानें, 'अग्नि + सु' या स्थली, 'सु' प्रत्ययाचे जागी झालेला) 'रु' हा 'सुप्' नसल्यामुळें, 'अग्नि + सु = अग्निर्' याला पदसंज्ञा होऊ शकणार नाही (व त्यामुळें 'खरवसानयोर्विसर्जनीयः' सू. ७६ या सूत्रानें 'अग्निर्' यातील अन्त्य रुसंज्ञक रकाराचा विसर्ग होऊं शकणार नाही पण 'सु' प्रत्ययाचे जागी झालेला 'रु' हा 'सु' प्रत्ययच आहे असे 'स्थानिवदादेश.' या सूत्रान्वयें मानल्यासच, 'अग्निर्' याला 'सुप्तिङन्तं पदम्' या सूत्रानें पदसंज्ञा होऊन पदान्ती असलेल्या रेफाचा 'खरवसानयो.' या सूत्रानें विसर्ग होतो आणि तो विसर्ग स्थानिवद्भावानें प्रत्ययच आहे असे मानल्यानें त्याचे प्रकृत सूत्रानें षत्व न होता 'अग्निः करोति' असा इष्ट प्रयोग सिद्ध होतो. ) 'विसर्गविधिस्तु पुनरित्यादौ चरितार्थः' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्यावर शंकाकार असी शंका करितो कीं, 'पुनर्' या स्थली देखील त्या अव्ययाहून 'सु' प्रत्यय घेतल्यावर 'पुनर् + सु' अशी स्थिति झाली असता, (सुप्तिङन्त पदम्' सू. २९ या सूत्रानें त्या समुदायाला ) जी पदसंज्ञा होते ती पदसंज्ञा, ( 'अव्ययादाप्सुपः' सू. ४५२ या सूत्रानें ) 'सु' प्रत्ययाचा लुक् झाल्यावर, 'पुनर्' याचे ठिकाणी अतिदेशशास्त्रानेंच आणता येते. मग या दोन उदाहरणात फरक कोणता ? ( शंकाकार असे म्हणतो कीं, 'अग्नि + सु' या स्थितीत 'सुप्तिङन्त पदम्' या सूत्रानें त्या समुदायाला जी पदसंज्ञा होते ती पदसंज्ञा, 'अग्निस्' या पदातील अन्त्य सकाराचे जागी 'ससजुषो रु' या सूत्रानें 'रु' हा आदेश केल्यावर 'अग्निस्' चे 'अग्निर्' असे जें रूप होते त्याचे ठिकाणी आणण्याकरिता ज्याप्रमाणे 'स्थानिवदादेश.' या अतिदेशशास्त्राचा आश्रय करावा लागतो त्याचप्रमाणे 'पुनर् + सु' या स्थितीत 'सुप्तिङन्त पदम्' या सूत्रानें प्राप्त झालेली पदसंज्ञा, 'अव्ययादाप्सुप.'

या सूत्रानें 'सु' प्रत्ययाचा लुक् झाल्यावर 'पुनर्' असे जें रूप होतें त्याच ठिकाणी आणण्याकरिता 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' सू २६२ या अतिदेशशास्त्राचा आश्रय घ्यावा लागतोच आणि अशा रीतीनें दोन्ही उदाहरणात कोणताहि फरक आढळत नाही म्हणून 'विसर्गविधिस्तु पुनरित्यादौ चरितार्थ ' म्हणजे ' अतिदेशशास्त्रमनाश्रित्य पुनरित्यादौ विसर्गविधिश्चरितार्थ ' असे जें मनोरमेंत म्हटले आहे ते बरोबर मानता येत नाही 'साराश 'अग्नि + सु' या स्थली 'सु' प्रत्ययाचे जागी 'रु' हा आदेश झाल्यावर तो आदेश 'सु' प्रत्ययच आहे असे मानण्याकरिता ज्याप्रमाणे 'स्थानिवदादेश ' या अतिदेशशास्त्राचा आश्रय करावा लागतो त्याचप्रमाणे 'पुनर् + सु' या स्थली 'सु' प्रत्ययाचा लुक् झाल्यावर तो 'सु' प्रत्यय कायमच आहे असे मानण्याकरिता देखील 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' सू २६२ या अतिदेशशास्त्राचा आश्रय करावा लागतोच व अतिदेशशास्त्राची प्रवृत्ति केल्याशिवाय–मग त एकच शास्त्र असो किंवा भिन्न शास्त्र असो– जशी 'अग्निर्' याला पदसज्ञा होऊ शकत नाही तशी 'पुनर्' याला देखील होऊ शकत नाही आणि म्हणून वरील दोन उदाहरणात दीक्षितानी जो फरक दाखविला आहे व अतिदेशशास्त्राची प्रवृत्ति न करिता 'पुनर्' इत्यादि स्थली विसर्गविधि चरितार्थ ठरतो असं जें त्यानीं म्हटले आहे तें बरोबर मानता येत नाही असा शकाकाराच्या म्हणण्याचा आशय आहे या शकेवर जर दीक्षिताचे असे म्हणणे असेल की, 'पुनर् + सु' या स्थलीं 'अव्ययादाप्सुप ' या सूत्रानें 'सु' प्रत्ययाचा लुक् झाल्यावर 'पुनर्' असं जें अवशिष्ट रूप राहतें त्याला पदसज्ञा करतेवेळी आम्ही 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' या अतिदेशशास्त्राची प्रवृत्ति न करिता 'एकदेशविकृतमनन्यवत्' —परि ३७–या लौकिकन्यायान्वयें पदसज्ञा करतो, तर त्यावर शकाकार असे उत्तर देतो की, ) 'पुनर्' या एकदेशविकृत रूपाला एकदेशविकृतन्यायानें पदसज्ञा केली जाते असे जर तुम्ही म्हणत असाल तर तुम्ही दिलेले ज्ञापक–म्हणजे 'स्थानिव-

दादेश ' या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें त्रिपादी असिद्ध नाहीं याचें प्रकृत सूत्रातील 'अप्रत्ययस्य' हें पद ज्ञापक आहे असें जें तुम्ही म्हणतां तें-व्यर्थ ठरतें व तें मानण्याची काहीच गरज नाही; कारण) 'अग्नि + सु' या स्थली ('सु' प्रत्ययाचे जागी 'ससजुषो रु' या सूत्रानें 'रु' आदेश केल्यावर) 'अग्निर्' असें जें एकदेशविकृत रूप होते त्याला देखील तो लौकिक एकदेशविकृतन्याय न्यायानें पदसंज्ञा होऊं शकतेच. (कारण हा एकदेशविकृतन्याय पाणिनीय शास्त्रात सांगितलेल्या 'स्थानिवदादेश ' इत्यादि अतिदेशशास्त्रांसारखा शास्त्रीय न्याय नसून लौकिक न्याय असल्यामुळें, सापादिक अतिदेश-शास्त्राला जसें 'पूर्वत्रासिद्धम्' हें सूत्र लागू पडतें व त्यामुळें त्या सापादिक अतिदेशशास्त्राच्या दृष्टीनें त्रिपादी असिद्ध ठरते त्याप्रमाणें या लौकिक न्यायाला 'पूर्वत्रासिद्धम्' हें सूत्र लागू पडत नाही व त्यामुळें तो न्याय जसा सपादसप्ताध्यायीला लागू पडतो तसाच त्रिपादीला देखील लागू पडतो मग 'स्थानिवदादेश ' या सूत्राच्या दृष्टीनें त्रिपादी असिद्ध ठरत नाही याचें प्रकृत सूत्रातील 'अप्रत्ययस्य' हें पद जें तुम्ही ज्ञापक मानतां आहे तें ज्ञापक मानून विशेष लाभ कोणता झाला ?, जर ज्ञापकाचें सहाय घेतल्याशिवाय 'अग्निर् = अग्नि.' याची पदसंज्ञा लौकिक एकदेश-विकृतन्यायानेंच सिद्ध होऊं शकते तर ज्ञापक मानण्याची गरज काय व वरील दोन उदाहरणात फरक तो कोणता ?- यावर दीक्षिताकडून असें म्हणण्यात येतें की, 'पुनर्' व 'अग्निर्' या दोन उदाहरणात फरक आहे, कारण) 'अग्निर्' या स्थली ('ससजुषो रु.'-या त्रैपादिक सूत्रानें 'सु' प्रत्ययाचे जागी झालेला व विसर्गाचा स्थानी ) 'रु' हा आदेश व तसेच त्या 'रु' चे जागी ('खरवसानयो-विसर्जनीय ' या त्रैपादिक सूत्रानें होणारा) विसर्गरूप आदेश हे दोन्ही (त्रैपादिक सूत्रानी होत असल्यामुळें, 'सुप्तिङन्तं पदम्' या पदसंज्ञाविधायक सापादिक शास्त्राच्या दृष्टीनें) असिद्ध ठरतात, परंतु 'पुनर्' या स्थली विसर्गाचा स्थानी रेफ मूळचा स्वत-

सिद्ध असून त्या रेफाचे जागी होणारा विसर्गच केवळ असिद्ध आहे ( साराश 'अग्नि + सु = अग्निर् = अग्नि ' या स्थली दोन त्रैपादिक-सूत्रानी दोन असिद्ध कार्ये झाली असून, 'पुनर् = पुन ', या स्थली एकच विसर्गरूप असिद्ध कार्य झाले आहे, आणि 'अणुरपि विशेषाऽध्यवसायकर' या न्यायान्वयें वरील दोन उदाहरणात फरक आहे हे सिद्ध होते यावर शकाकार असे उत्तर देतो की,) वरील दोन्ही उदाहरणात पदसज्ञा होण्याकरिता अतिदेशशास्त्राची मदत घ्यावी लागत असल्यामुळें, त्या दोन उदाहरणात दाखविलेला वरील फरक केवळ नाममात्र फरक आहे, म्हणजे तशा निरर्थक फरकामुळें वरील दोन उदाहरणात फरक आहे असे मुळीच म्हणता येत नाही (शकाकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, जरी 'अग्नि + सु = अग्निर् = अग्नि ' या स्थली 'सु' प्रत्ययाचा 'र' होणे व 'र', चा विसर्ग होणे अशी दोन असिद्ध कार्ये होतात व 'पुनर् = पुन ' या स्थली रेफाचे जागी विसर्ग होणे एवढें एकच असिद्ध कार्य होते तरी, 'अग्नि ' याला पदसज्ञा प्राप्त करून देण्याकरिता जशी 'स्थानिवदादेश ' या अतिदेशशास्त्राची मदत घ्यावी लागते त्याचप्रमाणे 'पुन '-याला पदसज्ञा प्राप्त करून देण्याकरिता देखील त्या अतिदेशशास्त्राची मदत घ्यावी लागतेच, कारण 'पुनर् + सु = पुनर् ' या स्थली 'सु प्रत्ययाचा लुक् झाल्यावर 'पुनर्' या रेफान्त शब्दाला 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' या सूत्रानें जरी पदसज्ञा होते तरी त्या पदातील अन्त्य रेफाचा 'खरवसानयोर्विसर्जनीय ' या त्रैपादिक सूत्रानें होणारा विसर्ग 'सुप्तिङन्त पदम्' व 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्'-या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें असिद्ध असल्यामुळें, 'पुन ' या विसर्गान्त रूपाला पदसज्ञा प्राप्त करून देण्याकरिता 'स्थानिवदादेश-हे सूत्र उपयोगात आणलेच पाहिजे, त्याशिवाय 'पुन ' याला पदसज्ञा होणे अशक्य आहे साराश वरील दोन्ही उदाहरणात पदसज्ञा प्राप्त करून देण्याकरिता 'स्थानिवदादेश ' या सूत्राची-मदत घ्यावी लागत असल्यामुळे, एका उदाहरणात दोन असिद्ध

कार्यें होतात व दुसऱ्या उदाहरणात एकच असिद्ध कार्य होते असे दर्शविल्यानें ती दोन उदाहरणे भिन्न प्रकारची उदाहरणे ठरत नाहींत, कारण प्रकृत स्थली एका उदाहरणात किती कार्यें असिद्ध आहेत व दुसऱ्यात किती असिद्ध आहेत हा प्रश्न नसून, वास्तविक प्रश्न हा आहे की, दोन्ही उदाहरणात पदसंज्ञा होण्याकरिता 'स्थानिवदादेश ' या सूत्रान्वयें स्थानिवद्भाव मानण्याची सारखीच गरज आहे किंवा नाहीं एका उदाहरणात पदसंज्ञा होण्याकरिता स्थानिवद्भाव मानणे आवश्यक असून दुसऱ्यात स्थानिवद्भाव न मानता व अतिदेशशास्त्राची प्रवृत्ति न करिता पदसंज्ञा होऊ शकते अशी जर वस्तुस्थिति असती तरच ती दोन भिन्न प्रकारची उदाहरणें ठरलीं असती म्हणून 'स्थानिवद्भावमनाश्रित्य विसर्गविधि पुनरित्यादौ चरितार्थं' हे दीक्षिताचे म्हणणे योग्य ठरत नाही दोन्ही उदाहरणात 'स्थानिवदादेश ' या सूत्राचा आश्रय करण्याची सारखीच अपेक्षा– गरज–असल्यामुळें, भावप्रकाशकार प्रकृत पक्तीचा तात्पर्यार्थ देताना असे म्हणतात की, 'तथा चोभयथापि ज्ञापकोपयोग । सामर्थ्याद्वा प्रवृत्तिरिति । वैषम्यमयुक्तमितिभाव '–म्हणजे वरील दोन्ही उदाहरणात 'स्थानिवदादेश ' या सूत्राचा आश्रय करण्याची सारखीच गरज असल्यामुळें, दीक्षितानी दिलेले ज्ञापक दोन्ही स्थली सारखेंच लागू पडतें व उपयुक्त ठरते असे मानले पाहिजे किंवा प्रकृत सूत्र मुद्दाम आरभिले असल्यामुळें त्या आरभसामर्थ्यानें ते सूत्र दोन्ही उदाहरणात सारखेंच प्रवृत्त होते असे मानले पाहिजे, आणि म्हणून ती दोन भिन्न प्रकारची उदाहरणे आहेत हे म्हणणे बरोबर नाही असा शकाकाराच्या म्हणण्याचा भावार्थ आहे पुन्हा शकाकार असे म्हणतो की,) 'अग्नि+सु = अग्निर्' या स्थली ('ससजुषो रु' सू १६२ या त्रैपादिक सूत्रानें) 'सु' प्रत्याचे जागी झालेला 'रु' हा आदेश ('सुप्तिडन्त पदम्' सू २९ या पदसंज्ञाविधायक सापादिक सूत्राच्या दृष्टीनें) असिद्ध असल्यामुळें ('रु' हा आदेश

झालाच नाही व 'सु' प्रत्यय कायमच आहे असें मानल्यानें) 'अग्निर्' याला पदसंज्ञा होऊं शकतेच (व 'ससजुषो रुः' या पूर्व त्रैपादिक सूत्रानें झालेलें रुत्व हे 'खरवसानयोर्विसर्जनीयः' या उत्तर त्रैपादिक सूत्राच्या दृष्टीनें सिद्ध असल्यामुळें, पदान्ती असलेल्या 'र' चा विसर्ग होण्यात काही अडचण येत नाही. पुन्हा शकाकार असे म्हणतो की, ) विसर्गाचा स्थानी जो अल्रूप रेफ त्याचे ठिकाणी असलेला 'प्रत्ययत्व' हा धर्म अल्रूप स्थानीचे–रेफाचे–ठिकाणी असलेला धर्म असल्यामुळें, ( त्या रेफाचा विसर्ग झाल्यावर ) विसर्गाचे ठिकाणी आणण्याकरिता 'स्थानिव-दादेशः' या अतिदेशशास्त्राची, ( 'अनल्विधौ' हा प्रतिषेध असल्यामुळें ) प्रवृत्ति करता येत नाही व त्यामुळें प्रत्ययरूप विसर्ग मिळणें शक्य नाही. विसर्गाचा स्थानी 'रु' हा अनल्रूप समुदाय नसून अल्रूप रेफ हाच त्या विसर्गाचा स्थानी आहे असे जें वर म्हटले आहे त्याला 'भो भगो अघो' सू. ८.३.१७ या सूत्रावरील भाष्य प्रमाण आहे. (त्या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानीं 'रो रि' या पूर्व सूत्रातून 'खरवसानयोर्विसर्जनीयः' या उत्तरसूत्रात 'रः' या षष्ठयन्त पदाची अनुवृत्ति करून त्या सूत्राचा 'खरवसानयोः रः विसर्जनीयः' असा अर्थ केला आहे व विसर्गाचा स्थानी रेफ हा अल् मानला आहे. त्या भाष्यात भाष्यकार म्हणतात–'अथाऽयमल्विधिः स्याच्छक्यमरग्रहणमवक्तुम् ? बाढं शक्यम् । अल्विधिर्स्तार्हि भवि-ष्यति । कथम् ? । इदमस्ति रो रीति । ततो वक्ष्यामि–खरवसानयो-र्विसर्जनीय रः । ततो रोः सुपि । विसर्जनीयो र इत्येव ।' भाष्यकारानीं असे म्हटले असल्यामुळें, अल्रूप रेफाचे ठिकाणी असलेला प्रत्ययत्व धर्म त्याचे जागी होणाऱ्या विसर्गाचे ठिकाणी स्थानिवद्भावानें, 'अनल्विधौ' या प्रतिषेधान्वयें येऊं शकत नाही हें उघड आहे आणि त्यामुळें प्रत्ययरूप विसर्ग कोठेंहि मिळणें शक्य नाही. म्हणून '*न च विसर्गस्य प्रत्ययत्वमप्रसिद्धमिति वाच्यम् । अग्निः करोती-त्यादौ स्थानिवद्भावेन तत्प्रसिद्धेः*' असे जें दीक्षितांनी मनोरमेंत

म्हटले आहे ते बरोबर मानता येत नाही.) दुसरे असे की, 'अप्रत्ययो यो विसर्ग.' असा सामानाधिकरण्याने अन्वय होतो असें मानल्यास, 'इदुदुपधस्य च असो.' असे प्रकृत सूत्र करावयास पाहिजे होते व 'अप्रत्ययस्य' हे पद प्रकृत सूत्रात घालण्याची काही गरज नव्हती व ते पद व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. (कारण 'सु' प्रत्ययाचे जागी झालेल्या विसर्गाचे ठिकाणी प्रत्ययत्वरूप धर्म येऊ शकतो असे मानल्यास, प्रत्ययरूप विसर्ग केवळ 'सु' प्रत्ययाचाच मिळू शकतो. 'भिस्, भ्यस्' इत्यादि इतर प्रत्ययात जो विसर्ग सापडतो तो प्रत्ययरूप विसर्ग नसून प्रत्ययावयव सकाराचा विसर्ग असतो. म्हणून प्रत्ययरूप विसर्गाचेच पत्व होऊ नये असे जर पाणिनीला विवक्षित व इष्ट असते तर, त्यानें 'असोः' असा लघु व असंदिग्ध–स्पष्टार्थबोधक –निर्देश केला असता व 'अप्रत्ययस्य' असा अधिक मात्राचा संदिग्ध व लक्षणेनें–परम्परेनें– 'सु' प्रत्ययाचे ज्ञान करून देणाऱ्या शब्दाचा निर्देश केला नसता, कारण 'असोः' असा न्यास केल्याने 'सु' प्रत्ययाचे जागी न झालेला विसर्ग असा एकदम अर्थ ध्यानात येतो व लक्षणा करण्याची गरज पडत नाही. पण 'अप्रत्ययस्य' असा न्यास केल्यानें 'प्रत्यय' या शब्दाचा 'केवळ सु प्रत्यय' असा लक्षणेनें अर्थ करावा लागतो व तसा लक्षणेनें अर्थ करण्यात गौरव आहे हे उघड आहे. परतु ज्या अर्थी 'असोः' असा लघु व स्पष्ट निर्देश न करिता पाणिनीनें प्रकृत सूत्रात 'अप्रत्ययस्य' असा लाक्षणिक व सामान्य निर्देश केला आहे त्याअर्थी हे ज्ञापित होते की, सामानाधिकरण्यानें अन्वय करणे पाणिनीला विवक्षित नसून वैयधिकरण्यानें अन्वय करणे विवक्षित होते असा शकाकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.) पुन्हा असे की, 'अप्रत्ययो यो विसर्ग.' असा सामानाधिकरण्यानें अन्वय मानल्यास, 'नित्य समासेऽनुत्तरपदस्थस्य' सू. १५९ या सूत्रातील 'अनुत्तरपदस्थस्य' या पदाचे ग्रहण व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते; कारण 'परमसर्पिः कुण्डिका' इत्यादि स्थली

('अनुत्तरपदस्यस्य' हे पद त्या सूत्रात असून देखील) 'इदुदुपधस्य' या प्रकृत सूत्रानें प्राप्त झालेले षत्व टाळता येणे अशक्य आहे. ('परमसर्पिः कुण्डिका' या उदाहरणात जो विसर्ग आहे तो प्रत्ययरूप विसर्ग नसून 'सृप्' धातूहून झालेल्या 'इस्' या उणादि प्रत्ययाचा अवयव जो सकार त्याचे जागी झालेला विसर्ग आहे. म्हणून त्या अप्रत्ययरूप विसर्गाला 'इदुदुपधस्य' हे सूत्र लागून विसर्गाचे षत्व होण्याची आपत्ति येईल व 'नित्य समासे' या सूत्रात 'अनुत्तरपदस्यस्य' हा प्रतिषेध असून देखील 'परमसर्पि' या सामासिक पदातील 'सर्पि.' या उत्तरपदाच्या अन्ती असणाऱ्या अप्रत्ययरूप विसर्गापुढें ककार असल्यामुळें, त्याचे षत्व होणे टाळता येणार नाही व अशा रीतीनें 'अनुत्तरपदस्यस्य' हें पद व्यर्थ ठरेल. परंतु प्रकृत सूत्रातील 'अप्रत्ययस्य' याचा 'प्रत्ययावयवभिन्नस्य विसर्गस्य' असा वैयधिकरण्यानें अन्वय करून अर्थ केल्यास, 'परमसर्पि.' यातील विसर्ग 'इस्' या उणादि प्रत्ययाचा अवयव जो सकार त्याचे जागी झाला असल्यामुळें व अशा रीतीनें तो विसर्ग प्रत्ययावयवरूप ठरत असल्यामुळें, त्याला 'इदुदुपधस्य' हे सूत्र लागू पडत नाही व त्या विसर्गाचे षत्व होण्याची आपत्ति टळते. 'परमसर्पिः कुण्डिका' या उदाहरणासबधानें बालमनोरमाकार म्हणतात–'अत्र विसर्गस्य उत्तरपदस्थत्वान्न षत्वम् । इदुदुपधस्येति षत्वं तु न, विसर्गस्यात्र प्रत्ययावयवत्वात् । प्रत्ययभिन्नस्य विसर्गस्येति व्याख्याने तु अत्रापि इदुदुपधस्येति षत्वं स्यात्, अत्र विसर्गस्य प्रत्ययैकदेशतया प्रत्ययभिन्नत्वात् ।') पुन्हा असे की, 'अप्रत्ययो यो विसर्ग.' असा सामानाधिकरण्यानें अन्वय मानल्यास, 'नित्य समासे' ८. ३. ४५ या सूत्रावरील भाष्याशी विरोध येण्याची आपत्ति येते. त्या भाष्यात भाष्यकार असे म्हणतात की, जर 'सर्पि.' इत्यादि अव्युत्पन्न प्रातिपदिके मानली तर, ('इदुदुपधस्य' या सूत्रानें') जें नित्य षत्व प्राप्त होते ते विकल्पें-करून व्हावे याकरिता 'इसुसो. सामर्थ्ये' सू १९८ हें सूत्र आरंभिले

याहे. प्रकृत सूत्रातील 'अप्रत्ययस्य' या पदाचा 'प्रत्ययत्वरूप धर्म जेथें केवळ विसर्गाचे ठिकाणीच राहतो तसा विसर्ग खेरीज करून इतर विसर्ग' असा अर्थ केल्यास, व्युत्पत्तिपक्षात देखील 'इदुदुपधस्य' या सूत्रानें नित्य षत्वाची प्राप्ति होत असल्यामुळें, वरील भाष्यात 'अथ अव्युत्पन्न प्रातिपदिकम्' इत्यादि जें म्हटले आहे ते विसङ्गत-चूक-ठरण्याची आपत्ति येते ('नित्य समासे' या सूत्रावरील भाष्यात चार कारिका पठित केल्या असून त्यापैकी 'अथ चेत्प्रविज्ञान नित्ये षत्वे ततो विभाषेयम् । सिद्ध च मे समासे, प्रतिषेधार्थस्तु यत्नोऽयम् ॥' ही चवथी कारिका आहे. या कारिकेतील 'प्रविज्ञानम्' या पदाचा 'अव्युत्पन्न प्रातिपदिकम्' असा अर्थ आहे व या कारिकेचे व्याख्यान करिताना भाष्यकार म्हणतात—'अथाऽव्युत्पन्न प्रातिपदिक ततो नित्ये षत्वे प्राप्ते इय विभाषा आरभ्यते । सिद्ध च मे समासे षत्वम् । किमर्थं तर्हीदमुच्यते ? । प्रतिषेधार्थोऽय यत्न । अनुत्तरपदस्थस्येति प्रतिषेध वक्ष्यामीति ।' म्हणून शकाकार असे म्हणतो की, 'सर्पिस्' हें व्युत्पन्न किंवा अव्युत्पन्न, म्हणजे धातूला उणादि प्रत्यय लागून तयार झालेले किंवा प्रकृतिप्रत्ययविभागरहित स्वत सिद्ध, प्रातिपदिक मानले तरी, दोन्ही पक्षात विसर्ग प्रत्ययरूप नसून, अव्युत्पत्तिपक्षात तो 'सर्पिस्' या प्रातिपदिकाचा अवयव जो सकार त्याचे जागी झालेला विसर्ग आहे. व व्युत्पत्तिपक्षात 'इस्' या उणादि प्रत्ययाचा अन्त्यावयव जो सकार त्याचे जागी झालेला विसर्ग आहे. म्हणून 'अप्रत्ययस्यो यो विसर्ग' असा सामानाधिकरण्यानें अन्वय केल्यास, दोन्ही पक्षात त्या प्रत्ययरूप नसलेल्या विसर्गाचे जागी 'इदुदुपधस्य' या प्रकृत सूत्रानें नित्य षत्वाची प्राप्ति आहे. परतु भाष्यकार तर म्हणतात की, अव्युत्पत्तिपक्षातच नित्य षत्वाची प्राप्ति आहे दोन्ही पक्षात नित्य षत्वाची प्राप्ति आहे असे भाष्यकाराचे मुळीच म्हणणे नाहीं. सारांश 'अप्रत्ययो यो विसर्ग.' असा सामानाधिकरण्यानें अन्वय केल्यास, वरील भाष्य विसङ्गत

ठरते. पण 'प्रत्ययावयवो यो विसर्गस्तद्भिन्नस्य' असा वैयधिकरण्यानें अन्वय केला तरच तें भाष्य सुसङ्गत ठरतें; कारण व्युत्पत्तिपक्षात विसर्ग हा प्रत्ययावयव ठरत असल्यामुळें, त्या पक्षात 'इदुदुपधस्य' या सूत्राची प्रवृत्तीच होऊ शकत नाहीं व त्यामुळें नित्य षत्वाची प्राप्ति होत नाहीं. केवळ अव्युत्पत्तिपक्षातच त्या सूत्राची प्रवृत्ति होऊं शकते; कारण त्या पक्षात विसर्ग प्रत्ययाचे किंवा प्रत्ययावयवाचे जागीं झाला नसून प्रातिपदिकावयव जो सकार त्याचे जागीं झालेला विसर्ग आहे. म्हणून 'अप्रत्ययो यो विसर्गः' असा सामानाधिकरण्यानें अन्वय करणें भाष्यविरुद्ध ठरत असल्यामुळें, तसा अन्वय करणें योग्य नाहीं असा शकाकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.) 'अथाव्युत्पन्न प्रातिपदिकम्' या वरील भाष्यातील 'अथ' या पदाचा 'यदि' असा अर्थ आहे. तसा त्या पदाचा अर्थ असल्यामुळें, 'सर्पिषा, यजुषा' इत्यादि स्थली.('आदेशप्रत्यययो.' सू. २१२ या सूत्रान्वयें) *षत्वसिद्धि होण्याकरिता अव्युत्पत्तिपक्ष न मानता, व्युत्पत्तिपक्ष* मानणेंच योग्य आहे असें भाष्यकार सुचवितात. ('सर्पिस् इत्यादि जर अव्युत्पन्न प्रातिपदिकें मानली' असें वरील भाष्यात म्हटलें असल्यामुळें हें ध्वनित होतें कीं, जेथें 'सर्पिस्, यजुस्' इत्यादि प्रातिपदिकें व्युत्पन्न–उणादि प्रत्यय लागून सिद्ध झालेलीं–प्रातिपदिकें मानल्याशिवाय इष्टरूपाची सिद्धि होऊ शकत नसेल तशा ठिकाणी तीं व्युत्पन्न प्रातिपदिकें मानून इष्ट रूपाची सिद्धि करावी, कारण इष्ट रूपाची सिद्धि होण्याकरिताच व्याकरणशास्त्रात व्युत्पत्तिपक्ष व अव्युत्पत्तिपक्ष हे दोन्ही पक्ष मानले आहेत आणि इष्ट रूपाची सिद्धि करणें हे व्याकरणशास्त्राचें मुख्य प्रयोजन असल्यामुळें, जेथें जो पक्ष स्वीकारल्यानें इष्ट रूप सिद्ध होऊ शकतें तेथें तो पक्ष स्वीकारावा असें वरील भाष्यात 'यदि' या अर्थाचा वाचक 'अथ' हा शब्द घालून भाष्यकार सुचवितात असा शकाकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. व्युत्पत्तिपक्ष मानला तरच 'सर्पिषा, यजुषा' इत्यादि स्थली 'आदेशप्रत्यययो.' सू. २१२ या सूत्रानें होणारे सकाराचे

षत्व होऊ शकते, कारण त्या सूत्रानें सकाराचें षत्व होण्याकरिता (१) 'इण्' प्रत्याहारान्तर्गत किंवा कवर्गान्तर्गत वर्णाच्या लगेच पुढें सकार असला पाहिजे, व (२) तो सकार पदान्ती नसला पाहिजे, आणि (३) तो आदेशरूप किंवा प्रत्ययावयवरूप सकार असला पाहिजे 'सर्पिस् + आ, यजुस् + आ' या स्थली 'इण्' प्रत्याहारान्तर्गत 'इ, उ' या वर्णांपुढें सकार आहे व तो सकार पदान्ती नाही, कारण 'टा = आ' हा अजादि प्रत्यय पुढें असल्यामुळें 'यचि भम्' सू. २३१ या सूत्रान्वयें 'सर्पिस्, यजुस्' ही अङ्गे भसंज्ञक ठरतात पण तो सकार प्रत्ययावयव मानला तरच प्रकृत सूत्र प्रवृत्त न होता त्याच वरील सूत्राने षत्व होऊ शकते या स्थली अव्युत्पत्तिपक्ष स्वीकारल्यास, म्हणजे 'सर्पिस्, यजुस्' ही प्रकृतिप्रत्ययविभागरहित स्वतःसिद्ध प्रातिपदिके आहेत असे मानल्यास, तो सकार प्रत्ययावयव ठरत नसून प्रातिपदिकाचा अवयव ठरतो व त्यामुळें त्या सकाराचें वरील प्रकृतसूत्रानें षत्व होऊ शकत नाही पण षत्व होणें तर इष्ट आहे, आणि व्युत्पत्तिपक्ष मानला तरच त्या सकाराचें षत्व होऊ शकते, कारण त्या पक्षात तो सकार 'सृप्' व 'यज्' धातूंहून अनुक्रमें झालेल्या 'इस्' व 'उस्' या उणादि प्रत्ययाचा अवयव ठरतो म्हणून या वरील उदाहरणात षत्वसिद्धि होण्याकरिता व्युत्पत्तिपक्ष मानणे आवश्यक आहे असे टीकाकारांच्या म्हणण्याचें तात्पर्य आहे 'नित्य समासे' या सूत्रावरील वृत्तीत 'अव्युत्पत्तिपक्षे स्वाश्रीयमाणे सर्पिषा यजुषेत्यादि न सिध्यतीति पचाय व्युत्पत्तिपक्ष एवैमुमन्तस्याश्रयणीय' असे कैयटानें देखील म्हटलें आहे व त्याचाच प्रकृत पङ्क्तीत अनुवाद केला आहे या विषयासबधानें 'परेत्वय चेत्सविज्ञानमिति पाणिने पक्ष, सर्पिषेत्यादो बहुलग्रहणात् कृन्निदन्यत्वेऽयर्थकात्पत्व सिद्धम् ।' असे 'नित्य समासे' या सूत्रावरील उद्योतात व तसेच शब्देन्दुशेखरात नागेशानें म्हटले आहे ) म्हणून वर दिलेल्या भाष्यानुसार, प्रकृत सूत्रातील 'धनन्ययस्य' या पदात जो 'प्रत्यय' शब्द आहे त्याचा (लक्षणेनें)

प्रत्ययमवधि–प्रत्ययावयवरूप–असा अर्थ करून 'अप्रत्ययस्य' या पदाचा 'प्रत्ययसम्बन्धिभिन्नस्य–प्रत्ययावयवभिन्नस्य–विसर्गस्य' असा (सामानाधिकरण्यानें अन्वय करून) अर्थ करणे उचित आहे तसा त्या पदाचा अर्थ असल्यामुळेंच, 'कविभि:कृतम्' इत्यादि स्थली (पत्वापत्तिरूप) दोष येत नाहीं. ('कवि+भिस्+कृतम्' या स्थली होणारा विसर्ग प्रत्ययरूप विसर्ग नाहीं; कारण ज्या सकाराचे जागीं तो विसर्ग झाला तो सकार प्रत्यय नसून 'भिस्' या प्रत्ययाचा अवयव आहे. म्हणून 'अप्रत्ययरूपो यो विसर्ग.' असा मनोरमेंत दिलेला अर्थ बरोबर मानल्यास, 'कविभि: कृतम्' या स्थली 'इदुदुपधस्य' या प्रकृत सूत्रान्वयें त्या विसर्गाचे पत्व होण्याची आपत्ति येते. पण 'प्रत्ययावयवो यो विसर्ग तद्भिन्न' असा वर सांगितल्याप्रमाणे अर्थ केल्याने त्या विसर्गाचे पत्व होण्याची आपत्ति टळते मग 'अग्नि:करोति' या स्थली 'सु' प्रत्ययाचे जागी झालेला विसर्ग प्रत्ययरूप असून प्रत्ययावयवरूप नसल्यामुळें त्या विसर्गाचे पत्व होण्याची आपत्ति येते असे कोणी म्हटल्यास, त्याला उत्तर हे आहे कीं, 'व्यपदेशिवदेकस्मिन्'–परि. ३०–या परिभाषान्वयें तो विसर्ग व्यपदेशिवद्भावानें प्रत्ययावयव मानता येतो व त्यामुळें त्या विसर्गाचे पत्व होण्याची आपत्ति टळते, आणि 'विसर्गस्य व्यपदेशिवद्भावेन प्रत्ययावयवत्वात्' हेच 'अग्नि:करोति' या स्थली विसर्गाचे पत्व होत नाही याचें कारण बालमनोरमेंत दिले आहे )

'नित्य समासे' सू. १६९ या सूत्रात 'अनुत्तरपदस्थस्य' या पदाचे जें ग्रहण केले आहे व तसेच कस्कादिगणात 'सर्पिष्कुण्डिका' या शब्दाचा जो पाठ केला आहे ही दोन्ही 'प्रत्ययावयवो यो विसर्ग. तद्भिन्नस्य' असाच प्रकृत सूत्रातील 'अप्रत्ययस्य' या पदाचा अर्थ होतो याची ज्ञापके मानणे उचित आहे. ('परमसर्पि:कुण्डिका' या उदाहरणात 'परमसर्पि.' या सामासिक पदातील 'सर्पि.' या उत्तरपदाच्या अन्ती असलेला विसर्ग प्रत्ययरूप नसून 'इस्' या उणादि प्रत्ययाचा अवयव जो सकार त्याचे

जागी झाला असल्यामुळें, प्रत्ययावयवरूप आहे. म्हणून 'अप्रत्ययो यो विसर्गः' असा अर्थ केल्यास, या विसर्गाचे 'इदुदुपधस्य' या सूत्रानें प्राप्त झालेले षत्व टाळता येणे शक्य नाही पण 'अप्रत्ययस्य' या पदाचा 'प्रत्ययावयवो यो विसर्गः तद्भिन्नस्य' असा अर्थ केल्यास, जरी 'परमसर्पिः' यातील विसर्ग प्रत्ययावयव आहे तरी, तो त्या समासातील 'सर्पिः' या उत्तरपदात असल्यामुळें व 'नित्यं समासे' या सूत्रात 'अनुत्तरपदस्थस्य' हा निषेध असल्यामुळें, 'इदुदुपधस्य' या सूत्रान्वयें प्राप्त झालेले षत्व त्या विसर्गाचे होत नाही, आणि अशा रीतीनें 'अनुत्तरपदस्थस्य' हे पद चरितार्थ ठरून 'प्रत्ययावयवो यो विसर्गः तद्भिन्नस्य' या अर्थाचे ते पद ज्ञापक ठरते तसेच दीक्षितानी 'अप्रत्ययरूपो यो विसर्गः' असा जो सामानाधिकरण्यानें अन्वय केला आहे तो बरोबर मानल्यास, 'सर्पिष्कुण्डिका' या स्थली अव्युत्पत्तिपक्षात 'सर्पिस्' या प्रातिपदिकाचा अन्त्यावयव जो सकार त्याचे जागी होणारा विसर्ग असल्यामुळें व व्युत्पत्तिपक्षात 'इस' या उणादि प्रत्ययाचा अन्त्यावयव जो सकार त्याचे जागी होणारा विसर्ग असल्यामुळें आणि अशा रीतीनें दोन्ही पक्षात तो प्रत्ययरूप विसर्ग ठरत नसल्यामुळें, 'इदुदुपधस्य' या सूत्रानेंच त्या विसर्गाचे नित्य षत्व होऊ शकेल आणि त्यामुळें 'सर्पिष्कुण्डिका' या शब्दाचा 'कस्कादिषु च' सू १४४ या सूत्रानें नित्य षत्व होण्याकरिता कस्कादिगणांत जो पाठ केला आहे तो व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते परंतु व्युत्पत्तिपक्षात तो विसर्ग प्रत्ययावयवरूप ठरत असल्यामुळें, 'प्रत्ययावयवो यो विसर्गः तद्भिन्नस्य' असा अर्थ केल्यास, 'इदुदुपधस्य' हें सूत्र प्रवृत्त होऊ शकत नाही व नित्य षत्व होऊ शकत नाही, आणि तसे नित्य षत्व व्हावे याकरिता 'सर्पिष्कुण्डिका' या शब्दाचा कस्कादिगणात केलेला पाठ चरितार्थ ठरून तो पाठ देखील दीक्षितानी जसा अर्थ करून अन्वय केला आहे तसे न करिता, वर सांगितल्याप्रमाणे अन्वय करून अर्थ करावा याचा ज्ञापक ठरतो असा यथाशास्त्र्या

म्हणण्याचा आशय आहे. 'ननु तत्रापि पुनर्‌स्' येथपासून 'चैतदर्थं ज्ञापकत्वेनोचिता' येथपर्यंत शङ्काग्रन्थ आहे हें लक्षांत ठेवावे या शङ्केसबधानें शब्दरत्नकार असे म्हणतात कीं,) वर केलेली शङ्का म्हणजे दीक्षितांनी 'अप्रत्ययस्य' याचा जो अर्थ केला आहे तो चूक आहे हे सिद्ध करण्याकरिता शङ्काकारानें वर जी कारणपरंपरा दिली आहे ती, यथार्थ आहे परंतु दीक्षितांनी व्याख्यादर्श ग्रन्थाला अनुसरून 'प्रत्ययरूपो यो विसर्गः' असा सामानाधिकरण्यानें अन्वय केला आहे व हे ध्वनित करण्याच्या हेतूनेंच दीक्षितांनी 'हरदत्तेनोक्त नातीवादर्तव्यम्' असे मनोरमेंतील पुढील पङ्क्तीत म्हटले आहे. (त्या पुढील पङ्क्तीचे विवरण लौकरच केले जाईल.)

शब्दरत्न---'न प्रवर्तत इति । अत एव सिरङ्चेत्यादौ सस्य ढत्वसिद्धिः । एतच्चेष्टानुरोधेन सयोगादिलोपस्य ढत्वस्यासिद्धत्वे स्थानिवत्त्वं भवत्येवेति "तस्य दोष–" इत्याद्यपि न वाचनिकमिति भावः । मातु ष्वायंमिति । सिद्धान्तव्याख्याने ऽप्यत्र दोष । तथा हि सकारसन्निधावकारो नैव प्रत्यय समुदायनिवेशि-त्वात्प्रत्ययत्वस्येति तदादेशस्योरः प्रत्ययत्वाभावेन विसर्गस्य तत्सम्बन्धित्वाभावात् । षत्वे कृतेऽवशिष्टः सकार प्रत्ययसञ्ज्ञकः, स लुप्त एव । न च "अन्तादिवच्च" इत्यस्य पूर्वस्य परस्य समुदा-यस्यान्तादिभ्यां वर्णाभ्यां पृथगवस्थिताभ्यां ये व्यवहाराः प्रत्ययत्वाद-यस्ते एकादेशविशिष्टस्यापीत्यर्थादुरसित्यत्र प्रत्ययत्वस्य सुलभतया एकदेशविकृतन्यायेनोरित्यस्य प्रत्ययतया न दोष इति वाच्यम् । त्रिपाद्या असिद्धत्वेन तत्रान्तवत्त्वाप्रवृत्तेः । स्थानिवत्त्वेन तु न निर्वाहः । उपात्तस्य स्थानिनो ऽकारस्य प्रत्ययत्वाभावात् । प्रत्यय-सम्बन्धित्व तु न स्थानिवत्त्वलभ्यमशास्त्रीयत्वात् । "सर्वे सर्व-पदादेशा" इति न्यायेन मातु असित्यस्य स्थानित्वेऽप्यसित्यस्य स्थानित्वालाभेनोसित्यस्य प्रत्ययत्वमलभ्यमिति । एतदेवाभिप्रेत्य प्रकृतसूत्रे "उरण् रपरः" इति सूत्रे च भाष्ये उक्तम् "इह कस्मान्न भवति पितुः करोति, "अप्रत्ययस्य" इति षत्वं प्राप्नोति, अप्रत्यय-

विसर्जनीयस्येत्युच्यते, प्रत्ययविसर्जनीयश्चायं, लुप्यते ऽत्र प्रत्यय-विसर्जनीयो "रासस्य" इति"। लुप्यते ऽत्रेत्यादेरयमर्थः। प्रत्यय-विसर्जनीयत्वेन यस्तत्राभिमतः स लुप्यते, न दृश्यते स्थानिनः प्रत्ययस्यैव लोपादिति बोद्धव्यम्।

(प्रकृत सूत्रातील 'अप्रत्ययस्य' हे पद, 'स्थानिवदादेश' या सूत्राच्या दृष्टीनें त्रिपादी असिद्ध ठरत नाही एवढ्यापुरतेंच दीक्षितांनी विशेषापेक्ष ज्ञापक मानलें आहे व असे म्हटलें आहे की, तें ज्ञापक विशेषापेक्ष असल्यामुळें, 'अच परस्मिन्' सू. ५० हे सूत्र त्रिपादीत प्रवृत्त होत नाही) तसे असल्यामुळेंच, म्हणजे 'अचः परस्मिन्' सू ५० या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें त्रिपादी असिद्ध ठरत असल्याकारणानें तें सूत्र त्रिपादींत प्रवृत्त होत नसल्यामुळेंच, 'तिरश्चा' इत्यादि स्थली सकाराचें श्चुत्व होतें ('तिर अञ्चतीति तिर्यङ्, तेन तिरश्चा' या उदाहरणांत 'ऋत्विग्दधृक्' सू ३७३ या सूत्रानें 'अञ्चू' धातूहून 'क्विन्' प्रत्यय होऊन व 'अनिदितां हल उपधायाः' सू ४१५ या सूत्रानें 'अञ्च्' धातूतील नकाराचा लोप होऊन व 'अचः' सू ४१६ या सूत्रानें त्या धातूतील अकाराचा लोप होऊन आणि 'वेरपृक्तस्य' सू. ३७५ या सूत्रानें 'क्विन् = व्' हा अपृक्त प्रत्यय नाहीसा होऊन 'तिरस्+च्+आ' अशी स्थिति झाली असता, 'स्तोः श्चुना श्चुः' सू १११ या त्रैपादिक सूत्रानें 'तिरस्' यांतील सकाराचें श्चुत्व पावलें आहे. 'अचः परस्मिन्' या सूत्रान्वयें 'अ'लोपाचे ठिकाणी तो 'अ' कायमच आहे असा स्थानिवद्भावानें बुद्धि केल्यास, सकाराचे पुढें अकार येत असून चकार येत नाही असे मानावें लागत असल्यामुळें, सकाराचा शकार होऊं शकणार नाही व 'तिरश्चा' असें इष्ट रूप सिद्ध होऊं शकणार नाही. पण 'अचः परस्मिन्' हें सूत्र त्रिपादींत प्रवृत्त होत नसल्यामुळें, 'अ'लोपाचे ठिकाणी तो 'अ' कायमच आहे अशी स्थानिवद्भावानें बुद्धि करता येत नाहीं व त्यामुळें 'तिरश्चा' असें इष्ट रूप सिद्ध होतें.) इष्ट रूपाची

सिद्धि व्हावी याकरिता, सयोगादिलोप, ल्त्व, व षत्व हीं तीन कार्ये खेरीज करून इतर त्रैपादिक कार्ये करतेवेळी 'पूर्वत्रासिद्धे न स्थानिवत्' हे वचन प्रवृत्त होत असे मानले आहे आणि त्यामुळें ती तीन त्रैपादिक कार्ये करतेवेळी अजादेशाचे ठिकाणी स्थानिवद्भाव होतोच म्हणून (ते वचन वार्तिक न मानता त्याला जसे युक्तिमूलक सिद्धान्त मनोरमेंत मानले आहे त्याचप्रमाणें) 'तस्यदोष संयोगादिलोपलत्वणत्वेषु' हे वचन देखील वार्तिक मानू नये (पूर्वत्रासिद्धे न स्थानिवत्' या युक्तिमूलक सिद्धान्ताचाच प्रपञ्च करणार– अर्थ स्पष्ट करणारे– ते वचन आहे असे समजावें) असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे ('प्रत्ययरूपो यो विसर्गं तद्भिन्नस्य' असा प्रकृत सूत्रातील 'अप्रत्ययस्य' या पदाचा अर्थ न करिता 'प्रत्ययसम्बन्धिभिन्नस्य= प्रत्ययावयवो यो विसर्ग तद्भिन्नस्य' असा लक्षणा करून व सामानाधिकरण्यानें अन्वय करून अर्थ केला तरी या) सिद्धान्तपक्षात देखील 'मातृ कार्यम्' या स्थली दोष येतोच म्हणजे विसर्गाचे षत्व होण्याची आपत्ति येतेच (कारण 'मातृ + ङस् = मातृ + अस्' या स्थली) सकाराचे जवळ, म्हणजे सकाराच्या लगेंच पूर्वी, असलेला अकार मुळीच प्रत्यय नसून, 'अस्' या समुदायाचे ठिकाणी प्रत्ययत्व आहे (व तो अकार त्या समुदायाचा अवयव आहे म्हणून 'मातृ' यातील ऋकार व 'अस्' प्रत्ययातील अकार या प्रत्यय नसणाऱ्या दोहोचे जागी 'ऋत उत्' सू २७९ या सूत्रानें 'उ' असा एकादेश होऊन व 'उरण्रपर' सू ७० या सूत्रानें तो रपर होऊन, म्हणजे त्याला रकारागम होऊन) 'उर्' असा जो आदेश होतो त्याचे ठिकाणी प्रत्ययत्व हा धर्म नसल्यामुळें ('उर्' यातील अन्त्य रकाराचे जागी 'खरवसानयो' सू ७६ या सूत्रानें होणारा) विसर्ग प्रत्ययसंबंधि, म्हणजे प्रत्ययाचा अवयव, आहे असे मानता येत नाही (जर तो 'उ' हा एकादेश 'अस्' या संपूर्ण प्रत्ययाचे जागी झाला असता तर त्याला स्थानिवद्भावानें प्रत्यय मानता आले असतें व त्याला 'उरण्रपर' या

सूत्रानें जो रकारागम होतो तो 'यदागमाः'–परि. ११–या परिभाषान्वयें त्याचा अवयव होत असल्यामुळें, तो आगमरूप रेफ प्रत्ययावयव आहे व त्याचे जागी झालेला विसर्ग प्रत्ययावयव आहे असे मानता आले असते पण तो विसर्ग प्रत्ययावयव नसून प्रत्यया-वयवभिन्न असल्यामुळें, 'इदुदुपधस्य' या प्रकृत सूत्रानें त्याचे सिद्धान्तपक्षात देखील षत्व होण्याची आपत्ति येते वरील उदाहरणात 'ऋ' व 'अ' या दोन वर्णाचे जागी) 'उ' हा एकादेश केल्यावर (एकादेश केल्यानें 'अस्' प्रत्ययातील अकार नाहीसा होऊन) जो त्या प्रत्ययातील सकार अवशिष्ट राहतो तो प्रत्ययसंज्ञक आहे असे मानता येते तरी, त्या सकाराचा लोप होतोच–म्हणजे एकादेश रपर होऊन 'मातुर्स्' अशी स्थिति झाली असता, रेफापुढें सकार आला असल्यामुळें, 'रात्सस्य' सू. २८० या सूत्रानें त्या सकाराचा देखील लोप होतोच. (सारांश 'अस्' प्रत्ययातील अकार एकादेशानें नाहीसा झाल्यावर जरी 'य. शिष्यते स लुप्यमानार्थाभिधायी' या वचनान्वयें त्या प्रत्ययातील अवशिष्ट सकाराचे ठिकाणी प्रत्ययत्व-धर्म आणता येतो तरी, तो सकार देखील 'रात्सस्य' या सूत्रानें लुप्त होत असल्यामुळें आणि अशा रीतीनें संपूर्ण 'अस्' प्रत्यय नाहीसा होत असल्यामुळें, 'मातुर्' यातील अन्त्य आगन्तुक रकाराचे जागी 'खरवसानयोर्विसर्जनीयः' सू ७६ या सूत्रानें जो विसर्ग होतो तो प्रत्ययावयव आहे असे मानता येत नाही आणि त्यामुळें सिद्धान्तपक्षात देखील त्या विसर्गाचे प्रकृत सूत्रानें षत्व होण्याची आपत्ति येते. येथें कित्येक वैयाकरण अशी शंका करतात की, 'मातृ + अस्' या स्थली 'ऋ + अ' या दोहोंचे जागी 'उ' हा एकादेश झाला असल्यामुळें व जेथें केवळ ऋकाराचे जागी अण्–अ, इ, किंवा उ–आदेश होतो तथाच ठिकाणी तो आदेश 'उरण्रपरः' या सूत्रानें रपर करता येत असल्यामुळें, प्रकृत स्थली दोन स्थानांचे जागी झालेला 'उ' हा एकादेश रपर करता येत नाही आणि म्हणून तो एकादेश केल्यावर 'मातुर्स्' अशी स्थिति

मुळीच होत नसून 'मातुस्' अशीच स्थिति होते अशा स्थितीत 'मातुस्' मधील सकार रेफापुढें येत नसल्यामुळें, 'रात्सस्य' सू २८० हें सूत्र येथें प्रवृत्त होऊच शकत नाहीं व सकाराचा लोप मुळीच पावत नाहीं आणि तो सकार पदान्तीं असल्यामुळें, 'ससजुषो रुः' सू १६२ या सूत्रानें त्याचें रुत्व करून 'खरवसानयोः' सू ७६ या सूत्रानें 'रु' चे जागीं विसर्ग केला असता तो विसर्ग 'अस्' प्रत्ययातील अवशिष्ट जो सकार व ज्याला 'यः शिष्यते स लुप्यमानार्थाभिधायी' या न्यायान्वयें प्रत्ययसंज्ञक मानता येत त्याचे जागीं झालेला विसर्ग असल्यामुळें, तो विसर्ग स्थानिवद्भावानें प्रत्ययरूप मानता येतो व अशा रीतीनें तो विसर्ग प्रत्ययभिन्न किंवा प्रत्ययावयवभिन्न ठरत नसल्यामुळें आणि प्रकृत सूत्रांत 'अप्रत्ययस्य' असा निषेध असल्यामुळें, 'मातुः कार्यम्' या स्थलीं 'इदुदुपधस्य' या सूत्रानें त्या विसर्गाचें षत्व होण्याची मुळींच आपत्ति येत नाहीं ही जी वर शंका केली आहे ती 'उरण्रपरः' १।१।५१ या सूत्रावरील भाष्यांत 'उः स्थानेऽण्प्रसज्यमान एव रपरो भवतीत्युच्यते, न चायमुरेव स्थानेऽणिशिष्यते। किं तर्हि ? । उश्चान्यस्य च' असें जें शंकापर ग्रन्थांत म्हटलें आहे त्याच्या आधारें केली आहे पण भाष्यकारांनीं त्या भाष्यांत त्या शंकेचें निरसन 'इह यो द्वयोः षष्ठीनिर्दिष्टयोः प्रसङ्गे भवति लभतेऽसावन्यतरतो व्यपदेशम्। तद्यथा। देवदत्तस्य पुत्रः देवदत्तायाः पुत्र इति' भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं, जेथें दोन षष्ठीनिर्दिष्ट स्थानींचे जागीं मिळून एकादेश होणें सांगितलें आहे तेथें तो एकादेश त्या दोन स्थानींपैकीं कोणत्याहि स्थानीचा आदेश आहे असें म्हणता येतें ज्याप्रमाणें लौकिक व्यवहारांत देवदत्त बाप व देवदत्ता आई या दोघांचा जो मुलगा त्याला देवदत्ताचा मुलगा असेंहि म्हणतात व देवदत्तेचा मुलगा असेंहि म्हणतात तसेंच 'ऋ' व 'अ' या दोहोंचे जागीं मिळून 'ऋत उत्' सू २७९ या सूत्रानें झालेला 'उ' हा एकादेश 'ऋ' या स्थानीचे जागीं झाला आहे असें म्हणता येते व

त्यामुळें तो एकादेश 'उरण्रपर' या सूत्रानें रपर करता येतोच. या भाष्यावरून हे स्पष्ट होत की, 'मातृ + अस' या स्थली वरील शकेत म्हटल्याप्रमाणे 'मातुस्' अशी स्थिति होत नसून 'मातुर्स्' अशीच स्थिति होते व या स्थितीत 'रात्सस्य' या सूत्रानें 'अस्' प्रत्ययातील अवशिष्ट सकाराचा लोप होत असल्यामुळें, पदान्ती असलेल्या प्रत्ययावयवरूप सकाराचे जागी विसर्ग होतो असे जें वरील शकेत म्हटले आहे ते चूक ठरते हे उघड आहे वास्तविक 'मातुरम' या स्थलो वर सांगितल्याप्रमाणे सकाराचा लोप झाल्यावर पदान्ती जो रकार येतो त्याचे जागी विसर्ग होतो व तो विसर्गाचा स्थानी रकार प्रत्यय किंवा प्रत्ययावयव नसल्यामुळें, त्याचे जागी होणारा विसर्ग प्रत्ययावयवरूप आहे असे मानता येत नाही आणि त्यामुळें 'मातुः कार्यम्' या स्थली सिद्धान्तपक्षात देखील विसर्गाचे षत्व होण्याची व 'मातुष्कार्यम्' असे अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते पण या आपत्तीचे निवारण 'उरण्रपर' या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी 'इह हि मातुः करोति, पितुः करोतीत्यप्रत्ययविसर्जनीयस्येति षत्वं प्रसज्येत। अप्रत्ययविसर्जनीयस्येत्युच्यते, प्रत्ययविसर्जनीयश्चायम्। लुप्यतेऽत्र प्रत्ययो रात्सस्येति। एवं तर्हि भ्रातुष्पुत्रग्रहणं ज्ञापकमेकादेशनिमित्तात्षत्वप्रतिषेधस्य। यदयं कस्कादिषु भ्रातुष्पुत्रशब्दं पठति तज्ज्ञापयत्याचार्यो नैकादेशनिमित्तात्षत्वं भवतीति।' अशा रीतीनें केले आहे व या भाष्याचे विवरण पूर्वी मनोरमेंत केलेले आहे ) 'अन्तादिवच्च' सू ७५ या सूत्राचा, 'एकादेश होण्यापूर्वी पृथक् स्थितीत असणाऱ्या पूर्व व पर समुदायाचे ठिकाणी जे प्रत्ययत्वादि धर्म आहेत ते धर्म एकादेश केल्यानतर एकादेशान्त व एकादेशादि समुदायाचे ठिकाणी देखील येतात', असा अर्थ होत असल्यामुळें, 'उर्म्' या समुदायाचे ठिकाणी प्रत्ययसंज्ञा सहज प्राप्त करून देता येते (व त्या समुदायातील अन्त्य मकाराचा 'रात्सस्य' सू २८० या सूत्रानें लोप झाल्यावर अवशिष्ट राहिलेल्या) 'उर्' या भागाला देखील 'एकदेशविकृतमनन्यवत्'—

परि–३७–या न्यायान्वयें प्रत्यय मानता येतें व त्यामुळें (पत्व होण्याची आपत्ति टळते आणि) काही दोष येत नाही असे कोणी म्हटल्यास, तें म्हणणे बरोबर नाही, कारण 'अन्तादिवच्च' या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें त्रिपादी असिद्ध असल्यामुळें, ते सूत्र त्रिपादीत प्रवृत्त होऊ शकत नाही ('मातृ+अस् = मातुर्स्' या स्थली 'अन्तादिवच्च' या सूत्रान्वयें 'उर्स्' हा एकादेशादि प्रत्ययान्त समुदाय प्रत्यय मानता येतो आणि 'उर्स्' यातील सकाराचा जरी 'रात्सस्य' या सूत्रानें लोप होतो तरी अवशिष्ट राहिलेला 'उर्' हा एकदेशविकृतन्यायानें प्रत्यय मानता येतो व 'उर्' यातील रकाराचे जागी जो विसर्ग होतो तो विसर्ग प्रत्ययावयव आहे असे स्थानिवद्भावानें मानला येत असल्यामुळें, 'इदुदुपधस्य' हे प्रकृत सूत्र 'मातु कार्यम्' या उदाहरणात प्रवृत्त होऊ शकत नाही व त्यामुळें विसर्गाचे पत्व होण्याची आपत्ति मुळीच येत नाहीं असे शंकाकाराचे म्हणणे आहे या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, 'पूर्वत्रासिद्धम्' या वचनान्वयें 'अन्तादिवच्च' या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें त्रिपादी असिद्ध असल्यामुळें, म्हणजे त्रिपादीचा अभाव असल्यामुळें, ते सापादिक सूत्र त्रिपादीत प्रवृत्त होऊ शकत नाही व त्यामुळें 'इदुदुपधस्य' या प्रकृत त्रैपादिक सूत्रानें पत्व करतेवेळी 'मातुर्स्' यातील 'उर्स्' हा एकादेशादि समुदाय प्रत्यय मानता येत नाही आणि त्या समुदायातील सकाराचा लोप झाल्यावर पदान्ती असलेल्या रकाराचे जागीं 'खरवसानयो' सू ७६ या सूत्रानें जो विसर्ग होतो तो प्रत्ययावयव आहे असे मानता येत नसल्यामुळें, पत्व होण्याची आपत्ति टळत नाही 'मातु कार्यम्' या स्थली) 'स्थानिवदादेश' सू ४९ हे सूत्र प्रवृत्त केल्यानें देखील पत्व होण्याची आपत्ति टाळता येत नाही, कारण ('ऋत उत्' सू २७९ या सूत्रात) निर्दिष्ट असलेला 'उ' हा स्थानी प्रत्यय नव्हे ('मातृ + अस्' या स्थलीं 'ऋत उत्' या सूत्रानें 'मातृ' यातील ऋकार व

'अस्' प्रत्ययातील अकार या दोहोंचे जागी मिळून 'उ' हा एकादेश होणे सांगितले आहे. तो एकादेश रपर केल्यावर 'उर्' या आदेशाचे 'ऋ' व 'अ' हे दोन स्थानी ठरतात या दोन स्थानींपैकी 'ऋ' हा 'मातृ' या प्रकृतीचा अवयव असल्यामुळें त्याचे ठिकाणी प्रत्ययत्वरूप धर्म नाही हे उघड आहे. 'अस्' या प्रत्ययातील 'अ' हा द्वितीय स्थानी जरी प्रत्ययावयव आहे तरी तो प्रत्यय नव्हे; कारण संपूर्ण 'अस्' हा प्रत्यय आहे सारांश 'उर्' हा एकादेश प्रत्ययाचे जागी झाला नसल्यामुळें, 'स्थानिवदादेश' हे सूत्र येथें प्रवृत्त केलें तरी त्या आदेशाचे ठिकाणी प्रत्ययत्व धर्म येऊ शकत नाही त्यामुळें 'उर्' यातील रेफाचे जागी झालेला विसर्ग प्रत्ययावयव आहे असें मानता येऊ शकत नसल्यामुळें, वरील उदाहरणात 'इदुदुपधस्य' या प्रकृत सूत्रानें षत्व होण्याची आपत्ति सिद्धान्तपक्षात देखील कायम राहतेच ) 'प्रत्ययसंबंधित्व' हा शास्त्रीय धर्म नसल्यामुळें, अशा अशास्त्रीय धर्माचा आदेशाचे ठिकाणी 'स्थानिवदादेशः' या सूत्रानें अतिदेश करता येत नाही. (शंकाकाराची शंका अशी आहे की, 'अस्' प्रत्ययसंबंधि—'अस्' प्रत्ययावयव—जो अकार त्याचे जागी 'उर्' हा आदेश होत असल्यामुळें, तो आदेश देखील 'स्थानिवदादेश' या सूत्रान्वयें प्रत्ययसंबंधि मानता येतो, म्हणजे त्या आदेशाचे ठिकाणी प्रत्ययसंबंधित्व हा धर्म स्थानिवद्भावानें आणता येतो. म्हणून 'उर्' यातील रकाराचे जागी झालेला विसर्ग स्थानिवद्भावानें प्रत्ययसंबंधि मानता येऊ शकत असल्यामुळें, 'मातुः कार्यम्' या स्थली 'इदुदुपधस्य' हें प्रकृत सूत्र प्रवृत्त होऊ शकत नाही व विसर्गाचे षत्व होण्याची आपत्ति टळते. या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, 'स्थानिवदादेश' या सूत्रानें स्थानीचे ठिकाणी असणाऱ्या प्रातिपदिकत्व, सुबन्तत्व, प्रत्ययत्व इत्यादि शास्त्रीय धर्मांचाच आदेशाचे ठिकाणी अतिदेश करता येतो. प्रत्ययत्व हा जरी शास्त्रीय धर्म आहे तरी प्रत्ययसंबंधित्व हा शास्त्रीय धर्म नसल्यामुळें, तसा

असास्नीय धर्माचा वरील सूत्रान्वयें आदेशाचे ठिकाणी अतिदेश करता येत नाही व त्यामुळें षत्व होण्याची आपत्ति सिद्धान्तपक्षात देखील कायम राहतेंच.) 'सर्वे सर्वपदादेशा' या न्यायान्वयें जरी 'मातुर्स्' या समुदायरूप आदेशाचा 'मातृ + अस्' हा समुदाय स्थानी मानता येतो तरी, 'अस्' प्रत्यय त्या समुदायरूप आदेशाचा स्थानी मानता येत नसल्यामुळें, 'उर्स्' याचे ठिकाणी प्रत्ययत्व हा धर्म येऊ शकत नाही आणि हा आशय मनात धरूनच प्रकृत सूत्रावरील व तसेच 'उरण्रपर' या सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात – 'पितुः करोति' या स्थली ('इदुदुपधस्य' या सूत्रानें) षत्व का होत नाही ? त्या सूत्रात 'अप्रत्ययस्य' असा निर्देश असल्यामुळें वरील उदाहरणात षत्वाची प्राप्ति आहे त्या सूत्रानें अप्रत्ययरूप विसर्गाचे षत्व होणे सांगितले आहे व वरील उदाहरणात झालेला विसर्ग प्रत्ययाचे जागी झाला असल्यामुळें, त्याचे षत्व होत नाही. पण प्रत्ययातील ज्या सकाराचे जागी विसर्ग झाला आहे (असे शकाकार समजतो) त्या सकाराचा 'रात्सस्य' या सूत्रानें लोप झाला आहे या भाष्यात 'लुप्यतेऽत्र प्रत्ययविसर्जनीय' इत्यादि जें म्हटले आहे त्याचा असा अर्थ आहे की, ज्या प्रत्ययाचे–प्रत्ययातील सकाराचे–जागी विसर्ग झाला आहे असे तू – शकाकार – समजतोस त्या स्थानिरूप प्रत्ययाचाच लोप झाला आहे व तो दिसत नाही (विसर्ग होण्यापूर्वीच त्या विसर्गाचा जो तू सकार हा स्थानी समजतोस) त्या स्थानीचाच लोप झाला आहे. (सारांश 'पितुः कार्यम्' या उदाहरणात झालेला विसर्ग प्रत्ययावयवरूप सकाराचे जागी झाला नाही, कारण विसर्ग होण्यापूर्वीच संपूर्ण 'अस्' प्रत्यय नाहीसा झाला आहे, म्हणजे एकादेशानें प्रत्ययातील अकार नाहीसा होऊन अवशिष्ट सकाराचा 'रात्सस्य' या सूत्रानें लोप होऊन गेला आहे, आणि त्या सकाराचा लोप झाल्यावर 'उर्' यातील रकाराचे जागी वास्तविक विसर्ग झाला आहे व 'उर्' हा

प्रत्यय नसल्यामुळें, त्यांतील रेफाचे जागीं झालेला विसर्ग प्रत्ययावयव आहे असें मानता येत नाही आणि त्यामुळें त्या विसर्गाचें प्रकृत सूत्रानें षत्व होण्याची प्राप्ति आहे. या आपत्तीचें भाष्यकारांनीं 'नैकादेशनिमित्तात् षत्वं भवति' हा सिद्धान्त सांगून निवारण केलें आहे हें पूर्वी सांगितलेंच आहे या भाष्यावरून हें स्पष्ट होतें की, 'उरस्' याचे ठिकाणीं प्रत्ययत्व हा धर्म अतिदेशानें आणता येत नाही )

शब्दरत्न—ज्ञापनादिति । त्रिपाद्यामप्यन्तवत्त्वप्रवृत्तिज्ञापनद्वारेति भावः । अत एवाग्नी, क्षीरपेणेत्यादौ षोत्वणत्वे सिद्ध्यतः । अग्नेःकारस्यादस्समर्थाधस्त्व पे इत्यर्थकानुत्तरपदस्य चान्तवद्भावादीनमिति बोध्यम् । व्यधिकरणमेवेति । प्रत्ययस्य सम्बन्धी यो विसर्गस्तस्य नेत्यर्थ इति तद्भावः । अगत्या च भ्रातुर्भेदात्समर्थसमासे व्यधिकरणान्वयरूपदोषद्वयसहनमिति तदभिमानः । नातोऽवेति । व्यधिकरणान्वयफलस्य कविभिः कृतमित्यादेः प्रत्ययसम्बन्धिभिन्नस्य विसर्गस्येत्यर्थे वं लक्षणया सामानाधिकरण्येनापि सम्भवादिति भावः । व्याख्यातदोषसामानाधिकरण्ये तु लिङ्गतोऽपि तदादरभावात्सौत्रस्य सङ्गतमेव स्यादिति । अनेनोक्तव्याख्याया एव स्वाभिमतत्व सूचितमित्यलम् ।

'इणिङसो' अत उकारात्परस्य षत्व नेति ज्ञापनात्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे की, 'अन्तादिवच्च' सू. ७५ हें सूत्र त्रिपादींत देखील प्रवृत्त होतें हें ('भ्रातुष्पुत्रः' या शब्दाचा कस्कादिगणात मुद्दाम पाठ केला असल्यामुळें) ज्ञापित होत असल्यामुळें, त्या ज्ञापनाचें फल हें आहे कीं, ('मातुः कार्यम्' इत्यादि स्थळीं) षत्व होत नाही. ('पूर्वपरयोरर्थयोरेकादेशः पूर्वस्थानिघटितसमुदायस्यान्तवद्भवति, परस्थानिघटितसमुदायस्याद्यवद्भवति' असा 'अन्तादिवच्च' या सूत्राचा अर्थ आहे. 'भ्रातृ + ङस् = भ्रातुस्' या स्थळीं 'पुत्र' हा शब्द पुढें आला असता, प्रकृत सूत्रानें विसर्गाचें षत्व करतेवेळीं 'अन्तादिवच्च' हें सूत्र प्रवृत्त

केले तरच वरील अर्थान्वयें 'उरस्' हा एकादेशादि समुदाय परादिवद्भावानें प्रत्ययसंज्ञक मानता येतो व त्या समुदायातील सकाराचा 'रात्सस्य' या सूत्रानें लोप झाल्यावर अवशिष्ट राहिलेल्या 'उर्' यातील रकाराचे जागी 'खरवसानयोः' या सूत्रानें होणारा विसर्ग स्थानिवद्भावानें प्रत्ययावयव मानता येतो व प्रकृत सूत्रानें प्रत्ययावयवभिन्न विसर्गाचे षत्व होणे सांगितले असल्यामुळें, वरील उदाहरणात रेफाचे जागी झालेल्या विसर्गाचे षत्व होऊं शकत नाही. पण त्या उदाहरणात षत्व होणें इष्ट असल्यामुळें, 'भ्रातुष्पुत्र' हा शब्द कस्कादिगणात मुद्दाम पठित केला आहे व 'अन्तादिवच्च' हे सूत्र त्रिपादीत देखील प्रवृत्त होते याचा तो पाठ वास्तविक ज्ञापक ठरतो, आणि तें सूत्र त्रैपादिक षत्वकार्य करतेवेळी त्रिपादीत प्रवृत्त होत असल्यामुळें, विसर्गाचे षत्व होत नाही हे म्हणणे त्या सूत्राच्या प्रवृत्तिमुळें निष्पन्न होणाऱ्या फलाचे केवळ कथन करणे होय असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. 'त्रिपाद्या असिद्धत्वात् तत्रान्तवत्वाप्रवृत्तेः' असे जें पूर्वी शब्दरत्नात म्हटलें आहे त्या विरुद्ध प्रकृत पंक्ति असल्यामुळें, या दोन पंक्ति आपाततः परस्परविरुद्ध दिसतात. परंतु पूर्व पंक्ति पूर्वपक्षाचा अनुवाद करणारी असून प्रकृत पंक्ति सिद्धान्तपक्ष सांगणारी असल्यामुळें, तो दोष येत नाहीं. प्रकृत सूत्रावरील उद्योतात 'त्रिपाद्या असिद्धत्वेन तत्रान्तवद्भावाऽप्रवृत्तेरिति पूर्वपक्षतात्पर्यम्' असे स्पष्ट म्हटले आहे व शब्दरत्नातील वरील सर्व पंक्ति 'उरण्परः' या सूत्रावरील उद्योतात आढळतात.) 'अन्तादिवच्च' हें सूत्र त्रिपादीत प्रवृत्त होत असल्यामुळेच, 'अमी, क्षीरपेण' इत्यादि उदाहरणात मीत्व व णत्व यांची अनुक्रमें सिद्धि होते. या दोन उदाहरणांपैकीं 'अमी' या प्रथम उदाहरणात एकार हा 'अदस्' शब्दाचा अवयव आहे व द्वितीय उदाहरणात 'पे' हे एकाच् उत्तर पद आहे हे पूर्वान्तद्भाव मानल्याशिवाय सिद्ध होऊं शकत नाही हे लक्षात ठेवावे. ('अदस्+जस्' या स्थली 'त्यदादीनामः'

सू. २६५ या सूत्रानें 'अदस्' यातील अन्त्य सकाराचे जागी अकार होऊन व 'अतो गुणे सू. १९१ या सूत्रानें पररूप एकादेश होऊन आणि 'जसः शी' सू. २१४ या सूत्रानें 'जस्' प्रत्ययाचे जागी 'शी = ई' असा आदेश होऊन 'अद+ई' अशी स्थिति झाली असता, 'आद्गुणः' सू. ६९ या सूत्रानें गुणरूप एकादेश होऊन 'अदे' असे रूप होतें. 'एत ईद्बहुवचनें' सू. ४३८ या त्रैपादिक सूत्रानें 'अदस्' यातील दकारापुढें येणाऱ्या एकाराचे जागी बहुवचनात ईकारादेश होणें व तसेच पूर्व दकाराचे जागी मकार होणें सांगितले आहे. 'अदे' यातील एकार 'अदस्' शब्दाचा वास्तविक अवयव नसून तो 'अदस्' शब्दातील अकार व प्रत्यय ईकार या दोहोंचे जागी झालेला एकादेश आहे पण 'अन्तादिवच्च' या सूत्रान्वयें तो एकार पूर्वान्तवद्भावानें 'अदस्' शब्दाचा अन्त्यावयव मानता येतो व त्यामुळें त्या एकाराचे जागी 'एत ईत्' या सूत्रानें ईकारादेश होतो. जर 'अन्तादिवच्च' हे सापादिक सूत्र 'एत ईत्' या सूत्रानें होणारे त्रैपादिक कार्य करतेवेळी त्रिपादीत प्रवृत्त झाले नसतें तर, एका-राचे जागी ईकार व पूर्व दकाराचे जागी मकार होऊं शकला नसता व 'अमी' हें इष्ट रूप सिद्ध होऊ शकले नसतें. तसेच 'क्षीरप+टा' या स्थली 'टाङसिङसाम्' सू. २०१ या सूत्रानें 'टा' या प्रत्ययाचे जागीं 'इन' असा आदेश होऊन 'क्षीरप+इन' अशी स्थिति झाली असता, 'आद्गुणः' सू. ६९ या सूत्रानें 'अ+इ' या दोहोंचे जागी 'ए' असा गुणरूप एकादेश होऊन 'क्षीरपेण' असे रूप होतें. या उदाहरणात 'एकाजुत्तरपदे णः' सू. ३०७ या त्रैपादिक सूत्रानें णत्व झाले आहे. या त्रैपादिक सूत्राचा असा अर्थ आहे की, समासातील उत्तरपद एकाच् असल्यास व पूर्वपदात णत्व होण्याचे निमित्त असल्यास, उत्तर पदापुढील विभक्तिप्रत्ययाचे असणाऱ्या नकाराचे णत्व होतें. 'क्षीरपेण' या स्थली वास्तविक 'प' हें उत्तरपद असून त्यापुढें नकार नाहीं. 'पे' पुढें नकार आहे; पण तें उत्तर पद नाही. तरी पण 'अन्तादिवच्च' या सूत्रान्वयें

'पे' हे पूर्वान्तवद्भावानें उत्तर पद मानता येतें व त्यामुळें 'पे' पुढील विभक्तिप्रत्ययातील नकाराचे णत्व होतें. णत्वरूप त्रैपादिक कार्य करतेवेळीं जर 'अन्तादिवच्च' या सापादिक सूत्राची त्रिपादींत प्रवृत्ति झाली नसती तर, 'क्षीरपेण' असें इष्ट रूप सिद्ध होऊं शकलें नसतें. साराश वरील दोन उदाहरणावरून हें स्पष्ट होतें कीं, 'अन्तादिवच्च' हें सूत्र त्रिपादींत देखील प्रवृत्त होतें.) 'अप्रत्ययस्य इत्येतदपि व्यधिकरणमेव' असें जें हरदत्तानें म्हटलें आहे त्याचा 'प्रत्ययस्य सम्बन्धी यो विसर्गस्तस्य न' असा अर्थ आहे व हरदत्ताच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं, (सर्व इष्टरूपाची सिद्धि होण्याकरिता 'अप्रत्ययस्य' हा प्रसज्यप्रतिषेध मानून) वाक्यभेद करणें, असमर्थ समास करणें, व वैयधिकरण्यानें अन्वय करणें हे तीन दोष गत्यन्तर नसल्यामुळें सहन करणें भाग आहे. 'हरदत्तेनोक्त नातीवादर्तव्यम्' या मनोरमेंतील पक्तीत 'नातीव' हें जें पद घातलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, ('प्रत्ययस्य सम्बन्धी यो विसर्गः तस्य न' असा) वैयधिकरण्यानें अन्वय केल्यानें जें फल सिद्ध होतें तेंच फल, 'अप्रत्ययस्य' या पदाचा 'प्रत्ययसम्बन्धिभिन्नस्य' असा लक्षणेनें अर्थ करून ('प्रत्ययसम्बन्धिभिन्नस्य' याचा 'विसर्गस्य' या पदाशीं) सामानाधिकरण्यानें अन्वय केल्यानें देखील, सिद्ध होतें व त्यामुळें 'कविभिः कृतम्' इत्यादि उदाहरणाचा सग्रह होऊं शकतो, म्हणजे त्या उदाहरणात 'भिस्' प्रत्ययाचा अवयव जो सकार त्याचे जागीं होणाऱ्या विसर्गाचें, लक्षणा न करिता केवळ सामानाधिकरण्यानें अन्वय केल्यानें, षत्व होण्याची जी आपत्ति येत होती ती वर सागितल्याप्रमाणें लक्षणा करून सामानाधिकरण्यानें अन्वय केल्यानें सहज टाळता येते. व्याख्यादर्शीत जशा (लक्षणा न करिता) सामानाधिकरण्यानें अन्वय केला आहे तसा अन्वय करणें दीक्षिताना मान्य असतें तर, त्याना लेशमात्र देखील हरदत्ताचें मत आदरार्ह वाटलें नसतें व त्यानीं 'नातीवादर्तव्यम्' या पक्तींत 'नातीव' हें जें पद घातलें आहे तें अगदीं अयोग्य ठरलें अ॰

वरील मनोरमेच्या पंक्तींत 'नातीव' हें पद घातलें असल्यामुळें ('अप्रत्ययस्य' या प्रकृत सूत्रातील पदाचा 'प्रत्ययसम्बन्धिभिन्नस्य' असा लक्षणेनें अर्थ करून त्याचा 'विसर्गस्य' या पदाशी सामानाधिकरण्यानें अन्वय करणें) असेंच व्याख्यान करणें योग्य आहे असें दीक्षितांनी सूचित केलें आहे. या विपर्यासवधानें एवढें व्याख्यान पुरे. ('कविभि कृतम्' इत्यादि स्थलीं विसर्गाचें षत्व होण्याची जी आपत्ति येते ती टाळण्याकरिता हरदत्तानें प्रकृत सूत्रातील 'अप्रत्ययस्य' हें पद प्रसज्यप्रतिषेध मानून त्या सूत्राची 'इदुदुपधस्य विसर्गस्य षत्वं भवति किन्तु प्रत्ययसम्बन्धिन विसर्गस्य षत्वं न भवति' अशी दोन वाक्यें केली आहेत. अशा रीतीनें वाक्यभेद करणें, म्हणजे एका सूत्ररूप वाक्याची दोन वाक्यें करणें, हा व्याकरणशास्त्रात गौरवरूप दोष मानला आहे. दुसरें असें की, 'प्रत्ययसम्बन्धिन न भवति' या अर्थांत 'अप्रत्ययस्य' हा नञ्समास होऊ शकत नाही, कारण नञाचा 'भवति' या क्रियेंत अन्वय असून 'प्रत्यय' या पदात अन्वय नाही. त्यामुळें हा समास असमर्थ समास ठरतो व 'समर्थः पदविधिः' सू ६४५ हें सूत्र असल्यामुळें असा असमर्थ समास करणें अयोग्य ठरतें. तिसरें असें की, 'सम्भवति सामानाधिकरण्ये वैयधिकरण्यमन्याय्यम्' असा न्याय असल्यामुळें, वैयधिकरण्यानें अन्वय करणें अन्याय्य ठरतें. सारांश 'अप्रत्ययस्य' हा प्रसज्यप्रतिषेध मानून हरदत्तानें जो वैयधिकरण्यानें अन्वय केला आहे तो वर सांगितल्याप्रमाणें दोषत्रययुक्त ठरत असून, 'अप्रत्ययस्य' हा पर्युदास मानून व लक्षणा करून, म्हणजे 'अप्रत्ययस्य' या पर्युदासाचा 'प्रत्ययावयवभिन्नस्य' असा लक्षणेनें अर्थ करून, 'प्रत्ययावयवभिन्नस्य' या पदाचा 'विसर्गस्य' या पदाशी सामानाधिकरण्यानें अन्वय केला असता वरील तीन दोषांपैकी कोणताहि दोष उद्भवत नसल्यामुळें व तसा अन्वय केल्यानें 'कविभि कृतम्' इत्यादि इष्ट रूपाची देखील सहज सिद्धि होऊ शकत असल्यामुळें, हरदत्तानें जसा वैयधिकरण्यानें अन्वय केला आहे तसा अन्वय

न करिता, लक्षणा करून वर सांगितल्याप्रमाणे सामानाधिकरण्यानें अन्वय करणेंच दीक्षितांना पसत होतें आणि त्यामुळेंच त्यांनी 'हरदत्तोक्तं नातीवादर्तव्यम्' असें मनोरमेंत म्हटलें आहे. व्याख्यादर्शांत जसा लक्षणा न करिता सामानाधिकरण्यानें 'प्रत्ययभिन्नस्य निमित्तस्य' असा अन्वय केला आहे तसाच अन्वय करणें जर दीक्षितांना मान्य असतें तर, मनोरमेच्या वरील पंक्तीत 'नातीवादर्तव्यम्' असा प्रयोग न करिता 'नादर्तव्यम्' असा त्यांनी प्रयोग केला असता. सारांश हरदत्तानें जो वैयधिकरण्यानें अन्वय केला आहे त्यावरच दीक्षितांचा कटाक्ष असून 'प्रत्ययावयवभिन्नस्य' असें जें त्यानें आपल्या व्याख्यानात म्हटलें आहे त्यावर नव्हता असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. प्रकृत सूत्रावरील शब्देन्दुशेखरांत देखील 'अप्रत्ययस्येति पर्युदासो, लाघवात्। तत्र प्रत्ययपदं प्रत्ययसम्बन्धिपरम्, तेन प्रत्ययसम्बन्धिभिन्नस्येत्यर्थः। अत एव कविभिः कृतमित्यादौ न परत्रम्।' असेंच म्हटलें आहे)

शब्दरत्न—परम्परयेति। एकादेशशास्त्रमपेक्ष्य रेफस्यानिमित्तत्वेन विसर्गस्यैकादेशशास्त्रनिमित्तकत्वमिति भावः। प्रचुरः पाठ इति। ओषधीरुपयोरित्यादौ शर्ककादेशो "कः करत्करतिकृधि–" इति षत्वनिवृत्तिश्च तत्फलमुक्तम्। मूले तु तस्य फलस्य च्छान्दसत्वात् "छन्दसि वा प्र–" इत्यतः "इण षः" इत्यस्य निवृत्या ऽद्योषाच्च पष्ठयन्तमेव पठितमिति दिक्॥

प्रामादिकमिति। पदादित्वेन "सोऽपदादौ" इत्यस्याप्राप्तिरिति भावः॥

'ऋत उत् इत्येकादेशशास्त्रं विसर्गं प्रति परम्परया प्रयोजकम्' या मनोरमेंतील पंक्तीत 'परम्परया' हें जें पद घातलें आहे त्याचा भावार्थ हा आहे की, 'ऋत उत्' सू. ७७१ या एकादेशशास्त्रानें झालेला उकार रपर झाल्यावर रेफ विसर्गाचा स्थानी होत असल्यामुळें, एकादेशशास्त्र हें परंपरेनें विसर्गाचें निमित्त ठरतें (वास्तविक 'ऋत उत्' या एकादेशशास्त्रानें 'ऋ' व 'अ'

या दोहोंचे जागी केवळ 'उ' हा एकादेश होणे सांगितले आहे. त्या एकादेशशास्त्रानें रेफ निष्पन्न होत नसून, एकादेश झाल्यावर 'उरण्रपर' सू ७० या सूत्रानें एकादेशाला रकारागम होऊन 'उर्' असा रेफान्त एकादेश निष्पन्न होतो पण 'उ' असा एकादेश प्रथम झाल्याशिवाय विसर्गाचा स्थानी जो रेफ तो निष्पन्न होऊ शकत नसल्यामुळें व रेफ निष्पन्न झाल्याशिवाय त्याचे जागी होणारा विसर्ग उत्पन्न होऊ शकत नसल्यामुळे, 'ऋत उत्' हे एकादेशशास्त्र परंपरेनें विसर्गाच्या उत्पत्तीला कारणीभूत होते असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे असे शब्दरत्नकार म्हणतात ) 'एकादेशशास्त्रनिमित्तात् (षत्व न भवति)' असा जो (पञ्चम्यन्त) पाठ भाष्यात–म्हणजे 'उरण्रपर' १ १ ५१ या सूत्रावरील व प्रकृत सूत्रावरील भाष्यात ८ ३ ४१–अनेक ठिकाणी आढळतो त्या पाठाचे फल असे सांगितले आहे की, 'ओषधीस्कृधि' इत्यादि उदाहरणात 'शस्' प्रत्ययाशी एकादेश केल्यावर 'इदुदुपधस्य चाप्रत्ययस्य' सू.३६३५ या सूत्रानें विसर्गाचे जागी षकार होत नाही (व सकार होतो). प्रकृत सूत्रावरील कौमुदीत ('एकादेशशास्त्रनिमित्तकस्य न षत्वम्' ही जी पंक्ति आहे त्या पंक्तीत 'एकादेशशास्त्रनिमित्तकस्य' असा) षष्ठ्यन्तच पाठ केला आहे (भाष्यात जसा पञ्चम्यन्त पाठ केला आहे तसा पाठ केला नाही तरी पण पञ्चम्यन्त पाठाचे जें फल वर सांगितले आहे) ते फल वैदिक प्रयोगात होणारे असल्यामुळें व तसेच 'इण षः' या सूत्राची 'छन्दसि वा प्राम्रेडितयोः' या सूत्रापासून निवृत्ति मानल्यानें, ('ओषधीस्कृधि' हा प्रयोग सिद्ध होऊ शकतो आणि त्यामुळें कौमुदीत जो षष्ठ्यन्त पाठ केला आहे तसा पाठ मानल्यानें देखील) कांही दोष येत नाही. ('ओषधी + शस् = ओषधी + अस्' या स्थली 'प्रथमयोः पूर्वसवर्णः' सू १६४ या सूत्रानें पूर्वसवर्णदीर्घरूप एकादेश होऊन 'ओषधीस्' असे रूप झाल्यावर 'ससजुषो रुः' सू १६२ या सूत्रानें अन्त्य सकाराचे जागी 'रु' हा आदेश होऊन व त्याचा 'खरवसानयोः' सू ७६ या सूत्रानें विसर्ग होऊन 'ओषधीः' असे रूप होते. 'एकादेशशास्त्रनिमित्तात्'

ही परपञ्चमी मानून 'एकादेशशास्त्रनिमित्तात्परस्य विसर्गस्य षत्वं न भवति' असा त्या भाष्यवचनाचा अर्थ केल्यानें, जरी 'ओषधी:' या स्थलीं 'ई' या एकादेशापुढें विसर्ग आला असून त्यापुढें ककारानें सुरू होणारा 'कृधि' हा शब्द आला आहे तरी देखील, 'इण. षः' सू १५३ या सूत्रानें प्राप्त होणारें त्या विसर्गाचें षत्व न होता 'क: करत्करतिकृधि' या सूत्रानें त्या विसर्गाचें सत्व होतें हें त्या पञ्चम्यन्त पाठाचें फल सांगितलें आहे पण 'क. करत्करतिकृधि' या सूत्रात 'ईण: षः' या सूत्राची अनुवृत्ति मानली तरच, विसर्गाचे जागीं षत्वाची प्राप्ति होते. परंतु 'इण. ष:' या सूत्राची 'पस्कादिषु च' या सूत्राच्या अखेरपर्यंतच अनुवृत्ति मानली व 'क: करत्करतिकृधि' या पुढील सूत्रात त्या सूत्राची अनुवृत्ति न मानली तर, वरील उदाहरणात विसर्गाचे जागीं षत्वाची प्राप्तीच होऊं शकत नाहीं व 'ओषधीस्कृधि' असें सकारयुक्त रूप सिद्ध होऊं शकतें. दुसरें असें की, 'छन्दसि दृष्टानुविधि.' हा न्याय असल्यामुळें, वैदिक प्रयोग जसा आढळतो तसाच तो शुद्ध मानला पाहिजे आणि त्यामुळें पञ्चम्यन्त पाठ मानल्यानें कोणत्याहि अधिक फलाची सिद्धि होत नाही. कौमुदींत जसा षष्ठ्यन्त पाठ मानला आहे तसा पाठ मानल्यानें देखील, वर सांगितलेल्या दोन कारणामुळें, 'ओषधीस्कृधि' हें सकारयुक्त रूप सिद्ध होऊं शकतेंच सारांश षष्ठ्यन्त पाठ मानल्यानें देखील पञ्चम्यन्त पाठाचें फल वर जें सांगितलें आहे तें निष्पन्न होऊं शकतेंच व कोणताहि दोष येत नाही असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.) 'वृत्तौ मुहुस्कामेति सकारं क्वचित् पठयते, तत् प्रामादिकमिति हरदत्त.' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे की, ('मुहु कामा' या उदाहरणात विसर्गापुढें असणारा ककार हा 'कामा' या) पदाचा आद्य अवयव असल्यामुळें, 'सोऽपदादौ' सू १५० या सूत्राची प्राप्ति होत नाहीं (व त्या सूत्रानें होणारें विसर्गाचें सत्व होऊंच शकत नाही आणि त्यामुळें 'मुहुस्कामा' हा सकारयुक्त पाठ चूक ठरतो असा हरदत्ताच्या म्हणण्याचा आशय आहे )

मनोरमा—द्विस्त्रिश्चतुरिति इह । द्वित्रिभ्यां सुजन्ताभ्यां साहचर्यात् चतुःशब्दोऽपि सुजन्त एव ग्रहीष्यते । कृत्वोऽर्थग्रहणं ज्ञापकम्-साहचर्यं न सर्वत्र व्यवस्थापकमिति । तेन "दीधीवेवीटाम्" इत्यत्र धातुसाहचर्येऽपि आगमस्येटो ग्रहणम् । उभयत्र विभाषा चेयम् । चतुरित्यस्य "इदुदुपधस्य-" इति प्राप्ते इतरयोस्त्वप्राप्ते । न च तयोरपि "इसुसोः सामर्थ्ये" इत्यनेन सिद्धिः शङ्क्या । इसः प्रत्ययस्य अर्थवतश्च तत्र ग्रहणात् । चतुष्कपाल इति । "इदुदुपधस्य" इति नित्य षः ।

'द्विस्त्रिश्चतुरिति कृत्वोऽर्थे' सू १५७ या सूत्रात सुजन्त 'द्विस्, त्रिस्' या शब्दाच्या साहचर्यामुळें सुजन्त 'चतुर्' शब्दाचेच ग्रहण केले जाऊ शकते असे असून देखील प्रकृत सूत्रात 'कृत्वोऽर्थे' या शब्दाचें जें ग्रहण केले आहे ते साहचर्यन्याय सर्वत्र लागू पडत नाही याचे ज्ञापक ठरते व तो न्याय अनित्य असल्यामुळेंच, 'दीधी-वेवीटाम्' सू २१९० या सूत्रात 'दीधी, वेवी' या धातूचे साहचर्य असून देखील ('इट् गतौ' धा न ३१८ या धातूचे ग्रहण न केले जाता) 'इट्' या आगमाचे ग्रहण केले जाते ('द्वित्रिचतुर्भ्यः सुच्' सू २०८६ या सूत्रानें 'द्वि, त्रि, चतुर्' या शब्दांना 'क्रियाभ्या-वृत्तिगणन' या अर्थामध्यें 'सुच् = स्' प्रत्यय होतो व 'चतुर्' शब्दाहून 'सुच् = स्' प्रत्यय केला असता, 'रात्सस्य' सू. २८० या सूत्रानें सकाराचा लोप होऊन 'चतुर्' असेच सुजन्त रूप राहते. 'चतुर्' हा शब्द रकारान्त अनव्यय प्रातिपदिक आहे व तसेच सुजन्त 'चतुर्' हा शब्द, 'तद्धितश्चासर्वविभक्तिः' सू ४४८ या सूत्रात 'कृत्वोर्थाः' असे परिगणन केले असल्यामुळें त्या सूत्रान्वयें, अव्ययसंज्ञक देखील आहे त्यामुळें 'द्विस्त्रिश्चतुरिति कृत्वोऽर्थे' असे प्रकृत सूत्र पठित न करिता पाणिनीनें 'द्विस्त्रिश्चतुरिति' असेच सूत्र पठित केले असतें तरी, 'द्विस्, त्रिस्' या सुजन्त अव्ययाबरोबर 'चतुर्' शब्दाचा उच्चार केल्यामुळें, 'सहचरितासहचरितयोः सहचरितस्यैव ग्रहणम्'—परि. ११२—या साहचर्यन्यायान्वयें 'चतुर्'

या रकारान्त अनव्यय प्रातिपदिकाचें ग्रहण न होता, 'चतुर्' या मुजन्त अव्ययाचेंच ग्रहण झालें असतें. असें असून देखील वरील सूत्रात 'कृत्वोऽर्थे' हें पद घातलें असल्यामुळें हे ज्ञापित होतें कीं, साहचर्यन्याय अनित्य आहे, म्हणजे तो सर्वत्र लागू पडणारा नसून कोठें कोठें ज्याचा धर्म समान नाही अशा शब्दाचा देखील एकत्र प्रमाण विना उच्चार केला जातो उदाहरणार्थ 'दीधीवेवीटाम्' या सूत्रात 'दीधी, वेवी' हे धातु पठित केले असून त्याच्या साहचर्यानें ग्वादिगणात पठित असलेल्या 'इट् गतौ' या धातूचें ग्रहण न होता 'इट्' या आगमाचें ग्रहण होतें. जर साहचर्यन्याय नित्य असता तर, त्या सूत्रातील 'इट्' या शब्दानें 'इट्' धातूचेंच ग्रहण करणें भाग पडलें असतें व ते सूत्र गुणवृद्धीचा निषेध करणारें सूत्र असल्यामुळें, 'इट् + शप् + ति' अशा स्थितीत 'पुगन्तलघूपधस्य च' सू. २१८९ या सूत्रानें 'इट्' धातूतील 'इ' या उपधेचा गुण होऊं शकला नसता व 'एटति' असें इष्ट रूप सिद्ध न होता 'इटति' असें अनिष्ट रूप होण्याची आपत्ति आली असती सारांश साहचर्यन्याय अनित्य असल्यामुळें 'चतुर्' या शब्दानें 'चतुर्' या मुजन्त अव्ययाचेंच ग्रहण व्हावें याकरिता पाणिनीला प्रकृत सूत्रात 'कृत्वोऽर्थे' हें पद घालावें लागलें व अशा रीतीनें त्या पदाचें ग्रहण साहचर्यन्यायाच्या अनित्यत्वाचें ज्ञापक ठरतें)

प्रकृत सूत्र प्राप्ताप्राप्तविभाषेचें सूत्र आहे. 'चतुर्' या स्थलीं 'इदुदुपधस्य' सू. १५५ या सूत्रानें विसर्गाचें नित्य षत्व होण्याची प्राप्ति आहे व 'द्वि, त्रि' या दोन स्थलीं विसर्गाचें षत्व होण्याची प्राप्ति नाही ('द्वि, त्रि' या शब्दाहून 'द्वित्रिचतुर्भ्यः सुच्' सू २०८६ या सूत्रानें 'सुच् = स्' प्रत्यय केला असता, 'ससजुषो रु.' सू १६२ या सूत्रानें त्या प्रत्ययरूप सकाराचे जागीं 'रु' हा आदेश होऊन 'खरवसानयोः' सू ७६ या सूत्रानें 'रु' चा विसर्ग होतो सारांश या दोन्ही उदाहरणात 'सुच्' प्रत्ययाचे जागीं झालेला विसर्ग स्थानिवद्भावानें प्रत्ययरूप ठरत असल्यामुळें,

'इदुदुपधस्य' या सूत्राची वास्तविक प्रवृत्ति होऊ शकत नाही. तरी पण 'द्वि, त्रि' या सुबन्त शब्दापुढें 'कु, पु' आल्यास प्रकृत सूत्रानें विसर्गाचे विकल्पेंकरून षत्व होतें व अशा रीतीनें या दोन शब्दांना लागू पडणारें प्रकृत सूत्र अप्राप्तविभाषेचें सूत्र ठरतें. पण 'चतुर्' या प्रातिपदिकाहून 'सुप् = स्' प्रत्यय केला असता, 'चतुर् + स्' अशा स्थितीत 'रात्सस्य' सू २८० या सूत्रानें प्रत्ययरूप सकाराचा लोप झाल्यावर 'चतुर्' यातील अन्त्य प्रत्यय-भिन्न रकाराचा 'खरवसानयोः' या सूत्रानें जो विसर्ग होतो ती अप्रत्ययरूप विसर्ग ठरत असल्यामुळें, या स्थली 'इदुदुपधस्य' या सूत्रानें नित्य षत्वाची प्राप्ति होते. तें नित्य प्राप्त होणारें षत्व प्रकृत सूत्रानें विकल्पेंकरून होणें सांगितलें असल्यामुळें, 'चतुर्' या शब्दास लागू पडणारें प्रकृत सूत्र प्राप्तविभाषेचें सूत्र ठरतें आणि म्हणूनच हें उभयत्रविभाषेचें सूत्र आहे असें दीक्षितांनी मनोरमेंत म्हटलें आहे.) 'द्वि, त्रि' या स्थली देखील 'इसुसोः सामर्थ्ये' सू १५८ या सूत्रानें विसर्गाचें विकल्पेंकरून षत्व होऊं शकतें अशी कोणी शंका केल्यास, ती शंका बरोबर नाही, कारण त्या सूत्रात 'इस्' या प्रत्ययाचें व तसेंच अर्थवान् शब्दाचें ग्रहण केलें आहे. (कोणी अशी शंका करतात की, 'द्विस्, त्रिस्' या दोन्ही शब्दांत 'इस्' हा समुदाय अन्तीं आहे व त्या समुदायातील अन्त्य सकाराचें जागीं झालेल्या विसर्गाचें 'इसुसोः सामर्थ्ये' या सूत्रानें विकल्पेंकरून षत्व होऊं शकतेंच व म्हणून प्रकृत सूत्रात 'द्विस्, त्रिस्' या शब्दाचें ग्रहण करण्याची काहीच गरज नव्हती या शंकेवर दीक्षित असें उत्तर देतात की, 'द्विस्, त्रिस्' या स्थली 'इस्' प्रत्यय नसून केवळ 'सुप् = स्' हाच प्रत्यय आहे व 'इसुसोः' या सूत्रात 'इस्' या प्रत्ययाचें ग्रहण केलें असल्यामुळें आणि 'द्विस्, त्रिस्' या दोन्ही स्थलीं त्या प्रत्ययाचा अभाव असल्यामुळें, तें सूत्र या दोन शब्दांचे ठिकाणीं प्रवृत्त होऊं शकत नाही. दुसरें असें की, 'इसुसोः' या सूत्रांत, अर्थवान् असलेल्या 'इस्'चें ग्रहण केलें आहे व 'द्विस्, त्रिस्'

'यातील अन्त्य इकार व त्यापुढील 'युष् = म्' प्रत्यय यांचा समुदाय जो 'इस्' हा शब्द आहे तो अर्थवान् नाहीं. म्हणून 'अर्थवद्ग्रहणे नानर्थकस्य'—परि १४—या परिभाषान्वयें 'इसुसो.' या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या अर्थवान् 'इस्'नें तथा अनर्थक 'इस्'चे ग्रहण करता येत नाही आणि म्हणून देखील 'इसुसोः' हे सूत्र 'द्विस्, त्रिस्' या शब्दांना लागू पडत नाही त्यामुळें प्रकृत सूत्रात केलेलें 'द्विस्, त्रिस्' या शब्दांचे ग्रहण व्यर्थ ठरत नसून आवश्यक ठरतें.)
प्रकृत सूत्रावरील कौमुदीत दिलेल्या 'चतुष्कपाल.' या प्रत्युदाहरणात 'इदुदुपधस्य' सू. १५५ या सूत्रानें नित्य षत्व होतें. ('चतुष्कपाल ' या सामासिक शब्दाची 'चतुर्षु कपालेषु संस्कृतः पुरोडाश चतुष्क-पालः' अशी वृत्ति आहे. या स्थली तद्धित 'अण्' प्रत्यय विवक्षित असता 'तद्धितार्थोत्तरपदसमाहारे च' सू ७२८ या सूत्रानें झालेला हा समास 'संख्यापूर्वो द्विगुः' सू. ७३० या सूत्रान्वयें द्विगुसंज्ञक ठरतो व येथें 'संस्कृत भक्षाः' सू १२१७ या सूत्रानें झालेल्या 'अण्' प्रत्ययाचा 'द्विगोर्लुगनपत्ये' सू. १०८० या सूत्रानें लुक् झाला आहे. या उदाहरणात 'चतुर्' हा शब्द संख्यासम्यावृत्तिगणनाचा, म्हणजे 'कृत्वोऽर्था'चा, वाचक नसून केवळ संख्येचा वाचक असल्या-मुळें, येथें प्रकृत सूत्र लागू पडत नाही व त्यामुळें अप्रत्ययरूप विमर्गाचे विकल्पेंकरून षत्व न होता 'इदुदुपधस्य' या सूत्रानें नित्य षत्व होतें.)

शब्दरत्न—साहचर्यमिति । न च रामलक्ष्मणावित्यादौ दृष्ट-साहचर्यसम्बन्धस्याभिधानियामकत्व दृष्टम् । न चैवं क्वापि साहचर्य-सम्बन्धो गृहीत इति कथमेतदिति वाच्यम् । "पञ्चम्यपाङ्परिभिः" इत्यनेन लक्षणादिद्योतकपरियोगे पञ्चमीशङ्कायां "यद्यप्ययं परि-दृष्टापचारो वर्जने चावर्जने चायं खल्वपशब्दो ऽदृष्टापचारो वर्जनार्थ एव कर्मप्रवचनीयस्तस्य क. सहायो भवितुमर्हति अन्यो वर्जनार्थात् । यथा ऽस्य गोः सहायेनार्थ इति गौरेवानीयते नाश्वो न गर्दभः" इति "कर्मप्रवचनीययुक्ते" इति सूत्रस्थभाष्येण सदृशानामेव प्रयोगे

सहायत्वमित्यर्थस्य प्रतिपादनेनाक्षतेः । परिभाषायां सहचरितशब्देन सदृशस्यैव ग्रहणं सहचरस्य भावः साहचर्यम् । सहचरणं च सदृशयोरेवेति साहचर्यशब्देन सादृश्यमुच्यते । सदृशयोरेव सहविवक्षा तयोरेव च सह प्रयोगः । रामलक्ष्मणावित्यादावपि सादृश्यमेव नियामकमिति दिक् । अर्थवतश्चेति । प्रतिपदोक्तस्य चेत्यपि बोद्धव्यम् । नित्य च इति । भाष्यप्रामाण्येनाव्युत्पत्तिपक्षस्यैवाङ्गीकारेण व्युत्पत्तिपक्षे प्रत्ययसम्बन्धित्वात्कथं पत्वमिति न शङ्क्यम् । अत एव "चतुष्पाद्भ्यो ढञ्" इत्यादिनिर्देशसङ्गतिः ।

'रामलक्ष्मणौ' इत्यादि उदाहरणात राम व लक्ष्मण यांचा साहचर्यसंबंध लोकात प्रसिद्ध असल्यामुळे अशा प्रकारचा साहचर्यसंबंध अभिधेय अर्थाचा, म्हणजे अभिधाशक्तीनें ज्ञात होणाऱ्या अर्थाचा, नियामक होतो हे प्रसिद्ध आहे, पण 'द्वि', त्रि.' या शब्दांचा 'चतुर्' शब्दाशी साहचर्यसंबंध कोठेंहि (लौकिक प्रयोगात) आढळून येत नाही आणि म्हणून अशा ठिकाणी अभिधेय अर्थाचे नियामकत्व कसे होऊं शकणार असी कोणी शंका केल्यास, ती शंका बरोबर नाही (राम व लक्ष्मण यांचा साहचर्यसंबंध लोकांत सर्वत्र प्रसिद्ध असल्यामुळें, 'रामलक्ष्मणौ' असा प्रयोग केला असतां, 'राम' या शब्दानें दाशरथि रामाचेच ग्रहण केले जाते, परशुरामाचे किंवा बलरामाचे ग्रहण केले जात नाही, आणि तसेच 'लक्ष्मण' या शब्दानें दुर्योधनपुत्र लक्ष्मण याचे ग्रहण केले जात नसून दाशरथि लक्ष्मणाचेच ग्रहण केले जाते. परंतु 'द्वि, त्रि', चतुर्' या तीन युक्त शब्दांचे साहचर्य लौकिक प्रयोगात कोठेंहि आढळत नाही. म्हणून 'द्वि, त्रि' या शब्दांच्या बरोबर 'चतुर्' या शब्दाचा उच्चार केला आहे एवढयाच कारणावरून प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेला 'चतुर्' हा शब्द संख्यावाचक नसून सरयाम्प्राधृतिगणनाचा वाचक युक्त शब्द आहे असे त्याच्या अभिधेय अर्थाचे नियमन करता येणे शक्य नाही असी शंकाकाराची शंका आहे. या शंकेवर उत्तर देतांना शब्दकौस्तुभकार प्रथम भाष्याचे प्रमाण देतात.) 'धर्म-

'साहचर्य' हें रूप सिद्ध झाले आहे.) सारख्याच धर्माचे लोक एकत्र आढळतात ('समानशीलव्यसनेषु सख्यम्' ही कवीची उक्ति सर्वत्र प्रसिद्धच आहे.) त्यामुळें 'साहचर्य' हा शब्द सादृश्याचा वाचक ठरतो. सदृशार्थवाचक किंवा समानधर्मक शब्दाचाच एकत्र उच्चार करण्याची इच्छा–विवक्षा–असते व तशाच शब्दाचा एकत्र प्रयोग केला जातो 'रामलक्ष्मणौ' इत्यादि प्रयोगात देखील सादृश्यच, म्हणजे दाशरथित्व हा समान धर्मच, अभिधाशक्तीनें ज्ञात होणाऱ्या अर्थाचा नियामक ठरतो (सारांश समानधर्मक शब्दाचाच एकत्र प्रयोग करण्याची प्रथा–वहिवाट–असल्यामुळे, 'द्विस्, त्रिस्' या सुजन्त शब्दाच्या साहचर्यानें 'चतुर्' या सुजन्त शब्दाचें ग्रहण करता आलेच असते हें दीक्षिताचें म्हणणें वरील भाष्याला धरून असल्यामुळें योग्य ठरतें व शब्दकारानें केलेली शंका त्या भाष्याच्या विरुद्ध असल्यामुळें अयोग्य ठरते असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा भावार्थ आहे ) 'इस प्रत्ययस्य अर्थवतश्च तत्र ग्रहणात्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याखेरीज 'प्रतिपदोक्तस्य' हा हेतु देखील देता येतो. ('सर्पिस्' इत्यादि शब्दाच्या अन्ती जसा प्रतिपदोक्त–मूळचा–'इस्' आहे तसा 'द्वि, त्रि' या इकारान्त शब्दाच्या अन्ती मूळचा 'इस्' नाहीं. त्या शब्दाहून 'द्वित्रिचतुर्भ्यः सुच्' सू २०८६ या सूत्रानें 'सुच् = स्' प्रत्यय केल्यावरच, 'द्वि, त्रि' या प्रकृतीतील अन्त्य इकार व त्यापुढील 'सुच् = स्' प्रत्यय यांचा 'इस्' असा समुदाय निष्पन्न होत असल्यामुळें तो 'इस्' लाक्षणिक ठरतो व 'लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैव ग्रहणम्' – परि. ११४ – ही परिभाषा असल्यामुळें, 'इसुसोः' सू. १५८ या सूत्रांतील प्रतिपदोक्त 'इस्' नें तसा लाक्षणिक 'इस्' चे ग्रहण करतां येत नाहीं व त्यामुळें 'इसुसोः' हें सूत्र 'द्विस्, त्रिस्' यांना लागू पडत नाहीं ) पाणिनीय शास्त्रांत अव्युत्पत्तिपक्षच स्वीकारला आहे याला भाष्य प्रमाण असल्यामुळें, व्युत्पत्तिपक्ष मानल्यास 'धनु' या शब्दांतील विसर्गाचे षत्व कसे होऊं शकणार अशी शंका

उद्भवतच नाहीं व्याकरणशास्त्रात पाणिनीनें अव्युत्पत्तिपक्ष मानला असल्यामुळेंच, 'चतुष्पाद्भ्यो ढञ्' सू ११४१ इत्यादि सूत्रांतील 'चतुष्पाद्भ्य' इत्यादि निर्देश योग्य ठरतात ('चतेरुरन्' उ सू ७८६ या सूत्रानें 'चत्' धातूहून उणादि 'उरन् = उर्' प्रत्यय होऊन 'चतुर्' हें रूप सिद्ध होतें. येथें 'चतुर्' शब्दांतील ज्या अन्त्य रकाराचा विसर्ग होतो तो रकार 'उर्' या उणादि प्रत्ययाचा अवयव असल्यामुळें, त्याचे जागीं 'खरवसानयो' या सूत्रानें होणारा विसर्ग स्थानिवद्भावानें प्रत्ययावयवरूप विसर्ग ठरतो व 'इदुदुपधस्य चाप्रत्ययस्य' सू १५५ या सूत्रांत 'अप्रत्ययस्य' असा निषेध असल्यामुळें, त्या सूत्रानें त्या प्रत्ययावयवरूप विसर्गाचें षत्व होऊं शकत नाहीं असें शकाकाराचें म्हणणें आहे शकाकारानें ही शंका व्युत्पत्तिपक्ष मानून केली आहे, व तो पक्ष मानल्यास, 'चतुष्पाल' या उदाहरणांत विसर्गाचें षत्व होऊं शकत नाहीं. पण 'आयनेयीनीयियः' सू ७ १ २ या सूत्रावरील भाष्यांत 'प्रातिपदिकविज्ञानाच्च पाणिनेः सिद्धम्' असें वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचें व्याख्यान करितांना भाष्यकार म्हणतात– 'प्रातिपदिकविज्ञानाच्च भगवतः पाणिनेराचार्यस्य सिद्धम् । उणादयोऽव्युत्पन्नानि प्रातिपदिकानि ।' या भाष्यावर उद्योतकारांनी 'अत्र पाणिनेरित्युक्त्या सर्पिषा यजुषेत्यादि कतिपयातिरिक्तोणादिषु पाणिनेरव्युत्पत्तिपक्ष एवाभिप्रेत इति दर्शयति । वस्तुतः सर्पिषेत्यादौ षत्वमपि बहुलग्रहणादिति सर्वथाऽव्युत्पत्तिरेवैतेष्विति बोध्यम्' असें म्हटलें आहे यावरून हें सिद्ध होतें की, धातूहून उणादि प्रत्यय करून सिद्ध केलेलीं प्रातिपदिकें अव्युत्पन्न प्रातिपदिकेंच मानलीं पाहिजेत असा पाणिनीय सिद्धान्त आहे सारांश पाणिनीला व्युत्पत्तिपक्ष मान्य नसून अव्युत्पत्तिपक्षच मान्य असल्यामुळें, व्युत्पत्तिपक्षाचा आश्रय करून 'चतुष्पाल' या स्थलीं औणादिक 'उरन् = उर्' या प्रत्ययाचा अन्त्यावयव जो रकार त्या रेफाचे जागीं होणाऱ्या विसर्गाचें षत्व पावत नाहीं अशी जी शकाकारानें शंका केली आहे

ती पाणिनीय सिद्धान्ताविरुद्ध असल्यामुळें अयोग्य ठरते असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. जर आचार्य पाणिनीला व्युत्पत्तिपक्ष मान्य असता तर त्यानें 'चतुष्पाद्भ्यो ढञ्' या सूत्रात औणादिक प्रत्ययावयवरूप रेफाचे जागी झालेल्या विसर्गाचे षत्व न करिता व 'चतुष्पाद्भ्य' असा निर्देश न करता 'चतुःपाद्भ्य' असा निर्देश केला असता हे उघड आहे )

मनोरमा– व्यपेक्षाविरहेऽपीति । तिष्ठतु सर्पिष्कुण्डिकामानयेत्यादावित्यर्थं । व्यपेक्षायामिति । इद सर्पिष्कुण्डिकाया इत्यत्रेत्यर्थः। यत्तु पारायणिका आहु —कस्कादिषु सर्पिष्कुण्डिकादीना पाठ उत्तरपदस्थस्वेऽपि षत्वार्थं." इति । तद्भाष्यविरोधादुपेक्ष्यम् ।

('नित्य समासेऽनुत्तरपदस्थस्य' सू १५९ या सूत्रावरील कौमुदीत 'कस्कादिषुसर्पिष्कुण्डिकाशब्दोऽसमासे व्यपेक्षाविरहेऽपि षत्वार्थो, व्यपेक्षाया नित्यार्थश्च' असे दीक्षितानी म्हटले आहे या पक्तीचेच विवरण दीक्षित मनोरमेंत करितात ) तिष्ठतु सर्पिष्कुण्डिकामानय इत्यादि स्थली व्यपेक्षाविरह–अन्वयाभाव–असून देखील विसर्गाचे षत्व झाले आहे ('इसुसो सामर्थ्ये' सू १५८ या सूत्रावरील कौमुदीत दीक्षितानी 'सामर्थ्यमिह व्यपेक्षा', म्हणजे या सूत्रातील 'सामर्थ्य' या शब्दाचा 'व्यपेक्षा' हा अर्थ आहे, असे म्हटले आहे सामर्थ्य दोन प्रकारचे असते, एक वृत्तीत होणारे एकार्थीभावरूप सामर्थ्य व दुसरे व्यपेक्षारूप सामर्थ्य प्रथम प्रकारचे एकार्थीभावरूप सामर्थ्य वृत्तीत आढळत असून, द्वितीय प्रकारचे व्यपेक्षारूप सामर्थ्य वाक्यात आढळते. 'पदानामाकाङ्क्षायोग्यतासन्निधिवशाद्य परस्परान्वय सा व्यपेक्षा' असा 'व्यपेक्षा' या शब्दाचा अर्थ आहे. असा परस्परान्वय एकाच वाक्यात असणाऱ्या पदामध्येंच होऊ शकतो, एका वाक्यातील पदाचा भिन्न वाक्यातील पदाशी परस्परान्वय होऊ शकत नाहीं व्यपेक्षाविरहाचे मनोरमेंत वर जें उदाहरण दिले आहे त्यात 'तिष्ठतु सर्पि' व 'कुण्डिकामानय' अशी दोन भिन्न

वाक्यें आहेत व प्रथम वाक्यातील 'सर्पिः' या पदाचा द्वितीय वाक्यातील 'कुण्डिकाम्' या पदात अन्वय होत नाही. म्हणून परस्परान्वयाभावामुळें, म्हणजेच व्यपेक्षाविरहामुळें, या उदाहरणात 'इसुसोः सामर्थ्ये' या सूत्रानें होणारें विसर्गाचें षत्व होऊ शकत नाही. तसेच 'सर्पिः' व 'कुण्डिकाम् या दोन पदाचा समास झालेला नसल्यामुळें, 'नित्य समासे' सू. १५९ या सूत्राची देखील प्राप्ति होत नाही. त्याचप्रमाणें 'सर्पिः' यातील विसर्ग पूर्वी सांगितल्या-प्रमाणें 'इस्' या औणादिक प्रत्ययातील सकाराचे जागी झालेला प्रत्ययावयवरूप विसर्ग असल्यामुळें, 'इदुदुपधस्य' सू. १५५ या सूत्राची देखील प्राप्ति होत नाही. परंतु या स्थली षत्व होणें इष्ट असल्यामुळें 'सर्पिष्कुण्डिका' या शब्दाचा कस्कादिगणात मुद्दाम पाठ केला आहे व त्यामुळें येथें व्यपेक्षाविरह–परस्परान्वयाभाव – असून देखील, 'कस्कादिषु च' सू. १४४ या सूत्रानें विसर्गाचें षत्व झाले आहे.) 'इह सर्पिष्कुण्डिकाया.' या उदाहरणात व्यपेक्षा असून विसर्गाचें षत्व झाले आहे. (या उदाहरणात 'सर्पि.' हे पद 'कुण्डिकाया' या पदात अन्वित आहे, म्हणजे या दोन पदात व्यपेक्षा–परस्परान्वितत्व– आहे. त्यामुळें 'इसुसो. सामर्थ्ये' सू. १५८ या सूत्रानें 'सर्पिः' यातील विसर्गाचें विकल्पेंकरून षत्व पावले आहे तें षत्व विकल्पें-करून न होता नित्य व्हावें याकरिता 'सर्पिष्कुण्डिका' हा शब्द कस्कादिगणात पठित केला आहे. सारांश व्यपेक्षा असो किंवा व्यपेक्षाविरह असो दोन्ही ठिकाणी 'सर्पि.' यातील विसर्गाचें, 'कुण्डिका' हा ककारानें सुरू होणारा शब्द पुढें आला असता, नित्य षत्व व्हावें याकरिता 'सर्पिष्कुण्डिका' या शब्दाचा कस्कादिगणात पाठ केला आहे असें दीक्षिताचे म्हणणे आहे ) पारायणिक वैयाकरण असें म्हणतात की, 'सर्पिष्कुण्डिका' इत्यादि शब्दाचा कस्कादिगणात जो पाठ केला आहे तो अशाकरिता की, विसर्ग जरी समासातील उत्तर पदात असला तरी त्याचें षत्व व्हावें. पण हें त्याचें म्हणणे भाष्यविरुद्ध असल्यामुळें स्वीकारार्ह नाही, (कारण 'नित्य समासे'

८-३-४५ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी 'अनुत्तरपदस्थस्येति किमर्थम् ? । परमसर्पि कुण्डिका ।' म्हणजे 'परमसर्पि कुण्डिका' या उदाहरणात समासातील 'सर्पि' या उत्तर पदात विसर्ग असल्यामुळें 'नित्य समासे' सू १५९ या सूत्रानें होणारे षत्व त्या विसर्गाचे होत नाही, असे स्पष्ट म्हटले आहे या स्थली 'इसुसो सामर्थ्ये' या सूत्राची प्राप्ति होत नाही, कारण पृथक् पदें असून त्यात परस्परात अन्वय असला तरच ते सूत्र लागू पडते, व जेथें दोन पदाचा समास होऊन एकार्थीभाव झाला आहे तेथें ते सूत्र लागू पडत नाही असे 'नित्य समासे' या सूत्रावरील भाष्यात सांगितले आहे त्या भाष्यात भाष्यकार म्हणतात - 'पूर्वस्मिन् योगे व्यपेक्षासामर्थ्यमाश्रीयते न पुनरेकार्थीभाव '. 'परमसर्पि कुण्डिका' हे सामासिक पद असल्यामुळें येथें 'इसुसो सामर्थ्ये' हे सूत्र लागू पडत नाही हे उघड आहे )

शब्दरत्न - इत्यर्थ इति । अप्रत्ययान्तस्य पूर्वं सूचितम् । तद्भाष्येति । "अनुत्तरपदस्थस्य' इति किं परमसर्पि कुण्डिकेति "नित्य समासे-" इति सूत्रस्थभाष्येत्यर्थः ।

'व्यपेक्षायामिति । इद सर्पिष्कुण्डिकाया इत्यत्रेत्यर्थं' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा तात्पर्यार्थ पूर्वी सांगितला आहे ('अप्रत्य तस्य पूर्वं सूचितम्' या शब्दरत्नातील प्रश्न पडतीचा भावप्रकाशकारानी 'अथ पाठस्ता- दृशान्वयबाधतात्पर्यग्राहक इत्येवरूपमित्यर्थः । इदुदुपधेतिसूत्रे स्पष्टी- कृतमेनन् ।'—म्हणजे 'सर्पिष्कुण्डिका' या शब्दाचा कस्कादिगणात जो पाठ केला आहे त्यावरून हे ज्ञापित होते की, 'इदुदुपधस्य' या सूत्रातील 'अप्रत्ययस्य' या पदाचा स्थाणा न करिता 'प्रत्यय- भिन्नस्य विसर्गस्य' असा जो व्याख्यादर्शांत सामानाधिकरण्यानें अन्वय केला आहे तसा अन्वय करणे योग्य नसून, 'अप्रत्ययस्य' या पदाचा षष्ठ्यर्थानें 'प्रत्ययावयवभिन्नस्य' असा अर्थ करून नतर त्याचा

'विसर्गस्य' या पदाशी सामानाधिकरण्यानें अन्वय करणे योग्य आहे असे 'इदुदुपधस्य' या सूत्रावरील शब्दरत्नात पूर्वी सांगितले आहे– असा अर्थ केला आहे याचा भावार्थ हा आहे की, 'सृप्' धातूहून औणादिक इस् प्रत्यय केल्यावर 'सर्पिस्' असे जें रूप होतें त्यातील संपूर्ण 'इस्' प्रत्ययाचे जागी विसर्ग होत नसून त्या प्रत्ययाचा अवयव जो सकार आहे त्याचेच जागी विसर्ग होत असल्यामुळें, व्याख्यादर्शोक्तरीत्या वरप्रमाणे अन्वय केल्यानें, 'सर्पिष्कुण्डिका' या स्थली प्रत्ययरूप विसर्ग नसून प्रत्ययभिन्न विसर्ग असल्यामुळें, 'इदुदुपधस्य' या सूत्रानेंच नित्य षत्व होऊं शकतें व नित्य षत्व होण्याकरिता 'सर्पिष्कुण्डिका' या शब्दाचा जो कस्कादिगणात पाठ केला आहे तो व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. परंतु सिद्धान्तपक्षात जसा अन्वय करणे सांगितले आहे तसा अन्वय केल्यानें 'सर्पिष्कुण्डिका' या स्थली प्रत्ययावयवरूप विसर्ग असल्यामुळें 'इदुदुपधस्य' या सूत्रानें त्याचे नित्य षत्व होऊं शकत नाही व 'इसुसोः सामर्थ्ये' या सूत्रानें त्याचे विकल्पेंकरून षत्व होण्याची प्राप्ति आहे. तसे त्या विसर्गाचे विकल्पेंकरून षत्व न होता नित्य षत्व होण्याकरिता 'सर्पिष्कुण्डिका' हा शब्द कस्कादिगणात मुद्दाम पठित केला आहे व अशा रीतीनें तो पाठ सिद्धान्तपक्ष मानल्यानेंच चरितार्थ ठरतो म्हणून व्याख्यादर्शग्रन्थानुसार मनोरमेंत व कौमुदीत केलेले व्याख्यान न मानता शब्दरत्नात लक्षणा करून 'इदुदुपधस्य' या सूत्रातील 'अप्रत्ययस्य' या शब्दाचे जसें पूर्वी व्याख्यान केले आहे तेच व्याख्यान मानणें योग्य आहे असा शब्दरत्नातील प्रकृत पङ्क्तीचा गर्भितार्थ आहे)
'तत्राप्यविरोधादुदाहृतम्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचे कारण हे की, 'नित्य समासे' ८ ३ ४५ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारांनी 'अनुत्तरपदस्थस्येति किम्? । परमसर्पिष्कुण्डिका' असे म्हटले आहे. (या भाष्यावरून हें स्पष्ट होतें की, समासांतील उत्तर पदात असलेल्या विसर्गाचें षत्व होत नाहीं व म्हणून पारायणिकांचे म्हणणे वरील भाष्याविरुद्ध असल्यामुळें स्वीकारार्ह नाहीं.)

मनोरमा--अयः संहितेति । न त्वयसो विकारः । "जानपद-" इति ङीष्प्रसङ्गात् । अयस्कर्णीति । अय इव कर्णौ यस्याः । "नासिकोदरौष्ठ--" इत्यादिना ङीष् ॥

('अत. कृकमि' सू. १६० या सूत्रावरील कौमुदीत 'अयस्कुशा' व 'अयस्कर्णी' अशी उदाहरणे दिली आहेत व 'अयस्कुशा' याचा 'अयः संहिता कुशा' असा विग्रह केला आहे. तसा विग्रह का केला आहे व 'अयसो विकारः' अशा रीतीनें विग्रह का केला नाही याचे कारण दीक्षित सांगतात.) 'अयसो विकारः' अशा रीतीनें विग्रह करता येत नाही, कारण तसा विग्रह केल्यास, 'जानपदकुण्डगोण' सू ५०० या सूत्रानें 'ङीष्' प्रत्यय होण्याची आपत्ति येते (व 'अयस्कुशा' असे इष्ट रूप सिद्ध न होता, 'अयस्कुशी' असे अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते. 'जानपद' या सूत्रावरील कौमुदीत 'कुशी अयोविकारश्चेत्, कुशाऽन्या' असे स्पष्ट म्हटले आहे ) 'अयस्कर्णी' या शब्दाचा 'अयः इव कर्णौ यस्याः' असा विग्रह आहे. या स्थली 'नासिकोदरौष्ठ' सू. ५११ या सूत्रानें 'ङीष्' प्रत्यय झाला आहे.

शब्दरत्न--आबन्तप्रयोगसूचितमर्थं स्फुटप्रतिपत्तये आह--नत्वयस इत्यादि ॥

'अयस्कुशा' या आबन्त प्रयोगानें सूचित होणाऱ्या अर्थाचा स्पष्टपणे बोध व्हावा याकरिता 'न त्वयसो विकारः' असे मनोरमेत म्हटले आहे. ('कुशा' हा आबन्त शब्द यज्ञपात्र विशेषाचे नाव आहे व हे यज्ञपात्र खादिरकाष्ठाचे केलेले असते. 'कुशी' या ङीप्प्रत्ययान्त शब्दाचा अर्थ 'नांगराचा लोखंडाचा फाळ' असा आहे व 'विकारस्त्वयस. कुशी' असा अमरपाठ आहे. सारांश लोखंडाचा फाळ असा अर्थ जेथें विवक्षित आहे तेथेंच 'कुशी' असा ङीप्प्रत्ययान्त प्रयोग करता येतो. काष्ठ विशेषाचे तयार केलेले यज्ञपात्र असा अर्थ जेथें विवक्षित आहे तेथें 'कुशा' या आबन्त शब्दाचाच प्रयोग करणे व्याकरणरीत्या शुद्ध ठरते.)

मनोरमा— अधः शिरसो ।। एतयोरिति । सूत्रे तु षष्ठ्याः स्थाने प्रथमा बोद्धया । अधस्पदमिति । मयूरव्यंसकादित्वात्समासः शिरस्पदमिति । षष्ठीसमासः ।।

('अधः शिरसी पदे' सू. १६१ या सूत्राचे कौमुदीत व्याख्यान करिताना 'एतयोर्विसर्गस्य सादेशः स्यात् पदशब्दे परे' असे म्हटले आहे. यात) 'एतयोः' असा जो शब्द घातला आहे त्याचे कारण हे की, प्रकृत सूत्रात षष्ठीच्या ऐवजी प्रथमाविभक्तीचा प्रयोग केला आहे, म्हणजे 'अधः शिरसो.' या षष्ठ्यर्थामध्ये 'अधः शिरसी' या प्रथमाविभक्तीचा उपयोग केला आहे 'अधस्पदम्' हा समास 'मयूरव्यंसकादयश्च' सू. ७५४ या सूत्रान्वयें झाला आहे (व त्या शब्दाचा 'पदस्य अधः' असा विग्रह आहे.) 'शिरस्पदम्' हा षष्ठी-समास आहे (व 'शिरस पदम्' असा त्याचा विग्रह आहे.)

।। विसर्गसन्धिप्रकरण समाप्तम् ।।

## ॥ अथ स्वादिसन्धिप्रकरणम् ॥

मनोरमा– ससजुषो रुः । पदस्येत्यनुवृत्तं ससजूभ्यां विशेष्यते, विशेषणेन तदन्तविधि. । न च सजूःशब्दांशे "ग्रहणवता प्रातिपदिकेन तदन्तविधिर्नास्ति" इति निषेधः शङ्क्यः । तस्य प्रत्ययविधिविषयत्वात् । सान्त सजुष्शब्दान्त च यत्पद तस्य रुः स्यात् । इत्यर्थः । एव स्थिते फलितमाह–पदान्तस्येति । सजुष्शब्दस्येति । तदन्तस्य पदस्येत्यर्थ. । तेन सजुष इत्यादौ नातिप्रसङ्गः । न च सजूरित्यत्राप्राप्ति. "व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन" इति निषेधादिति वाच्यम् । "येन विधिः" इति सूत्रे शब्दकौस्तुभेऽस्य प्रत्याख्यातत्वात् । "व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन" इति, "ग्रहणवता–" इति च परिभाषाद्वयमपि प्रत्ययविधिविषयकमिति "विड्वत्" सूत्रे कैयट-हरदत्ताभ्यामुक्तत्वाच्च । एवञ्च परमसजूभ्यामित्याद्यपि निर्बाधम् । एव स्थिते इह सजुष्शब्देन तदन्तविधिर्नेति प्राचामुक्तिरापाततः इत्यवधेयम् ॥

'ससजुषो रु' सू १६२ (हे सूत्र 'पदस्य' या अधिकारात पठित असल्यामुळें) या सूत्रात 'पदस्य' हे पद अनुवृत्त होते व त्याचे 'ससजुष' हे विशेषण होते आणि त्यामुळें ('येन विधिस्तदन्तस्य' सू २६ या सूत्रानें) तदन्तविधि होतो (व 'ससजुष पदस्य' या शब्दाचा 'सकारान्तस्य सजुष्शब्दान्तस्य च पदस्य' असा अर्थ होतो ) प्रकृत सूत्रात 'सजुष्' हे प्रातिपदिक उच्चारल असल्यामुळें 'ग्रहणवता प्रातिपदिकेन तदन्तविधिर्नास्ति'– परि. ३१ – या निषेधक परिभाषान्वयें 'सजुष्' शब्दाचे ठिकाणी तदन्तविधि करता येत नाही अशी शंका करणें बरोबर नाही, कारण जेथें प्रत्यय होण्याचे विधान केले आहे तेथेंच ती निषेधक परिभाषा लागू पडते, म्हणजे ज्या सूत्रात प्रातिपदिकाचे ग्रहण केले असून त्याहून प्रत्यय होणे सागितले आहे तशाच सूत्राना ती परिभाषा लागू पडते. (प्रकृत

सूत्रात जरी 'सजुष्' या प्रातिपदिकाचे ग्रहण केले आहे तरी त्याहून प्रत्यय होणे सांगितले नसून त्याच्या अन्त्य वर्णाचे जागी 'रु' हा आदेश होणे सांगितले आहे म्हणून प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'सजुष्' शब्दाला वरील परिभाषा लागू पडत नाहीं व त्यामुळें तदन्तविधि होतो ) ज्या पदाच्या अन्तीं सकार आहे किंवा 'सजुष' शब्द आहे त्याचे रुत्व होते असा प्रकृत सूत्राचा अर्थ आहे व 'अलोऽन्त्यस्य' सू. ४२ हें सूत्र असल्यामुळें, तशा पदाच्या अन्त्य वर्णाचे रुत्व होतें असा प्रकृत सूत्राचा अर्थ होत असल्यामुळें, 'पदान्तस्य सस्य सजुष्शब्दस्य च रुः स्यात्' असें जें प्रकृत सूत्रावरील कौमुदीत म्हटलें आहे तें फलितार्थाच, म्हणजे प्रकृत सूत्रातील शब्दातून निष्पन्न होणाऱ्या अर्थाचे, कथन आहे 'सजुष्शब्दस्य' असें जें कौमुदीतील वरील पङ्क्तीत म्हटलें आहे त्याचा 'सजुष्शब्दान्तस्य पदस्य' असा अर्थ आहे (कारण 'सजुष्' हें 'पदस्य' या अनुवृत्तपदाचे विशेषण असल्यामुळें, 'येन विधिस्तदन्तस्य' सू. २६ या सूत्रान्वयें त्याचा 'सजुष्शब्दान्तस्य' असा अर्थ होतो ) त्यामुळें 'सजुष' इत्यादि स्थलीं अतिप्रसङ्ग–अतिव्याप्तिरूप दोष–येत नाहीं ('सजुष् + शस् = सजुष् + अस् = सजुष' या स्थळीं 'सजुष्' या शब्दापुढें अजादि असर्वनामस्थान विभक्तिप्रत्यय असल्यामुळें हा शब्द पदसंज्ञक होत नसून 'यचि भम्' सू २३१ या सूत्रानें भसंज्ञक ठरतो व त्यामुळें, त्यातील अन्त्य षकाराचे प्रकृत सूत्रानें रुत्व होऊं शकत नाहीं ) 'व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन'–परि ३०–ही निषेधक परिभाषा असल्यामुळें 'सजूः' या स्थळीं अव्याप्तिरूप दोष येतो, म्हणजे अन्त्य षकाराचे रुत्व होऊं शकत नाहीं, असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं, कारण 'येन विधि' १ १ ७२ या सूत्रावरील शब्दकौस्तुभात त्या परिभाषेचे प्रत्याख्यान केलें आहे व 'दिव उत्' ६ १. १३१ या सूत्रावरील पदमञ्जरीत हरदत्तानें (व 'इन्द्रे च' ६ १ १२४ या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तीत) कैयटानें असें म्हटलें आहे की, 'ग्रहणवता प्रातिपदिकेन तदन्त-

विधिर्नास्ति '–परि. ३१ –व 'व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन '–परि. ३२–या दोन्ही परिभाषा प्रत्ययविधिविषयक आहेत, म्हणजे जेथें सूत्रात प्रातिपदिकाचे ग्रहण करून त्याहून प्रत्यय होणे सांगितले आहे अशाच ठिकाणी त्या दोन्ही परिभाषा लागू पडतात. ('येन विधिस्तदन्तस्य' सू. १.१.७२ या सूत्रावरील शब्दकौस्तुभात 'व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन' या परिभाषेचे प्रत्याख्यान करिताना दीक्षितानी 'वस्तुतस्तु भयाढ्याद्याविव सूत्रांशात्तृक्, दशान्ताड्ड इत्यादावपि विशेषणविशेष्यभावव्यत्यासमात्रेण सिद्धे अन्तग्रहणसामर्थ्यमपि सूपपादमिति परिभाषाश्रयणं व्यर्थम् ।' असे म्हटले आहे. तसेच 'दिव उत्' या सूत्रावरील पदमञ्जरीत हरदत्ताने 'दिवशब्देन विशेषणात्तदन्तविधिः, ग्रहणवता प्रातिपदिकेनेति तु प्रत्ययविधिविषय, व्यपदेशिवद्भावात् केवलस्यापि भवितव्य, व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेनेत्येतदपि प्रत्ययविधिविषयमेव ।' असे म्हटले आहे त्याचप्रमाणे 'द्वन्द्वे च' या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तीत कैयटानें 'इन्द्रादावपि' हे भाष्यातील प्रतीक घेऊन 'इन्द्रशब्द आदिर्यस्य तस्मिन् परत इत्यर्थः । केवले चेन्द्रशब्दे व्यपदेशिवद्भावाद्भवति । व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेनेति तु निषेधः प्रत्ययविधिविषय ।' असे म्हटले आहे. म्हणून जरी प्रकृत सूत्रांत 'सजुष्' या प्रातिपदिकाचे ग्रहण केले आहे तरी या सूत्रात प्रत्यय होणे सांगितले नसल्यामुळें, व्यपदेशिवद्भाव करता येतो–म्हणजे 'सजुष्' हा शब्द 'सजुष्' शब्दान्त मानता येतो. त्यामुळें 'सजुष् + सु' या स्थितीत 'हल्ङ्याब्भ्य' सू २५२ या सूत्रानें जरी 'सु' प्रत्ययाचा लोप होतो तरी 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' सू. २६२ या सूत्रान्वयें 'सजुष्' शब्दाला पदसंज्ञा होते आणि जरी 'सजुष्' हे पद सजुष् शब्दान्त नसून 'सजुष्' एवढेंच पद आहे तरी 'व्यपदेशिवदेकस्मिन्' –परि.३०–या परिभाषान्वयें ते पद व्यपदेशिवद्भावानें सजुष्शब्दान्त आहे असे मानता येते येथें व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन' ही परिभाषा आड येत नाही; कारण प्रकृत सूत्रात 'सजुष्' शब्दाहून प्रत्यय होणे सांगितले नसून, तो शब्द पदान्ती असता, त्याच्या

अत्यवर्णाचे–षकाराचे–रुत्व होणे सांगितले आहे. त्यामुळें प्रकृत सूत्रानें 'सजुष्' यातील अन्त्य षकाराचे रुत्व होऊन व 'र्वोरुपधाया दीर्घ इकः' सू ४३३ या सूत्रानें 'सजुष्' यातील 'ज' ही उपधा दीर्घ होऊन आणि 'खरवसानयोः', या सूत्रानें 'रु = र्' चा विसर्ग होऊन 'सजूः' असे रूप सिद्ध होतें ) तदन्तविधि करता येत असल्यामुळें, 'परमसजूर्भ्याम्' इत्यादि स्थलीं देखील ( अन्त्य षकाराचे रुत्व होण्यात) कोणताहि बाध–प्रत्यवाय–येत नाही ('परमसजुष्+भ्याम्' या स्थली 'स्वादिष्वसर्वनामस्थाने' सू २३० या सूत्रान्वयें 'परमसजुष्' हा शब्द पदसंज्ञक ठरतो व त्या पदाच्या अन्ती 'सजुष्' हा शब्द असल्यामुळें प्रकृत सूत्रानें त्या पदातील अन्त्य षकाराचे रुत्व होणें आणि 'र्वोरुपधाया' या सूत्रानें उपधा दीर्घ होऊन 'परमसजूर्भ्याम्' असे रुप सिद्ध होतें.) वर सांगितल्याप्रमाणे स्थिति असल्यामुळें, 'इह सजुष्शब्देन तदन्तविधिर्न' असे जें प्रकाशकारानी म्हटल आहे तें वर वर विचार करून म्हटलें आहे, म्हणजे पूर्ण विचार न करिता त्यानी तसे म्हटले असल्यामुळें त्यांचें म्हणणे वरील व्याख्यानान्वयें चूक ठरतें–हें ध्यानात ठेवावें. (कारण 'ग्रहणवता प्रातिपदिकेन तदन्तविधिर्नास्ति' ही परिभाषा वर सांगितल्याप्रमाणे प्रकृत सूत्रास लागू पडत नसल्यामुळें, 'पदस्य' या अनुवृत्त पदाचे विशेषण असणाऱ्या 'सजुष्' शब्दाहून 'येन विधि' या सूत्रानें तदन्तविधि होण्यात कोणताहि प्रत्यवाय येत नाहीं व त्यामुळें प्रकाशकाराचें वरील म्हणणे चूक ठरतें हे उघड आहे )

शब्दरत्न– तत्र प्रत्ययविधौति । अत एव "येन विधि.–" इति सूत्रे भाष्ये प्रत्ययविधिभिन्ने "अप्तृन्" इत्यादौ गृह्यमाणप्रातिपदिकेनापि तदन्तविधिप्रतिपादन स्वसा परमस्वसेत्युदाहृत च सगच्छते । अस्य "समासप्रत्ययविधौ––" इति निषेधानुवादकताया एव युक्ततरत्वाच्च । यत्त्वस्य ज्ञापक "सपूर्वाच्च" इति सूत्रम् । अन्यथा "पूर्वादिनिः" इत्यत्र तदन्तविधिनैव सिद्धे कि तेन । तत् "प्रत्ययविधौ प्रतिषेधः" इत्यस्यैव ज्ञापकमिति वक्तु शक्यम् । अत एव तदन्तविधिसूत्रभाष्ये

"समास—" इत्यादिनिषेधवदस्य न कथनमिति बोद्धव्यम् । प्रत्याख्यातत्वादिति। अस्य फलाभावात "सूत्रान्ताट्ठक" 'दशान्ताड्ड" इत्यादावन्तग्रहणसामर्थ्येन व्यपदेशिवद्भावाप्रवृत्तेरिति भाव । ननु "एकगोपूर्वात्-" इत्यस्य केवलैकशब्दगोशब्दयोरप्रवृत्त्यर्थं सा ऽऽवश्यकी "सूत्रान्तात—" "दशान्तात" इत्यर्थं च । तत्रान्तग्रहणं तु प्रत्ययविधौ तदन्तग्रहणनिषेधात्तदन्ते प्रवृत्त्यर्थमावश्यकमिति न तत्सामर्थ्यादव्यपदेशिवद्भावाप्रवृत्तिर्वक्तुं शक्या । न च यथाश्रुतावधि "सूत्रान्तात—" इत्यादौ विशेषणविशेष्यभावव्यत्यासेन सिद्धे- ऽन्तग्रहणसामर्थ्यं सूपपादमिति कौस्तुभोक्तरीत्या निर्वाह "समास- प्रत्ययविधौ—" इत्यादौना सूत्रशब्दादेर्विशेष्यत्वे तात्पर्यं ग्राहकत्वस्य सत्त्वेन विपरीतस्य तस्य वक्तुमशक्यत्वात । न चास्या मानाभाव । "पूर्वात्सपूर्वादिनि" इत्येकयोगेन सिद्धे पृथग्योगकरणस्य मानत्वात । न च 'इष्टादिभ्य" इत्यत्रानुवृत्त्यर्थं तथा पाठ, अत एवानिष्टी त्याद्विसिद्धिरिति वाच्यम । ज्ञापकपरभाष्यप्रामाण्यनानिष्ठीत्यादि प्रयोगाणामनिष्टत्वात । एकयोगे ऽपि तत्रैव स्वरितत्वबलेन तावत एवोत्तरत्रानुवृत्तौ बाधकाभावाच्च । व्यपदेशिवद्भावस्य प्रातिपदिके नियमस्वीकारादेव ' ना तादसस्यादे —" इति चरितार्थम । अन्यथा पञ्चम इत्यादावपि व्यपदेशिवद्भावेन तस्याविस्यात्तदैयर्थ्यं स्पष्टमेवे- त्यरुचेराह—व्यपदेशिवद्भाव इत्यादि । दिव उत्सूत्र यत्रेति बहुव्रीहिणा तत्सूत्रघटिते पादे इत्यर्थ । एव च "दिव उत" इति सूत्रे हरदत्तेन "इ द्रव" इति सूत्र कैयटेनोक्तमिति भाव । "येन विधि —' इति सूत्र कैयटेन सूत्रोपात्ता तादिशब्दविषयतास्यति वदता स्पष्टमेव प्रत्ययविधिविषयतोक्ता । "असमासे निष्कादिभ्य ' इति सूत्र भाष्ये कैयट च स्पष्टमनयो प्रत्ययविधिविषयतोक्तेति दिक । इत्याद्यपीति । आदिना सजूर्भ्यामिति ॥

तस्य प्रत्ययविधिविषयत्वात ' म्हणजे ज्या सूत्रात प्रातिपदिकाचे ग्रहण करून त्याहून प्रत्यय होणे सांगितले आहे तशाच सूत्रांना 'ग्रहणवता प्रातिपदिकेन '-परि ३१-

ही परिभाषा लागू पडते, असे मनोरमेंत म्हटले असल्यामुळें, 'अप्तृन्' सू. २७७ इत्यादि ज्या सूत्रात प्रत्यय होणे सांगितले नाहीं तशा प्रत्ययविधिभिन्न सूत्रात प्रातिपदिकाचे ग्रहण केले असून देखील त्या प्रातिपदिकाहून तदन्तविधि करता येतो असे जें 'येन विधि.' १.१.७२ या सूत्रावरील भाष्यात प्रतिपादन करून 'स्वसा, परमस्वसा' हे जें उदाहरण दिले आहे ते योग्य ठरते. ('येन विधि.' या सूत्रावरील भाष्यात 'महदप्स्वसृनप्तृणा दीर्घविधौ' हे वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचें व्याख्यान करिताना भाष्यकार म्हणतात– 'महदप्स्वसृनप्तृणा दीर्घविधौ प्रयोजनम् । महान् परममहान् । स्वसा स्वसारौ स्वसार, परमस्वसा परमस्वसारौ परमस्वसार• ।' 'अप्तृन्' या सूत्रात प्रत्यय होणे सांगितले नसून उपधा दीर्घ होणे सांगितले असल्यामुळें, त्या सूत्रास 'ग्रहणवता प्रातिपदिकेन' ही परिभाषा लागू पडत नाहीं व त्यामुळें त्या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'स्वसृ' इत्यादि प्रातिपदिकाहून तदन्तविधि करता येतो. म्हणून 'स्वसृ+सु' या स्थली 'ऋदुशनस्' सू. २७६ या सूत्रानें 'स्वसृ' यातील अन्त्य ऋकाराचे जागी 'अनङ् = अन्' आदेश होऊन व 'अप्तृन्' सू. २७७ या सूत्रानें उपधा दीर्घ होऊन व 'हल्ङ्याब्भ्य.' सू. २५२ या सूत्रानें 'सु' प्रत्ययाचा लोप होऊन आणि 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' सू. २३६ या सूत्रानें अन्त्य नकाराचा लोप होऊन ज्याप्रमाणे 'स्वसा' हे रूप सिद्ध होते त्याचप्रमाणे स्वसृशब्दान्त 'परमस्वसृ' या शब्दाचे ठिकाणीं देखील उपधा दीर्घ इत्यादि कार्यें होऊन 'परमस्वसा' हे रूप सिद्ध होते.) 'समास-प्रत्ययविधौ प्रतिषेधः' या वार्तिकांतील 'प्रत्ययविधौ प्रतिषेधः' या निषेधक अंशाचा अनुवाद करणारी म्हणजे तेंच सांगणारी, 'ग्रहणवता प्रातिपदिकेन' ही परिभाषा आहे असेच मानणे योग्य आहे (व ही स्वतत्र परिभाषा आहे असे मानू नये.) नित्येच वैयाकरण असे म्हणतात की, 'सपूर्वाच्च' सू. १८८७ हे सूत्र वरील परिभाषेचे ज्ञापक आहे; कारण 'ग्रहणवता प्रातिपदि-केन' ही परिभाषा नसती तर 'पूर्वादिनि.' सू. १८८६ या सूत्रात पठित

असलेल्या 'पूर्व' या प्रातिपदिकाहून तदन्तविधि केल्यानेंच, 'सपूर्वाच्च' या सूत्रानें सिद्ध होणारी रूपें सिद्ध होऊ शकली असती व 'सपूर्वाच्च' हें सूत्र करण्याची काही गरज नव्हती पण हे ज्ञापक 'प्रत्ययविधौ तदन्तविधि प्रतिषेध ' या वार्तिकांशाचेच ज्ञापक आहे असे म्हणता येणे शक्य आहे आणि या वार्तिकांशाचाच केवळ अनुवाद करणारी ती परिभाषा असून स्वतन्त्र परिभाषा नसल्यामुळेंच, 'येन विधि ' १ १. ७२ या सूत्रावरील भाष्यात 'समासप्रत्ययविधौ प्रतिषेध ' हे वार्तिक जसे पठित केले आहे तशी 'ग्रहणवता प्रातिपदिकेन' ही परिभाषा पठित केली नाही हे लक्षात ठेवावे (जर ती स्वतन्त्र परिभाषा असती तर, भाष्यकारानी त्या भाष्यात ती अवश्य पठित केली असती ) 'व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन' ही जी परिभाषा दीक्षितानी प्रत्याख्यात केली आहे त्याचे कारण हे की, ती परिभाषा मानल्यानें कोणतेंहि फल निष्पन्न होत नाही, कारण 'सूत्रान्तात् ठक्' सू १२७० 'दशान्तात् ड ' सू १८४६ इत्यादि सूत्रात 'अन्त' या शब्दाचे ग्रहण केले असल्यामुळे, त्या शब्दाच्या सामर्थ्यानें त्या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या प्रातिपदिकाना, व्यपदेशिवद्भावानें ते तदन्त आहेत, असे मानता येत नाही (साराश वरील दोन्हीं सूत्रात 'अन्त' शब्दाचे ग्रहण केले असल्यामुळे, सूत्रान्तशब्दाहूनच 'ठक्' प्रत्यय व दशान्तशब्दाहूनच 'ड' प्रत्यय होऊ शकता, केवळ 'सूत्र' शब्दाहून 'ठक्' प्रत्यय व केवळ 'दशन्' शब्दाहून 'ड' प्रत्यय, 'अन्त' शब्दग्रहणसामर्थ्यामुळे, होऊच शकत नाहीत हे उघड आहे म्हणून 'व्यपदेशिवद्भावो ऽप्रातिपदिकेन' ही परिभाषा मानण्याची काहीच आवश्यकता नाही असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे असे शब्दरत्नकार म्हणतात 'यन विधि ' या सूत्रावरील भाष्यात भाष्यकार देखील या परिभाषेसबधाने म्हणतात—'सा तर्ह्येषा परिभाषा कर्तव्या ? । न कर्तव्या । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेनेति यदय पूर्वादिभि सपूर्वाच्च इत्याह'।) यावर शकाकार अशी शका करतो की,

'एकगोपूर्वात् ठञ्' म् १९२५ या सूत्रातील 'एक' व 'गो' हे शब्द एकपूर्व व गोपूर्व न मानले जावे या करिता, 'व्यपदेशिवद्भा-वोऽप्रातिपदिकेन' ही परिभाषा मानणे आवश्यक आहे, व तसेच 'सूत्रान्तात्' व 'दशान्तात्' इत्यादि सूत्रात व्यपदेशिवद्भाव न व्हावा या करिता देखील ती परिभाषा मानणे आवश्यक आहे 'सूत्रान्तात् ठक्' व 'दशान्तात् ड' या दोन सूत्रात केलेलें 'अन्त' शब्दाचे ग्रहण असा करिता आवश्यक आहे की, 'प्रत्ययविधौ तदन्तविधिप्रतिषेध' हे तदन्तविधि प्रतिषेधक वार्तिक असल्यामुळें, ज्या शब्दाच्या अन्ती 'सूत्र' शब्द किंवा 'दशन्' शब्द आहे अशा शब्दाहून त्या दोन सूत्रात सागितलेले प्रत्यय होऊ शकत नसते ते व्हावे आणि अशा रीतीनें त्या दोन सूत्रातील 'अन्त' शब्दाचे ग्रहण चरितार्थ ठरत असल्यामुळें, त्या शब्दाच्या सामर्थ्यानें त्या दोन सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'सूत्रान्त' व 'दशान्त' प्रातिपदिकाना व्यपदेशिवद्भाव करता येत नाही असे म्हणणे शक्य नाही (शकाकार म्हणता की, वरील दोन सूत्रात 'अन्त' शब्दाचे ग्रहण केले नसते तर, त्या दोन सूत्रानी होणारे प्रत्यय 'सूत्रान्त' व 'दशान्त' शब्दाहून झाले नसते, कारण 'प्रत्ययविधौ तदन्तविधिप्रतिषेध' असे वार्तिककारानें वार्तिक पठित केले आहे म्हणून 'सूत्रान्त' व 'दशान्त' शब्दाहून ते प्रत्यय व्हावे या करिता, त्या दोन्ही सूत्रात 'अन्त' शब्दाचे ग्रहण केले आहे साराश 'अन्त' शब्दाचा उपयोग वर सागितलेल्या कारणाकरिताच केला असल्यामुळें, त्या शब्दाच्या जोरावर, तदन्ताहूनच त्या सूत्रानीं विहित असलेला प्रत्यय होऊ शकतो व केवलाहून तो प्रत्यय होऊ शकत नाहीं हे म्हणणे मुळींच सिद्ध होऊ शकत नाही, कारण 'सूत्र' व 'दशन्' हे शब्द व्यपदेशिवद्भावानें सूत्रान्त व दशान्त मानता येऊ शकतात ते तसे मानता न यावे व केवलाहून त्या दोन सूत्रात सागितलेला *प्रत्यय न व्हावा याकरिता, 'व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन'* ही परिभाषा मानणे आवश्यक आहे त्यामुळें दीक्षितानी जें म्हटले

आहे की, 'अन्त' शब्दाच्या सामर्थ्यामुळें 'सूत्रान्त' व 'दशान्त' शब्दाहूनच विहित प्रत्यय होऊ शकतो व केवळ 'सूत्र' व 'दशन्' शब्दाहून तो प्रत्यय होऊ शकत नाही ते म्हणणे बरोबर मानता येत नाही असे शंकाकाराचे म्हणणे आहे ) दीक्षितानी कौस्तुभात असे म्हटले आहे की, ज्या प्रमाणे ('मेघर्तिभयेषु कृञः' सू २९६० या सूत्रात निर्दिष्ट असलेला) 'भय' हा शब्द व तसेच ('आढ्य-सुभग' सू २९७३ या सूत्रात निर्दिष्ट असलेला) 'आढ्य' हा शब्द व तसेच सूत्रनिर्दिष्ट इतर काही शब्द विशेषणे मानून ('येन विधि' या सूत्रान्वयें भाष्यकारानी) तदन्तविधि केला आहे त्याच प्रमाणे, 'सूत्र' व 'दशन्' हे शब्द विशेष्य न मानता विशेषण मानल्यानें ('येन विधि' या सूत्रान्वयें) तदन्तविधि होऊ शकलाच असता, पण असे असून देखील ज्या अर्थी 'सूत्रान्ताट्ठक्' व 'दशान्ताड्ड' या दोन सूत्रात मुद्दाम 'अन्त' शब्दाचे ग्रहण केले आहे त्या अर्थी, 'सूत्रान्त' व 'दशान्त' शब्दाहूनच विहित प्रत्यय होऊ शकतो व तो प्रत्यय केवळ 'सूत्र' व 'दशन्' शब्दाहून होत नाही अशाच प्रकारे 'अन्त' शब्दाची उपपत्ति लावता येते – म्हणजे 'अन्त' शब्दाच्या ग्रहणाचे हेच फल आहे असे म्हणता येते, पण (शंकाकार म्हणतो की, दीक्षितानी शब्दकौस्तुभात जें 'अन्त' शब्दाचे प्रयोजन सांगताना म्हटले आहे) ते म्हणणे बरोबर आहे असें मानता येत नाही, कारण 'समासप्रत्ययविधौ प्रतिषेधः' व 'ग्रहणवता प्रातिपदिकेन तदन्तविधिर्नास्ति' या तदन्तविधिनिषेधक वचनाचें तात्पर्य हे आहे की, प्रत्ययविधायक सूत्रात निर्दिष्ट असलेली 'सूत्र' 'दशन्' इत्यादि प्रातिपदिके विशेष्यरूपानेंच निर्दिष्ट आहेत असेंच सिद्ध होते व त्यामुळें त्याना विशेष्य न मानता विशेषण मानणे अशक्य आहे ('वस्तुतस्तु भयाढ्यादाविव सूत्रान्ताट्ठक् दशान्ताड्ड इत्यादावपि विशेषणविशेष्यभाववत्यासमात्रेण सिद्धे अन्त-ग्रहणसामर्थ्यमपि सूपपादमिति परिभाषाश्रयण व्यर्थम्' असे 'येन विधि.' या सूत्रावरील शब्दकौस्तुभात दीक्षितानी म्हटले आहे हे

मनोरमेंत सांगितलेंच आहे. दीक्षिताच्या म्हणण्याचें तात्पर्य हें आहे की, जेथें लक्ष्यानुरोधानें तदन्तविधि होणें इष्ट आहे तेथें सूत्रनिर्दिष्ट प्रातिपदिक विशेषण मानून तदन्तविधि करावा व जेथें तदन्तविधि होणें इष्ट नाहीं तेथें सूत्रनिर्दिष्ट प्रातिपदिक विशेष्य मानावें व तसें मानल्यानें तदन्तविधि होणें आपोआपच टळतें. सारांश दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, तदन्तविधिनिषेधक वचनाचें हेंच तात्पर्य आहे की, लक्ष्यानुरोधानें विशेषणविशेष्यभावाचा व्यत्यास करून – म्हणजे जेथें तदन्तविधि होणें इष्ट आहे तेथें सूत्रनिर्दिष्ट प्रातिपदिक विशेषण मानून व जेथें तदन्तविधि होणें इष्ट नाहीं तेथें सूत्रनिर्दिष्ट प्रातिपदिक विशेष्य मानून – इष्ट रूपाची सिद्धि करावी; कारण 'विशेषणविशेष्यभावे कामचार.' असा न्याय असल्यामुळें व 'सिद्ध तु विशेषणविशेष्ययोर्यथेष्ट-त्वात्' असें वार्तिक 'येन विधि.' या सूत्रावरील भाष्यांत पठित असल्यामुळें, लक्ष्यानुरोधानें असा विशेषणविशेष्यभावव्यत्यास करण्यांत कांहीं प्रत्यवाय येत नाहीं. असें असल्यामुळेंच, 'येन विधि' या सूत्राचीं प्रयोजनें सांगताना, भाष्यकारांनीं त्या सूत्रावरील भाष्यांत 'उपपदविधौ भयाढ्यादिग्रहणम्' हें वार्तिक पठित केलें आहे व भाष्यकार म्हणतात – 'उपपदविधौ भयाढ्यादिग्रहणं प्रयो-जनम् । भयकरः अभयकरः । आढ्यकरणम् स्वाढ्यकरणम् ।' 'मेघर्तिभयेषु कृञ.' या सूत्रांत 'मेघ, ऋति, भय' हीं तीन उपपदें पठित आहेत. पहिल्या दोन उपपदांस तदन्तविधि होणें इष्ट नसल्यामुळें त्यांना विशेष्य मानलें आहे, व 'भय' या तृतीय उपपदास तदन्तविधि होणें इष्ट असल्यामुळें तें त्या सूत्रांत अनुवृत्त असलेल्या 'कर्मणि उपपदे' याचें विशेषण मानलें आहे तसेंच 'आढ्यसुभग' या सूत्रांत 'आढ्य' या शब्दाला तदन्तविधि होणें इष्ट असल्यामुळें त्याला विशेषण मानलें आहे व त्या सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या इतर प्रातिपदिकांना तदन्तविधि होणें इष्ट नसल्यामुळें तीं प्रातिपदिकें विशेष्य मानलीं आहेत व अशा रीतीनें विशेषण-

विशेष्यभावाचा व्यत्यास करण्याला वरील वार्तिक व भाष्य प्रमाण आहे. म्हणून 'सूत्राट्ठक्' असे जरी सूत्र केले असते तरी, 'सूत्र' हा शब्द विशेषण मानल्यानें 'सूत्रान्त' शब्दाहून 'ठक्' प्रत्यय होऊच शकला असता. असे असून देखील ज्या अर्थी त्या सूत्रात 'अन्त' शब्दाचे ग्रहण केले आहे त्या अर्थी हे सिद्ध होते की, 'सूत्रान्त' शब्दाहूनच 'ठक्' प्रत्यय व्हावा व केवळ 'सूत्र' शब्दाहून 'ठक्' प्रत्यय होऊ नये आणि म्हणून 'व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन' ही परिभाषा मानण्याची काहीच गरज नाही असे दीक्षित म्हणतात. ह्यावर शकाकार असे म्हणतो की दीक्षिताचे म्हणणे बरोबर नाही; कारण 'येन विधि ' या सूत्रानें विशेषणाहूनच तदन्तविधि करता येतो व विशेष्याहून तदन्तविधि करता येत नाही. 'ग्रहणवता प्रातिपदिकेन तदन्तविधिर्नास्ति' ही परिभाषा व 'प्रत्ययविधौ तदन्तविधि प्रतिषेध ' हे वार्तिक तदन्तविधिनिषेधक असल्यामुळें व भाष्यकारानी सांगितल्याप्रमाणे ही दोन्ही प्रत्ययविधायकसूत्रानाच लागू पडणारी वचने असल्यामुळें हे सिद्ध होते की, प्रत्ययविधायकसूत्रात निर्दिष्ट असलेली प्रातिपदिके विशेष्यरूपानेच पठित आहेत, विशेषणरूपानें पठित नाहीत जर ती विशेषणरूपानें पठित असती तर, 'येन विधि ' या सूत्रानें त्याहून तदन्तविधि करता आला असता. पण ज्या अर्थी त्याहून तदन्तविधि होऊ शकत नाही त्या अर्थी, तदन्तविधि निषेधक वचनाचे तात्पर्य हेच मानले पाहिजे की, प्रत्ययविधायक सूत्रात निर्दिष्ट असलेली प्रातिपदिके विशेष्यरूपानेंच पठित आहेत म्हणून 'सूत्राट्ठक्' असे सूत्र केले असते तर, 'सूत्र' हे प्रातिपदिक विशेष्य ठरत असल्यामुळें, त्याहून तदन्तविधि होऊ शकला नसता आणि म्हणून 'सूत्रान्ताट्ठक्' असे सूत्र केले आहे व त्या सूत्रात 'सूत्रान्त' असे प्रातिपदिक निर्दिष्ट असल्यामुळें, केवळ 'सूत्र' या शद्वाला व्यपदेशिवद्भावानें तो 'सूत्रान्त' आहे असे मानल्यानें, त्याहून 'ठक्' प्रत्यय होण्याची जी आपत्ति येते ती टाळण्याकरिता, 'व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन' ही परिभाषा

मानणे आवश्यक आहे. हे खरे की, 'विशेषणविशेष्यभावे कामचार.' या न्यायाचा उपयोग करून वार्तिककारानें प्रत्ययविधायक सूत्रात निर्दिष्ट असलेली 'मय, आढ्य' इत्यादि प्रातिपदिके विशेषण मानून त्याहून तदन्तविधि केला आहे पण तदन्तविधिनिषेधक वार्तिक व परिभाषा असल्यामुळें तो न्याय प्रत्ययविधायकसूत्रात निर्दिष्ट असलेल्या वाटेल त्या प्रातिपदिकाला लावता येत नाहीं. जेवढ्या प्रातिपदिकाना तो न्याय अपवादरूपानें वार्तिककार व भाष्यकार यानी लावला आहे तेवढ्याच प्रातिपदिकाना तो न्याय लावता येतो आणि त्या न्यायाचा इतरत्र उपयोग करता येत नाही, म्हणजे 'सूत्र, ददान्' इत्यादि शब्दाचे ठिकाणी तो न्याय लावता येत नाही असे शङ्काकाराच्या म्हणण्याचे तात्पर्य आहे ) 'व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन' ही परिभाषा मानण्यास काही प्रमाण नाही असे नाहीं. 'पूर्वात्सपूर्वादिनि' असे एक सूत्र केल्यानें इष्ट रूपाची सिद्धि होऊ शकत असता, 'पूर्वादिनि.' सू. १८८६ व 'सपूर्वाच्च' सू. १८८७ ही जी दोन पृथक् सूत्रें केली आहेत ते पृथक्सूत्रकरण ही परिभाषा मानण्यास प्रमाण आहे. ('पूर्वात्सपूर्वादिनि.' असे एकच सूत्र केले असते तर, ज्याच्या पूर्वी कोणता तरी शब्द आहे व अन्ती 'पूर्व' हा शब्द आहे अशा प्रातिपदिकाहून 'इनि' प्रत्यय करावा असा त्या सूत्राचा अर्थ झाला असता व 'व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन' ही परिभाषा न मानली तर, 'व्यपदेशिवदेकस्मिन्' या परिभाषान्वयें केवळ 'पूर्व' हा शब्द पूर्वशब्दान्त आहे असे मानल्यानें त्या 'पूर्व' शब्दाहून देखील 'इनि' प्रत्यय झालाच असता. पण तसे एकच सूत्र केले असते तर 'व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन' ही परिभाषा मानल्यास, केवळ 'पूर्व' या प्रातिपदिकाहून 'इनि' प्रत्यय होऊ शकला नसता. परंतु 'पूर्व' या प्रातिपदिकाहून देखील 'इनि' प्रत्यय होणे इष्ट असल्यामुळें, पाणिनीला दोन पृथक् सूत्रें, वर सांगितल्याप्रमाणे, करावी लागली व अशा रीतीनें पृथक् पठित केलेली ती दोन सूत्रें 'व्यपदेशिवद्भावोऽप्राति-

पदिकेन' या परिभाषेचे ज्ञापक ठरतात असे शंकाकाराचे म्हणणें आहे व त्याच्या म्हणण्यास 'येन विधि' १–१–७२ या सूत्रावरील भाष्य देखील प्रमाण आहे. त्या भाष्यात भाष्यकार म्हणतात– 'आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति । व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेनेति यदय पूर्वादिनि सपूर्वाच्च इत्याह । नैतदस्ति ज्ञापकम् । अस्ति ह्यन्यदेतस्य वचने प्रयोजनम् । किम् ? । सपूर्वातपूर्वादिनि वक्ष्यामीति । यत्तर्हि योगविभाग करोति । इतरथा हि पूर्वात्सपूर्वादिनिरित्येव ब्रूयात् ।' या भाष्यावरून हें स्पष्ट होत की, भाष्यकारानी वरील परिभाषा स्वीकारली असून वरील दोन सूत्राचे पृथक्करण त्या परिभाषेचे ज्ञापक मानले आहे ) 'इष्टादिभ्यश्च' सू १८८८ या उत्तर सूत्रात 'सपूर्वाच्च' या पूर्व सूत्राची अनुवृत्ति व्हावी याकरिता पाणिनीनें ('पूर्वात्सपूर्वादिनि' असे एक सूत्र न करिता 'पूर्वादिनि, सपूर्वाच्च' अशी) दोन पृथक् सूत्रें मुद्दाम पठित केली आहेत आणि 'इष्टादिभ्य' या उत्तर सूत्रात 'सपूर्वाच्च' या पूर्व सूत्राची अनुवृत्ति होत असल्यामुळेंच 'अनिष्टी' इत्यादि रूपें सिद्ध होतात असे कोणी म्हटल्यास, (त्यावर शंकाकार असे उत्तर देतो की,) हे म्हणणे बरोबर नाही कारण ज्या भाष्यात ही दोन पृथक् सूत्रें वरील परिभाषेचे ज्ञापक मानली आहेत त्या ज्ञापकपर भाष्याच्या आधारे हे स्पष्ट होतें की, 'अनिष्टी' इत्यादि रूपाची सिद्धि होणे इष्ट नाही. (प्रतिशंकाकाराचे असे म्हणणे आहे की, पाणिनीनें एकच सूत्र पठित न करिता दोन पृथक् सूत्रें अशाकरिता पठित केली आहेत की, 'इष्टादिभ्य' या पुढील सूत्रात 'सपूर्वाच्च' या पूर्व सूत्राची अनुवृत्ति व्हावी व ज्याच्या पूर्वी इतर शब्द आहे अशा इष्टादिशब्दान्ताहून 'इनि' प्रत्यय होऊन 'अनिष्टी' इत्यादि रूपें सिद्ध व्हावीं आणि अशा रीतीनें त्या दोन सूत्रांचे पृथक्करण सप्रयोजनक व चरितार्थ ठरत असल्यामुळें, ते पृथक्करण वरील परिभाषेचें ज्ञापक मानता येत नाही. या प्रतिशंकेवर शंकाकार असे उत्तर देतो की, भाष्यकारानी वरील दोन सूत्रें वरील परिभाषेचे ज्ञापक

मानलें असल्यामुळें, 'इष्टादिभ्यश्च' या सूत्रांत 'सपूर्वाच्च' या सूत्राची अनुवृत्ति व्हावी याकरिता दोन पृथक् सूत्रें पाणिनीनें केलीं आहेत असें मानल्यास, भाष्यकाराचें ज्ञापकपर भाष्य चूक ठरण्याची आपत्ति येते. म्हणून तें भाष्य सुसङ्गत ठरण्याकरिता वरील परिभाषा मानणें आवश्यक आहे. ती परिभाषा मानल्यानें 'अनिष्टी' इत्यादि रूपें अशुद्ध ठरतात हें उघड आहे, कारण 'इष्टादिभ्यश्च' या सूत्रांत 'सपूर्वाच्च' या सूत्राची अनुवृत्ति होत नाहीं असें मानलें असता, त्या सूत्रान्वयें 'इष्ट' इत्यादि प्रातिपदिकाहून 'इनि' प्रत्यय होऊं शकतो व 'ग्रहणवता प्रातिपदिकेन' ही परिभाषा असल्यामुळें, तदन्तविधि होऊं शकत नाहीं व त्यामुळें 'अनिष्ट' इत्यादि शब्दाहून 'इनि' प्रत्यय करतां येत नाहीं दुसरें असें कीं, पाणिनीनें दोन पृथक् सूत्रें न करितां 'पूर्वात्सपूर्वादिनि' असें) एकच सूत्र केलें असतें तरी, त्या सूत्रांतील 'सपूर्वात्' एवढाच भाग स्वरित केल्यानें त्या स्वरितत्वाच्या सामर्थ्यानें ('स्वरितेनाधिकार' सू ४६ या सूत्रान्वयें 'इष्टादिभ्यश्च' या) उत्तर सूत्रांत तेवढयाच स्वरित पदाची अनुवृत्ति करण्यांत कोणताहि बाध आला नसता. (म्हणून उत्तर सूत्रांत अनुवृत्ति करण्याकरिता पाणिनीनें दोन पृथक् सूत्रें केलीं आहेत असें मुळींच मानतां येत नाहीं 'व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन' ही परिभाषा असल्यामुळेंच, पाणिनीला तशीं दोन पृथक् सूत्रें करावीं लागलीं व अशा रीतीनें तीं दोन पृथक् सूत्रें त्या परिभाषेचें ज्ञापक ठरतात असें भाष्यकाराचें म्हणणें आहे तें पुढें असें म्हणतो कीं,) प्रत्ययविधायक सूत्रांत सूत्रनिर्दिष्ट प्रातिपदिकाचे ठिकाणीं व्यपदेशिवद्भाव होण्याचा प्रतिषेध केला असल्यामुळेंच, 'नान्तादसङ्ख्यादेर्मट्' सू १८५० हें सूत्र चरितार्थ ठरतें अशा ठिकाणीं व्यपदेशिवद्भाव होऊं शकला असता तर, 'पञ्चम' इत्यादि स्थळीं 'पञ्चन्' इत्यादि नकारान्त सङ्ख्यावाचक शब्द व्यपदेशिवद्भावानें सङ्ख्यादि आहेत असें मानतां आलें असतेंच व तें सूत्र व्यर्थ ठरलें असतें हें उघड आहे. ('नान्तादसङ्ख्यादेर्मट्'

या सूत्राचा असा अर्थ आहे की, सख्यावाचक नकारान्त शब्दापूर्वी सख्यावाचक शब्द नसल्यास, 'तस्य पूरणे डट्' सू. १८४९ या सूत्राने होणाऱ्या 'डट्' प्रत्ययाला 'मट्' आगम होतो. अशा ठिकाणी जर 'व्यपदेशिवदेकस्मिन्' ही परिभाषा प्रवृत्त केली तर, 'पञ्चन्' इत्यादि नकारान्त सख्यावाचक शब्द देखील व्यपदेशिवद्भावाने सख्यादि आहेत असे मानता येऊ शकते. त्यामुळे 'नान्तादसङ्ख्यादेर्मट्' हे सूत्र प्रवृत्त होण्यास कोणतेहि उदाहरण मिळणे अशक्य असल्यामुळे, ते सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. परंतु 'व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन' ही परिभाषा असल्यामुळे अशा ठिकाणी व्यपदेशिवद्भाव करता येत नाही व 'पञ्चन्' शब्दाहून मडागमसहित 'डट्' प्रत्यय करतेवेळी तो शब्द सख्यादि आहे असे व्यपदेशिवद्भावाने मानता येत नाही आणि त्यामुळे 'नान्तादसङ्ख्यादेर्मट्' हे सूत्र चरितार्थ ठरते 'ननु एकगोपूर्वात् · तद्वैयर्थ्यं स्पष्टमेव' येथपर्यंत शकाग्रन्थ आहे हे लक्षात ठेवावे, आणि जरी दीक्षितानी 'व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन' ही परिभाषा मानण्याची काही गरज नाही असे पूर्वी मनोरमेंत म्हटले आहे तरी, वरील शकाग्रन्थात केलेले प्रतिपादन यथार्थ आहे हे जाणून व ही ) अरुचि मनात धरूनच दीक्षितानी मनोरमेच्या पुढील पक्तीत 'परिभाषाद्वयमपि प्रत्ययविधिविषयकम्' असे म्हटले आहे. ( दीक्षितानी 'सान्त सजुष्शब्दान्त च यत्पद तस्य रु स्यात्, स चाल्लोऽन्त्यस्य' असा प्रकृत सूत्राचा मनोरमेंत अर्थ केला आहे. केवळ 'सजुष्' हा शब्द सजुष्शब्दान्त नसल्यामुळे, म्हणजे त्या शब्दापूर्वी 'परम' इत्यादि कोणताहि शब्द नसल्यामुळे, वरील अर्थान्वयें त्या शब्दाच्या अन्त्य षकाराचे रुत्व न होण्याची आपत्ति येते पण 'व्यपदेशिवदेकस्मिन्' या परिभाषान्वयें तो शब्द व्यपदेशिवद्भावाने सजुष्शब्दान्त मानता येत असल्यामुळे, वरील आपत्ति टळते. यावर शकाकाराने असे म्हटले आहे की, 'व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन' ही परिभाषा असल्यामुळे प्रकृत सत्रात निर्दिष्ट असलेला 'सजुष्' शब्द सजुष्शब्दान्त मानता

येत नाही या शंकेवर दीक्षितांनी असे उत्तर दिले आहे की, ती परिभाषा मानण्याची काहीच गरज नाहीं असे त्यांनी शब्दकौस्तुभात सिद्ध करून दाखविले आहे व तिचे प्रत्याख्यान केले आहे म्हणून ती परिभाषा न मानल्यानें व्यपदेशिवद्भाव करता येतो व केवळ 'सजुष्' शब्द देखील व्यपदेशिवद्भावानें सजुष्शब्दान्त मानता येतो यावर शंकाकाराचे असे म्हणणे आहे की, भाष्यकारानीं ती परिभाषा प्रत्याख्यात केली नसून स्वीकारली आहे व ती परिभाषा न मानल्यास 'नान्त्यादसङ्ख्यादेर्मट्' हें सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. म्हणून दीक्षितांनीं त्या परिभाषेच केलेले प्रत्याख्यान भाष्यविरुद्ध ठरत असल्यामुळें बरोबर मानता येत नाही व ती परिभाषा मानणे आवश्यक आहे शंकाकाराची ही शंका यथार्थ मानून दीक्षित असे उत्तर देतात की, ती परिभाषा स्वीकारल्यानें देखील कोणताहि दोष येत नाही, कारण प्रत्ययाचे विधान करणाऱ्या सूत्रानाच ती परिभाषा लागू पडते असें भाष्यकारादिकानीं म्हटले असल्यामुळें व प्रकृत सूत्रात प्रत्ययाचे विधान केलें नसून अन्त्य वर्णाचे जागीं 'रु' हा आदेश होण्याचे विधान केलें असल्यामुळें, प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'सजुष्' शब्दाहून व्यपदेशिवद्भाव करण्यात व 'सजुष्' हा शब्द सजुष्शब्दान्त मानण्यात कोणताहि बाध–प्रत्यवाय–येत नाही.) मनोरमेंत 'दिव उत्सूत्रे कैयटहरदत्ताभ्यामुक्तत्वाच्च' असे जें म्हटले आहे त्या पङ्क्तीतील 'दिव उत्सूत्रे' हीं पदें 'दिव उत्सूत्र यस्मिन् पादे तत्सूत्रघटितपादे' अशा अर्थाच्या बहुव्रीहिसमासाचीं वाचक पदें आहेत व तसा समास मानल्यानें असा अर्थ होतो की, 'दिव उत्' या सूत्रावरील वृत्तीत हरदत्तानें व ते सूत्र ज्या पादात पठित आहे त्या पादात पठित असलेल्या 'इन्द्रे च' या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तीत कैयटानें 'परिभाषाद्वयमपि प्रत्ययविधिविषयकम्' असे म्हटले आहे. (वास्तविक हरदत्तानें 'दिव उत्' ६-१-१३१ या सूत्रावरील वृत्तीत वरील दोन्ही परिभाषा प्रत्ययविधिविषयक आहेत असे म्हटले आहे. कैयटानें देखील त्या दोन्ही परिभाषा–म्हणजे

'ग्रहणवता प्रातिपदिकेन तदन्तविधिर्नास्ति' व 'व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन' या दोन्ही परिभाषा— प्रत्ययविधिविषयकच आहेत असे जरी म्हटले आहे तरी ते 'दिव उत्' या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तीत म्हटले नसून 'इन्द्रे च' ६ १ १२४ या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तीत म्हटले आहे म्हणून शब्दरत्नकारांनी आपाततः चूक दिसणाऱ्या दीक्षितांच्या म्हणण्याचे समर्थन करण्याकरिता 'दिव उत्सूत्रे' हा शब्दसमुदाय बहुव्रीहिसमास मानून त्याचा वर सांगितल्याप्रमाणे विग्रह केला आहे.) जेथें सूत्रात 'अन्त' इत्यादि शब्दाचे ग्रहण केले आहे तेथेंच 'व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन' ही परिभाषा लागू पडते असे कैयटानें 'येन विधि' १ १ ७२ या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तीत म्हटले असल्यामुळें हें स्पष्ट होते की, ही परिभाषा प्रत्ययविधायक सूत्रानाच लागू पडते. (त्या भाष्याच्या वृत्तीत कैयटानें 'अप्रातिपदिकेनेति तु निषेधो यत्रान्तग्रहण सूत्रे एवोपात्त तत्र। यथा दशान्ताड्डः' असे म्हटले आहे यावर उद्योतकारांनी 'यत्रान्तेत्यन्तग्रहणमुपलक्षणम्,' म्हणजे वरील पङ्क्तीत कैयटानें वापरलेला 'अन्त' हा शब्द उपलक्षणार्थक असून त्या शब्दानें 'पूर्व' इत्यादि अवयववाचक शब्दाचे देखील ग्रहण होते सारांश ज्या सूत्रात प्रातिपदिकाचे ग्रहण केले असून त्या प्रातिपदिकान्ताहून किंवा प्रातिपदिकपूर्वाहून प्रत्यय होणे सांगितले असेल तेथेंच वरील परिभाषा प्रवृत्त होते व भावप्रकाशकारांनी 'प्रत्ययविध्यन्यत्र तेषामभावात्' असे जें म्हटले आहे त्यावरून हें स्पष्ट होतें की, अशा रीतीचें ग्रहण प्रत्ययविधायक सूत्रातच सापडते. त्यामुळें, ही परिभाषा प्रत्ययविधायक सूत्रानाच लागू पडते हे उघड होतें.) 'असमासे निष्कादिभ्यः' ५ १. २० या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारांनी व तसेच त्या भाष्याच्या वृत्तीत कैयटानें स्पष्ट म्हटले आहे की, 'ग्रहणवता प्रातिपदिकेन' व 'व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन' या दोन्ही परिभाषा प्रत्ययविधायक सूत्रानाच लागू पडतात. (त्या सूत्रावरील भाष्यात 'आर्हादगोपुच्छसङ्ख्यापरिमाणाट्ठक्'

सू. १६८१ या सूत्रान्वयें 'गोपुच्छ' या शब्दाहून 'ठक्' प्रत्यय होण्याचा प्रतिषेध केला असल्यामुळें तो प्रतिषेध 'परमगोपुच्छ' या गोपुच्छान्त शब्दास लागू पडतो किंवा नाही असा प्रश्न उपस्थित करून त्या प्रश्नाचे भाष्यकारानी असे उत्तर दिले आहे की, 'विधौ प्रतिषेध, प्रतिषेधस्त्वायम्' म्हणजे प्रत्ययविधायक सूत्राच्या विषयातच तदन्तविधि होण्याचा निषेध केला आहे. परंतु 'अगोपुच्छ' या सूत्रात 'गोपुच्छ' इत्यादि शब्दाहून प्रत्यय होणे सांगितले नसून त्या शब्दाहून 'ठक्' प्रत्यय होण्याचा प्रतिषेध केला असल्यामुळें, अशा प्रत्ययप्रतिषेधक सूत्रात निर्दिष्ट असलेल्या प्रातिपदिकाहून तदन्तविधि करता येतो व त्यामुळें 'परमगोपुच्छ' या शब्दाहून देखील 'ठक्' प्रत्यय होऊ शकत नाही व 'ठञ्' प्रत्ययच होतो. या भाष्यावरून हें स्पष्ट होते की, वरील दोन्ही परिभाषा प्रत्ययप्रतिषेधक सूत्रांना लागू पडत नसून प्रत्ययविधायक सूत्रांनाच लागू पडतात. त्या भाष्यावरील वृत्तीत कैयटानें 'पूर्वादिनिः सपूर्वाच्चेति प्रत्ययविधौ ग्रहणवर्जं येतस्या परिभाषाया ज्ञापितत्वाद्यत्रैव प्रत्यया विधीयन्ते तत्रैवानया तदन्तविधिः प्रतिषिध्यते। अगोपुच्छादसंख्यापरिमाणाद्दित्यत्र तु ठक् प्रतिषिध्यते इति न तदन्तविधिप्रतिषेधः, नापि व्यपदेशिवद्भावप्रतिषेधः.' असे स्पष्ट म्हटले आहे ) 'एवं च परमसजुर्भ्यामित्याद्यपि निर्बाधम्' या मनोरमेच्या पङ्क्तीतील 'आदि' या शब्दानें 'सजुर्भ्याम्' या रूपाचे ग्रहण होते. ('ससजुषो रुः' या प्रकृत सूत्रात 'पदस्य' या अनुवृत्त असलेल्या पदाचे 'सजुष' हे विशेषण असल्यामुळें, त्याचा 'येन विधि.' सू. ३६ या सूत्रान्वयें 'सजुष्शब्दान्तस्य' असा अर्थ होतो. 'सजुष्' हा शब्द जरी सजुष्शब्दान्त नाही तरी व्यपदेशिवद्भावानें तो शब्द सजुष्शब्दान्त आहे असे मानता येते व येथे 'व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन' ही परिभाषा लागू पडत नाही. कारण प्रकृत सूत्र प्रत्ययविधायक सूत्र नसून आदेशविधायक सूत्र आहे हे पूर्वी सांगितलेच आहे. म्हणून 'सजुष्+भ्याम्' या रूपात 'सजुर्'

याला 'स्वादिष्वसर्वनामस्थाने' सू. २३० या सूत्रानें पदसंज्ञा होत असल्यामुळे, 'सजुष्' यातील अन्त्य षकाराचे रुत्व होऊन व पूर्वी मनोरमेंत सांगितल्याप्रमाणे उपधा दीर्घ होऊन 'सजूर्भ्याम्' हे रूप सिद्ध होते प्रकृत सूत्रावरील शब्दरत्नांत परिभाषा ३०, ३१, ३२ या तीन परिभाषासंबधानें बरीच चर्चा केली आहे. परिभाषेन्दुशेखराच्या मराठी भाषान्तरांत या तीन परिभाषांचे जें विस्तृत विवरण केलें आहे ते वाचल्यास शब्दरत्नातील वर केलेली चर्चा उत्तम रीतीनें ध्यानांत येईल )

मनोरमा– "भोभगो ॥ असन्धिः सौत्र इति । भगोअघोशब्दयोरोकारस्याकारस्य च पूर्वरूपं सौत्रत्वान्नेत्यर्थः । यदि तु भोस्, भगोस्, अघोस्, इति सान्त रान्त वा अनुकृत्य भो इत्यादीनां त्रयाणामलोऽन्त्यस्य यः स्यादपूर्वस्य रोश्चेति व्याख्यायते, तर्हि असन्धिर्न्याय्य एव । युक्तं चैतत् । अन्यथा विभोरिव, सुप्रभा गौर्यस्य स सुप्रभगुस्तस्य सुप्रभगोरिदं रघोरिदमित्यत्रापि यत्वापत्तेः । भवति ह्यत्र भोशब्दादिपूर्वो रुः । न चात्र भोशब्दादेर्लाक्षणिकत्वादग्रहणम् । "विभाषा भवद्भगवदघवतामोच्चावस्य" इति वार्तिकेन निष्पन्नानां भवदादिप्रकृतिकानां भोशब्दादीनामपि लाक्षणिकत्वाविशेषात् । अनर्थकत्वमप्युभयत्र तुल्यम् । रुविशिष्टानामेवार्थवत्त्वात् । ननु रोरुकारस्यानुबन्धत्वाद्रेफमात्र विसर्गस्य स्थानि तथा च "अनल्विधौ" इति स्थानिवद्भावो न स्यादित्याशङ्क्याह––न ह्ययमिति । यथाऽग्रहीदित्यत्र "ग्रहोऽलिटि इति दीर्घस्य स्थानिवद्भावेनेट्त्वात् "इट ईटि" इति प्रवर्तते । एवमिहापि विसर्गस्य रुत्वाद्यत्वं प्रवर्ततेति भावः । तथा च स्थानिवत्सूत्रे भाष्यम् "विशिष्ट ह्येषोऽनलमाश्रयते इटं नाम" इति । इतोऽपि हेतोर्धात्वङ्गेत्यादिपरिगणनमशुद्धमित्यवधेयम् ।

'भोभगोअघोअपूर्वस्य योऽशि' सू. १६७ या सूत्रावरील कौमुदींत 'असन्धिः सौत्रः' असे जें म्हटले आहे त्याचा अर्थ हा

याहे कीं, (लुक् पावलेल्या अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाला मानून पदसंज्ञक असलेल्या एङन्त) 'भगो, अघो' या दोन शब्दांतील ओकार व त्याच्या पुढील अकार याचा (एङः पदान्तादति' सू. ८६ या सूत्रानें) जो पूर्वरूप सन्धि पावला होता तो, सौत्रप्रयोग असल्यामुळें, केला नाहीं. ('भोभगोअघोअपूर्वस्य' हा एक सामासिक शब्द आहे व '*नित्या समासे*' या वचनान्वयें समासांत सन्धिकार्य नित्य होणें सांगितलें असल्यामुळें, येथें वर सांगितल्याप्रमाणें पावलेला पूर्वरूप सन्धि करावयास पाहिजे होता व 'भोभगोऽघोऽपूर्वस्य योऽशि' असें पाणिनीनें प्रकृत सूत्र पठित करावयास पाहिजे होतें. परंतु 'छन्दोवत्सूत्राणि भवन्ति' असें भाष्यवचन असून 'सर्वे विधयश्छन्दसि विकल्प्यन्ते'–परि. ३५–अशी परिभाषा असल्यामुळें, येथें पूर्वरूप सन्धि केला नाहीं. प्रकृत सूत्रावरील कौमुदींत 'भोस्, भगोस्, अघोस् इति सकारान्ता निपाताः' असें दीक्षितांनीं म्हटलें असल्यामुळें हें स्पष्ट होतें की, प्रकृत सूत्रांत *निर्दिष्ट असलेले 'भो, भगो, अघो' हे ओकारान्त शब्द निपात नसून* त्या मान्य निपातांच्या किंवा 'ससजुषो रुः' सू. १६२ या सूत्रानें त्यांच्या अन्त्य सकाराचें रुत्व केलें असता रान्त होणाऱ्या त्या निपातांच्या एकदेशाचें अनुकरण करणारे ओंकारान्त शब्द आहेत. सारांश दीक्षितांनीं कौमुदींत ओंकारान्तानुकरण पक्ष मानला आहे आणि त्यामुळेंच त्यांनीं कौमुदींत 'अलघ्वि. सोवः' असें म्हटलें आहे. पण ते आता मनोरमेच्या पुढील पक्तींत असें म्हणतात कीं, हा ओंकारान्तानुकरण पक्ष न मानता ) 'भोस्, भगोस्, अघोस्' या मान्य किंवा वर सांगितल्याप्रमाणें कृतरान्त निपातांचें अनुकरण करणारे प्रकृत सूत्रांत *निर्दिष्ट असलेले 'भो, भगो, अघो' हे शब्द आहेत* असें मानलें, म्हणजे मान्तानुकरण पक्ष किंवा रान्तानुकरण पक्ष मानला, आणि त्या मान्त किंवा कृतरान्त शब्दांतील अन्त्य अराचें यत्व होणें व तसेंच 'अ' वर्ण पूर्वी आहे ज्याच्या अशा 'र'चें यत्व होणें असें प्रकृत सूत्राचें व्याख्यान केलें तर, प्रकृत सूत्रांत जें पूर्वरूप

सन्धिकार्य केले नाही तेच योग्य ठरते. ( ओकारान्तानुकरण पक्ष मानल्यानें 'एङः पदान्तादति' सू. ८६ या सूत्रानें ज्या पूर्वरूप सन्धिकार्याची अवश्य प्राप्ति होते ते सन्धिकार्य पाणिनीनें केले नाही व सन्धिशास्त्राचे उल्लघन केले असा पाणिनीवर दोष येतो व त्या दोपाचे निवारण करण्याकरिता 'असन्धिः सौत्रः' अशी कल्पना करून कसे तरी समाधान करून घ्यावे लागते पण प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेले 'भो, भगो, अघो' हे शब्द वरील तीन सान्त किंवा रुतरान्त निपाताचेच अनुकरण करणारे शब्द आहेत असा पक्ष मानल्यास, 'भोस्, भगोस्, अघोस्' याच्या अन्त्य सकाराचे जागी व रुतरान्त शब्दातील अन्त्य रेफाचे जागी प्रकृत सूत्रान्वयें यकारादेश केल्यावर 'ओतो गार्ग्यस्य' सू. १६९ या त्रैपादिक सूत्राने त्या यकाराचा जो लोप होतो तो 'पूर्वत्रासिद्धम्' सू. १२ या सूत्रान्वयें 'एङः पदान्तादति' या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें असिद्ध ठरत असल्यामुळें, सन्धिकार्य करतेवेळी तो यकार विद्यमानच आहे असे मानणे भाग पडते व त्यामुळें पूर्वरूप सन्धीची प्राप्तीच होत नाही व पाणिनीनें जें पूर्वरूप सन्धिकार्य केले नाही तें अगदी योग्य ठरते आणि पाणिनीवर सन्धिशास्त्राचे उल्लघन करण्याचा जो दोष येऊ पाहत होता त्या दोपाचे सहज रीतीनें निवारण होते. मात्र या दोन सान्त व रान्त पक्षात 'भोभगोअघोअपूर्वस्य' एवढा एक सामासिक शब्द न मानता, 'अपूर्वस्य' असा एक सामासिक शब्द मानून, 'भोभगोअघो' असा वेगळा षष्ठयन्त सामासिक शब्द मानावा व शब्दरत्नात सांगितल्याप्रमाणे त्या सामासिक शब्दापुढील षष्ठीच्या प्रत्ययाचा सौत्र लुक् झाला आहे असे समजावे. ) आणि असेच मानणे योग्य आहे असे न मानल्यास, म्हणजे सान्त किंवा रुतरान्त अनुकरणपक्ष न मानल्यास व प्रकृत सूत्राचा वर प्रमाणे अर्थ न केल्यास, 'भोरिद्, सुप्रभा गौर्यस्य स सुप्रभगुस्तस्य सुप्रभगोरिदम्' व 'रघोरिदम्' या तीन्ही उदाहरणात देखील 'र' चे यत्व होण्याची आपत्ति येते. या वरील तीन्ही उदाहरणात 'र' च्या पूर्वी 'भो, भगो,

अघो' हे शब्द आहेत. या तीन्ही उदाहरणात ( 'विभु, सुप्रभगु, रघु' या घिसञ्ज्ञक प्रातिपदिकाहून षष्ठीच्या एकवचनाचा 'ङस्=अस्' प्रत्यय केला असता, 'घेर्ङिति' सू. २४५ या सूत्राने अन्त्य उकाराचा गुण होऊन व 'ङसिङसोश्च' सू. २४६ या सूत्राने पूर्वरूप एकादेश होऊन सिद्ध झालेल्या म्हणजे एकादेश ) 'भो, भगो, अघो' हे शब्द लाक्षणिक असल्यामुळे, ( प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेल्या शब्दांचे ) त्याचे ग्रहण होऊ शकत नाही असे देखील म्हणता येत नाही, कारण 'विभाषा भवद्भगवदघवतामोच्चावस्य' या वार्तिकान्वये 'भवत्' इत्यादि प्रकृतीहून सिद्ध झालेले 'भोर्, भगोर्, अघोर्' हे शब्द देखील वरील तीन उदाहरणातील शब्दासारखेच लाक्षणिक आहेत व वरील दोन्ही स्थली 'भो, भगो, अघो' हे शब्द अर्थवान् नसून अर्थरहितच आहेत, कारण 'र' विशिष्ट-'र'-युक्त-ते शब्दच अर्थवान् आहेत. ( वरील वार्तिकाचा अर्थ असा आहे की, 'भवत्, भगवत्, अघवत्' या शब्दापुढे सबुद्धीचा प्रत्यय आल्यास, त्याच्या अन्त्य वर्णाचे जागी 'रु' असा आदेश व त्या शब्दातील 'अव' चे जागी 'ओ' असा आदेश विकल्पेंकरून होतो त्यामुळें या तीन शब्दांचे 'भोर्, भगोर्, अघोर्' असे सबुद्धीचे रूपान्तर होतें. जसे मनोरमेंत दिलेल्या तीन उदाहरणातील 'भो, भगो, अघो' हे मूळचे शब्द नसून वर सांगितल्याप्रमाणे लाक्षणिक आहेत तसेच वार्तिकनिष्पन्न शब्द देखील मूळचे 'भो, भगो अघो' असे शब्द नसून 'भवत्' इत्यादि प्रकृतीच्या अन्त्य वर्णाचे रत्व होऊन व 'अव' चे जागी ओकार होऊन सिद्ध झालेले लाक्षणिक शब्द आहेत या दोन्ही स्थली 'विभोर्, सुप्रभगोर्, रघोर्, भोर्, भगोर्, अघोर्' हे 'र' विशिष्ट शब्दच अर्थवान् असून त्या शब्दांचे एकदेश 'भो, भगो, अघो' हे सारखेच अर्थरहित आहेत म्हणून सान्त शिवा सूत्रान्त 'भोस्, भगोस्, अघोस्' या शब्दाने प्रकृत सूत्रांत अनुकरण केले नसून 'भो, भगो, अघो' या अनर्थक एकदेशाचे ग्रहण केले आहे असा ओकारान्तानुकरण पक्ष मानला तर, मनोरमेंत

दिलेल्या तीन उदाहरणातील 'भो, भगो, अघो' या एकदेशाच्या पुढें पदान्त सकाराचे जागी झालेला 'रु' असल्यामुळें, प्रकृत सूत्रान्वयें त्या 'रु' चे यत्व होण्याची व तसे इष्ट प्रयोग सिद्ध न होण्याची आपत्ति येते या सूत्रनिर्दिष्ट अर्थरहित शब्दानी मनोरमेंत दिलेल्या वरील तीन उदाहरणातील अनर्थक एकदेशाचे ग्रहण होऊ शकत नाही पण वार्तिकनिष्पन्न शब्दातील अनर्थक एकदेशाचे ग्रहण होऊ शकते असा भेद मानण्यास कोणताहि आधार नाही दोन्ही प्रकारचे शब्द लाक्षणिक असून त्या दोहोचे एकदेश 'भो, भगो, अघो' हे सारखेच अर्थरहित असल्यामुळें, सूत्रनिर्दिष्ट शब्दानी एक तर त्या दोहोचेहि ग्रहण होऊ नये, किंवा वार्तिकनिष्पन्न शब्दातील एकदेशाचे ग्रहण केल्यास, मनोरमेंत दिलेल्या तीन उदाहरणातील एकदेशाचे देखील ग्रहण करणे भाग आहे दुसरे असे की, सूत्रनिर्दिष्ट 'भो, भगो, अघो' हे शब्द ओकारान्तानुकरण पक्षात अनर्थक आहेत असे वर सांगितल्याप्रमाणे मानले असल्यामुळें, या पक्षात 'अर्थवद्-ग्रहणे नानर्थकस्य'–परि १४–ही परिभाषा लागू पडत नाही व त्यामुळें सूत्रनिर्दिष्ट अर्थरहित शब्दानी मनोरमेंत दिलेल्या तीन उदाहरणातील अनर्थक एकदेशाचे ग्रहण करण्यात कोणताहि प्रत्यवाय येत नाही म्हणून या ओकारान्तानुकरण पक्षात त्याचे ग्रहण टाळता येणे अशक्य असल्यामुळें वर दाखविलेली आपत्ति येते आणि ती आपत्ति टाळण्याकरिता ओकारान्तानुकरण पक्ष न मानता, सान्त किंवा रान्त अनुकरण पक्ष मानणच उचित आहे या

वार्तिकनिष्पन्न 'मोर्, मगोर्, अघोर्' हे सबुद्धयन्त शब्द अर्थवान् असल्यामुळें, सूत्रनिर्दिष्ट कृतरान्त सवोधनार्थक निपातानीं त्याचे ग्रहण करता येते, कारण दोहोंत स्वरूपसादृश्य व अर्थसादृश्य आहे. वार्तिकनिष्पन्न शब्द जरी लाक्षणिक आहेत तरी लक्षण-प्रतिपदोक्तपरिभाषा–परि ११४–अनित्य असल्यामुळें, सूत्रनिर्दिष्ट अर्थवान् शब्दानी त्याचे ग्रहण करता येते हें मनोरमेंत पुढें सांगण्यात येईल आता पुढील पक्तीचे विवरण करूं. 'ससजुषो रुः' सू १६२ या सूत्रानें पदान्ती असलेल्या सकाराचे जागी जो 'रु' आदेश होतो त्या) 'रु' तील उकार हा अनुबन्ध–म्हणजे 'इत्'वर्ण–असल्यामुळें ('देवा सन्ति' या उदाहरणात 'खरवसानयोर्विसर्जनीय' सू. ७६ या सूत्रानें होणाऱ्या) विसर्गाचा केवळ रेफ = 'र्' हा अल् स्थानी ठरतो आणि 'अनल्विधौ' हा प्रतिषेध असल्यामुळें, त्या विसर्गरूप आदेशाचे ठिकाणी स्थानिवद्भावानें रुत्वबुद्धि करताच येत नाहीं (व त्यामुळें यत्वाची प्राप्तीच होत नाही) अशी कोणी शका केल्यास, त्या शकेचे उत्तर 'तैह्य-यमल्विधि । रोरिति समुदायरूपाश्रयणात् ।' असें प्रकृत सूत्रावरील कौमुदीत दिलें आहे ज्याप्रमाणे 'ग्रहोऽलिटि दीर्घे' सू २५६२ या सूत्रानें 'इट्' या आगमाचे जागी होणारा दीर्घ ईकार 'इट्'च आहे असें मानता येतें व त्यामुळें 'अग्रहीत्' या स्थली 'इट ईटि' सू २२६६ या सूत्राची प्रवृत्ति होते (व सिचाचा–म्हणजे सकाराचा-लोप होतो) त्याचप्रमाणे ('देवा सन्ति' या उदाहरणात यत्वविधि करतेवेळी विसर्गाचे ठिकाणी स्थानिवद्भावानें रुत्वबुद्धि करता येत व त्यामुळें यत्व होण्याची आपत्ति येते (ती टाळण्याकरिता प्रकृत सूत्रात 'अशि' या पदाच ग्रहण आवश्यक आहे) 'स्थानिवदादेश' सू १. १. ५६ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी स्पष्ट म्हटले आहे की, 'विशिष्ट ह्येषोऽल्समाश्रयते इट नाम'–म्हणजे 'इट ईटि' या सूत्रात 'इट्' या समुदायाचे ग्रहण केलें असल्यामुळें, 'ग्रहोऽलिटि दीर्घे' या सूत्रानें होणाऱ्या दीर्घ ईकारादेशाचा 'इट्'

हा समुदाय स्थानी ठरतो. यामुळें देखील 'धात्वङ्गकृत्तद्धिताव्ययसुप्तिङ्पदादेशा.' असे जें प्रक्रियाकौमुदीकारांनी परिगणन केले आहे ते अशुद्ध ठरतें हे लक्षात ठेवावे. (शकाकार असे म्हणतो की, 'देवास् सन्ति' या उदाहरणात 'देवास्' या पदाच्या अन्ती असणाऱ्या सकाराचे जागी 'ससजुषो रुः' या सूत्रानें होणाऱ्या 'रु' या आदेशातील उकार हा अनुबन्ध इत्संज्ञक वर्ण असल्यामुळें व 'नानुबन्धकृतमनेकाल्त्वम्'–प ६–ही परिभाषा असल्यामुळें, 'रु' हा वास्तविक अल्‌रूप रेफच ठरतो व त्या रेफाचे–'र'चे–जागी प्रकृत पर त्रैपादिक सूत्रानें पावलेल्या यत्वाचा बाध करून 'खरवसानयो' या पूर्व त्रैपादिक सूत्रानें जो विसर्ग होतो त्या विसर्गाचा स्थानी अशा रीतीनें अल्‌रूप रेफ–रकार–ठरत असल्यामुळें, 'अनल्विधौ' या प्रतिषेधान्वये, तो अल्‌स्थानिक विसर्ग 'रु' च आहे असे स्थानिवद्भावानें मानता येत नाही व त्यामुळें प्रकृत सूत्रात 'भवि' हे पद नसले तरी त्या विसर्गाचे यत्व होण्याची आपत्ति मुळीच येत नाही, कारण प्रकृत सूत्रानें 'रु' चे यत्व होणे सांगितले आहे व वरील उदाहरणात अल्‌रूप रेफाचे जागी झालेला विसर्ग जर वर सांगितल्याप्रमाणे 'रु' आहे असे शास्त्रदृष्ट्या मानता येत नाही तर त्याचे यत्व कसे होऊं शकणार ? या शंकेवर दीक्षित असें उत्तर देतात कीं, 'प्रातर्, पुनर्' इत्यादि स्थली होणाऱ्या विसर्गांचा स्थानी जसा अल्मात्रधर्मवृत्ति केवळ रकार हा अल् आहे तसा प्रकृत उदाहरणात होणाऱ्या यत्वाचा तसा रेफ स्थानी नसून उकारानुबन्धविशिष्ट अनल्धर्मवृत्ति 'रु' हा समुदाय स्थानी आहे आणि जरी त्या 'रु' स्थानीतील उकार हा इत् आहे तरी तो स्थानी उकारानुबन्धविशिष्ट मुद्दाम प्रकृत सूत्रात उच्चारला असल्यामुळें, त्याचे अनल्त्व नष्ट होत नसून तो अनल्धर्मवान् ठरतो म्हणून तशा अनल्धर्मक 'रु' या समुदायरूप स्थानीचे जागी होणारे यत्व करतेवेळी वरील उदाहरणात झालेला विसर्ग 'रु' च आहे असे स्थानिवद्भावानें मानण्यात 'अनल्विधौ' हा प्रतिषेध लागूच पडत

नाही व त्यामुळें त्या विसर्गाच यत्व होण्याची आपत्ति येते पण प्रकृत सूत्रात 'अशि' या पदाचे ग्रहण केले असल्यामुळें व 'देवा सन्ति' या उदाहरणात विसर्गापुढें 'अश' नसून सकार हा 'खर्' असल्यामुळें, ती आपत्ति टळते आणि अशा रीतीनें प्रकृत सूत्रात केलेले 'अशि' या पदाचे ग्रहण चरितार्थ ठरते अशा स्थली होणाऱ्या विसर्गाचे ठिकाणी रुत्व-बुद्धि करता येते हे सिद्ध करण्याकरिता दीक्षितानी 'स्थानिवदादेश' १-१-५६ या सूत्रावरील भाष्याच प्रमाण दिले आहे 'ग्रहोऽलिटि दीर्घं' सू २५६२ या सूत्रान्वयें 'ग्रह धातूपुढें येणारा इडागम लिट्लकार खेरीज करून इतर आर्धधातुक स्वारात दीर्घ होतो 'इट्' या आगमातील टकार इत् असल्यामुळें दीघ ईकारा देशाचा स्थानी वास्तविक अल्रूप ऱ्हस्व इकारच आहे व त्यामुळें त्या आदेशाच ठिकाणी तो 'इट्' आहे असो, 'अनल्विधौ' हा प्रतिषेध असल्यामुळें, स्थानिवद्भावानें बुद्धि करता येत नाही असे म्हणता येऊ शकत. पण भाष्यकारानी दीघ ईकारादेशाचा 'इट्' हा अनल्रूप समुदाय स्थानी मानून त्या आदेशाचे ठिकाणा स्थानिवद्भावानें 'इट्त्व' बुद्धि केली आहे त्याचे कारण हे की, 'इट = इ' हा स्थानी मामुली ऱ्हस्व इकारासारखा अल्रूप नसून टकारानुबन्ध-विशिष्ट अनल्धर्मवृत्ति 'इट्' असा समुदाय स्थानी या रूपानें 'इट ईटि' या सूत्रात निर्दिष्ट असल्यामुळें, भाष्यकारानी 'ग्रहोऽलिटि दीर्घं' या सूत्रानें होणारा विधि अल्विधि नव्ह असे म्हटले आहे हाच न्याय उकारानुबन्धविशिष्ट 'रु' या अनल्धर्मवृत्ति प्रकृत-सूत्रनिर्दिष्ट समुदायरूप स्थानीचे जागी होणाऱ्या यकारास लागू पडतो व यत्व करतेवेळी विसर्गाच ठिकाणी स्थानिवद्भावानें रुत्वबुद्धि करता येते त्यामुळें प्रकृत सूत्रात 'अश' या पदाचे ग्रहण न केल तर त्या विसर्गाच 'देवा सन्ति' या उदाहरणात यत्व होण्याची आपत्ति येते या विषयाची अधिक चर्चा शब्दरत्नात करण्यात येईल वरील भाष्यात भाष्यकारानी आगमाचे जागी

होणाऱ्या आदेशाचे ठिकाणी देखील स्थानिवद्भाव मानला असल्यामुळें व प्रक्रियाकौमुदीकारानी दिलेल्या परिगणनात आगमाचे जागी होणाऱ्या आदेशाचा निर्देश केला नसल्यामुळें, ते परिगणन न्यून व अशुद्ध ठरते हे उघड आहे )

मनोरमा–निपाता इति । "भोभगो–" इति सूत्रे निर्दिष्टा-श्चादेराकृतिगणत्वात्तत्र बोध्याः । तथा च "विभाषा भव-द्भगवत्––" इति वार्तिक माश्रयणीयम् । अन्यथा पुल्लिङ्गै-कवचनमात्रे भो हरे इत्यादिसिद्धावपि भो हरिहरौ, भो विद्वद्वृन्द, भो गङ्गे, इत्यादि न सिद्ध्येदिति भावः । एतच्च वृत्तिहरदत्तादिमतेनोक्तम् । भाष्यस्वरसरीत्या तु "विभाषा—" इत्यादि वार्तिकमारब्धव्यमेव । किं तु निपातोऽपि भोः शब्दोऽस्ति, तेन द्विवचनादौ स्त्रीनपुंसकयोश्च न दोषः । युक्ततर चैतत् । हे भवन्नितिवत हे भो इति प्रयोगस्यापी-ष्टत्वात् । तस्य च वार्तिकारम्भ एव सिद्धेः । "स्युः प्याट्पाडङ्ग-हैहेभो" इत्यमरोक्ताना सम्बोधनार्थाना निपातानां सह प्रयोगायोगात् । किं चात्रभवान् हरिस्तत्रभवान् इतिवत् तत्र भो इत्याद्यपि वार्तिके सत्येव सिद्ध्यति । "इतराभ्योऽपि दृश्यन्ते" इति सर्वविभक्त्यन्ता-त्त्रतसोर्भवदादियोग एवेष्टत्वात् । किं चामन्त्रितत्वे पदात्परस्याष्ट-मिकनिघातः । "आमन्त्रित पूर्वम्––" इत्यविद्यमानवद्भाव. । "आमएडान्तरम्-" इति विधिः । "वाक्यादेरामन्त्रितस्य–" "इति द्विर्भाव । "सुबामन्त्रित––" इति पराङ्गवद्भावश्चेत्यादि सर्वं सिद्ध्यति, न त्वन्यथेति दिक् । भगो, अघो इति निपातावपि यदि प्रामाणिकौ तर्हि स्तां नाम । आमन्त्रितकार्यसिद्धिस्तु वार्तिकाय-त्तैवेति सुधीभिराकलनीयम् । यत्तु वदन्ति–सकारान्तानेवैतान् निपातानाश्रित्य दत्वोत्वे भाष्ये प्रत्याख्याते इति, तदतिरभसात् ।

'चादयोऽसत्वे' ॥ २० या सूत्रांत निर्दिष्ट असलेला चादिगण आकृतिगण असल्यामुळें, 'भोस्, भगोस्, अघोस्' हे प्रकृतसूत्रनिर्दिष्ट

निपात चादिगणात (जरी साक्षात् पठित नाहीत तरी) अन्तर्भूत आहेत असे समजावे. अशा रीतीनें 'भोस्, भगोस्, अघोस्' हे निपात मानल्यानें सर्व इष्टसिद्धि होऊ शकत असल्यामुळें, 'विभाषा भवद्भगवत्' हें वार्तिक मानण्याची काही गरज नाही, म्हणजे त्या वार्तिकाचे प्रत्याख्यान करणे योग्य आहे. पण जर केवळ या वार्तिकाचाच स्वीकार केला (व 'भास्, भगोस्, अघोस्' हे निपात न मानले) तर, जरी 'भो हरे' हा पुल्लिङ्गाच्या सबुद्धीचा प्रयोग सिद्ध होऊ शकतो तरी, 'भो हरिहरौ, भो विद्वद्वृन्द, भो गङ्गे' इत्यादि प्रयोग सिद्ध होऊ शकणार नाहीत ('मतुवसो रु' ८. ३. १ या सूत्रावरील भाष्यात वरील वार्तिक पठित करून त्याचे व्याख्यान करिताना भाष्यकार म्हणतात–'सवुद्धाविरयुच्यते तत्रेद न सिध्यति– भो ब्राह्मणा इति। तथा विभक्तौ लिङ्गविशिष्टग्रहण नेतीह न प्राप्नोति भो ब्राह्मणि।' या भाष्याचा भावार्थ असा आहे कीं, वरील वार्तिक 'मतुवसो रु' या सूत्रावरील वार्तिक असल्यामुळें, त्या वार्तिकात 'मतुवसो रु' या सूत्रातील 'सबुद्धौ' या पदाची अनुवृत्ति होते व त्यामुळें 'भो ब्राह्मणा.' इत्यादि प्रयोग सिद्ध होऊ शकत नाहीत, कारण संबोधनाचे 'औ, जस्' हे प्रत्यय सबुद्धीचे –एकवचनाचे–प्रत्यय नसून द्विवचनाचे व बहुवचनाचे प्रत्यय असल्यामुळें 'भवत्' शब्दापुढें ते प्रत्यय आल्यास वरील वार्तिकात सांगितलेली आदेशरूप कार्यें होऊ शकत नाहीत व त्यामुळें 'हे भवन्तौ, हे भवन्त:' याचे 'भो.' असे रूप सिद्ध होऊ शकत नाहीं आणि म्हणून 'भो हरिहरौ, भो ब्राह्मणा:' इत्यादि प्रयोग सिद्ध होऊ शकत नाहीत तसेच वरील वार्तिकात 'भवत्' या प्रातिपदिकाचे ग्रहण केले असून त्यापुढें 'सु' हा सबुद्धीचा प्रत्यय आला असता वार्तिकनिर्दिष्ट आदेशरूप कार्य होणे सांगितले असल्यामुळें व 'विभक्तौ लिङ्गविशिष्टाग्रहणम्'–परि. ७३–ही परिभाषा असल्यामुळें, वार्तिकनिर्दिष्ट 'भवत्' शब्दानें त्याच्या 'भवती' या स्त्रीलिङ्गाच्या रूपाचे ग्रहण करता येत नाही. त्यामुळें

'भवत् + ङीप् + सु' या स्थली 'भवत्' शब्दाच्या लगेच पुढें सबुद्धीचा 'सु' प्रत्यय नसून दोहोंमध्यें 'ङीप्चें' व्यवधान असल्यामुळें, भवती' या स्त्रीलिङ्गाच्या सबुद्धीचे 'भो' असे रूप सिद्ध होऊ शकत नाही व त्यामुळें 'भो ब्राह्मणि, भो गङ्गे' इत्यादि प्रयोग सिद्ध होऊ शकत नाहीत त्याचप्रमाणे 'भवत्' शब्दाच्या नपुंसकाच्या सबुद्धीचे देखील 'भो' असे रूप सिद्ध होऊ शकत नाही याचे कारण शब्दरत्नात सागण्यात येईल त्यामुळें 'भो विद्वद्वृन्द' हा नपुंसकाचा प्रयोग देखील सिद्ध होऊ शकत नाही साराश वरील वार्तिक मानल्यानें जरी पुल्लिङ्गाच्या सबुद्धीचा 'भो हरे' हा प्रयोग सिद्ध होऊ शकतो तरी स्त्रीलिङ्गाच्या व नपुंसकलिङ्गाच्या सबुद्धीचे व तसेच सबोधनाच्या द्विवचनाचे व बहुवचनाचे 'भो' असे रूप सिद्ध होऊ शकत नसल्यामुळें व 'भोस, भगोस् अघोस्' हे सबोधनार्थक निपात मानल्यानें भाष्यात व मनोरमेंत दिलेले सर्व प्रयोग सिद्ध होऊ शकत असल्यामुळें आणि अशा रीतीनें हे तीन शब्द निपात मानल्यानें सर्व काम भागत असल्यामुळें, वरील वार्तिक मानून फायदा काय व त्या वार्तिकाचे प्रत्याख्यान करणेच इष्ट आहे असा मनोरमेच्या प्रकृत पङ्क्तीचा भावार्थ आहे पण हें दीक्षिताचे स्वत चे मत नसून त्याचे भिन्न मत आहे हु ते पुढील पङ्क्तींत सागतात ) वर जें व्याख्यान केले आहे तें काशिकावृत्तीचा व हरदत्तादिकाच्या मताला अनुसरून केले आहे (काशिकाकारानें 'निपातविज्ञानाद्वा सिद्धम्' हे वचन पठित करून वरील वार्तिकाच प्रत्याख्यान केले आहे व 'मतुवसो रु' या सूत्रावरील पदमञ्जरींत हरदत्तानें स्पष्ट म्हटले आहे कीं, 'तस्मात्भोत्रा एते निपाता भोभगोअघोइत्यत्र सूत्रे निर्दिष्टा चादिषु वा पठितव्या, अतेव प्रत्याख्यातमुपसख्यानम्' साराश काशिकाकाराच्या व हरदत्ताच्या मताप्रमाणें 'भोस्, भगोस्, अघोस्' हे निपात मानल्यानें सर्व इष्ट प्रयोगाची सिद्धि होऊ शकत असल्यामुळें व वरील वार्तिक मानल्यानें सम होऊ शकत नसल्यामुळें, वार्तिकाचें प्रत्याख्यान

हेभो ' या अमरकोशातील श्लोकात निर्दिष्ट असलेल्या 'हे' व 'भोः' या दोन्ही संबोधनार्थक निपाताचा सहप्रयोग होणे अशक्य आहे ('हे' व 'भो ' हे जर दोन्ही एकाच अर्थाचे संबोधनार्थक निपातच मानले तर 'हेभोः' हा प्रयोग शुद्ध ठरू शकणार नाहीं. पण तसा प्रयोग होणे इष्ट असल्यामुळें, 'भो.' हा शब्द 'भवत्' शब्दाच्या 'भवन्' या संबुद्धीचे रूपान्तर असून निपात नाही असे मानणे देखील आवश्यक आहे व वरील वार्तिक स्वीकारल्याशिवाय तसे मानता येत नाही व 'हे भो ' हा प्रयोग शुद्ध ठरू शकत नाही. म्हणून तें वार्तिक देखील मानले पाहिजे असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे ) दुसरें असे की, ज्याप्रमाणे 'अत्र भवान् हरिः, तत्र भवान्' हे प्रयोग सिद्ध होतात त्याचप्रमाणे 'तत्र भोः' इत्यादि प्रयोग वरील वार्तिक मानल्यानेंच सिद्ध होऊ शकतात. 'इतराभ्योऽपि दृश्यन्ते' सू. १९६३ या सूत्रान्वयें ('किम्' इत्यादि सर्वनामाहून) सर्व विभक्तीच्या अर्थांमध्यें होणारे 'त्र' व 'तस्' प्रत्यय लागून बनलेल्या शब्दाचा 'भवत्' इत्यादि शब्दासहच प्रयोग होणे इष्ट आहे. ('इतराभ्योऽपि दृश्यन्ते' या सूत्रावरील कौमुदीत 'दृशिग्रहणाद्भवदादियोग एव' असे वचन पठित केले आहे व त्याचे कारण हें की, त्या सूत्रावरील भाष्यात ५–३–१४ 'इह कस्मान्न भवति–स'। तौ। ते ? । भवदादिभिर्योगे । भवदादिभिर्योगे इति वक्तव्यम् । के पुनर्भवदादयः ? । भवान्दीर्घायुर्देवानांप्रिय आयुष्मानिति । स भवान् । तत्र भवान् । ततो भवान् ....' असे भाष्यकारानी म्हटले आहे. या भाष्यावरून हें स्पष्ट होतें की, 'त्रल्' व 'तसिल्' प्रत्ययान्त 'किम्' इत्यादि सर्वनामाचा जो सर्व विभक्तीत प्रयोग होतो तो 'भवान्' इत्यादि चार शब्दासहच होतो. म्हणून 'स भवान्' या अर्थांमध्यें जसे 'तत्र भवान्, ततो भवान्' हे प्रयोग होतात त्याचप्रमाणे 'तत्र भो, ततो भोः' इत्यादि इष्ट प्रयोग सिद्ध होण्याकरिता देखील वार्तिक मानणे आवश्यक आहे; कारण 'भोः' हे 'भवन्' शब्दाचे रूपान्तर आहे असे मानले तरच तसे प्रयोग 'भवदादिभिर्योगे'

या वार्तिकान्वयें शुद्ध ठरू शकतात.) आणखी असे की, 'भोः' हा शब्द ('भवत्' शब्दाच्या सबुद्धीचे रूपान्तर आहे असे वरील वार्तिकान्वयें मानल्यासच, 'तिष्ठति भोः' इत्यादि वाक्यात 'भोः' हा शब्द 'तिष्ठति' या पदापुढें असल्यामुळें) आमन्त्रितसंज्ञक ठरून 'आमन्त्रितस्य च' सू. ३६५४ या अष्टमाध्यायातील सूत्रान्वयें तो सर्वानुदात्त ठरू शकतो (वार्तिक न मानता 'भो' हा शब्द केवळ निपात मानल्यास, तो अनुदात्त न होता 'निपाता आद्युदात्ताः' फिट् सू. ८० या सूत्रानें आद्युदात्त होईल.) तसेच 'भोः' हा शब्द आमन्त्रितसंज्ञक मानल्यासच, 'आमन्त्रित पूर्वमविद्यमानवत्' सू. ४१२ या सूत्रानें त्याचे ठिकाणी अविद्यमानवद्भाव मानता येतो. ('भोः' हा शब्द केवळ निपात नमून 'भवत्' शब्दाच्या सबुद्धीचे रूपातर देखील आहे असे वरील वार्तिक स्वीकारून मानले तरच, 'भो. तिष्ठति' इत्यादि वाक्यात 'सामन्त्रितम्' सू. ४११ या सूत्रानें 'भोः' हा शब्द आमन्त्रितसंज्ञक ठरतो, व 'आमन्त्रित पूर्वमविद्यमानवत्' या सूत्रानें तो वाक्याच्या आरंभी नाहीच असे मानता येतें व त्यामुळें 'तिङ्ङतिङः' सू. ३९३५ या सूत्राची प्रवृत्ति होत नाही व 'तिष्ठति' हे पद सर्वानुदात्त होत नाही. तसेच 'भो ब्राह्मण' या स्थळीं 'भो' हे आमन्त्रित पद अविद्यमान आहे असे मानल्यानें 'ब्राह्मण' या आमन्त्रित पदापूर्वी पद नाही असे मानता येते व त्यामुळें 'आमन्त्रितस्य च' सू. ३६५४ हे अष्टमाध्यायाचे सूत्र प्रवृत्त होत नाही व 'ब्राह्मण' हे पद सर्वानुदात्त न होता 'आमन्त्रितस्य च' सू. ३६५३ या षष्ठाध्यायातील सूत्रानें ते पद आद्युदात्त होते.) 'आम एकान्तरमामन्त्रितमनन्तिके' सू. ३९६२ या सूत्रानें होणारे अनुदात्तप्रतिषेधरूप कार्य, व तसेच 'वाक्यादेराम-न्त्रितस्य' सू. २१४३ या सूत्रानें होणारे आमन्त्रिताचे द्विर्वचनकार्य, आणि त्याचप्रमाणे 'सुबामन्त्रिते पराङ्गवत्स्वरे' सू. ३६५६ या सूत्रानें होणारा पराङ्गवद्भाव इत्यादि कार्ये, 'भोः' हा शब्द वरील

वार्तिकान्वयें 'भवत्' शब्दाच्या सबुद्धीचे रूपान्तर आहे व त्यामुळें तो आमन्त्रितसंज्ञक आहे असे मानल्यासच, सिद्ध होऊ शकतात, तें वार्तिक न मानल्यास, ती कार्यें सिद्ध होऊ शकत नाहीत. ('आम एकान्तरम्' या सूत्राचा 'आम परमेकपदान्तरितमामन्त्रितं नाऽनुदात्तम्' असा अर्थ आहे 'आम् पचसि भो.' या उदाहरणात 'आम्' व आमन्त्रितसंज्ञक 'भो' या दोन शब्दामध्यें 'पचसि' या एकाच पदाचे व्यवधान असल्यामुळें, 'आमन्त्रितस्य च' सू. ३६५४ या अष्टाध्यायातील सूत्रानें पावलेल्या अनुदात्त स्वराचा प्रतिषेध होतो व 'भो' हा शब्द अनुदात्त होत नाही. 'भो' हा शब्द केवळ निपात मानला तर त्याला वरील प्रतिषेध लागू पडणार नाही व त्याला 'आमन्त्रितस्य च' सू ३६५३ या पाणिनीय सूत्रानें उदात्त स्वर न होता 'निपाता आद्युदात्ता' फिट् सू ८० या फिट्सूत्रानें आद्युदात्त निपातस्वर होईल हे खरे की, दोन्ही पक्षात एकच प्रकारचा–म्हणजे आद्युदात्त–स्वर होईल, पण तो भिन्न सूत्रानें होईल एवढाच भाग तो या स्थली फरक होतो हे लक्षात ठेवावें. 'अनूमा, समति, कोप, कुत्सन, भर्त्सन' या अर्थामध्यें आमन्त्रिताचा वाक्याच्या आरंभी प्रयोग केला असल्यास, त्याचे 'वाक्यादेराम-न्त्रितस्य' सू. २१४३ या सूत्रानें द्विर्वचन होणे सांगितले आहे म्हणून 'भो वृथा ते वीर्यम्' या कुत्सनार्थक वाक्यातील 'भोः' या आद्य आमन्त्रित शब्दाचे द्विर्वचन होऊन 'भो भो वृथा ते वीर्यम्' असा प्रयोग सिद्ध होतो. 'भो' हा शब्द केवळ निपात मानल्यास तो आमन्त्रितसंज्ञक होत नसल्यामुळे त्याचे द्विर्वचन होऊ शकणार नाही व वरील प्रयोग सिद्ध होऊ शकणार नाही. 'सुबामन्त्रिते' सू. ३६५६ या सूत्राचा 'स्वरविधौ कर्तव्ये सुबन्तमामन्त्रिते परे सति, तस्य परस्य आमन्त्रितस्य एकदेशवद्भवति–आमन्त्रितशरीरानु-प्रविष्ट तत्सुबन्तमामन्त्रितस्यैव स्वरं लभते'–असा अर्थ आहे. त्यामुळें 'पूर्ण्यांसि विद्यया भो =विद्यावन् भवन् पूज्योऽसि' या वाक्यात 'विद्यया' या मत्वर्थीय करणाचा 'भो.' या आमन्त्रित

शब्दामध्यें कारकरूपानें अन्वय होत नसल्यामुळें पराङ्गवद्भाव होऊन 'त्रिचया' हे पद 'आमन्त्रितस्य च' सू. ३६५४ या आष्टमिक सूत्रानें सर्वानुदात्त होतें. 'भो' हा शब्द केवळ निपात मानल्यास, तो आमन्त्रितगत ठरत नसल्यामुळें पराङ्गवद्भाव होऊं शकणार नाही) 'भगो' व 'अघो' हे (आकारान्त) शब्द जर कोणत्याहि प्रमाणानें निपात ठरूं शकत असतील तर ते सुखानें निपात ठरोत पण आमन्त्रितगत शब्दाला होणारें कार्य 'भगो' व 'अघो' या शब्दांना होण्याकरिता वरील वार्तिक मानणें आवश्यक आहे हें विद्वान लोकांनी लक्षात आणावें. प्रकाशकाराचें असें म्हणणें आहे की, भाष्यकारांनी 'भोस्, भगोस्, अघोस्' असे सकारान्त निपात मानून रुत्व व ओत्व या कार्यांचें विधान करणाऱ्या वरील वार्तिकाचें प्रत्याख्यान केलें आहे पण त्यांनी योग्य विचार न करितां असें म्हटलें आहे. (भाष्यांत वरील वार्तिकाचें प्रत्याख्यान केलें नाहीं व भाष्यकारांनी वरील वार्तिक मानून त्याच्याबरोबर 'भो' हा निपात देखील मानला आहे हें पूर्वी सांगितलेंच आहे. म्हणून प्रकाशकाराचें म्हणणें बरोबर मानतां येत नाहीं.)

मनोरमा—स्यादेतत् । निपातानामभ्युपगमे यत्वविधौ [illegible] एव गृह्येरन् प्रतिपदोक्तत्वात् । न तु सम्बुद्ध्यन्ताः लाक्षणिकत्वात् इति चेन्मैवम् । "स्वरितेनाधिकारः" इत्यत्राधिकः कारोऽधिकार इति व्याख्यानमाश्रित्य लक्ष्यानुरोधेन स्वरितत्वमाश्रित्योभयग्रहणात् । "भुवश्च महाव्याहृतेः" इति सूत्रे महाव्याहृतिग्रहणं लक्षणप्रतिपदोक्तपरिभाषाया अनित्यत्वज्ञापनार्थमिति हरदत्ताद्युक्तेश्च । न चैवमपि प्रभोरित्यादावतिव्याप्तिः । परस्परसाहचर्येण निपातानां वार्तिकोक्तानां च ग्रहणेऽप्यन्येषामग्रहणात् ।

'भो, भगो, अघो' हे सान्त किंवा रान्त निपात आहेत असें मानल्यास, यत्वविधि करतेवेळीं, सूत्रनिर्दिष्ट 'भो, भगो, अघो' या शब्दांनी त्या निपातांचेंच ग्रहण होऊं शकेल, कारण ते प्रतिपदोक्त

आहेत आणि 'भवन, भगवन, अघवन्' या शब्दाहून वरील वार्तिकान्वयें सिद्ध झालेले 'भोर्, भगोर्, अघोर्' हे सबुद्धयन्त शब्द लाक्षणिक असल्यामुळें 'लक्षणप्रतिपदोक्तयो प्रतिपदोक्तस्यैव ग्रहणम्'–परि ११४–या परिभाषान्वयें तशा लाक्षणिक शब्दाचें ग्रहण होऊ शकणार नाही अशी कोणी शका केल्यास, ती शका बरोबर नाही, कारण 'स्वरितेनाधिकार' १ ३ ११ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी त्या सूत्रातील 'अधिकार' या पदाचें 'अधिक कार', म्हणजे 'स्वरितेन अधिक कार्यं भवति', असे जें व्याख्यान केलें आहे त्या व्याख्यानाचा आश्रय केल्यास व सर्व इष्ट रूपाची सिद्धि व्हावी याकरिता प्रकृत सूत्रातील 'भो, भगो, अघो' हे शब्द स्वरित आहेत असें मानल्यास, त्या स्वरितत्वप्रतिज्ञाबलानें 'भो, भगो, अघो' या निपाताचें व त्याचप्रमाणे वार्तिकसिद्ध शब्दाचेंहि ग्रहण करता येतें दुसरे असे की, 'भुवश्च महाव्याहृते' सु ३६०५ या सूत्रात 'महाव्याहृते' या शब्दाचे ग्रहण केले असल्यामुळें, लक्षणप्रतिपदोक्त परिभाषा–परि ११४–अनित्य आहे हे ज्ञापित होत असं हरदत्तादिकाचे म्हणणं आहे (पृथिवी, अन्तरिक्ष व स्वर्ग याच्या अनुक्रमें वाचक 'भू, भुव, स्व' या तीन प्रसिद्ध महाव्याहृति आहेत 'भुव' हा शब्द 'भुव' या अव्ययसज्ञक द्वितीय महाव्याहृतीच वाचक प्रतिपदोक्त रूप आहे व 'भू' धातूहून क्विप् प्रत्यय केला असता 'भू' असं जें प्रातिपदिक होतं व त्याचें 'भुव' असे जें षष्ठीच्या एकवचनाचें रूप होतें तें रूप, किंवा 'भुवो विश्वेषु सवनेषु' या श्रुतीतील छान्दस गुणाभावानें व 'बहुल छन्दस्यमाङ्योगेऽपि' सू ३५४६ या सूत्रान्वयें अडागम न होतां सिद्ध झालेलें 'भू' धातूच लङाच्या द्वितीयपुरुषैकवचनाच रूप, ही रूपें पाणिनीय सूत्रें प्रवृत्त केल्यानें बनलेली लाक्षणिक रूपें होत लक्षणप्रतिपदोक्त परिभाषा नित्य मानल्यास, 'भुव' या वरील सूत्रात निर्दिष्ट असलेल्या शब्दानें प्रसिद्ध प्रतिपदोक्त महाव्याहृतिवाचक 'भुव' या शब्दाचच ग्रहण होऊ शकतें व लाक्षणिक 'भुव' या

शब्दाचे ग्रहण होऊं शकत नाही असे असून देखील ज्या अर्थी 'भुवश्च महाव्याहृते' या सूत्रात 'महाव्याहृतेः' या पदाचे ग्रहण केले आहे त्या अर्थी हें ज्ञापित होते की, लक्षणप्रतिपदोक्त परिभाषा अनित्य आहे, म्हणजे कोठें कोठें प्रतिपदोक्त शब्दानें लाक्षणिक शब्दाचे देखील ग्रहण होते त्यामुळें 'भुव' या शब्दानें तशा लाक्षणिक शब्दाचे ग्रहण होण्याची जी आपत्ति येत होती ती टाळण्याकरिता वरील सूत्रात 'महाव्याहृते' या पदाचे मुद्दाम ग्रहण केले आहे व अशा रीतीनें तें ग्रहण लक्षणप्रतिपदोक्त परिभाषेच्या अनित्यत्वाचे ज्ञापक ठरतें. साराश ती परिभाषा अनित्य असल्यामुळें, 'भो, भगो, अघो' या प्रतिपदोक्त निपातानी वार्तिकसिद्ध तशा लाक्षणिक शब्दाचे देखील ग्रहण होऊ शकते ) जर वरील प्रतिपदोक्त निपातानी वार्तिकसिद्ध लाक्षणिक शब्दाचे देखील ग्रहण होत असे मानले तर, 'प्रभोरिदम्' इत्यादि मनोरमेंत दिलेल्या तीन उदाहरणातील 'भो, भगो, अघो' या एकदेशाचे देखील ग्रहण होण्याची आपत्ति येईल अशी कोणी शका केल्यास, ती शका बरोबर नाही, कारण प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेले व वार्तिकनिष्पन्न 'भो, भगो, अघो' या दोन्ही प्रकारच्या शब्दामध्यें परस्पर साहचर्य, म्हणजे स्वरूपत व अर्थत सादृश्य, असल्यामुळें, सूत्रनिर्दिष्ट त्या शब्दानी वार्तिकनिष्पन्न शब्दाचे ग्रहण करता येत, परतु ('विभोरिदम्' इत्यादि मनोरमेंतील तीन वाक्यातील 'भो, भगो, अघो' या) अनर्थक एकदेशाचे ग्रहण करता येत नाही (या पक्तीतील 'परस्परसाहचर्येण' या पदाचा 'प्रतिपदोक्ताना सूत्रनिर्दिष्टाना कृतरान्ताना शब्दाना वार्तिकनिष्पन्नाना लाक्षणिकाना रान्ताना शब्दाना च स्वरूपसादृश्येन अर्थवत्तारूपसादृश्येन च' असा अर्थ आहे सूत्रनिर्दिष्ट कृतरान्त 'भो, भगो, अघो' व वार्तिकनिष्पन्न 'भोर्, भगोर्, अघोर्' हे दोन्ही प्रकारचे शब्द अर्थवान् असून त्याचे वर्णानुपूर्वी सारखीच आहे व त्याचा अर्थ देखील सारखाच आहे व अशा रीतीनें दोहोमध्यें स्वरूपसादृश्य व अर्थसादृश्य आहे. म्हणून सूत्रनिर्दिष्ट शब्दानी

वार्तिकनिष्पन्न शब्दाचे, अशा परस्परसादृश्यामुळें, ग्रहण करता येते. परंतु 'विभोरिदम्, सुभगोरिदम्, रघोरिदम्' या वाक्यातील 'भो, भगो, अघो' या अनर्थक एकदेशाचे ग्रहण करता येत नाही; कारण दोहोमध्यें अर्थवत्तारूप सादृश्य नसल्यामुळें व 'सहचरितासहचरितयो सहचरितस्यैव ग्रहणम्'—परि ११७—हा न्याय असल्यामुळें, सूत्रनिर्दिष्ट अर्थवान् शब्दांनी तशा अनर्थक एकदेशाचे ग्रहण होऊ शकत नाही या पक्तीचे जास्त विवरण शब्दरत्नात केले जाईल.)

शब्दरत्न — ननु सान्तानुकरणे "विभाषा भवत्—" इति वार्तिकनिष्पन्नाना ग्रहण न स्यादत आह— रान्त वेति । कृतरुत्वानुकरणमित्यर्थ. । अस्लोऽन्त्यस्येति । न च भो राजसे इत्यादौ "रोरि" इति लोपे कृते एकदेशविकृतन्यायेन भोः शब्दत्वादनन्त्यस्यौकारस्य यत्वापत्तिरिति वाच्यम् । तेषामभिधाने एवा रोरपूर्वस्य च रोरिति व्याख्यानेनादोषो बोध्य । अत्र पक्षेऽघोशब्दशान्तद्वन्द्वे षष्ठ्याः सौत्रो लुक् बोध्यः । अवधेयमिति । यदि "ग्रहोऽलिटि' इति सूत्रे इटः स्थानित्वेन निर्देश इति तत्रानलाश्रयण, प्रकृते तु विसर्गे रेफस्यैव स्थानित्वाद्वैषम्य "अनल्विधौ" इत्यस्य स्थान्यल्वृत्तिधर्माश्रये स्थानिसम्बन्ध्यल्वृत्तिधर्माश्रये च नेत्यर्थस्तत्र स्थान्यल्रेफवृत्ति रत्व स्थानित्वेन दुलभमल्विधित्वात्स्पष्ट चेद प्रकृतसूत्रे भाष्ये इत्युच्यते तदा पद.न्तस्यत्र यत्ववारणायाशीति । तत्र हि "रोः सुपि" इति विसर्गः । नियमशास्त्राणा च विधिमुखेनैव प्रवृत्तिरिति तत्र रविशिष्टः स्थानीति तद्वृत्तिरुत्वस्य स्थानित्वेन लाभः सुकरः । यदि तु "रो· सुपि" इत्यत्रापि "रः" इत्यनुवर्त्य रोः रेफस्यैव तेन विसर्गस्तदा ऽप्यग्रहणमुत्तरार्थं सत्स्पष्टार्थमिहैव कृतमित्यवधेयम् ।

सूत्रनिर्दिष्ट 'भो, भगो, अघो' हे शब्द 'भोस्, भगोस्, अघोस्' या सान्त निपाताचे अनुकरण आहेत असें मानल्यास, 'विभाषा भवत्' या वार्तिकानें सिद्ध होणाऱ्या 'भोर्, भगोर्, अघोर्' या रान्त शब्दाचे ग्रहण होऊ शकणार नाही. म्हणून

मनोरमेंत 'रान्त वा अनुकृत्य' असे म्हटले आहे, व त्याचा अर्थ असा आहे की, 'भोस् भगोस, अघोस्' यातील अन्त्य सकाराचे ('ससजुषो रु' सू. १६० या सूत्रान्वयें) रुत्व केलें असता जी रकारान्त रूपें होतात त्याचे व तसच वार्तिकनिष्पन्न रकारान्त रूपाच प्रकृत सूत्रात अनुकरण केलें आहे हा रान्तानुकरण पक्ष मानल्यास, 'भो राजसे' इत्यादि स्थली 'रो रि' सू. १७३ या सूत्रानें ('भोर्' यातील अन्त्य रकाराचा) लोप केल्यावर 'एकदेश-विकृतमनन्यवत्'–परि ३७–या न्यायान्वयें अवशिष्ट एकदेश-विकृत 'भो' हा शब्द 'भोर्' च आहे अशी बुद्धि केल्यास, 'भो' यातील अन्त्य ओकाराचे जागीं प्रकृत सूत्रानें (अलोऽन्त्यपरिभाषान्वयें सू ४२) यकारादेश होण्याची आपत्ति येईल अशी कोणी शंका केल्यास, ती शंका बरोबर नाही, कारण 'भो राजसे' इत्यादि प्रयोग भाषेंत होतात असे स्वीकारले तरी, 'भोस्, भगोस, अघोस्' याच्या अन्त्य सकाराचे रुत्व केल्यावर त्या 'रु' चे जागी आणि तसच 'अ' वर्णापुढें असलेल्या 'रु' चे जागी यकारादेश होतो असें प्रकृत सूत्राचे व्याख्यान केल्यानें, 'भो राजसे' या स्थली 'भो' यातील ओकाराचे जागीं यकारादेश होण्याची आपत्ति मुळींच येत नाही या रान्तानुकरणपक्षात–कृतरुत्वानुकरणपक्षात–'भोभगोअघो' हा शब्द द्वन्द्वसमास असून षष्ठ्यन्त आहे व षष्ठीच्या प्रत्ययाचा सौत्र लुक् झाला आहे असे मानावे (शब्दरत्नकारानी 'भो राजसे' इत्यादि प्रयोग भाषेंत आढळत नाहींत व त्यामुळें शंकाकाराची शंका अनुपपन्न ठरते अशा रीतीनें त्या शंकेचे निरसन केलें नाही, कारण 'भो राजसे' हा प्रयोग भाषेंत आढळत नाहीं असे मानले तरी, 'भो राजन्' इत्यादि प्रयोग भाषेंत आढळतात व तशा प्रयोगात देखील शंकाकारानें केलेली शंका लागू पडते म्हणून त्यानी 'भो राजसे' इत्यादि प्रयोग 'भो राजन्' इत्यादि प्रयोगा-प्रमाणें भाषेंत होतात असे स्वीकारून शंकाकाराच्या शंकेचे अशा रीतीनें समाधान केलें आहे कीं, 'रो सुपि' या पूर्व सूत्रातून 'रो '

या पदाची प्रकृत सूत्रात अनुवृत्ति असून व 'भोभगोअघोअपूर्वस्य' एवढा एक सामासिक शब्द नसून 'भोभगोअघो' व 'अपूर्वस्य' हे दोन पृथक् सामासिक शब्द आहेत आणि 'भोभगोअघो' हा षष्ठयन्त द्वन्द्वसमास आहे असे मानल्याने व प्रकृत सूत्राचा 'कृत-रुत्वकार्याणां भोभगोअघो इति शब्दानामन्त्यस्य रो य स्यात्, अपूर्वस्य रोश्च य स्यात्' असा अर्थ केल्याने या अर्थानुसार यकारादेशाचा स्थानी 'रु' ठरत असल्यामुळे व 'निर्दिश्यमानस्यादेशा भवन्ति' – परि १२–ही परिभाषा असल्यामुळे, जरी 'भोर् राजसे' या स्थली 'भोर्' यातील अन्त्य रकाराचा 'रो रि' सू १७३ या सूत्राने लोप केल्यावर अवशिष्ट 'भो' हा शब्द एकदेशविकृतन्यायाने 'भोर्' आहे असे मानले तरी, त्या एकदेश-विकृत 'भो' शब्दाच्या अन्ती 'रु' नसून 'ओ' असल्यामुळे व 'ओ' चे जागी यकारादेश होणे सांगितले नसून 'रु' चे जागीच तो आदेश होणे सांगितले असल्यामुळे, 'भो' यातील अन्त्य 'ओ' चे यत्व होण्याची आपत्तीच येत नाही आता दीक्षितांनी मनोरमेंत 'ननु रोरुकारस्यानुबन्ध-त्वात् परिगणनमशुद्धमित्यवधेयम्' असे जें म्हटले आहे त्या संबधाने शब्दरत्नकार असें म्हणतात की,) 'ग्रहोऽलिटि दीर्घ' सू २५६२ या सूत्रात 'इट्' या समुदायाचा स्थानी या रूपाने निर्देश केला असल्यामुळें, तेथ अनल् स्थानीचे ग्रहण केले आहे असे मानता येतें, पण प्रकृत स्थली अल्रूप रेफ हाच विसर्गाचा स्थानी निर्दिष्ट असल्या-मुळें, या दोन स्थली वैषम्य आहे, म्हणजे द्वितीय स्थली स्थानीचे अल्रूपाने ग्रहण केले आहे हें स्पष्ट होतं दुसरे असे की, 'अनल्विधौ' या प्रतिषेधाचा असा अर्थ आहे की, जर स्थानी अल् असला तर त्या अल्रूप स्थानीचे ठिकाणी असलेला धर्म व तसेच (स्थानी जरी अनेकाल् असला तरी त्या) स्थानीच्या अवयवभूत अल्चे ठिकाणी असणारा धर्म आदेशाचे ठिकाणी ('स्थानिवदादेश' या) अतिदेशशास्त्राने आणता येत नाही, व म्हणून 'देवा सन्ति' या प्रकृत उदाहरणात अल्रूप रेफ हा जो

विसर्गाचा स्थानी आहे त्याचे ठिकाणी असणारा रुत्व धर्म विसर्गरूप आदेशाचे ठिकाणी आणणे हा अल्विधि ठरत असल्यामुळें, तो धर्म आदेशाचे ठिकाणी स्थानिवद्भावानें आणता येणे अशक्य आहे व हें सर्व प्रश्न सूत्रावरील भाष्यात स्पष्ट केले आहे असे जर म्हणणे असेल तर मग, 'पय सु' या स्थली विसर्गाचे यत्व न व्हावे याकरिता प्रकृत सूत्रात 'अशि' या पदाचे ग्रहण केले आहे असच मानले पाहिजे, कारण 'पयःसु' या उदाहरणात 'रो सुपि' सू ३३९ या सूत्रानें ('रु' या अनल्रूप समुदायाचे जागी) विसर्ग झाला आहे नियामक शास्त्राची (निषेधरूपानें प्रवृत्ति होत नसून) विधिरूपानेंच प्रवृत्ति होत असल्यामुळें व 'रो सुपि' या नियामक सूत्रात उकारानुबन्धविशिष्ट 'रु' या समुदायाचा स्थानी या रुपानें निर्देश केला असल्यामुळें त्या स्थानीचे ठिकाणी असणारा रुत्वधर्म विसर्गरुप आदेशाचे ठिकाणी स्थानिवद्भावानें सहज आणता येता (व तसे करिताना 'अनल्विधौ' हा प्रतिषेध लागू पडत नाहीं )पण जर 'रो सुपि' या सूत्रात देखील ('रो रि' या पूर्वसूत्रातून) 'र' या पदाची अनुवृत्ति करून व त्या सूत्रान्वयें देखील 'रु'च्या रेफाचाच विसर्ग होतो, म्हणजे त्या सूत्रानें होणाऱ्या विसर्गाचा देखील 'रु' हा अनल्रूप समुदाय स्थानी नसून अल्रूप रेफ हाच स्थानी आहे, असे म्हणणे असेल, तर मग असेच मानले पाहिजे की, उत्तर सूत्रात-'हशि सर्वेषाम्' या उत्तर सूत्रात-'अशि' या पदाची अनुवृत्ति व्हावी व प्रकृत सूत्राचा अर्थ स्पष्ट व्हावा याकरिता प्रकृत सूत्रात त्या पदाचे ग्रहण केलें आहे हें लक्षात ठेवावें ('देवा सन्ति' या उदाहरणामध्यानें दीक्षितांच

होणा-या विसर्गाचा स्थानी असल्यामुळें, त्या अनल्रुप स्थानीत असणारा रुत्व धर्म विसर्गरूप आदेशाचे ठिकाणी स्थानिवद्भावाने आणता येतो व असे करणे हा अल्विधि ठरत नसल्यामुळें या ठिकाणी 'अनल्विधौ' हा प्रतिषेध लागू पडत नाही त्यानी आपल्या या वरील म्हणण्याचे समर्थन करण्याकरिता 'स्थानिवदादेश' या सूत्रावरील भाष्यात 'ग्रहोऽलिटि दीर्घ' या सूत्रासबधानें 'विशिष्ट ह्येषोऽनलमाश्रयते इट नाम' असे जें भाष्यकारानी म्हटले आहे त्याचा आधार दिला आहे यावर शकाकार असे म्हणतो की, 'ग्रहोऽलिटि दीर्घ' या सूत्रात 'आर्धधातुकस्येट्' या पूर्व सूत्रातून 'इट' या पदाची अनुवृत्ति होत असून ते पद 'इट' असे विभक्ति-विपरिणामानें स्थानपष्ठयन्त होत असल्यामुळें, त्या सूत्रात टकारानुबन्धविशिष्ट 'इट्' या अनल्रुप समुदायाचा स्थानी या रुपाने निर्देश केला आहे हे स्पष्ट होते पण 'खरवसानयो' या विसर्गविधायक सूत्रात रु' हा अनल्रुप समुदाय विसर्गाचा स्थानी निर्दिष्ट नसून, अल्रुप रेफ हाच विसर्गाचा स्थानी निर्दिष्ट आहे. कारण त्या सूत्रात 'रो' या पष्ठयन्त पदाची कोणत्याहि पूर्व सूत्रातून अनुवृत्ति होत नसून 'रो रि' या पूर्व सूत्रातून 'र' या पष्ठयन्त पदाचीच अनुवृत्ति होते म्हणून 'ग्रहोऽलिटि दीर्घ.' या सूत्रात दीर्घ ईकारादेशाचा स्थानी 'इट्' हा अनल्रुप समुदाय निर्दिष्ट असून 'खरवसानयो' या सूत्रात अल्रुप रेफ हाच विसर्गाचा स्थानी निर्दिष्ट असल्यामुळें, या दोन सूत्रात वैषम्य–फरक–आहे हे स्पष्ट होते आणि म्हणून ज्या भाष्यवचनाचा दीक्षितानी आधार दिला आहे तें भाष्यवचन वर दर्शविलेल्या वैषम्यामुळें प्रकृत स्थली लागू पडत नाही म्हणून 'इट्' चे जागी होणारा दीर्घ ईकार 'इट्'च आहे असे जरी, तो अल्विधि नसल्यामुळें, स्थानिवद्भावाने मानता येत तरी, 'देवा सन्ति' या उदाहरणात होणाऱ्या विसर्गाचा 'रु' हा समुदाय स्थानी नसून अल्रुप रेफ स्थानी असल्यामुळें, त्या अल्रुप स्थानीचे जागी होणाऱ्या विसर्गाचे ठिकाणी, 'अनल्विधौ'

हा प्रतिषेध असल्यामुळें, स्थानिवद्भावानें ह्रस्वबुद्धि करतां येत नाहीं; कारण 'अनल्विधौ' या प्रतिषेधाचा असा अर्थ आहे की, जर अल्रूप स्थानी असला तर त्याचे ठिकाणी असणारा धर्म आदेशाचे ठिकाणीं अतिदेशानें आणता येत नाहीं. म्हणून प्रकृत स्थलीं रेफ हा अल् जरी 'रु' या उकारानुबन्धविशिष्ट समुदायाचा अवयव आहे तरी, समुदायाचे ठिकाणी जो ह्रस्व धर्म आहे त्याचा अल्रूप स्थानीचे जागीं होणाऱ्या विसर्गरूप आदेशाचे ठिकाणी वरील अर्थान्वयें अतिदेश करता येत नाहीं. जर 'रु' हा समुदाय विसर्गाचा स्थानी निर्दिष्ट असता तरच विसर्गाचे ठिकाणी ह्रस्वबुद्धि करता आली असती. प्रकृत सूत्रावरील भाष्यात 'वृक्षस्तत्र, प्लक्षस्तत्र' या उदाहरणात होणाऱ्या विसर्गाचा स्थानी भाष्यकारानीं 'रु' हा समुदाय मानला नसून रेफ हा अल्च त्या विसर्गाचा स्थानी मानला आहे व त्यानीं असे म्हटले आहे कीं, हा अल्विधि असल्यामुळें विसर्गाचे ठिकाणीं ह्रस्वबुद्धि करता येत नाहीं आणि त्यामुळें त्या विसर्गाचे प्रकृत सूत्रानें यत्व होण्याची आपत्ति टळते प्रकृत सूत्रावरील भाष्यात दिलेल्या वरील दोन उदाहरणात व 'देवाः सन्ति' या प्रकृत उदाहरणात काहींच फरक नाहीं; कारण दोन्ही स्थलीं 'खरवसानयोः' या सूत्रानें अल्रूप रेफाचेच जागीं विसर्ग झाला आहे आणि म्हणून प्रकृत सूत्रावरील भाष्यान्वयें 'देवाः सन्ति' या उदाहरणात रेफाचे जागीं झालेल्या विसर्गाचे ठिकाणीं ह्रस्वबुद्धि करता येत नसल्यामुळें यत्वाची मुळींच प्राप्ति होत नाही त्यामुळें प्रकृत उदाहरणात यत्वाची आपत्ति टाळण्याकरिता प्रकृत सूत्रात 'अपि' या पदाचे ग्रहण आवश्यक आहे असे जें दीक्षितानीं म्हटले आहे तें भाष्यविरुद्ध ठरते हें उघड आहे. हा विषय पदमञ्जरींत हरदत्तानें स्पष्ट केला आहे व असे म्हटले आहे कीं, 'अपग्रहणमनर्थकमन्यत्राभावात्, अन्योन्य. सर्मवन्ति, तत्र च पूर्वत्रासिद्धमिति यत्वस्यासिद्धत्वाद्वि-सर्जनीयेन भाव्य, कृते विसर्जनीये स्थानिवद्भावाद्रुग्रहणेन ग्रहणात्स्या-त्प्रसङ्ग इति चेन्न, अल्स्थानिकत्वात् । अत्र हि रोर्यो रेफस्स विसर्ज-

नीयस्य स्थानी न पुना रुरेव, किं च यत्वस्याप्यस्य रोर्यो रेफ स एव, स्थानी न पुनारुरेव, तस्मादल्विधित्वादपि नास्ति स्थानिवद्भावः।' हरदत्ताचे हे व्याख्यान भाष्यानुसार असून दीक्षितांनी केलेले व्याख्यान भाष्यविरुद्ध असल्यामुळें, 'देवा सन्ति' या उदाहरणात विसर्गाचे यत्व होण्याची आपत्ति टाळण्याकरिता प्रकृत सूत्रात 'अश्' ग्रहण केले आहे हे त्याचे म्हणणे स्वीकारता येत नाहीं. मग प्रकृत सूत्रात 'अश्' ग्रहण का केले आहे ? या प्रश्नावें शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, 'पय सु, छन्द सु' या उदाहरणात जो विसर्ग झाला आहे तो 'खरवसानयो' या सूत्राने अल्रूप रेफाचे जागी झाला नसून 'रो सुपि' सू ३३९ या सूत्रानें 'रु' या अनल्रूप समुदायाचे जागी झाला असल्यामुळे, त्या विसर्गाचे ठिकाणी स्थानिवद्भावानें रुत्वबुद्धि करता येते व त्या विसर्गाचे यत्व न व्हावे याकरिता प्रकृत सूत्रात अश्ग्रहण केले आहे व त्यामुळे वरील दोन्ही उदाहरणात विसर्गापुढें 'अश्' नसून 'सु' प्रत्ययातील सकार हा 'खर्' असल्यामुळें, विसर्गाचे यत्व होण्याची आपत्ति टळते आणि अशा रीतीनें प्रकृत सूत्रात केलेले अश्ग्रहण चरितार्थ ठरते आता कोणी असे म्हणेल की, 'रु' यातील उकार हा अनुबन्ध असून इत्संज्ञक असल्यामुळे, 'रो सुपि' या सूत्रानें होणाऱ्या विसर्गाचा देखील अल्रूप रेफ हाच वास्तविक स्थानी ठरतो व तो स्थानी अल् असल्यामुळे त्याचे जागी होणाऱ्या विसर्गाचे ठिकाणी रुत्वबुद्धि करणे हा अल्विधि ठरत असल्यामुळे व 'अनल्विधौ' हा प्रतिषेध असल्यामळें, त्या विसर्गाचे ठिकाणी देखील रुत्वबुद्धि करता येत नाही, म्हणून जशी 'वृक्षस्तव, प्लक्षस्तत्र' किंवा 'देवा सन्ति' या उदाहरणात यत्वाची प्राप्ति होत नाही तशीच 'पय सु, छन्द सु' या उदाहरणात देखील यत्वाची प्राप्ति होत नाही व त्यामुळें प्रकृत सूत्रातील 'अश्' ग्रहण व्यर्थ ठरते. पण हे म्हणणे बरोबर नाही, कारण 'उच्चारणकाले य. श्रुत स स्थानित्वेनाश्रीयते, न तु प्रतिपत्तिकाले' असा भाष्यसिद्धान्त आहे. म्हणून 'रो सुपि'

या सूत्रात 'रु' हा अनल्प समुदाय विसर्गाचा स्थानी निर्दिष्ट असल्यामुळें व 'निर्दिश्यमानस्यादेशा भवन्ति' हा न्याय असल्यामुळें, त्या सूत्रात अल्प रेफ हा विसर्गाचा स्थानी आहे असें मानता येत नाहीं. आता 'रो सुपि' हें नियामक सूत्र असल्यामुळें या सूत्राचा 'बहुवचने सुपि परे रुभिन्नस्य विसर्गो न भवति' असा निषेधरूप अर्थ केल्यानें हें सूत्र विसर्गविधायक सूत्र ठरत नाही व त्यामुळें 'छन्दःसु, पयःसु' या स्थलीं त्या सूत्रानें विसर्ग झाला आहे असें मानता येत नाहीं अशी कोणी शंका केल्यास, त्या शंकेवर 'नियमशास्त्राणा विधिमुखेनैव प्रवृत्तिः' असें शब्दरत्नकारानी उत्तर दिलें आहे. व भाष्यकारानी पस्पशाह्निकात 'यथा लौकिकवैदिकेषु' या वचनाच व्याख्यान करिताना 'सति सम्भवे नियमशास्त्राणां विधिमुखेनैव प्रवृत्तिः' हा न्याय ध्वनित केला आहे. नियमशास्त्र निषेधमुखानें प्रवृत्त केल्यास स्वार्थहानि, परार्थकल्पना व शास्त्रबाध हे तीन दोष येत असल्यामुळें, नियमशास्त्राचा विधिरूपानेंच अर्थ करणें उचित आहे असा त्या न्यायाचा आशय आहे. म्हणून 'रो सुपि' या नियामक सूत्राचा कौमुदींत दिल्याप्रमाणे 'सप्तमी बहुवचने रोरेव विसर्जनीयो नान्यस्य रेफस्य' असा विधिरूप अर्थ केल्यानें, तें सूत्र देखील विसर्गविधायक सूत्र ठरतें व त्या सूत्रानें 'पयःसु, छन्दःसु' या उदाहरणात विसर्ग झाला आहे असें म्हणता येतें आणि तो विसर्ग त्या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या अनल्प 'रु' या स्थानीचे जागीं झाला असल्यामुळें व त्या अनल्स्थानिक विसर्गाचे ठिकाणीं स्थानिवद्भावानें रुत्वबुद्धि करता येत असल्यामुळें, त्या विसर्गाचे यत्व होण्याची जी आपत्ति येते तिचें निवारण करण्याकरिता प्रकृत सूत्रात 'अल्'ग्रहण केलें आहे असें म्हणता येत असें शब्दरत्नकार सुचवितात परंतु भाष्यकारानी 'रो सुपि' या सूत्रात देखील 'रो रि' या पूर्व सूत्रातून 'र' या षष्ठ्यन्त पदाची अनुवृत्ति करून 'रो र विसर्जनीय स्यात् सुपि परे सति' असा त्या सूत्राचा अर्थ केला आहे. त्या अर्थान्वयें त्या सूत्रानें होणाऱ्या

विसर्गाचा देखील अल्‌रूप रेफ हाच स्थानी ठरत असल्यामुळें, 'पय सु, छन्द सु' या उदाहरणात देखील अल्‌रूप रेफाचे जागी होणाऱ्या विसर्गाचे ठिकाणी रुत्वबुद्धि करता येत नाही व त्यामुळें त्या दोन स्थली देखील विसर्गाचे यत्व होण्याची आपत्ति येत नसल्यामुळें, प्रकृत सूत्रातील 'अश्'ग्रहण व्यर्थ ठरते. मग जर विसर्ग सर्वत्र अल्‌रूप रेफाचेच जागी होतो व त्यामुळें त्या विसर्गाचे ठिकाणी रुत्वबुद्धि करता येत नाही आणि अशा रीतीनें त्या विसर्गाचे यत्व होण्याची केव्हाहि आपत्ति येत नाही तर, पाणिनीनें प्रकृत सूत्रात 'अश्'ग्रहण का केले आहे? या प्रश्नाचे शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, 'हलि सर्वेषाम्' या उत्तर सूत्रात 'अशि' या पदाची अनुवृत्ति व्हावी याकरिता पाणिनीनें प्रकृत सूत्रात 'अश्'ग्रहण केले आहे. त्या सूत्रात 'अशि' या पदाची अनुवृत्ति केल्यानें व 'अशि' हे 'हलि' या पदाचे विशेषण मानल्यानें 'अश्रूपे हलि' असा 'अशि हलि' या पदाचा अर्थ होऊन, 'यकारवकारयो लोप. स्यादशि हलि सर्वेषा मतेन' असा 'हलि सर्वेषाम्' सू. १७१ या सूत्राचा अर्थ होतो व त्या अर्थान्वयें 'वृक्षव् करोति' या उदाहरणात, 'वृक्ष भातीति वृक्षवा', तमाचष्टे = वृक्षवा+णिच्+क्विप्+सु' या स्थली 'वृक्षवा' या प्रातिपदिकाहून 'प्रातिपदिकाद्धात्वर्थे बहुलमिष्ठवच्च' या गणसूत्रानें 'तत्करोति तदाचष्टे' या अर्थामध्यें 'णिच्' प्रत्यय करून त्या णिजन्ताहून 'क्विप् = व्' प्रत्यय केला असता, 'णेरनिटि' सू. २३१३ या सूत्रानें 'णि'लोप होऊन व इष्ठवद्भावानें 'टे:' सू. १७८६ या सूत्रानें 'वृक्षवा' यातील 'आ' या 'टि'चा लोप होऊन व 'वेरपृक्तस्य' सू. ३७५ या सूत्रानें 'क्विप् = व्' हा अपृक्त प्रत्यय नाहीसा होऊन आणि 'हल्ङ्याब्भ्य:' सू. २५२ या सूत्रानें 'सु' प्रत्ययाचा लोप होऊन 'वृक्षव्' असे जें प्रथमेच्या एकवचनाचे रूप होते त्यापुढें 'अश्'रूप हल् नसून 'करोति' यातील ककार हा 'खर्'रूप हल् असल्यामुळें, 'वृक्षव्' यातील अन्त्य वकाराचा लोप होत नाही व 'वृक्षव् करोति' असा इष्ट प्रयोग सिद्ध होतो.

मग जर पाणिनीचा 'उत्तरार्थमशूग्रहणमिह कृतम्' असा हेतु होता तर त्यानें 'हलि सर्वेषाम्' या सूत्रातच 'अशि' या पदाचे ग्रहण का केले नाहीं व प्रकृत सूत्रात त्या पदाचे ग्रहण का केले? या प्रश्नाचे शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, प्रकृत सूत्राचा अर्थ स्पष्ट व्हावा, म्हणजे 'अश्' पुढें असतानाच 'रु' चे यत्व होणे शक्य आहे व 'खर्' पुढें असताना त्या 'रु' तील रेफाचा 'खरवसानयो.' या त्रैपादिक पूर्वसूत्रानें अवश्य विसर्ग होणार असल्यामुळें त्याचे यत्व होणे शक्य नाही हें एकदम लक्षात यावे, म्हणूनच प्रकृत सूत्रातच 'अश्' ग्रहण केले आहे व अशा रीतीनें प्रकृत सूत्राचा अर्थ स्पष्ट होणे व 'हलि सर्वेषाम्' या उत्तरसूत्रात 'अशि' या पदाची अनुवृत्ति होणे ही दोन्ही कार्यें पाणिनीनें साधली आहेत. प्रकृत सूत्रावरील भाष्यात ८–३–१७ भाष्यकारानीं 'अशूग्रहणमनर्थकमन्यत्राभावात्' हें वार्तिक पठित करून असे म्हटलें आहे की, जर 'वृक्षस्तत्र, प्लक्षस्तत्र' आणि 'छन्द सु, पय सु' या दोन्ही प्रकारच्या उदाहरणात होणारा विधि अल्विधि मानता येणे शक्य असेल तरच ते वार्तिक स्वीकारता येतें व प्रकृत सूत्रातील 'अश्' ग्रहण व्यर्थ मानता येते. वरील चार उदाहरणात होणारा विधि अल्विधि आहे असे मानता येणे शक्य आहे काय असा प्रश्न करून भाष्यकार त्या प्रश्नाचे पुढें लिहिल्याप्रमाणें उत्तर देतात –'बाढ शक्यम्। अल्विधिस्तर्हि भविष्यति। कथम्? । इदमस्ति रो रीति। ततो वक्ष्यामि–खरवसानयोर्विसर्जनीय.–र.। ततो रो सुपि। विसर्जनीयो र इत्येव। उत्तरार्थं तर्हि अशूग्रहण कर्तव्य,–हलि सर्वेषा,–हल्यशीति यथा स्यादिह मा भूत–वृक्षवयतेरप्रत्ययो–वृक्षव् करोति।' या भाष्याच्या आधारावरच शब्दरत्नातील वरील ग्रन्थ लिहिला आहे व प्रकृत सूत्रावरील शब्देन्दुशेखरात देखील असेच विवरण केले आहे हें लक्षात ठेवावे)

शब्दरत्न–तत्रेति चादिष्वित्यर्थः। वार्तिकं नाप्यपणोयमिति। भो इत्यादिप्रयोगाणां निपातैरेव सिद्धेः। निपातानामपि सम्बोध-

नान्तभवदादिसमानार्थकत्वात्सम्बोधनं विभक्त्यन्तत्वेनामन्त्रितत्वमस्ति। "भवदादि" इत्यत्र भोः शब्दस्याप्यादिना ग्रहणात्तत्रभोः इत्यादिसिद्धिरिति भावः। अन्यथा = साधारणानामभावे। भो विद्वद्वृन्देति। नपुंसके सोर्लुका लुप्तत्वेन वार्तिकाप्रवृत्तेरिति भावः। भो गङ्गे इति। विभक्तौ लिङ्गविशिष्टाग्रहणान्ङीपा व्यवधानाद्भवतः सम्बुद्धिपरत्वाभावेनेति भावः। "स्वः स्याद्-" इत्यस्य 'निपातमाश्राङ्गीकारे' इत्यादिः। ननु निपातोऽव्ययं भवच्छब्दसमानार्थं एवेति हे भो इत्यस्य नासङ्गतिः। अत एव भाष्यकैयटयोर्वार्तिकसिद्धविभक्त्यन्तप्रतिरूपकमव्ययमित्युक्तं, विभक्त्यन्तप्रतिरूपकत्वं च शब्दसोऽर्थतश्च इत्यन्यत्र स्पष्टम्। किं च व्यतिलुनीत इत्यादिवदेतयोरपि सहप्रयोग सम्भव इत्यश्चेराह-किं चेति। पदात्परस्येति। इदं च न भोः शब्दे फलमुभयोरपि भोः शब्दयोः सम्बोधनप्रथमान्तत्वेनामन्त्रितत्वात्। किं तु तिष्ठसि भगो, तिष्ठसि अघो इत्यादौ भगवन्, अघवन् तिष्ठसीत्यर्थे के "आमन्त्रितस्य-" इति निघातसिद्धिः। निपातयोस्तु तयोः सम्बोधने शक्तौ मानाभावेन सम्बोधनप्रथमान्तत्वाभावेनामन्त्रितत्वाभावात्। भगो तिष्ठसीत्यादौ अविद्यमानत्वम्। आम् देवदत्तभगो इत्यादौ, एकान्तरता। भगोभगो आगच्छेत्यादौ द्विर्भावः। अनेन भगो इत्यादौ पराङ्गत्वमिति भावः। यदि प्रामाणिकाविति। यदीत्यनेनेदं सूचितं तौ न प्रामाणिकौ। अत एव भाष्ये "विभाषा भवन्---" इति व्याख्याय भो ब्राह्मणा भो ब्राह्मणोऽत्यस्यैवासिद्धिमाशङ्क्याव्ययमेव भोः शब्दो विभक्तिप्रतिरूपकश्चादावित्येयोजनम्। एवं च भगो हरिहरावित्याद्यसाध्वेव।

'तत्र चोध्या' या मनोरमेच्या पक्तीतील 'तत्र' या पदाचा 'चादिषु'-म्हणजे 'चादि' या आकृतिगणात-असा अर्थ आहे. 'तथा च विभाषा भवद्भगवदिति वार्तिकं नाश्रयणीयम्' असे जें हरदत्तादिकांचे म्हणणं मनोरमेंत सांगितलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, 'भोम्, भगोम्, अघोम्' हे सान्त किंवा इतरान्त निपात मानल्यानें भाष्यांतील 'भोः' इत्यादि प्रयोग सिद्ध होतात

(आणि म्हणून ते वार्तिक मानण्याची काही गरज नाही) 'विभाषा भवद्भगवत्' या वार्तिकात निर्दिष्ट असलेल्या 'भवत्' इत्यादि शब्दाच्या संबोधनाच्या रूपाचा जो अर्थ होतो तोच 'भो' इत्यादि निपाताचा देखील होत असल्यामुळें व अशा रीतीनें वार्तिकनिष्पन्न शब्द आणि हे निपात समानार्थक असल्यामुळें, 'भो' इत्यादि निपात संबोधनविभक्त्यन्त मानता येतात आणि त्यामुळें ('सामन्त्रितम्' सू ४११ या सूत्रानें होणारी) आमन्त्रितसंज्ञा 'भो' इत्यादि निपातांना होऊं शकतेच, (आणि 'इतराभ्योऽपि दृश्यन्ते' या सूत्रावरील भाष्यात 'भवदादिभिर्योगे' असे जें वार्तिक पठित केलें आहे त्या वार्तिकातील) 'भवदादि' शब्दामध्यें जो 'आदि' शब्द आहे त्यानें 'भो' या शब्दाचें देखील ग्रहण होत असल्यामुळें (ज्याप्रमाणें 'तत्र भवान्, ततो भवान्' इत्यादि प्रयोग सिद्ध होतात त्याचप्रमाणें) 'तत्रभो' इत्यादि प्रयोग देखील सिद्ध होऊं शकतात. (सारांश आमन्त्रिताला जी कार्यें होणें सांगितली आहेत ती कार्यें 'भो' इत्यादि संबोधनार्थक निपातांना होऊं शकत असल्यामुळें व तसेंच 'भवदादिभिर्योगे' या वार्तिकातील 'आदि' शब्दानें 'भो' या संबोधनात्मक निपाताचें ग्रहण होत असल्यामुळें आणि अशा रीतीनें 'तत्र भो.' इत्यादि प्रयोग सिद्ध होऊं शकत असल्यामुळें, 'विभाषा भवत्' हें वार्तिक असण्याची काही गरज नाही असें हरदत्तादिकांचें म्हणणें आहे) मनोरमेंतील 'अन्यथा पुल्लिङ्गैक-वचनमात्रे' या पङ्क्तींतील 'अन्यथा' या पदाचा 'साधारणनाम-भावे,' म्हणजे तीन्ही लिङ्गांत व तीन्ही वचनांत ज्याचा प्रयोग होऊं शकतो असें 'भोस्' इत्यादि संबोधनार्थक निपात न मानल्यास, असा अर्थ आहे 'भो विद्वद्वृन्द, भो गन्तः इत्यादि न सिध्येत्' या मनोरमेंतील पङ्क्तींत 'भो विद्वद्वृन्द' हा नपुंसकाचा प्रयोग, 'भो' हा निपात न मानल्यास, सिद्ध होऊं शकणार नाहीं असें जें म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, 'भो विद्वद्वृन्द' या नपुंसकलिङ्गाच्या प्रयोगांत 'भवत्' शब्दाहून संबुद्धीचा 'सु' प्रत्यय

केला असता त्या प्रत्ययाचा ('स्वमोर्नपुंसकात्' सू. ३१९ या सूत्रानें) लुक् होत असल्यामुळें 'विभाषा भवत्' या वार्तिकाची प्रवृत्ति होऊ शकत नाही (कारण 'मतुवसो रु सम्बुद्धौ' या सूत्रात पठित असलेले ते वार्तिक तेव्हांच प्रवृत्त होऊं शकते की, जेव्हा त्या वार्तिकात निर्दिष्ट असलेल्या 'भवत्' इत्यादि शब्दाच्या लगेच पुढें 'सु' हा सबुद्धीचा प्रत्यय विद्यमान आहे. त्या वार्तिकान्वयें होणारे कार्य अंपादिक असून 'स्वमोर्नपुंसकात्' या सूत्रानें 'सु' प्रत्ययाचा लुक् होणें हें कार्य सापादिक असल्यामुळें, ते सापादिक कार्य प्रथम होतें व ते कार्य प्रथम होऊन 'सु' प्रत्ययाचा लुक् झाला असता 'भवत्' शब्दापुढें सबुद्धीचा 'सु' प्रत्यय शहत नसल्यामुळें, वरील वार्तिक प्रवृत्त होऊ शकत नाही. येथे अङ्गाला प्रत्ययनिमित्तक कार्य करणे असल्यामुळें व 'न लुमताङ्गस्य' सू. २६३ हा निषेध असल्यामुळें, 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' सू २६२ या सूत्राची प्रवृत्ति होऊ शकत नाही व 'सु' प्रत्यय विद्यमान आहे असे प्रत्ययलक्षणानें मानता येत नाही आणि त्यामुळें 'भवत्' शब्दाचे 'भो.' असे नपुंसकाचे सबुद्धीचे रूप सिद्ध होऊ शकत नाही आणि म्हणून 'भो विद्वद्वृन्द' असा नपुंसकलिङ्गाचा प्रयोग, 'भो' हा निपात न मानल्यास, सिद्ध न होण्याची आपत्ति येते असा हरदत्तादिकांच्या म्हणण्याचा आशय आहे असे शब्दरत्नकार म्हणतात.) 'भोः' हा निपात न मानल्यास 'भो गङ्गे' हा स्त्रीलिङ्गाचा प्रयोग सिद्ध होऊ शकणार नाही असे जें मनोरमेच्या 'अन्यथा... इत्यादि न सिध्येत्' या पङ्क्तीत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, 'विभक्तौ लिङ्गविशिष्टाग्रहणम्'–परि. ७३–ही परिभाषा असल्यामुळें, (वरील वार्तिकात निर्दिष्ट असलेल्या 'भवत्' या प्रातिपदिकानें 'भवती' या स्त्रीलिङ्गरूपाचे ग्रहण होऊ शकत नाही. म्हणून 'भवत्' या उगित् सर्वनामाहून 'उगितश्च' सू. ४५५ या सूत्रानें 'ङीप्' प्रत्यय झाल्यावर त्या ङीप्प्रत्ययान्त शब्दाहून सबुद्धीचा 'सु' प्रत्यय केला असता 'भवत्+ङीप्+सु' या स्थितीत)

'भवत्' शब्दाच्या लगेचपुढें 'सु' हा सबुद्धीचा प्रत्यय येत नसून दोहो-मध्यें 'ङीप्' चे व्यवधान होत असल्यामुळें, वरील वार्तिक प्रवृत्त होऊ शकत नाही. (व त्यामुळें 'भवत्' शब्दाचे 'भो' असे स्त्रीलिङ्गाचे सबुद्धीचे रूप सिद्ध होऊ शकत नाहीं आणि म्हणून 'भो' हा निपात न मानता केवळ वरील वार्तिक मानल्यास, 'भो गङ्गे' हा स्त्रीलिङ्गाचा प्रयोग सिद्ध होऊ शकत नाही असा हरदत्तादिकांच्या म्हणण्याचा आशय आहे असें शब्दरत्नकार म्हणतात) 'स्यु प्यात्-पाकर्ङ्गर्हेहेभो। .. सह प्रयोगायोगात' या मनोरमेंतील पङ्क्तीच्या पूर्वी 'निपातमात्राङ्गीकारे' हें पद अध्याहृत आहे (व त्यामुळें त्या पङ्क्तीचा अर्थ असा होतो की, वरील वार्तिक न मानल्यास व 'भो, भगो, अघो' हेच सबोधनार्थक निपात मानल्यास, 'हे' व 'भो' हे दोन्ही समानार्थक निपात असल्यामुळें 'हे भो' असा इष्ट प्रयोग करता येणार नाही. येथें ग्रन्थकार अशी शङ्का करतो की) 'भो' हा निपात देखील 'भवन्' या सबुद्धयन्त शब्दाशी समानार्थक आहेच व त्यामुळें 'हे भो' हा प्रयोग असङ्गत—चूक—ठरू शकत नाहीं (सारांश 'हे भवन्' हा प्रयोग जसा शुद्ध ठरतो त्याप्रमाणें 'हे भो' हा तत्समानार्थक प्रयोग देखील शुद्ध ठरतो) 'भो' हा निपात 'भवन्' या सबुद्धयन्त शब्दाशीं समानार्थक असल्यामुळेंच, भाष्यकार व कैयट यानीं 'विभाषा भवन्' या वार्तिकानें सिद्ध होणाऱ्या सबुद्धिविभक्त्यन्त 'भो' या शब्दासारखें 'भो' हें विभक्तिप्रतिरूपक अव्यय आहे असें म्हटले आहे. आणि अव्ययाचे ठिकाणीं जें विभक्त्यन्तप्रतिरूपकत्व असतें तें केवळ विभक्त्यन्त शब्दाचें व अव्ययाचे स्वरूप, म्हणजे वर्णानुपूर्वीविशिष्टत्व, सारखें असल्यामुळेंच नसून, अर्थामध्यें देखील दोहोंचे सादृश्य असल्यामुळें असतें असें इतर स्थळीं—मतुप्सूत्रावरील भाष्यात भाष्यकारांनीं—स्पष्टपणें सांगितले आहे ('तदस्यास्त्यस्मिन्निति मतुप्' ५-२-९४ या सूत्रावरील भाष्यात त्या सूत्रात 'अस्ति' या पदाचें ग्रहण का केलें आहे याचे प्रयोजन सांगताना भाष्यकार म्हणतात—'अस्तिमानिति

मतुब्यथा स्यात् । किं च कारण न स्यात् ? । अप्रातिपदिकत्वात् । नैष दोष । अव्ययमेषोऽस्तिशब्दो, नैषोऽस्तेर्लट् । कथमव्ययत्वम् ? । विभक्तिस्वरप्रतिरूपकाश्च निपाता भवन्तीति निपातसंज्ञा, निपातोऽव्ययमित्यव्ययसंज्ञा ।' या भाष्याचा भावार्थ हा आहे की, 'अस्ति' या शब्दाहून मतुप्‌प्रत्यय व्हावा याकरिता वरील 'मतुप्'विधायक सूत्रात 'अस्ति' या शब्दाचे ग्रहण केले आहे. पण 'अस्ति' हे 'अस्' धातूचे लटाचे प्रथम पुरुषाच्या एकवचनाचे रूप असल्यामुळे, 'अर्थवदधातुरप्रत्ययः प्रातिपदिकम्' सू. १७८ या सूत्रानें होणारी प्रातिपदिकसंज्ञा 'अस्ति' या प्रत्ययान्ताला होऊ शकत नाही व 'ङ्याप्प्रातिपदिकात्' सू. १८२ या अधिकारसूत्रान्वयें प्रातिपदिकाहूनच 'मतुप्'प्रत्यय होऊ शकत असल्यामुळें, 'अस्ति' या क्रियापदाहून 'मतुप्'प्रत्यय कसा होऊ शकणार अशी शंका उपस्थित करून त्या शंकेचें निवारण करतेवेळी भाष्यकार म्हणतात की, मतुप्‌विधायक 'तदस्यास्ति' या सूत्रात निर्दिष्ट असलेला 'अस्ति' हा शब्द 'अस्' धातूचें लटाचें रूप नसून अव्यय आहे व त्याचें कारण हें की, 'विभक्तिस्वरप्रतिरूपकाश्च निपाता भवन्ति' या वचनान्वयें विभक्तिप्रतिरूपक 'अस्ति' शब्दाला निपातसंज्ञा होते व अशा रीतीनें तो शब्द निपातसंज्ञक ठरत असल्यामुळें 'स्वरादिनिपातमव्ययम्' सू. ४४७ या सूत्रानें त्याला अव्ययसंज्ञा होते. या भाष्यावरील वृत्तीत कैयटानें 'अव्ययमिति' हे प्रतीक घेऊन 'कर्तृविशिष्टसत्तावाचीति भाव । तथा चास्ति स्वमिति भावप्रत्ययप्रयोगोपपत्ति । तत्रास्तिमानिति वृत्तिविषयेऽस्ति-क्रियाया कर्तृविशेषे धनेऽस्तिशब्दो वर्तते ।' असे म्हटले आहे यावरून हें स्पष्ट होतें की, 'अस्ति' हे अव्यय 'अस्ति' या क्रिया-पदाशी केवळ स्वरूपामध्यें समान नसून अर्थामध्यें देखील — कर्तृ-विशिष्टसत्तारूप अर्थामध्यें देखील — समान आहे व 'अस्तिमान्' याचा 'धनवान्' असा अर्थ आहे. म्हणून विभक्तिप्रतिरूपक व केवळ स्वरूपसादृश्यानें होत नसून अर्थामध्यें देखील सादृश्य असलें तरच होतें हें वरील व्याख्यानावरून सिद्ध होतें. प्रकृत स्थली

(म्हणून 'तिष्ठसि भगो, तिष्ठसि अघो' या दोन वाक्यात 'तिष्ठसि' या पदापुढें असणाऱ्या 'भगो, अघो' या शब्दांना आमन्त्रिताला होणारे सर्वानुदात्तत्व व्हावें याकरिता वरील वार्तिक मानणें आवश्यक आहे. ते दोन शब्द केवळ निपात मानल्यानें आमन्त्रितसंज्ञक होऊ शकत नाहीत व त्यामुळें सर्वानुदात्त होऊ शकत नाहीत. वार्तिकनिष्पन्न 'भगो' अघो' हेच शब्द संबोधनार्थक असल्यामुळें आमन्त्रित-संज्ञक ठरून सर्वानुदात्त होतात. म्हणून 'भगो, अघो' या दोन शब्दांकरिताच, वरील वार्तिक मानलें पाहिजे व 'भोः' हा निपात सबुद्ध्यन्त असल्यामुळें व त्या योगानें त्याला आमन्त्रित-कार्यें होऊ शकत असल्यामुळें, त्या शब्दाकरिता हें वार्तिक मानण्याची काही गरज नाहीं असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. ) वरील वार्तिक मानल्यासच, 'भगो तिष्ठसि' इत्यादि प्रयोगात अविद्यमानवद्भाव होतो, 'आम् देवदत्त भगो' इत्यादि प्रयोगात एकान्तरता होते, 'भगो भगो आगच्छ' इत्यादि प्रयोगात द्विर्वचन होतें, आणि 'धनेन भगो' इत्यादि प्रयोगात पराङ्गवद्भाव होतो. ( 'भगो तिष्ठसि' या उदाहरणात 'आमन्त्रित पूर्वमविद्य-मानवत्' सू ४१२ या सूत्रान्वयें 'तिष्ठसि' या पदापूर्वी असलेले 'भगो' हें आमन्त्रितसंज्ञक पद विद्यमानच नाहीं असे मानल्यानें 'तिङ्ङतिङः' सू. ३९३५ या सूत्रानें पावलेलें सर्वानुदात्तत्व 'तिष्ठसि' या तिङन्त पदाला होत नाहीं. 'आम् देवदत्त भगो' या वाक्यात 'आम्' व आमन्त्रितसंज्ञक 'भगो' या, दोन पदामध्यें 'देवदत्त' या एकाच पदाचें व्यवधान असल्यामुळें व 'आम एकान्तरम्' सू. ३९६२ हें निषेधक सूत्र असल्यामुळें 'आमन्त्रितस्य च' सू. ३६५४ या आष्टमिक सूत्रानें पावलेलें सर्वानुदात्तत्व 'भगो' या आमन्त्रितसंज्ञक शब्दाला होत नाहीं. या वरील वाक्यात 'भगो' हें आमन्त्रित पद 'देवदत्त' या पदाचें विशेषण असल्यामुळें व 'नामन्त्रिते समानाधिकरणे' सू. ४१३ हें अविद्यमानवद्भावाचें निषे-

मियोगे ' या वार्तिकातील 'आदि' या शब्दानें पूर्वी सांगितल्याप्रमाणे , 'भोः' या शब्दाचे ग्रहण होऊं शकत असल्यामुळें 'तत्रभवान्, ततोभवान्' या प्रयोगासारखे 'तत्रभोः, ततोभोः' हे प्रयोग देखील सिद्ध होऊ शकतात हेहि लक्षात आणून आणि) ही वरील मनात धरूनच दीक्षितानी 'किं चामन्त्रिते पदात्परस्याप्टमिकनिघातः' इत्यादि पंक्ति मनोरमेंत पुढें लिहिली आहे. 'भोः' हा निपात व वार्तिकनिष्पन्न 'भो.' हा शब्द या दोहोंचेहि ठिकाणी संबोधन-प्रथमान्तत्व असल्यामुळें, या दोहोनाहि (सामन्त्रितम् सू. ४११ या सूत्रानें होणारी) आमन्त्रितसंज्ञा आहेच व त्यामुळें मनोरमेंतील प्रकृत पंक्तीत ज्या फलाचा, आमन्त्रिताला होणाऱ्या कार्याचा, निर्देश केला आहे ती फलें 'भोः' या शब्दाला व्हावी हें 'विनापि भवत्' या वार्तिकाचे प्रयोजन नाही (कारण 'भोः' हा निपात देखील विभक्तिप्रतिरूपक सबद्न्त मानला असल्यामुळें, तो आमन्त्रितसंज्ञक ठरतो व त्यामुळें आमन्त्रिताला होणारी सर्व कार्यें त्याला आपोआपच होऊ शकतात व अशा रीतीनें ती आमन्त्रित कार्ये 'भो' या शब्दाचे ठिकाणी अन्यथासिद्ध असल्यामुळें, त्याला ती कार्यें व्हावी याकरिता वरील वार्तिक मानण्याची काहीं गरज नाही. परतु 'भगो, अघो' या दोन शब्दाना ती कार्ये व्हावी या-करिता वरील वार्तिक मानणे आवश्यक आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे व याचेच ते पुढील पंक्तीत विवरण करितात.) परतु 'भगवन् तिष्ठसि, अघवन् तिष्ठसि' या अर्थानें होणाऱ्या 'तिष्ठसि भगो, तिष्ठसि अघो' इत्यादि प्रयोगात 'भगो, अघो' हे शब्द 'आमन्त्रितस्य च' सू. ३६५४ या सूत्रानें वरील वार्तिक असल्यामुळेंच सर्वानुदात्त होतात; कारण 'भगो, अघो' हे निपात (जरी मानले तरी ते) संबोधनार्थाचे वाचक आहेत असे मानण्यास कोणतेंहि प्रमाण नसल्यामुळें, ते संबोधनप्रथमावि-भक्त्यन्त आहेत असे मानता येत नाहीं व त्यामुळें ('सामन्त्रितम्' या सूत्रानें होणारी) आमन्त्रितसंज्ञा त्याना होऊं शकत नाहीं.

(म्हणून 'तिष्ठसि भगो, तिष्ठसि अघो' या दोन वाक्यात 'तिष्ठसि' या पदापुढें असणाऱ्या 'भगो, अघो' या शब्दाना आमन्त्रिताला होणारें सर्वानुदात्तत्व व्हावें याकरिता वरील वार्तिक मानणें आवश्यक आहे. ते दोन शब्द केवळ निपात मानल्यानें आमन्त्रितसंज्ञक होऊ शकत नाहीत व त्यामुळें सर्वानुदात्त होऊ शकत नाहीत. वार्तिकनिष्पन्न 'भगो' अघो' हेच शब्द संबोधनार्थक असल्यामुळें आमन्त्रित-संज्ञक ठरून सर्वानुदात्त होतात. म्हणून 'भगो, अघो' या दोन शब्दाकरिताच, वरील वार्तिक मानलें पाहिजे व 'भोः' हा निपात सबुद्धयन्त असल्यामुळें व त्या योगानें त्याला आमन्त्रित-कार्यें होऊ शकत असल्यामुळें, त्या शब्दाकरिता तें वार्तिक मानण्याचो काही गरज नाहीं असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. ) वरील वार्तिक मानल्यासच, 'भगो तिष्ठसि' इत्यादि प्रयोगात अविद्यमानवद्भाव होतो, 'आम् देवदत्त भगो' इत्यादि प्रयोगात एकान्तरता होते, 'भगो भगो आगच्छ' इत्यादि प्रयोगात द्विर्वचन होते, आणि 'घनेन भगो' इत्यादि प्रयोगात पराङ्गवद्भाव होतो. ( 'भगो तिष्ठसि' या उदाहरणात 'आमन्त्रित पूर्वमविद्य-मानवत्' सू ४१२ या सूत्रान्वयें 'तिष्ठसि' या पदापूर्वी असलेले 'भगो' हे आमन्त्रितसंज्ञक पद विद्यमान नाही असें मानल्यानें 'तिङ्ङतिङः' सू. ३९३५ या सूत्रानें पावलेलें सर्वानुदात्तत्व 'तिष्ठसि' या तिङन्त पदाला होत नाही 'आम् देवदत्त भगो' या वाक्यात 'आम्' व आमन्त्रितसंज्ञक 'भगो' या, दोन पदामध्यें 'देवदत्त' या एकाच पदाचे व्यवधान असल्यामुळें व 'आम एकान्तरम्' सू. ३९६२ हे निषेधक सूत्र असल्यामुळें 'आमन्त्रितस्य च' सू ३६५४ या आष्टमिक सूत्रानें पावलेले सर्वानुदात्तत्व 'भगो' या आमन्त्रितसंज्ञक शब्दाला होत नाही. या वरील वाक्यात 'भगो' हे आमन्त्रित पद 'देवदत्त' या पदाचें विशेषण असल्यामुळें व 'नामन्त्रिते समानाधिकरणे' सू. ४१३ हे अविद्यमानवद्भावाचे निषे-

धक सूत्र असल्यामुळें, या वाक्यातील 'देवदत्त' हे आमन्त्रितसंज्ञक पद 'आमन्त्रितं पूर्वमविद्यमानवत्' या सूत्रान्वयें अविद्यमान आहे असे मानता येत नाही हे लक्षात ठेवावें. या वाक्यातील 'देवदत्त' हे पद अविद्यमान आहे असे मानल्यास, 'आम एकान्तरम्' हे सूत्र या स्थली मुळीच प्रवृत्त होऊं शकणार नाही. 'भगो आगच्छ' या संमतिप्रदर्शक वाक्यात 'भगो' हे आमन्त्रितसंज्ञक पद वाक्यातील आद्य पद असल्यामुळें, वाक्यादेरामन्त्रितस्य सू. २१४३ या सूत्रानें 'भगो' या पदाचें द्विर्वचन होऊन 'भगो भगो आगच्छ' असा प्रयोग सिद्ध होतो. 'धनेन भगो = धनेन ऐश्वर्यवन्' या उदाहरणात 'धनेन' हे मतुवर्थक पद करणकारकरूपानें पुढें असणाऱ्या 'भगो' या आमन्त्रितसंज्ञक पदाशी अन्वित असल्यामुळें, स्वरविधि करतेवेळीं 'सुबामन्त्रिते पराङ्गवत्स्वरे' सू. ३६५६ या सूत्रान्वयें 'धनेन' हे पद 'भगो' या उत्तरपदाचें अङ्ग मानलें जातें व 'धनेन भगो' हें एक पद मानलें जाऊन 'आमन्त्रितस्य च' सू. ३६५३ या षष्ठाध्यायातील सूत्रान्वयें 'धनेन' यातील धकारापुढील अकार उदात्त होतो—म्हणजे 'धनेन भगो' हें पद आद्युदात्त होतें. 'भगो' व 'अघो' हे संबोधनार्थक निपात आहेत असे मानण्यास काही प्रमाण नसल्यामुळें, वर दर्शविलेलीं आमन्त्रित कार्यें 'भगो, अघो' या शब्दास होऊं शकली नसती म्हणून 'विभाषा भवत्' हें वार्तिक मानणें आवश्यक आहे असें शब्दरत्नकाराचें म्हणणें आहे ) 'भगो, अघो इति निपातावपि यदि प्रामाणिकौ' या मनोरमेंतील पंक्तीत 'यदि' हें पद घातलें असल्यामुळें दीक्षित असें सुचवितात की, 'भगो' व 'अघो' हे निपात आहेत असें मानण्यास कोणतेंहि प्रमाण नाही ('स्युः प्याट्पाडङ्गहै-हेभोः' या अमरकोशांतील वचनांत जसा 'भोः' हा शब्द निपातरूपानें पठित केला आहे त्याप्रमाणें त्या ग्रन्थात किंवा इतर ग्रन्थांतहि कोठें 'भगो, अघो' हे शब्द निपातरूपानें पठित केले नसल्यामुळें, ते निपात आहेत असें मानता येत नाही ) 'भगो, अघो' हे शब्द निपात नसल्यामुळेंच, भाष्यकारांनी 'मतुवसो रु' ८. ३. १ या सूत्रावरील

भाष्यात 'विभाषा भवत्' या वार्तिकाचे व्याख्यान केल्यानंतर 'भो ब्राह्मणाः, भो ब्राह्मणि' हेच प्रयोग (पुल्लिङ्गाच्या सबुद्धीचे प्रयोग नसल्यामुळें वरील वार्तिकान्वयें) सिद्ध होऊ शकणार नाहीत अशी शंका उपस्थित करून त्या शंकेचे निरसन करिताना 'भो.' हा शब्द विभक्तिप्रतिरूपक असल्यामुळें अव्यय आहे एवढेंच म्हटले आहे व या भाष्यावरून हे स्पष्ट होते की, 'भगो हरिहरौ' ('भगो गङ्गे') इत्यादि प्रयोग अशुद्धच ठरतात ('भो.' हा जसा निपात आहे तसे 'भगो, अघो.' हे देखील निपात असते तर वरील भाष्यात भाष्यकारांनी 'भगो ब्राह्मणा, भगो ब्राह्मणि, अघो ब्राह्मणाः, अघो ब्राह्मणि' इत्यादि प्रयोगासबधानें देखील वरप्रमाण शंका उपस्थित केली असती व त्या शंकेचे निरसन करतेवेळी असे म्हटले असते की, 'भगो, अघो' हे निपात विभक्तिप्रतिरूपक अव्ययें ठरत असल्यामुळें तसे प्रयोग शुद्ध ठरतात)

शब्दरत्न-- तदतिरभसादिति । "भोभगो--" "मतुवसोः--" इति सूत्रयोरस्यार्थस्य भाष्येऽस्पष्टत्वादिति भावः। उभयग्रहणादिति । वार्तिकबोधितसाधुत्वानामपि "कुलटाया वा" इत्यादौ कार्यान्तरबोधनाय सूत्रकृताऽनुवादस्य करणादिति भावः। हरदत्तेति । एव चानित्यत्वास्यप्रवृत्तौ उभयोर्ग्रहणसिद्धिरिति भावः। "विभाषा भवत्--" इति वार्तिके भो ब्राह्मणा भो ब्राह्मणीत्यसिध्याशङ्कायामव्ययमेव भोः शब्द इति सिद्धान्तेनोभयोरन्ग्रहणलाभादिति बोध्यम् । परस्परसाहचर्येणेति । तेन चार्थवतामेव ग्रहणमिति भावः । अर्थवत्परिभाषयेत्यपि बोध्यम् । अन्येषाम् अनर्थकाना । सान्तरान्तान्यतरानुकरणमिति पक्षे प्रसिध्या भोइत्यादिपूर्वकरेफान्तानामेवार्थवत्ता ग्रहणस्य न्याय्यतया भोइत्याद्योकारान्तानुकरणपक्षेऽपि वार्तिकनिष्पन्नाना निपाताना चैकदेशभूतभोशब्दादीनामेव ग्रहणमिति भावः । अत्रेदन्तत्व--रान्तानामेवानुकरणं सूत्रे सन्ध्यभावो न्याय्य एवेति भाष्यस्वरस. ।

'यत्तु वदन्ति..... अविरभसात्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, 'भोभगो' व 'मतुवसोः' या दोन्ही सूत्रावरील भाष्यात प्रकाशकारानी जसे म्हटले आहे तसे भाष्यकारानी मुळीच म्हटले नाही, म्हणजे भाष्यकारानी 'अव्ययमेव भोः शब्दः' एवढेच म्हटले असून, 'अव्ययाम्येते' असे म्हटले नाही व वार्तिक-प्रत्याख्यान केले नाही 'स्वरितत्वमाश्रित्य उभयग्रहणात्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, ज्य प्रमाणें ('अटतीति अटा, कुलाना अटा कुलटा = कुल + अट् + अच्' या स्थली 'शकन्ध्वादिषु पररूप वाच्यम्'-सू ७९ वरील वार्तिक-या वार्तिकानें पररूप एकादेश होऊन सिद्ध होणाऱ्या) 'कुलटा' या शब्दाचा 'कुलटाया वा' सू ११३२ या सूत्रात अनुवाद करून पाणिनीनें त्या शब्दाला कार्यान्तर, म्हणजे त्या शब्दाहून अपत्यार्थक 'ढक्' प्रत्यय करतेवेळी विकल्पेंकरून 'इनङ्' आदेश, होणे सांगितले आहे त्याचप्रमाणे प्रकृत स्थलीं 'भोभगोअघो' या प्रकृत सूत्रात 'विभाषा भवत्' या वार्तिकानें निष्पन्न होणाऱ्या 'भोर्, भगोर्, अघोर्' या शब्दाचा अनुवाद करून त्याच्या अन्त्य वर्णाचे जागी यकारादेश होणे सांगितले आहे (व असे मानले असता प्रतिपदोक्त व आमन्त्रितसंज्ञक अशा दोन्ही प्रकारच्या त्या शब्दाचे ग्रहण प्रकृत सूत्रात केले आहे असे म्हणता येतें. शंकाकाराची शंका अशी आहे कीं, पाणिनीच्या नंतर वार्तिकें रचली गेलीं असल्यामुळें, 'विभाषा भवद्भगवत्' हे वार्तिक पाणिनीला ज्ञात होतें असे मानता येऊ शकत नाहीं व त्यामुळें प्रकृत सूत्रात वार्तिकनिष्पन्न 'भो, भगो, अघो' या शब्दाचें पाणिनीनें ग्रहण केले आहे असे म्हणता येऊ शकत नाही. या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात कीं, जरी पाणिनीच्या काळीं वरील वार्तिक नव्हतें तरी त्या काळीं वार्तिकनिष्पन्न शब्द भाषेंत प्रचारांत होते व त्याचे ज्ञान पाणिनीला होतें असे मानता येते. उदाहरणार्थ 'शकन्ध्वादिषु पररूपं वाच्यम्' या अर्थाचे सूत्र जरी पाणिनीनें

केले नाही तरी त्या वार्तिकानें निष्पन्न होणाऱ्या 'कुलटा' या शब्दाचा पाणिनीनें 'कुलटाया वा' या सूत्रात जसा कार्यान्तर-विधानार्थ निर्देश केला आहे त्याचप्रमाणे त्यानें प्रकृत सूत्रात 'विभाषा भवद्' या वार्तिकानें निष्पन्न होणाऱ्या व पाणिनीय कालीं भाषेंत रूढ असणाऱ्या त्या शब्दाचा प्रकृत सूत्रात कार्यान्तर-विधानार्थ, म्हणजे 'रु' चें यत्व होण्याकरिता, निर्देश केला आहे असें मानता येतें, व तसें मानलें असता, दोन्ही प्रकारच्या शब्दांचें प्रकृत सूत्रात ग्रहण केलें आहे असें मानण्यात कोणताहि प्रत्यवाय येत नाही ) 'भुवश्च महाव्याहृतेः इति सूत्रे ......हरदत्ताद्युक्तेश्च' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे की, (हरदत्तादिकानी म्हटल्याप्रमाणें) लक्षणप्रतिपदोक्तपरिभाषा–परि. ११४–अनित्य ठरत असल्यामुळें, तिच्या अनित्यत्वामुळें ती प्रकृत स्थलीं प्रवृत्त न केल्यानें (प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'भो, भगो, अघो' या शब्दानी) उभयविध शब्दांचें, म्हणजे प्रतिपदोक्त निपाताचें व तसेंच वार्तिक निष्पन्न लाक्षणिक शब्दाचें, ग्रहण करता येऊं शकतें. (याचें विवरण पूर्वी मनोरमेंत केलेंच आहे.) 'विभाषा भवद्' या वार्तिकाचें व्याख्यान करतेवेळीं 'भो ब्राह्मणाः, भो ब्राह्मणि' हे (संबोधनाच्या बहुवचनाचें व स्त्रीलिङ्गाच्या सबुद्धीचे) प्रयोग सिद्ध होऊं शकत नाहींत अशी शंका उपस्थित करून त्या शंकेचें निराकरण करिताना भाष्यकारानीं ('मतुवसो रु' ८–३–१ या सूत्रावरील भाष्यात) 'अव्ययमेष भोः शब्दः' असा सिद्धान्त सांगितला असल्यामुळें (प्रकृत सूत्रनिर्दिष्ट 'भो, भगो, अघो' या शब्दानी) उभयविध–प्रतिपदोक्त 'भो' इत्यादि प्रसिद्ध व वार्तिकनिष्पन्न लाक्षणिक–शब्दाचें ग्रहण करता येऊं शकतें हें त्या भाष्यावरून स्पष्ट होतें. 'परस्परसाहचर्येण निपातानां वार्तिकोक्तानां च ग्रहणेऽप्यन्येषामग्रहणात्' या मनोरमेंतील पङ्क्तीत दीक्षितानीं 'परस्परसाहचर्येण' असा जो हेतु दिला आहे त्यामुळें, सूत्रनिर्दिष्ट 'भो, भगो, अघो' या शब्दानीं वार्तिकनिष्पन्न 'भो, भगो, अघो' या अर्थवान् शब्दाचेंच (अर्थसादृश्यामुळें) ग्रहण करता

येतें (व 'विभोरिदम्' इत्यादि मनोरमेंत दिलेल्या तीन वाक्यांतील 'भो, भगो, अघो' या अनर्थक एकदेशाचें ग्रहण करता येत नाहीं, कारण 'सहचरितासहचरितयोः सहचरितस्यैव ग्रहणम्'—परि. ११२—या परिभाषेंतील 'सहचरित' व 'असहचरित' या शब्दाचा अनुक्रमें 'सदृश' 'असदृश' असा अर्थ आहे व त्या परिभाषेचा थोडक्यांत हा अर्थ आहे की, 'सदृशासदृशयोः ग्रहणे सम्भवति सति, सदृशस्यैव ग्रहणं कर्तव्यं, नासदृशस्य.' अशी ती परिभाषा असल्यामुळें, जरी सूत्रनिर्दिष्ट शब्दानी वार्तिकनिष्पन्न अर्थवान् शब्दाचें व अनर्थक एकदेशाचें स्वरूपसादृश्यामुळें ग्रहण होणें संभवतें तरी वार्तिकनिष्पन्न अर्थवान् शब्दाचेंच ग्रहण करता येतें व मनोरमेंत दिलेल्या तीन वाक्यांतील अनर्थक एकदेशाचें ग्रहण करता येत नाहीं; कारण दोहोंमध्यें अर्थवत्तारूप सादृश्य नाहीं. मनोरमेंत 'परस्परसाहचर्येण' हा जा हेतु दिला आहे) त्याखेरीज 'अर्थवद्ग्रहणे नानर्थकस्य'—प १४—हा हेतु देखील देता येतो (व या अर्थवद्ग्रहण-परिभाषान्वयें देखील अनर्थक एकदेशाचें ग्रहण करता येत नाहीं.) 'अन्येषामग्रहणात्' या मनोरमेच्या पक्तीतील 'अन्येषाम्' या पदाचा 'अनर्थकानाम्,' म्हणजे मनोरमेंत दिलेल्या तीन वाक्यांतील अर्थरहित एकदेशाचें, असा अर्थ आहे. सान्त किंवा रान्त शब्दाचें प्रकृत सूत्रांत अनुकरण केलें आहे. असा सान्त किंवा रान्त अनुकरण पक्ष मानल्यास, प्रसिद्ध 'भोर्, भगोर्, अघोर्' हे जे रेफान्त अर्थवान् शब्द आहेत त्यांचेंच ('गौणमुख्ययोः मुख्ये कार्यसम्प्रत्ययः'—परि. १५—या न्यायान्वयें) ग्रहण करणें न्याय्य असल्यामुळें, (व अनर्थक अप्रसिद्ध-गौण-एकदेशाचें ग्रहण करणें अयोग्य असल्यामुळें.) ओकारान्तानुकरण पक्ष मानला तरी, वार्तिकनिष्पन्न 'भोर्, भगोर्, अघोर्' ह्या प्रसिद्ध शब्दाचें व सान्त किंवा कृतरान्त प्रसिद्ध 'भोस्, भगोस्, अघोस्' या तीन निपाताचें 'भो, भगो, अघो' हे जे ओकारान्त एकदेश आहेत त्यांचेंच ग्रहण करता येत (व त्या पक्षांत देखील 'विभोरिदम्' इत्यादि मनोरमेंत दिलेल्या वाक्यांतील गौण व अनर्थक

ओकारान्त एकदेशाचे ग्रहण करता येत नाही- सान्तानुकरणपक्ष रान्तानुकरणपक्ष व ओकारान्तानुकरणपक्ष असे तीन भिन्न पक्ष प्रकृत स्थली मानले असल्यामुळे, पहिल्या दोन पक्षात जें फल सिद्ध होते तेच फल तृतीय पक्षात देखील सिद्ध होणे आवश्यक आहे. म्हणून वरील तीन्ही पक्षात फलैक्यसिद्धि होण्याकरिता, ओकारान्तानुकरणपक्षात देखील असेच मानले पाहिजे की, सूत्रनिर्दिष्ट ओकारान्त शब्दानी प्रसिद्ध 'भोस्, भगोस्, अघोस्' या सान्त किंवा कृतरान्त निपाताच्या व तसेच वार्तिकनिष्पन्न प्रसिद्ध 'भोर्, भगोर्, अघोर्' या शब्दाच्या ओकारान्त एकदेशाच ग्रहण होऊ शकते व मनोरमेत दिलेल्या तीन उदाहरणातील अप्रसिद्ध गौण शब्दाच्या ओकारान्त एकदेशाचे ग्रहण होऊ शकत नाही. तसे न मानले तर, भिन्न भिन्न पक्षात भिन्न भिन्न फले सिद्ध होण्याची आपत्ति येईल. मग तसे भिन्न पक्ष मानून फायदा काय ? तीन्ही पक्षात जर फलैक्यसिद्धि होणे संभवत असेल तरच तसे तीन पक्ष मानणे उचित ठरत असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. 'भोस्, भगोस्, अघोस्' या सान्त किंवा कृतरान्त निपाताचे व वार्तिकनिष्पन्न 'भोर्, भगोर्, अघोर्' या शब्दाचे 'भो, भगो, अघो' हे एकदेश अनर्थक असल्यामुळे, ओकारान्तानुकरणपक्षात अर्थवद्ग्रहणपरिभाषा लागू पडत नाही हे उघड आहे, आणि म्हणूनच दीक्षितानी तीन्ही पक्षात त्याच्या मत सारखीच लागू पडणारी साहचर्यपरिभाषा–परि. ११२–प्रवृत्त केली आहे. सान्त किंवा रान्त अनुकरणपक्षात पूर्वी सांगितल्याप्रमाणे स्वरूपसादृश्य व अर्थसादृश्य या उभयविध परस्परसादृश्यामुळे साहचर्यपरिभाषा लागू पडते हे जसे सहज सांगता येत तसे ती ओकारान्तानुकरणपक्षात कशी लागू पडते हे सांगता येणे बरेच कठीण आहे. प्रकृत सूत्रनिर्दिष्ट शब्दात व सान्त किंवा कृतरान्त निपाताच्या व वार्तिकनिष्पन्न शब्दाच्या अनर्थक ओकारान्त एकदेशात असे कोणते धर्मसादृश्य आहे की, ज्यामुळे सूत्रनिर्दिष्ट ओकारान्त शब्दानी या अनर्थक ओकारान्त एकदेशाचे ग्रहण होऊं शकते व मनोरमेत दिलेल्या तीन

उदाहरणातील अनर्थक ओकारान्त एकदेशाचे ग्रहण होऊ शकत नाही ? दोन्ही स्थलातील एकदेश सारखेच अनर्थक आहेत, तथापि सूत्रनिर्दिष्ट शब्द सान्त किंवा रुतरान्त 'भोस्, भगोस्, अघोस्' या संबोधनार्थक निपाताच्या ओकारान्त एकदेशाचे अनुकरण करणारे शब्द आहेत असे मानले असता, त्या निपाताच्या व वार्तिकनिष्पन्न सबुद्धचन्त समानार्थक शब्दाच्या ओकारान्त एकदेशाचे ग्रहण होऊ शकते व मनोरमेंत दिलेल्या तीन उदाहरणातील ओकारान्त एकदेश तसा निपाताचे किंवा निपातसमानार्थक शब्दाचे एकदेश नसल्यामुळें त्याचे ग्रहण करता येत नाही अशा रीतीनें जरी ओकारान्तानुकरणपक्षात समाधान करून घेतलें पाहिजे. सारांश ओकारान्तानुकरणपक्ष सर्व तऱ्हेनें त्याज्य ठरतो. म्हणून सान्त किंवा रान्त अनुकरणपक्ष मानणेंच योग्य आहे. तरी पण या दोन पक्षांपैकी रान्तानुकरणपक्ष मानणेंच अधिक योग्य आहे असे शब्दरत्नकार पुढील पक्तींत सांगतात.) वर सांगितलेल्या सर्व गोष्टींचा विचार केला असता हाच निष्कर्ष निघतो की, रान्तानुकरण पक्षच मानणे योग्य आहे व प्रकृत सूत्राव यें पूर्वरूप सन्धिकार्य केलें नाही तेंच न्याय्य ठरतें आणि भाष्यावरून देखील हाच सिद्धान्त निघतो. (ओकारान्तानुकरणपक्षात 'एङः पदान्तादति' सू. ८६ या सूत्रानें होणाऱ्या पूर्वरूप सन्धीची प्राप्ति होते व त्या पक्षात इतर दोष देखील उद्भवतात हे पूर्वी सांगितलेच आहे. म्हणून तो पक्ष मुळीच स्वीकारता येत नाही. सान्तानुकरणपक्ष मानल्यास, प्रकृत सूत्रात यें पूर्वरूप सन्धिकार्य केलें नाही ते जरी योग्य ठरतें तरी, सूत्रनिर्दिष्ट प्रतिपदोक्त सान्त शब्दानी वार्तिकनिष्पन्न रान्त शब्दाचे ग्रहण करतेवेळी लक्षणप्रतिपदोक्तपरिभाषा आड येते व तिचे निवारण करण्याकरिता ती अनित्य मानून त्या पक्षाचे समर्थन करावे लागतं. परतु रान्तानुकरणपक्ष मानल्यास, त्या पक्षात सान्त निपाताच्या अन्त्य सकाराच 'ससजुषो रुः' सू. १६२ या सूत्रानें रुत्व होऊन रान्त होणाऱ्या त्या निपाताचे व वार्तिकनिष्पन्न समानार्थक

रान्त शब्दाचे सूत्रनिर्दिष्ट रान्त शब्दानी ग्रहण करण्यांत कोणताहि प्रत्यवाय येत नाहीं, कारण ते दोन्ही प्रकारचे शब्दलक्षण–सूत्र व वार्तिक–लावून सिद्ध झालेले असल्यामुळें, सारखेच लाक्षणिक ठरतात. दुसरें असें की, 'मतुवसो रु' या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी वार्तिकनिष्पन्न रान्त शब्दाचे ठिकाणी देखील प्रकृत सूत्र प्रवृत्त केले आहे व लक्षणप्रतिपदोक्त परिभाषेची आडकाठी दाखविली नाही. म्हणून त्या भाष्याचा आशय ध्यानात आणला असता व वर दिलेल्या सर्व कारणांचा विचार केला असता, हाच सिद्धान्त निघतो की, प्रकृत स्थलीं रान्त शब्दाचे अनुकरण केले आहे हें मानणें–म्हणजे रान्तानुकरणपक्षच मानणें–योग्य ठरते असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.)

मनोरमा–व्योर्लघु। लघुप्रयत्नतरः लघूच्चारणतरः। स चान्तरतम्याद्यस्य वो यस्य य इत्याह–वयाविति ।।

'व्योर्लघुप्रयत्नतरः शाकटायनस्य' सू. १६८ या सूत्रातील 'लघुप्रयत्नतरः' या पदाचा 'लघूच्चारणतरः', म्हणजे ज्याच्या उच्चारणात कमी प्रयत्न करावा लागतो असा वकार किंवा यकार, असा अर्थ आहे. वकाराचे जागीं आन्तरतम्यानें, म्हणजे 'स्थानेऽन्तरतमः' सू. ३९ या सूत्राप्रमाणें, लघुतरप्रयत्नक वकार आणि यकाराचे जागीं लघुतरप्रयत्नक यकार होतो हा आशय व्यक्त करण्याकरिता प्रकृत सूत्रावरील कौमुदींत 'पदान्तयोर्वकारयकारयोर्लघूच्चारणौ वयौ वा स्तोऽशि परे' असें व्याख्यान केले आहे.

शब्दरत्न–लघूच्चारणतरो लघुतरोच्चारणः ।

मनोरमेंतील 'लघूच्चारणतरः' या पदाचा 'लघुतरोच्चारणः' असा अर्थ आहे. (वास्तविक 'लघूच्चारणतरः' व लघुतरोच्चारणः' हे दोन्ही शब्द व्याकरणरीत्या शुद्ध आहेत. 'अतिशायने तमबिष्ठनौ' सू. ५-३-५५ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानें 'गुणवचनेव प्रकर्षो न द्रव्यस्य' असा सिद्धान्त सांगितला असल्यामुळें व 'लघू-

च्चारण ' या स्थळी 'लघु' हा शद्ब गुणवाचक असल्यामुळें, 'द्विवचनविभज्योपपदे तरबीयसुनौ' सू. २००५ या सूत्रान्वयें 'लघु' या गुणवाचक शद्बाहून प्रथम 'तरप्' प्रत्यय करून नतर बहुव्रीहि केल्यास 'लघुतरोच्चारण.' असे रूप सिद्ध होतें. परंतु त्या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी 'पूर्वपदातिशये आतिशायिकाद्बहुव्रीहिः सूक्ष्मवस्त्रतरार्थं ' असे वार्तिक पठित केले आहे व त्या वार्तिकाचा भावार्थ असा आहे की, जेथें गुणप्रकर्ष व अन्य पदार्थ प्रधान बहुव्रीहि या दोहोंचीहि युगपत् विवक्षा आहे त्या स्थळी 'द्विवचन-विभज्योपपदे' सू. २००५ या सूत्रानें 'तरप्' प्रत्यय होण्याची व 'अनेकमन्यपदार्थे' सू. ८३० या सूत्राने बहुव्रीहीची युगपत् प्राप्ति होत असल्यामुळें व 'तरप्' प्रत्ययविधायक सूत्र बहुव्रीहिसमास-विधायक सूत्राच्या मानानें परसूत्र असल्यामुळें 'विप्रतिषेधे परं कार्यम्' सू. १७५ या सूत्रान्वयें प्रथम 'तरप्' प्रत्यय झाला पाहिजे व नतर बहुव्रीहिसमास झाला पाहिजे, व तसे केल्यास 'लघुतरप्रयत्न, लघुतरोच्चारणः' अशीच रूपें सिद्ध होऊ शकतात. परंतु 'सूक्ष्मवस्त्रतर ' इत्यादि रूपें सिद्ध व्हावी याकरिता वरील वार्तिक पठित केले आहे व त्या वार्तिकान्वयें पूर्वविप्रतिषेधानें प्रथम बहुव्रीहिसमास करून नतर 'तरप्' प्रत्यय केला असता जसे 'सूक्ष्म-वस्त्रतर.' हे रूप सिद्ध होत त्याचप्रमाणे 'लघुप्रयत्नतर', लघूच्चा-रणतर ' ही रूपें देखील सिद्ध होतात पण हे वार्तिक मानल्यास 'लघुतरप्रयत्न, लघुतरोच्चारण.' ही रूपें अशुद्ध ठरण्याची आपत्ति येते असे कोणी म्हटल्यास, त्यावर हे उत्तर आहे की, जेथें 'तरप्' प्रत्यय व बहुव्रीहिसमास या दोहोंची सहविवक्षा नाही तेथें 'लघु' या गुणवाचक शद्बाहून प्रथम 'तरप्' प्रत्यय करून नतर बहुव्रीहि-समास केला असता वरील रूपें देखील शुद्ध ठरतात )

मनोरमा—ओतो गार्ग्यस्य । ओकारादिति । यत्त्वोकारान्ता-दङ्गादिति प्राचा व्याख्यातं तन्न । अङ्गस्याप्रकृतत्वात् असम्भवाच्च । न ह्युदाहरणेष्वोकारान्तमङ्गमस्ति ।

'ओतो गार्ग्यस्य' सू. १६९ या सूत्राचें कौमुदीत 'ओकारात्परस्य पदान्तस्याल्पघुप्रयत्नस्य यकारस्य नित्य लोपः स्यात्' असें व्याख्यान केलें आहे. या सूत्रावरील प्रक्रियाकौमुदीच्या टीकेंत प्रसादकारानीं 'ओकारान्तादङ्गात्परस्य' असें जें व्याख्यान केलें आहे तें बरोबर नाहीं, कारण प्रकृत सूत्रांत 'अङ्गस्य' हें पद अनुवृत्त नाहीं, आणि दुसरें असें कीं, ओकारान्त अङ्गापुढें अ-लघु-प्रयत्न यकार येणें असंभवनीय आहे. प्रकृत सूत्रावरील दिलेल्या उदाहरणांत कोठेंहि ओकारान्त अङ्ग नाहीं. ('अङ्गस्य' ६-४-१ हा अधिकार षष्ठाध्यायाच्या चतुर्थ पादाच्या प्रारंभापासून सप्तमाध्यायाच्या अखेरपर्यंत चालू आहे व प्रकृत सूत्र त्या अधिकाराच्या बाहेर अष्टमाध्यायाच्या तृतीय पदांत 'पदस्य' या अधिकारांत पठित आहे. म्हणून प्रकृत सूत्रांत 'अङ्गस्य' हें पद मुळींच अनुवृत्त होऊं शकत नाहीं, पण 'पदस्य' हें पद अनुवृत्त होतें. त्यामुळें 'ओकारान्तादङ्गात्परस्य' हें व्याख्यान चूक ठरतें हें उघड आहे. प्रकृत सूत्रांत 'व्योर्लघुप्रयत्नतरः' सू. १६८ या पूर्वसूत्रांतून अनुवृत्त होणारा यकार 'पदस्य' या पदाचें विशेषण होऊन व 'येन विधिस्तदन्तस्य' सू. २६ या सूत्रान्वयें 'यकारान्तस्य पदस्य' असा अर्थ होऊन, 'अलोऽन्त्यपरिभाषान्वयें 'पदान्तस्य यकारस्य' असा अर्थ निष्पन्न होतो व प्रकृत सूत्रांतील 'ओत.' हें पद पञ्चम्यन्त असल्यामुळें, 'तस्मादित्युत्तरस्य' सू. ४१ या सूत्रान्वयें त्या पदाचा 'ओकारात्परस्य' असा अर्थ होऊन सूत्राचा कौमुदींत जसा अर्थ दिला आहे तसाच अर्थ त्या सूत्राचा होऊं शकतो. प्रक्रियाकौमुदीकारानीं प्रकृत सूत्राचा 'ओकारात्परस्याल्पघुप्रयत्नस्य-यकारस्य-नित्य लोपः' असा अर्थ केला आहे. पण प्रसादकारानीं 'ओकारात्परस्य' याचें व्याख्यान करितांना 'ओकारान्तादङ्गात्परस्येत्यर्थः । ओकारान्तात्परस्य वकारस्यासंभवात्' असें म्हटलें आहे आणि याच व्याख्यानावर दीक्षिताचा कटाक्ष आहे. दीक्षित म्हणतात कीं, ओकारान्त अङ्गापुढें

यकार येणे असंभवनीय आहे ते का असंभवनीय आहे याचे कारण त्यांनी मनोरमेंत दिलें नाही व प्रकृत सूत्रावर शब्दरत्न नसल्यामुळें आणि मनोरमेवरील दुसरी कोणतीहि स्वतंत्र टीका येथें उपलब्ध नसल्यामुळें, मनोरमेंतील 'असंभवाच्च' या हेतूचा वास्तविक अर्थ काय आहे याचें स्पष्टीकरण करणें अवघड जातें. तथापि दीक्षिताच्या म्हणण्याचा असा आशय दिसतो कीं, 'यस्मात्प्रत्ययविधिस्तदादि प्रत्ययेऽङ्गम्' सू. १९९ या सूत्रान्वयें अङ्गसंज्ञा प्रत्ययसापेक्ष असल्यामुळें, म्हणजे प्रत्यय पुढें असतानाच त्याच्या लगेंच मागें असणाऱ्या शब्दस्वरूपाला अङ्गसंज्ञा होत असल्यामुळें, 'ओकारान्ता-दङ्गात्परस्य यकारस्य' याचा 'ओकारान्तादङ्गात्परस्य यकारादि-प्रत्ययस्य यकारस्य' असाच अर्थ होऊं शकतो पण ओकारान्त अङ्गापुढें यकारादिप्रत्यय आला असता, 'पूर्वत्रासिद्धम्' सू. १२ या वचनान्वयें प्रकृत त्रैपादिक सूत्र प्रथम प्रवृत्त न होता 'वान्तो यि प्रत्यये' सू. ६३ हे सापादिक सूत्र प्रथम प्रवृत्त होऊन व तसा अङ्गाच्या अन्त्य ओकाराचें जागी अवादेश होऊन अङ्ग ओकारान्त न राहता वकारान्त होणार म्हणून प्रकृत त्रैपादिक सूत्र प्रवृत्त करण्याकरितां ओकारान्त अङ्गापुढें प्रत्ययादि यकार मिळणें असंभवनीय आहे. उदाहरणार्थ 'गो' शब्दाहून 'गोपयसोर्यत्' सू. १५२८ या सूत्रानें विकारार्थक 'यत् = य' प्रत्यय केला असता, 'गो+य' अशा स्थितीत 'गो' या अङ्गातील ओकाराचे जागी 'वान्तो यि प्रत्यये' या सूत्रानें अवादेश होऊन 'गव्' असें वकारान्त अङ्ग होतें. त्यामुळें ओकारान्त अङ्गापुढें प्रत्ययादि यकार मिळणें अशक्य आहे 'ओ' चे जागी झालेला 'अव्' हा आदेश 'ओ'च आहे असें स्थानिवद्भावानें मानता येत नाहीं, कारण हा अल्विधि असल्यामुळें व 'अनल्विधौ' हा प्रतिषेध असल्यामुळें, तसा स्थानिवद्भाव करता येत नाहीं. 'अचः परस्मिन् पूर्वविधौ' सू. ५० हें सूत्र देखील वरील उदाहरणांत प्रवृत्त करता येत नाहीं; कारण ज्या 'ओ' स्थानीचे जागी अवादेश झाला आहे त्या 'ओ' च्या

पूर्वी असणाऱ्या वर्णाला कार्य करणे नसून त्याच्या पुढे असणाऱ्या 'य्' या वर्णाला लोपरूप कार्य करणे आहे. म्हणून त्या सूत्रान्वये देखील येथें स्थानिवद्भाव होऊ शकत नाही. 'पूर्वस्मात् विधौ कर्तव्ये' हा अनित्य पञ्चमीसमासपक्ष मानला तरी, 'पूर्वत्रासिद्धे न स्थानिवत्', म्हणजे त्रैपादिक कार्य करतेवेळी अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव करता येत नाही असें वार्तिक असल्यामुळें, अजादेशाचे ठिकाणी कोणत्याहि रीतीनें स्थानिवद्भाव होऊ शकत नाही. तसेच 'अचः परस्मिन्' हें सापादिक शास्त्र त्रिपादीत वास्तविक उपस्थित होऊच शकत नाही हे पूर्वी सांगितलेच आहे. सारांश त्रैपादिक यकारलोपरूप कार्य करतेवेळी अजादेशाचे ठिकाणी स्थानिवद्भावानें ओत्ववृद्धि करता येत नसल्यामुळें, ओदन्त अङ्गापुढें प्रत्ययादि यकार मिळणें असमवनीय आहे असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय दिसतो दुसरे असें की, 'गो + यत्' या स्थली ओकारान्त अङ्गापुढें असणाऱ्या यकाराचा लोप केल्यास, 'गव्यम्' असें इष्ट रूप न होता 'गवम्' असें अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येईल. म्हणून प्रसादकाराचें व्याख्यान बरोबर मानता येत नाही हें उघड आहे. )

मनोरमा–हलि सर्वेषाम् यकारस्येति । वकारस्तु नानुवर्तते । भोभगोअघोपूर्वस्यासम्भवात् । अपूर्वस्तु यद्यपि सम्भवति वृक्षव् करोतीति तथापि तत्र लोपाप्रसङ्गः । अशीत्यनुवर्त्याशो हलो विशेषणात् । वृक्षवृहसतीत्यादि तु अनभिधानादसाध्वित्याहुः । गव्यमित्यत्र तु पदान्तत्वं नास्ति । गव्यूतिरित्यत्र तु वकारप्रश्लेषान्न वलोप इत्युक्तम् । ननु देवा नम्या इत्यादौ "लोपो व्यो.–" इत्येव सिद्धम् । मैवम् । वं प्रति यत्वस्यासिद्धत्वात् । देवा यान्तीत्यत्र वस्परत्वाभावाच्च ।

'हलि सर्वेषाम्' सू. १७१ या सूत्राचे कौमुदीत व्याख्यान करिताना' यकारस्य लोपः स्यात्' असें जें म्हटले आहे (व 'यकार-

वकारयोर्लोपः स्यात्' असे म्हटले नाही ) याचे कारण हे की, या सूत्रात ('व्योर्लघुप्रयत्नतरः' या पूर्व सूत्रातून 'व्योः' यातील केवळ यकाराची, 'क्वचिदेकदेशोऽप्यनुवर्तते' – परि. १८ – या न्यायान्वये अनुवृत्ति होत असून ) वकाराची अनुवृत्ति होत नाही. (प्रकृत सूत्रात अनुवृत्त होणाऱ्या 'भोभगोअघोअपूर्वस्य' यातील ) 'भो, भगो, अघो' याच्यापुढे वकार येण्याचा संभवच नाही (कारण त्याच्यापुढे 'भोभगोअघो' सू. १६७ या सूत्राने होणारा यकारच येऊ शकतो. ) जरी 'वृक्षव् करोति' या उदाहरणात अकारापुढे वकार येणे संभवते तरी (प्रकृत सूत्रात 'भोभगोअघो' या पूर्व सूत्रातून ) 'अशि' या पदाची अनुवृत्ति करून ते अनुवृत्त पद 'हलि' याचे विशेषण मानले असल्यामुळे, त्या उदाहरणात वकाराचा लोप होण्याचा प्रसङ्ग येत नाही, (कारण 'वृक्षव्' यात पदान्ती असणाऱ्या वकारापुढे ककार हा 'खर्' असून तो अश्रूप हल् नाही 'वृक्षव् हसति' या उदाहरणात जरी पदान्ती असणाऱ्या वकारापुढे हकार हा 'अश्' रूप हल् असल्यामुळे, प्रकृत सूत्रात वकाराची अनुवृत्ति केल्यास त्या वकाराचा लोप पावतो तरी ) 'वृक्षव् हसति' इत्यादि प्रयोग भाषेत आढळत नसल्यामुळे तसे प्रयोग असाधु–अशुद्ध–आहेत असे कित्येक वैयाकरणाच म्हणणे आहे 'गव्यम्' या उदाहरणात (जरी गकारापुढील अकारापुढे वकार आहे व त्या वकारापुढे यकार हा 'अश्' रूप हल् आहे तरी तो ) वकार पदान्ती नाही ( व त्यामुळे प्रकृत सूत्राने त्याच्या लोपाची प्राप्तीच होत नाही ) 'गव्यूति' या उदाहरणात (जरी गकारापुढील अकारापुढे जो वकार आहे तो पदान्ती असून त्यापुढे 'यूतिः' या पदातील यकार हा 'अश्' रूप हल् आहे तरी 'गोर्यूतो छन्दसि' या वार्तिकात पूर्वी सांगितल्याप्रमाणे 'छन्दसि' यातील छकारापूर्वी ) वकाराचा प्रश्लेष मानला असल्यामुळे, वकाराचा लोप होत नाही हे ( 'वान्तो यि प्रत्यये' सू. ६७ या सूत्रावरील कौमुदीत ) सांगितलेच आहे. 'देवा नम्या.' इत्यादि उदाहरणात 'लोपः शाकल्यस्य' सू. ७०३ या सूत्राने

यकाराचा लोप होऊ शकतोच असे कोणी म्हटल्यास, ते म्हणणे बरोबर नाही; कारण 'लोपो व्योर्वलि' या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें 'भोभगो' या त्रैपादिक सूत्राने होणारे यत्व असिद्ध ठरते, (व त्यामुळें 'देवास् नम्याः' या स्थली 'ससजुषो रुः' सू. १६२ या सूत्रानें 'देवास्' या पदातील अन्त्य सकाराचे रुत्व झाल्यावर 'देवार् नम्याः' अशी स्थिति झाली असता, 'भोभगो' या सूत्रानें त्या 'र' चे जागी जो यकार होतो तो 'पूर्वत्रासिद्धम्' या वचनान्वयें 'लोपो व्योर्वलि' या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें असिद्ध ठरत असल्यामुळें, त्रैपादिक सूत्रानी झालेले रुत्व व यत्व झालेच नाही व सकारच कायम आहे असे मानावे लागते व त्यामुळें 'लोपो व्योर्वलि' या सूत्रानें यकारलोप होऊ शकत नाही. पण पूर्व त्रैपादिक सूत्रानी झालेले रुत्व व यत्व 'हलि सर्वेषाम्' या प्रकृत त्रैपादिक उत्तर सूत्राच्या दृष्टीनें सिद्ध ठरत असल्यामुळें, प्रकृत सूत्रानेंच त्या यकाराचा लोप होऊ शकतो असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे.) 'देवा यान्ति' या उदाहरणात 'वल्' पुढें नसल्यामुळें देखील 'लोपो व्योर्वलि' या सूत्राची प्राप्ति होत नाही. (देवास् यान्ति = देवार् यान्ति = देवाय् यान्ति' या उदाहरणात, वर सांगितल्याप्रमाणे, त्रैपादिक सूत्रानी होणारे रुत्व व यत्व 'लोपो व्योर्वलि' या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें असिद्ध ठरत असल्यामुळें, त्या सूत्रानें यकारलोप होऊ शकत नाही; आणि दुसरे असे की, 'देवाय्' यातील अन्त्य यकारापुढें 'यान्ति' यातील जो यकार आहे तो 'वल्' नसल्यामुळें ते सूत्र या उदाहरणात प्रवृत्त होऊ शकत नाहीं व 'हलि सर्वेषाम्' हेच सूत्र प्रवृत्त होऊन त्या सूत्रानें यकाराचा लोप होतो आणि म्हणून 'हलि सर्वेषाम्' हे सूत्र असणे आवश्यक आहे असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे.)

शब्दरत्न—हलो विशेषणादिति । स्पष्टं भाष्ये । इत्याहुरिति । हरदत्तादयः । यकारलोपे ततस्तदर्शानवगतेरित्यर्थः । एवं च करोत्यादिपरेऽपि तत एव लोपोन भविष्यतीत्यदा हलो विशेषणं

व्यर्थमिति सूचितम् । भाष्यमपि तदेकदेश्युक्तिरेव । "न पदान्ताः परेऽणः सन्ति" इति "लण्" सूत्रस्थभाष्यविरोधाच्च ॥

'अशीत्यनुवर्त्याशा हलो विशेषणात्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे ते ('भोभगोअघो सू ८-३-१७ या सूत्रावरील) भाष्यावरून स्पष्ट होतें (व ते भाष्य 'भोभगो' या सूत्रावरील शब्दरत्नात पूर्वी दिलेच आहे ) 'असाधुरित्याहु' असे जें मनोरमेंत म्हटले आहे तें हरदत्त इत्यादिकानी म्हटले आहे ('हलि सर्वेषाम्' या सूत्रावरील पदमञ्जरीत हरदत्तानें 'ननु वृक्षव् हसतीत्यादौ–अवर्णपूर्वः अपरः पदान्तो वकार –सम्भवति, न सम्भवति। अनभिधानात्, न ह्येवंविधम-भिधानमस्ति, तथा च लण् इत्यत्र भाष्यकार आह, न पदान्ता हलोऽण सन्तीति । एवं च वृक्षव् करोतीत्ययमपि प्रयोगश्चिन्त्यः' असे म्हटले आहे ) 'वृक्षव् हसति' या उदाहरणात वकारलोप केल्यास, 'वृक्षव्' या शब्दाहून होणाऱ्या अर्थाचा बोध होऊ शकणार नाही असा हरदत्तादिकाच्या म्हणण्याचा आशय आहे ('वृक्षव्' यातील वकाराचा लोप केला असता 'वृक्ष' असा शब्द उच्चारला जाईल व त्यामुळें 'वृक्ष' हा शब्द उच्चारल्यानें ज्या अर्थाचा बोध होतो त्या अर्थाचा बोध होईल व 'वृक्षव्' हा शब्द उच्चारल्यानें ज्या अर्थाचा बोध होतो त्या अर्थाचा बोध होऊ शकणार नाहीं आणि म्हणून वकारलोप केल्यानें यथार्थाचा बोध होणे अशक्य असल्यामुळें देखील 'वृक्षव् हसति' इत्यादि प्रयोग असाधु मानणेच योग्य ठरत असा हरदत्तादिकाच्या म्हणण्याचा भावार्थ आहे.) म्हणून 'वृक्षव्' या पदापुढें 'करोति' इत्यादि ('खर्'नें सुरू होणारे पद असले तरी प्रकृत सूत्रानें वकाराचा लोप होऊ शकणार नाहीं (कारण वर सांगितल्याप्रमाणे 'वृक्षव्' यातील वकाराचा लोप केल्यास, त्या शब्दाहून ज्ञात होणाऱ्या अर्थाचा बोध होऊ शकणार नाहीं ) म्हणून (तशा उदाहरणात वकारलोप न व्हावा याकरितां) प्रकृत सूत्रात 'अशि' या पदाची अनुवृत्ति करून ते अनुवृत्त पद 'हलि' याचे विशेषण मानणे हें सर्व व्यर्थ आहे असे हरदत्तादिकाच्या

ग्रन्थावरून सूचित होतें (कारण वरील उदाहरणात वकारलोप केल्यानें यथार्थ बोध न होण्याची आपत्ति येते हे वर सांगितलेंच आहे.) 'लण्' या शिवसूत्रावरील भाष्यात "न पदान्ताः परेऽणः सन्ति," म्हणजे पदाच्या अन्ती 'ह् य् व् र् ल्' हे 'अण्' मुळींच येत नाहींत, असें जें भाष्यकारांनीं म्हटलें आहे त्या भाष्याशीं विरोध येत असल्यामुळें, ('उत्तरार्थं तर्हि वग्रहणं कर्तव्यं·· वृक्षव् करोति' असें जें 'भोभगो' या सूत्रावरील भाष्यात म्हटलें आहे तें देखील सिद्धान्तीचें म्हणणें नसून) तें भाष्य एकदेशीचीच उक्ति आहे हें सिद्ध होतें.

मनोरमा—अहोरात्र इति । "रात्राह्नाहाः—इति पुंस्त्वम् । अहरादीनामिति । उभयत्राप्यादिशब्दः प्रकारे । तेन 'स्वर्चक्षो रथिनः सत्यशुष्मः । विप्रः कविः काव्येन स्वर्चनो' इत्यादि ग्राह्यम् ।

('रोऽसुपि' सू १७२ या सूत्रावरील कौमुदीत पठित केलेल्या 'रूपरात्रिरथन्तरेषु रुत्वं वाच्यम्' या वार्तिकान्वयें 'अहोरात्रः' या उदाहरणात 'अहन्' शब्दातील अन्त्य नकाराचे जागीं रेफ न होता 'रु' होतो व) 'रात्राह्नाहाः पुंसि' सू. ८१४ या सूत्रान्वयें 'अहोरात्रः' हा समाहारद्वन्द्व पुल्लिंगी होतो. (व 'अहस्सर्वैकदेश-संख्यातपुण्याच्च रात्रेः' सू. ७८७ या सूत्रान्वयें तद्धित 'अच्' प्रत्यय होऊन व 'यस्येति च' सू. ३११ या सूत्रानें 'रात्रि' यातील अन्त्य इकराचा लोप होऊन 'अहोरात्रः' असें रूप सिद्ध होतें.) 'अहरादीनां पत्यादिषु वा रेफः' या प्रकृत सूत्रावरील वार्तिकात जो दोन ठिकाणीं 'आदि' शब्द पठित आहे तो प्रकाराचा, म्हणजे सादृश्याचा, वाचक आहे. (पदान्तीं रेफ असून त्यापुढें 'खर्' आल्यास, ज्या उदाहरणात 'खरवसानयोर्विसर्जनीयः' या सूत्रान्वयें रेफाचा नित्य होणारा विसर्ग न होता, रेफ विकल्पेंकरून कायम राहतो तीं सर्व प्रकृत वार्तिकाचीं उदाहरणें समजावीं.) त्यामुळेंच, 'स्वर्चक्षो रथिनः सत्यशुष्मः' व 'विप्रः कविः काव्येन स्वर्चनः' या श्रुतींतील स्वर्चक्षः

व 'स्वर्चन' इत्यादि रूपें प्रकृत वार्तिकाची उदाहरणे समजावी (या दोन्ही उदाहरणात 'स्वर्' या पदाच्या अन्ती रेफ असून व त्यापुढे चकार हा 'खर्' असून देखील रेफ कायम ठेविला आहे )

मनोरमा–तृढो वृढ इति। ऊदित्त्वेन वेट्कत्वात् "यस्य विभाषा" इति निष्ठायां नेट्। ढत्वधत्वष्टुत्वढलोपा। यत्तु प्राचा प्रत्युदाहृत वृढ इति तन्न। तत्र ढलोपस्यैवाभावात्। तथा हि। "वृढ स्थूलबलयो" इति सूत्रेण वृहेर्नकारहकारयोर्लोप, तकारस्य ढत्व च निपात्यते। न त्वसिद्धकाण्डस्थढत्वस्येह प्रवृत्ति "दादेर्धातो-" इति घत्वेन बाधात्। न च इडभावो ढत्व च निपात्यता धत्वष्टुत्वढलोपास्तु भविष्यन्त्यवेति वाच्यम्। तथा सति परिवृढय्येत्यत्र "ल्यपि लघुपूर्वात्" इति णेरयादेशो न स्यात्। पारिवृढीकन्येत्यत्र "अणिञो -" इति ष्यङ् च स्यात्। ढलोपस्यासिद्धत्वेन गुरूपोत्तमत्वाविति भाष्ये स्थितम्। यत्तु प्राचा व्याख्यात वृहेरेवेद निपातन, वृह वृद्धाविति तु प्रकृत्यन्तरम्। तस्य निष्ठायामागमशास्त्रस्यानित्यत्वाविडभावे "वा द्रुह"–इत्यत्र "वा" इति योगविभागात् पक्षे घत्वाभावे ढलोपे च प्रत्युदाहरणमिद द्रष्टव्यमिति। तन्न। उभयोरपि निपातनाभ्युपगमात्। तदाह वामन –अय वृहि प्रकृत्यन्तरमस्ति तस्याप्येतन्निपातन नलोपवजमिति। युक्त चैतत्। अन्यथा हि अस्माद् णेरय न स्यात्, ष्यङ् च स्यात्।

('ढ्रलोप पूर्वस्य दीर्घोऽण' सू १७४ या सूत्रावरील कौमुदीत 'तृढ' व 'वृढ' ही त्या सूत्राचा प्रत्युदाहरणे दिली आहेत ) 'तृहू हिंसायाम्' व 'वृहू उद्यमने' हे धातु ऊदित् असल्यामुळे, ( स्वरतिसूति' सू २२७९ या सूत्रान्वयें ) 'वेटक' आहेत, म्हणजे त्याच्यापुढे येणाऱ्या वलादि आर्धधातुक प्रत्ययाना विकल्पेंकरून इडागम होतो त्यामुळें त्या धातुपुढे 'निष्ठा क्त' प्रत्यय आला असता, त्या प्रत्ययाला 'यस्य विभाषा' सू ३०२५ या नियेधक सूत्रान्वयें इडागम होत नाहीं आणि ढत्व, धत्व, ष्टुत्व, ढलाप ही कार्यं होतात.

('तृह्+क्त' किंवा 'वृह+क्त' या दोन्ही स्थली, वर सांगितल्या-प्रमाणें, 'क्त = त' प्रत्ययाला इडागम न होतां, 'हो ढः' सू ३२४ या सूत्रानें या दोन्ही धातूंतील अन्त्य हकाराचा ढकार होऊन व 'झषस्त-थोर्धोऽधः' सू २२८० या सूत्रानें 'क्त' प्रत्ययांतील तकाराचा धकार होऊन व 'ष्टुना ष्टुः' सू ११३ या सूत्रानें त्या धकाराचा ढकार होऊन आणि 'ढो ढे लोपः' सू २३३५ या सूत्रानें पूर्व ढकाराचा लोप होऊन 'तृढ, वृढ' अशीं रूपें सिद्ध होतात व 'अ, इ, उ' हे 'अण्' असून ऋ हा 'अण्' नसल्यामुळें, या धातूंतील ऋकार 'ढ्लोपे' सू १७४ या सूत्रान्वयें दीर्घ होत नाहीं आणि अशा रीतीनें हीं रूपें प्रकृत सूत्राचीं प्रत्युदाहरणें ठरतात म्हणूनच 'अणः किम्? तृढ, वृढ' असें दीक्षितांनीं प्रकृत सूत्रावरील कौमुदींत म्हटलें आहे ) प्रक्रियाकौमुदीकारांनीं 'अणः किम्? दृढः' असें जें प्रकृत सूत्राचें प्रत्युदाहरण दिलें आहे तें बरोबर नाहीं या उदाहर-णांत ढलोपाची प्राप्तीच नाहीं याचें कारण हें आहे कीं, 'दृढ स्थूल-बलयोः' सू ३०६० या सूत्रानें 'दृहि दृह्' धातूंतील नकाराचा व हकाराचा लोप आणि निष्ठा तकाराचें ढत्व हीं कार्यें निपातनानें होतात (व तसेंच त्या सेट्क धातूपुढील क्त = त या वगैरे आर्ध-धातुक प्रत्ययांना जो इडागम प्राप्त आहे तो देखील निपातनानें होत नाहीं )या उदाहरणांत असिद्धकाण्डांत पठित असलेल्या 'हो ढः' या सूत्रानें दृह् धातूंतील अन्त्य हकाराचें ढत्व होऊं शकत नाहीं, कारण 'वादपाठाप' सू ३२५ या सूत्रानें होणाऱ्या पत्वानें त्या ढत्वाचा बाध होतो ('दृढः स्थूलबलयोः' या सूत्रानें ) इडागमाचा अभाव व धातूंतील अन्त्य हकाराचें ढत्व हीं दोन कार्यें निपातनानें होऊं द्या व धाराचा ढत्व, ष्टुत्व, ढलोप हीं कार्यें सामान्य रीतीनें होतीलच असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं तें म्हणणें बरोबर मानल्यास, 'परिवृढस्य' या रूपानीं 'स्थवि सपुत्रवान्' सू ३३३६ या सूत्रानें 'पि' च आगम अवादेश न होण्याचा आपत्ति येईल व त्याप्रमाणें 'पारिवृढी कन्या' या रूपाला

'अनित्रोः' सू. ११९८ या सूत्राने 'प्यङ्' होण्याची आपत्ति येईल; कारण ढलोप असिद्ध असल्यामुळें ऋकार गुरु ठरेल असे भाष्यात सांगितले आहे. ( 'दृहि' धातु इदित् असल्यामुळें 'इदितो नुम्धातोः' सू २२६२ या सूत्रानें त्याला नुमागम होतो व त्या धातूहून 'क्त' हा कित् प्रत्यय केला असता, तो धातु अनिदित् नसल्यामुळें, अनिदितां हल उपधायाः.' सू. ४१५ या सूत्रानें होणाऱ्या नकारलोपाची प्राप्ति होत नाही. तसेच त्या धातूच्या अन्ती जरी हकार आहे तरी तो धातु दकारानें सुरू होणारा असल्यामुळें, 'हो ढः' या सूत्रानें होणाऱ्या ढत्वाची प्राप्ति न होता, 'दादेर्धातोर्घः' या अपवादक सूत्रानें घत्वाची प्राप्ति होते. त्याचप्रमाणे त्या 'सेट्क' धातूपुढील वलादि 'क्त = त' या आर्धधातुक प्रत्ययाला 'आर्धधातुकस्येड्वलादेः' सू. २१८४ या सूत्रानें इडागमाची प्राप्ति आहे म्हणून टीकाकार म्हणतो की, 'दृहि = दृह्' या इदित् धातूतील जो नकारलोप पावला नाही व अन्त्य हकाराचें ढत्व पावले नाही आणि 'क्त' प्रत्ययाला जो इडागम पावला आहे ही तीन्ही कार्यें, म्हणजे नकारलोप, ढत्व, इडागमाभाव, 'दृढ. स्थूलबलयोः' सू. ३०६० या सूत्रानें निपातनानें होतात असें माना व बाकीची सर्व कार्यें घत्व, ष्टुत्व व ढलोप-मामुली तऱ्हेनें पाणिनीय सूत्रांनी होतीलच. सारांश 'दृह्' धातूतील हकाराचा लोप व निष्ठा तकाराचे ढत्व निपातनानें होतात असे जें दीक्षितांनी 'दृढ· स्थूलबलयो.' या सूत्रावरील कौमुदींत म्हटले आहे तसें मानण्याची काहीच गरज नाही. म्हणून 'दृह् + क्त' या स्थली निपातनानें इडभाव, नकारलोप व धातूतील अन्त्य हकाराचें ढत्व केल्यावर 'दृढ् + त' अशी स्थिति झाली असता, 'त' या वलादि प्रत्ययाला निपातनानें इडागम होत नसल्यामुळें, त्या प्रत्ययातील तकाराचा 'झषस्तथो' सू. २२८० या सूत्रानें धकार होऊन व नंतर 'ष्टुना ष्टुः' सू. ११३ या सूत्रानें त्या धकाराचा ढकार होऊन आणि 'ढो ढे लोपः' सू. २३३५ या सूत्रानें पूर्व ढकाराचा लोप होऊन 'दृढः' असें 'दृह्' धातूचें

क्तप्रत्ययान्त रूप होतें. या उदाहरणांत ज्या पूर्वं ढकराचा लोप झाला आहे त्याच्या लगेच पूर्वी असलेला ऋकार हा 'अण्' नसल्यामुळें, 'ढ्रूलोपे' या प्रकृत सूत्रानें 'अण्' ला होणारे दीर्घकार्य त्या ऋकारास होत नाही व अशा रीतीनें 'दृढः' हे प्रकृत सूत्रांतील 'अणः' याचें योग्य प्रत्युदाहरण ठरत असें शंकाकाराचें म्हणणें आहे. या शंकेवर दीक्षित असें उत्तर देतात की, शंकाकाराचें म्हणणें बरोबर मानल्यास, 'परि-ढ्रढय्य' व 'पारिदृढी' ही इष्ट रूपें सिद्ध न होण्याची आपत्ति येईल. 'दृढ' या क्तप्रत्ययान्त शब्दाची प्रक्रिया नुकतीच वर दिली आहे. 'परि' या उपसर्गपूर्वक 'दृढ' या प्रातिपदिकाहून 'प्राति-पदिकाद्धात्वर्थे बहुलमिष्ठवच्च' या गणसूत्रान्वयें 'णिच्' प्रत्यय केला असता, 'परि+दृढ+णिच्' अशा स्थितींत इष्ठवद्भावानें 'दृढ' यांतील ऋकाराचे जागी 'र ऋतो हलादेर्लघोः' सू. १७८५ या सूत्रानें 'र' असा आदेश होऊन व इष्ठवद्भावानें 'टेः' सू. १७८६ या सूत्रानें टिलोप–अन्त्य अकाराचा लोप–होऊन 'परिद्रढ् णि' अशी स्थिति होते व 'सनाद्यन्ता धातवः' सू. २३०४ या सूत्रानें या णिजन्त शब्दाला धातुसंज्ञा झाली असतां त्याहून 'क्त्वा' प्रत्यय केल्यास, 'समासेऽनञ्पूर्वे क्त्वो ल्यप्' सू. ३३३२ या सूत्रानें 'क्त्वा' चे जागी ल्यबादेश होतो व 'परिद्रढ् णि ल्यप्' अशी स्थिति होते. या उदाहरणांत 'दृढ' या शब्दाची शंकाकाराच्या रीतीनें सिद्धि करतेवेळी 'ढो ढे लोपः' या त्रैपादिक सूत्रानें झालेला ढकाराचा लोप 'ल्यपि लघुपूर्वात्' या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें असिद्ध ठरत असल्यामुळें तो झालाच नाही व 'णि' चे पूर्वी 'द्र' यांतील अकारापुढें 'ढ्' हा वर्ण आहे असें मानणें भाग पडेल आणि 'संयोगे गुरु' सू. ३२ या सूत्रान्वयें तो अकार गुरु ठरेल आणि अशा रीतीनें 'णि' च्या पूर्वी लघु वर्ण आहे असें मानतां येऊं शकत नसल्यामुळें, त्या णिचे जागीं ल्यादेश न होण्याची आपत्ति येईल व 'परिद्रढय्य' असें इष्ट रूप सिद्ध होऊं

शकणार नाही. पण 'दृढ. स्थूलबलयोः' या सापादिक सूत्रानेंच 'दृह्' यातील नकाराचा व हकाराचा लोप व त्यापुढें असलेल्या 'क्त' प्रत्ययातील तकाराचे जागी ढकार निपातनाने होतो असे मानल्यास दोन ढकार एकत्र येत नाहीत व अशा रीतीनें 'परिदृढ् णि ल्यप्' यातील 'णि' पूर्वी असणारा ढकार संयोग ठरत नसल्यामुळें, त्याचे पूर्वी असणारा अकार लघु ठरतो व त्यामुळें णिचे जागीं अयादेश होण्यास काही अडचण येत नाही. तसेच 'परिदृढस्य अपत्यं पुमान् पारिदृढि' या स्थली 'अत इञ्' सू. १०९५ या सूत्रानें अपत्यार्थक अनार्ष 'इञ्' प्रत्यय होऊन व 'तद्धितेष्वचामादेः' सू. १०७५ या सूत्राने आद्य अचाची वृद्धि होऊन आणि 'यस्येति च' सू. ३११ या सूत्रानें 'परिदृढ' यातील अन्त्य अकाराचा लोप होऊन 'पारिदृढि' असे रूप होते. या शब्दाचे स्त्रीलिङ्गाचे रूप करिताना असिद्धकाण्डातील सूत्रान्वयें 'दृढ' हा शब्द सिद्ध झाला आहे असे मानल्यास, 'अणिञोः' सू. ११९८ या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें 'ढो ढे लोप.' या त्रैपादिक सूत्रानें झालेला ढकारलोप असिद्ध ठरत असल्यामुळें तो झालाच नाहीं व 'दृढ' यातील ऋकारापुढें 'ढ्ढ्' हा संयोग आहे असे मानणे भाग पडेल. असे मानल्यास, 'दृढ' यातील ऋकार 'संयोगे गुरु' या सूत्रानें गुरु ठरेल व 'अणिञो' या सूत्रानें 'ष्यङ् = य' आणि 'यङश्चाप्' सू. ५२८ या सूत्रानें 'चाप् = आ' हे स्त्रीप्रत्यय होऊन 'पारिदृढ्या' असे अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येईल. परंतु 'दृढः स्थूलबलयो' या सापादिक सूत्रानेंच धातूतील हकाराचा लोप व 'क्त' प्रत्ययातील तकाराचे जागी ढकार निपातनानें झाला आहे असे मानल्यास, दोन ढकार एकत्र येऊच शकत नाहीत व त्यामुळें 'दृढ' यातील ऋकार गुरु ठरण्याचा प्रसंगच येत नाहीं आणि त्यामुळें 'अणिञोः' या सूत्राची प्रवृत्ति होऊ शकत नाहीं व 'इतो मनुष्यजातेः' सू. ५२० या सूत्रानें 'ङीष्' प्रत्यय होऊन 'पारिदृढी' असे स्त्रीलिङ्गाचे इष्ट रूप सिद्ध होते असे 'दृढः स्थूलबलयोः'

७-२-२० या सूत्रावरील भाष्यात सांगितले आहे आणि म्हणून शंका-काराची शंका भाष्यविरुद्ध असल्यामुळें अयोग्य ठरते असे दीक्षिताचें म्हणणें आहे. त्या सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात– 'दृढ, निपातन क्रियते, नकारहकारलोपार्थम् । नकारहकारलोपो यथा स्यात् । परस्य च ढत्वार्थम् । परस्य च ढत्व यथा स्यात्·· अनिड्वचने ह्रिरभावस्याऽप्रसिद्धिः स्यात् । द्रढीयान् । किं कारणम् ? अलघुत्वात् । नलोपवचने च । न लोपश्च वक्तव्यः । इह च परिद्रढय्य मत.– ल्यपि लघुपूर्वस्येत्ययादेशो न स्यात् । इह च पारिदृढी कन्येतिगुरूपोत्तम-लक्षणः ष्यङ् प्रसज्येत ।' या भाष्यावरून हे स्पष्ट होतें की, 'दृहि = दृंह्' धातूतील नकाराचा व हकाराचा निपातनानें लोप होऊन व तसेच त्या धातूपुढील निष्ठा 'क्त' प्रत्ययाला निपातनानें इडागम न होता त्या प्रत्ययातील तकाराचे जागी निपातनानें ढकार होऊन 'दृढः' असे क्तप्रत्ययान्त रूप निपातनानें सिद्ध होतें आणि शंका-कारानें जी शंका केली आहे ती या वरील भाष्याच्या विरुद्ध असल्या-मुळें अनुपपन्न ठरते हे उघड होतें.) प्रसादकारानी (प्रकृत सूत्रावरील प्रक्रियाकौमुदीत 'अणः किम् ? दृढः' हे जें प्रत्युदाहरण दिलें आहे त्याचें व्याख्यान करिताना) असे म्हटलें आहे की, 'दृढ' हे 'दृह्' धातूचेंच निपातनानें झालेलें क्तान्त रूप आहे. 'दृह् वृद्धौ' हा वेगळा धातु आहे. त्या 'दृह्' धातूहून निष्ठा क्तप्रत्यय केला असता, आगमशास्त्र अनित्य असल्यामुळें, त्या क्तप्रत्ययाला इडागम होत नाही व 'वा द्रुहमुहष्णुहष्णिहाम्' सू. ३२७ या सूत्राचा 'वा' असा योगविभाग केल्यानें 'दृह्' धातूतील हकाराचें घत्व न होता विकल्पेंकरून ढत्व होतें व नंतर पूर्व ढकाराचा लोप झाला असता 'दृढ' असे जें रूप सिद्ध होतें तें हें प्रत्युदाहरण होय. (प्रसाद-कारानी प्रक्रियाकौमुदीतील 'दृढः' हे प्रतीक घेऊन 'नात्र दृढः स्थूलबलयोः इति निपातो गृह्यते । तस्य निपातनादेव दीर्घाभाव-सिद्धेः प्रत्युदाहरणत्वानुपपत्तेः । किंतु दृह वृद्धावित्यस्य निष्ठाया-मागमशासनस्यानित्यत्वेनेडभावे, वा द्रुहमुह इति वा इति योगवि-

भागात् पक्षे घत्वाभावे ढत्वे ष्टुत्वे ढलोपे च रूपम्' असे म्हटले आहे प्रसादकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, 'दृढः स्थूलबलयो' सू. ७-२-२० या सूत्रावरील भाष्यात 'दृढनिपातन किमर्थं नकारहकारलोपार्थम् । नकारहकारलोपौ यथा स्याताम् । परस्य च ढत्वं यथा स्यात्' असे भाष्यकारानी म्हटले असल्यामुळें त्या भाष्यावरून हे स्पष्ट होते की, 'दृह्' धातूत नकार नसल्यामुळें त्या 'दृह्' धातूचे ठिकाणी नकारलोपाची प्राप्ति नसून 'दृहिः दृंह्' या इदित धातूचेच ठिकाणी निपातनानें नकारलोप पावत असल्यामुळें, 'दृढ' हे 'दृह्' धातूचे निपातनानें होणारे क्तान्त रूप नसून 'दृंह्' धातूचेच निपातनानें सिद्ध झालेले क्तान्त रूप आहे व प्रक्रियाकौमुदीकारानी प्रकृत सूत्राचे 'दृढ' हे जें प्रत्युदाहरण दिले आहे ते 'दृह्' धातूचे क्तान्त रूप नसून 'दृंह्' धातूचेच क्तान्त रूप आहे मग जर 'दृह' धातूहून झालेले 'दृढ' हे क्तान्त रूप निपातनानें सिद्ध झाले नाही व मामुली रीतीनें पाणिनीयशास्त्रप्रक्रियान्वयें सिद्ध झाले आहे असे मानले तर, त्या 'सेट्क' धातूपुढील 'क्त = त' या वलादि आर्धधातुक प्रत्ययाला 'आर्धधातुकस्येट्' सू. २१८४ या सूत्रानें इडागम व्हावयास पाहिजे होता अशी कोणी शंका घेतल्यास, त्या शंकेवर प्रसादकार असे उत्तर देतात कीं, 'आगमशास्त्रमनित्यम्'-परि ९५-या परिभाषान्वयें आगमशास्त्र अनित्य असल्यामुळें, येथें इडागम झाला नाही. पण आगमशास्त्र अनित्य असल्यामुळें प्रकृत स्थली 'त' प्रत्ययाला इडागम झाला नाही असे जरी मानले तरी, 'दृह्' धातू दकारानें सुरु होणारा असल्यामुळें 'दादेर्धातोर्घः' सू. ३२५ या सूत्रानें 'दृह्' धातूतील अन्त्य हकाराचे जागी घकार पावला आहे व घकारादेश केल्यास, घकार हा टवर्गातील वर्ण नसल्यामुळें 'ष्टुना ष्टुः' सू. ११२ हे सूत्र प्रवृत्त होऊं शकत नाही व तकाराचा ढकार होऊं शकत नाहीं आणि त्यामुळें ढलोपाची प्राप्तीच होऊ शकत नाहीं अशी कोणी शंका केल्यास, त्या शंकेवर प्रसादकार असे उत्तर देतात की,

'वा द्रुहमुह' सू ३२७ या सूत्राचा 'वा' असा योगविभाग करून त्या योगविभागानें बनलेल्या 'वा' या पृथक् सूत्राचा 'दादधाता-र्घो वा' म्हणजे दकारानें सुरु होणाऱ्या हकारान्त धातूतील अन्त्य हकाराचे विकल्पेंकरून घत्व होतें, असा अर्थ होतो व अशा रीतीनें घत्व वैकल्पिक ठरत असल्यामुळें तें घत्व विकल्पेंकरून न केल्यास व ढकार केल्यास व पुढील 'क्त' प्रत्ययातील तकाराचे जागीं 'झषस्त-थाेधः' सू २२८० या सूत्रानें धकार करून व नंतर 'ष्टुना ष्टुः' या सूत्रानें त्या धकाराचा ढकार करून, 'ढो ढे लोपः' सू २३३५ या सूत्रानें पूर्व ढकाराचा लोप केला असता, 'दृढ' असें 'दृह' धातूचें जें क्तान्त रूप सिद्ध होतें तें प्रक्रियाकौमुदींत प्रत्युदाहरण-स्थानें दिलें आहे असें प्रसादकाराचें म्हणणें आहे यावर दीक्षित असें म्हणतात कीं, प्रसादकाराचें ) हें म्हणणें बरोबर नाहीं, कारण 'दृढ' हें जें निपातनानें सिद्ध झालेलें क्तान्त रूप आहे तें 'दृह' व 'दृह्' या दोन्ही धातूंचे रूप आहे असें वैयाकरणांना मानलें आहे उदाहरणार्थ वामनानें सांगितलें असें म्हटलें आहे कीं 'दृह' हा भिन्न धातु आहे त्याचेंसुद्धां 'दृढ' हें निपातनानें सिद्ध झालेलें रूप आहे फरक एवढाच कीं, 'दृह' धातूतील नकाराचा निपातनानें जो लोप होतो तो 'दृह्' धातूचे ठिकाणीं (नकाराचा अभाव असल्यामुळें) पावत नाहीं वामनानें जें हें म्हटलें आहे तें अगदीं योग्य आहे तें म्हणणें बरोबर न मानल्यास, 'दृह्' धातूहून सिद्ध झालेल्या 'दृढ' या शब्दाहून 'णिच्' प्रत्यय केला असता, 'णि' चे जागीं वृद्धि होणार नाहीं व ('परिदृढी कन्या' या स्थलीं) 'ष्यङ' होण्याची आपत्ति येईल ('दृढ स्थूलबलयोः' या सूत्रावरील वृत्तींत वामनानें 'दृढ इति निपात्यते स्थूलबलवति चार्थे । दृढ स्थूलः । दृढो बलवान् । किमत्र निपात्यते । दृह क्तप्रत्यय इडभावः । हकार-नकारयोर्लोपः । परस्य ढत्वम् । अथ दृहि प्रकृत्यन्तरमस्ति । तत्रा-प्येतदेव सर्वं नलोपवर्जम् । नकारस्याभावात् । हलोपनिपातनं

पूर्वत्रासिद्धत्वनिवृत्त्यर्थम् । ढलोपे हि सति तस्य पूर्वत्रासिद्धत्वाद् द्रढिमा द्रढियान् द्रढयतीत्यत्र र ऋतो हलादेर्लघोरिति न स्यात् । इह च परिद्रढय्यागत इति ल्यपि लघुपूर्वादिति णेरयादेशो न स्यात् । इह च परिदृढस्यापत्यं पारिदृढी कन्येति गुरूपोत्तमलक्षण ष्यङ् च प्रसज्येत । स्थूलबलयोरिति किम् । दृहितम् । दृंहितम् । 'असे म्हटले आहे' व या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी जें म्हटले आहे त्याचाच हा अनुवाद आहे आणि या सर्व विषयाचें विवरण वर मनोरमेंत केलेच आहे अधिक विवरण शब्दरत्नात केले जाईल.)

शब्दरत्न—इडभावो ढत्वं चेति । चेन नलोपसङ्ग्रहः । ढलोप इति । 'ढो ढे लोप' इत्येतद्बुद्ध्या प्युत्वं तु नासिद्धं सामर्थ्यादिति भाव । भाष्येऽप्यतमिति । "दृढः स्थूल—" इति सूत्रे शेषः । इष्टव्यमितीति । ष्यङि णेरयाभावे चेष्टापत्तिरिति भावः । उभयोरपीति । स्वरमलम्बभूतेन वृत्तिकृतेति शेषः । तदाह—वामन इति । अत्रार्षबीज तु बृहेर्नकारहकारलोपार्थमिति भाष्यविरोध । अनिर्वितो बृहेस्तु बृहितमित्येवेष्यत इति कैयटविरोधश्चेति । किं च प्रसादोत्तरीत्या बृहेरपि इडभावढत्वयोः सिद्धाविभ्निषेधप्रकरणे दृढ इति निपातनस्य व्यर्थत्वमित्यलम् ।

'इडभावो ढत्वं च निपात्यनाम्' असें जें मनोरमेंतील वाक्यांत म्हटलें आहे त्यातील 'च' या पदानें नकारलोपाचा दखील समावेश होतो ('दृह्' धातूतील अन्त्य हकाराचे जागी ढकार होणे व त्या धातूपुढील 'क्त' प्रत्ययाला इडागम न होणे हीं कार्ये पाणिनी नसून दखील जशी 'दृढ स्थूलबलयो' या सूत्राच्या सामर्थ्यानें निपातनानें होतात त्याचप्रमाणे नकारलोप पावला नसून दखील निपातनानेंच होतो सारांश वरील तीनें निपातनानेंच होतात असें सार असतां, 'दृह्' धातूच 'दृढ' हें रूप सिद्ध होऊं शकत असल्यामुळे, त्या धातूतील अन्त्य हकाराचा लोप व 'क्त' प्रत्ययातील तकाराचे जागी ढकार होणे ही दोन कार्ये दखील निपातनानें होतात

हे मानण्याची काहीं गरज नाहीं असे शंकाकाराचे म्हणणे आहे. पण हे शंकाकाराचे म्हणणे भाष्यविरुद्ध असून ते म्हणणे बरोबर मानल्यास 'द्रढीयान् द्रढिमा, परिद्रढय्य' इत्यादि इष्ट-रूपांची सिद्धि होऊं शकत नसल्यामुळें, ते म्हणणे बरोबर मानतां येत नाहीं असे दीक्षितांनी मनोरमेंत सांगितलेंच आहे.) 'धत्वष्टु-त्वढलोपास्तु भविष्यन्त्येव' असे जें मनोरमेंतील शंकाग्रन्थांत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, 'ढो ढे लोपः' या सूत्राच्या आरम्भ-सामर्थ्यानें त्याच्या दृष्टीनें 'ष्टुना ष्टुः' या सूत्रानें होणारे ष्टुत्व असिद्ध ठरत नाहीं. ('ढो ढे लोपः' सू. २३३५ हें त्रैपादिक पूर्व सूत्र असून 'ष्टुना ष्टुः' सू. ११३ हें त्रैपादिक उत्तर सूत्र आहे. म्हणून 'पूर्वत्रासिद्धम्' या वचनान्वयें 'ढो ढे लोपः' या पूर्व त्रैपादिक सूत्रानें ढकारलोप करतेवेळी 'ष्टुना ष्टुः' या त्रैपादिक उत्तर सूत्रानें झालेले ष्टुत्व दत्व–असिद्ध ठरतें असें मानल्यास, पूर्व ढकाराचा लोप होऊं शकणार नाहीं व 'दृढः' असें इष्ट रूप सिद्ध होऊं शकणार नाहीं. परंतु 'ष्टुना ष्टुः' हें सूत्र प्रवृत्त केल्याशिवाय ढकारापूर्वी ढकार येणे अशक्य असल्यामुळें, 'ढो ढे लोपः' हें सूत्र प्रवृत्त न केल्यास तें 'व्यर्थ ठरण्याची आपत्ति येईल. सारांश 'ष्टुना ष्टुः' या उत्तर त्रैपादिक सूत्रानें होणाऱ्या कार्यांचा अनुवाद करून 'ढो ढे लोपः' हें पूर्व त्रैपादिक सूत्र आरम्भिलें असल्यामुळें, त्या आरम्भसामर्थ्यानें 'ढो ढे लोपः' या सूत्राच्या दृष्टीनें 'ष्टुना ष्टुः' या सूत्रानें झालेलें ष्टुत्व असिद्ध ठरत नाहीं असा शंकाकाराच्या म्हणण्याचा भावार्थ आहे.) 'भाष्ये स्थितम्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्यापूर्वी 'दृढः स्थूलबल-योरिति सूत्रे' हीं पदें अध्याहृत आहेत म्हणजे 'दृढः स्थूलबल-योरिति सूत्रे भाष्ये स्थितम्' असा तो पंक्ति वाचावी. 'प्रत्युदा-हरणमिदं द्रष्टव्यमिति' असें जें प्रसादकारांनी म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, ('दृह्' धातूहून 'क्त' प्रत्यय केला असतां 'दृढ' असें जें श्नान्त रूप सिद्ध होतें त्याहून 'णिच्' प्रत्यय केल्यास) 'णिचे

जागी अयादेश न होण्याची जी आपत्ति येते (व तसेच 'दृढ' शब्दाहून अपत्यार्थक अनार्ष 'इञ्' प्रत्यय केला असता) 'ष्यङ्'-होण्याची जी आपत्ति येते या दोन्ही इष्टापत्तीच आहेत (सारांश प्रसादकाराच्या मते 'दृह्' धातूहून सिद्ध होणाऱ्या 'दृढ' या शब्दाचीच 'परिद्रढय्य, पारिदृढी' इत्यादि रूपें होऊ शकतात व 'दृह्' धातूहून सिद्ध होणाऱ्या 'दृढ' या शब्दाची तशी रूपें मुळीच होऊ शकत नाहीत) 'उभयोरपि निपातनाम्युपगमात्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्या पूर्वी 'स्वस्वलम्बभूतेन वृत्तिकृता' ही पदे अध्याहृत आहेत, आणि म्हणूनच 'तदाह वामन' असे दीक्षितानी मनोरमेंत म्हटले आहे (पण 'दृह्' व 'दृह्' या दोन्ही धातूचे 'दृढ' असे क्तान्त रूप 'दृढ स्थूलबलयो' या सूत्रान्वयें निपातनानें सिद्ध होते असे वामनाचे म्हणणे आहे तरी, प्रक्रियाकौमुदीकारानी 'अणः किम्' याचे प्रकृत सूत्रावरील वृत्तीत 'दृढ' हें जें प्रत्युदाहरण दिले आहे त्यावरून हे सिद्ध होते की, प्रक्रियाकौमुदीकाराना वामनाचे हे म्हणणे मान्य नसून, 'दृह्' धातूचेच निपातनानें सिद्ध झालेले 'दृढ' हें रूप आहे व 'दृह्' धातूचे निपातनानें सिद्ध झालेलें हे रूप नव्हे असे त्याचे मत आहे, कारण जर ते रूप त्याच्या मते 'दृह्' धातूचे देखील निपातनानें सिद्ध झालेले रूप असते तर त्यानी ते रूप प्रत्युदाहरणरूपानें दिले नसते. प्रक्रियाकौमुदीकाराना वामनाचे मत मान्य नाहीं याचे उघड कारण हे आहे की,) 'दृहेर्नकारहकारलोपार्थम्' असे भाष्यवचन असल्यामुळें वामनाचे मत त्या भाष्यवचनाविरुद्ध ठरते व तसेच 'अनिदितो दृहेस्तु दृहितमित्येप्यते' असे जें कैयटानें म्हटले आहे ते देखील वामनाच्या मताविरुद्ध जाते. (सारांश जरी प्रसादकाराचे मत वामनाच्या मताविरुद्ध आहे तरी वामनाचे मत भाष्यविरुद्ध असल्यामुळें, प्रसादकारानी त्या मताचा स्वीकार केला नाही हे अयोग्य ठरत नसून उलट योग्यच ठरतें असे प्रसादकारानुयायीचे म्हणणे आहे.) पण प्रसादकाराच्या म्हणण्याप्रमाणे 'दृह्' धातूचे देखील इडागम न केल्यानें व ढत्व केल्यानें 'दृढ'

असें क्तान्त रूप सिद्ध होऊं शकतें असें मानल्यास, 'दृढः स्थूलबलयोः', हें जें निपातनसूत्र इडागमनिषेधप्रकरणात पठित केलें आहे तें व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. ('दृह्' व 'दृहि = दृंह्' धा. न. ७३३, ७३४ हे दोन्ही धातु भ्वादिगणात पठित असून त्यांचा अर्थ सारखाच आहे व हे दोन्ही धातु सेट्क असून दकारानें युक्त होणारे हकारान्त धातु आहेत त्यामुळें त्यांच्या अन्त्य हकाराचे 'दादेर्धातोर्घः' सू ३२५ या सूत्रानें घत्व पावतें व त्याच्या पुढें 'क्त = त' हा वलादि आर्धधातुक निष्ठाप्रत्यय आला असतां, त्या प्रत्ययाला 'आर्धधातुकस्येट्' सू २१८४ या सूत्रानें इडागम पावतो. 'आगमशास्त्रमनित्यम्' ही परिभाषा स्वीकारून प्रसादकारानीं 'दृह्' धातूपुढें येणाऱ्या 'क्त' प्रत्ययाला इडागम होण्याचें निवारण केलें आहे आणि 'वा द्रुह' सू. ३२७ या सूत्राचा 'वा' असा योगविभाग करून 'दृह्' धातूतील अन्त्य हकाराचें घत्व होण्याचें निवारण केलें आहे व अशा रीतीनें त्यानीं त्या धातूचें 'दृढ' असें रूप, निपातन न मानता, शास्त्रीयरीत्याच सिद्ध होतें असें म्हटलें आहे हे पूर्वी सांगितलेंच आहे. शेष तऱ्हा 'दृहि = दृंह्' धातूचे ठिकाणी उपयोगात आणल्यास, त्या धातूपुढें येणाऱ्या 'क्त' प्रत्ययाला इडागम होणें व त्या धातूतील अन्त्य हकाराचें घत्व होणें जरी टाळता येतें तरी निपातनानें नकारलोप केल्याशिवाय त्या धातूचें 'दृढ' असें क्तान्त रूप सिद्ध होऊं शकत नाही हे खरं; कारण तो धातु इदित् असल्यामुळें, त्याला 'अनिदितां हल उपधायाः' सू ४१५ हें सूत्र लागू पडत नाही. पण जरी त्या धातूचें तसें क्तान्त रूप निपातन मानल्याशिवाय सिद्ध होऊं शकत नाही तरी, 'दृह्' धातूचें तसें रूप, निपातन न मानता, शास्त्रीयरीत्या प्रसादकाराच्या म्हणण्याप्रमाणें सिद्ध होऊं शकतेंच. मग असें जर आहे तर 'दृढः स्थूलबलयोः' हें निपातनाचें सूत्र इडागमनिषेध प्रकरणात पठित करण्याची गरज काय होती ? जर 'दृह्' किंवा 'दृहि' या दोन्ही धातूचें 'दृढ' असें क्तान्त रूप

निपातन मानल्याशिवाय सिद्ध होऊ शकत नाही असे मानले तरच ते निपातनसूत्र व्यर्थ न ठरता चरितार्थ ठरते म्हणून ते सूत्र चरितार्थ ठरण्याकरिता हे मानणे आवश्यक आहे की, 'दृह्' या सेट्क धातूचे देखील 'दृढ' असे क्तान्त रूप निपातनानेच ढत्व व इडभाव होतो असे मानल्याशिवाय, सिद्ध होऊ शकत नाही व प्रसादकारानी आगमशास्त्र अनित्य मानून व वर सांगितल्याप्रमाणे 'वा' असा योगविभाग करून 'दृह्' धातूचे 'दृढ' असे जें क्तान्त रूप, निपातन न मानता, सिद्ध केले आहे ते त्यांचे करणे चूक ठरते; कारण 'आगमशास्त्रमनित्यम्' ही जी परिभाषा त्यानी स्वीकारली आहे ती भाष्यात कोठेंहि पठित नसल्यामुळें स्वीकारार्ह नाही आणि तसेच 'वा दृह' या सूत्राचा त्यानी जसा योगविभाग केला आहे तसा भाष्यकारानी केला नसल्यामुळें, तसा योग–विभाग करणे देखील प्रमाणरहित व अयोग्य आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.) या विषयाचे एवढें विवेचन पुरे. (सारांश 'दृढः' हे जें प्रकृत सूत्रातील 'अण' याचे प्रक्रियाकौमुदीत प्रत्युदाहरण दिले आहे ते योग्य प्रत्युदाहरण ठरत नाही असे शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचे तात्पर्य आहे )

मनोरमा–उत्वमेवेति सिद्धासिद्धयोरतुल्यबलत्वेन "विप्रतिषेधे परम्–" इत्यस्याप्रवृत्तौ निष्प्रतिपक्षत्वादुत्वमेव भवतीत्यर्थः। तदुक्तम्–पूर्वत्रासिद्धे नास्ति विप्रतिषेधोऽभावादुत्तरस्य इति एतेन विभर्तितकार्य प्राक् पश्चादुत्वमत्वे इत्यादि व्याख्यातम् ।

('विप्रतिषेधे परं कार्यम्' सू. १७५ या सूत्रावरील कौमुदीत) 'पूर्वत्रासिद्धमिति रो रि इत्यस्यासिद्धत्वादुत्वमेव' असं जें म्हटले आहे त्याचा अर्थ हा आहे की, ('हशि च' सू. १६६ हे सापादिक) सिद्धशास्त्र व ('रो रि' सू. १७३ हे त्रैपादिक) असिद्धशास्त्र ही दोन शास्त्रें समानबल नसल्यामुळें, 'विप्रतिषेधे पर कार्यम्' हें प्रकृत सूत्र ('मनस् + रथ = मनर् + रथ' या उदाहरणात 'रो

रि' या परशास्त्राची प्रवृत्ति करून देण्याकरिता) प्रवृत्त होऊ शकत नाही व त्यामुळें ('हशि च' या सापादिक सिद्ध) शास्त्राचा कोणीच प्रतिपक्षी राहत नसल्यामुळें, उत्वच होते ('मनस् + रथ' या उदाहरणात 'ससजुषो रुः' सू. १६२ या सूत्रानें 'मनस्' यातील सकाराचे जागीं 'रु' हा आदेश झाला असता, 'हशि च' या सापादिक पूर्व सूत्राची व 'रो रि' या त्रैपादिक उत्तर सूत्राची युगपत् प्राप्ति होते. या स्थली 'विप्रतिषेधे परं कार्यम्' हे प्रकृत सूत्र प्रवृत्त केल्यास, 'रो रि' या उत्तर सूत्राची प्रवृत्ति झाली पाहिजे व ते सूत्र प्रथम प्रवृत्त झाल्यास, 'मनोरथ' असे इष्ट रूप न होता, त्या उत्तर सूत्रानें पूर्व रेफाचा लोप होऊन व 'ढ्रलोपे' सू. १७४ या सूत्रानें अकार हा 'अण्' दीर्घ होऊन 'मनारथ' असे अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते. पण 'विप्रतिषेधे परं कार्यम्' हें सूत्र या वरील उदाहरणात प्रवृत्त होऊ शकत नाही; कारण जेथें दोन तुल्यबलशास्त्रांची युगपत् प्राप्ति होते तेथेंच ते सूत्र प्रवृत्त होऊं शकते. प्रकृत सूत्रावरील भाष्यात्–१.४.२–भाष्यकार म्हणतात–'विप्रतिषेध इति कोऽयं शब्दः। विप्रतिपूर्वात् सिधेः कर्मव्यतिहारे घञ्। इतरेतरप्रतिषेधो विप्रतिषेधः। अन्योन्यप्रतिषेधो विप्रतिषेधः। कः पुनर्विप्रतिषेधः?।...द्वौ प्रसङ्गौ यदाऽन्यार्थौ भवत एकस्मिंश्च युगपत् प्राप्नुतः स विप्रतिषेधः। क्व पुनरन्यार्थौ क्व चैकस्मिन् युगपत् प्राप्नुत वृक्षाभ्याम् वृक्षेष्वित्यन्यार्थौ, वृक्षेभ्य इत्यत्र युगपत् प्राप्नुतः।' भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, जे दोन विधि एकएकटे निरनिराळ्या उदाहरणामध्यें उपयोगी पडलेले असून वेगळ्या एका उदाहरणात युगपत् प्राप्त होतात त्याला विप्रतिषेध म्हणतात. उदाहरणार्थ 'वृक्षाभ्याम्' या उदाहरणात 'सुपि च' सू. २०२ हें सूत्र प्रवृत्त होऊन चरितार्थ होते आणि 'वृक्षेषु' या उदाहरणात 'बहुवचने झल्येत्' सू. २०५ हे सूत्र प्रवृत्त होऊन चरितार्थ होते. अशा रीतीनें वेगवेगळ्या उदाहरणात प्रवृत्त होऊन सावकाश व चरितार्थ झालेली हीं दोन सूत्रें

वृक्षेभ्य ' या भिन्न उदाहरणात युगपत् प्राप्त होतात. अशा रीतीनें एकाच उदाहरणात इतरत्र चरितार्थ झालेल्या दोन सूत्राची युगपत् प्राप्ति होणे यालाच विप्रतिषेध म्हणतात, व अशा ठिकाणी 'विप्रतिषेधे परं कार्यम्' या प्रकृत सूत्रानें पूर्व शास्त्र बाधित होऊन परशास्त्रच प्रथम प्रवृत्त होत. पण जेथें युगपत् प्राप्त होणारी दोन शास्त्रे समानबल नाहीत तेथें प्रकृत सूत्र प्रवृत्त होत नाहीं, आणि 'पूर्वत्रासिद्धम्' सू. १२ या सूत्रान्वयें सापादिक शास्त्राच्या दृष्टीनें त्रिपादी असिद्ध ठरत असल्यामुळें, म्हणजे त्रिपादी नाहीच असे मानावे लागत असल्यामुळें, 'हशि च' हे सापादिक सूत्र व 'रो रि' हें त्रैपादिक सूत्र ही दोन सूत्रें तुल्यबल ठरत नाहीत आणि त्यामुळें ती दोन सूत्रें प्रकृत सूत्राचा विषय होऊं शकत नाहीत. अशा रीतीनें 'हशि च' या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें 'रो रि' हे त्रैपादिक सूत्र विद्यमानच नाहीं असे मानले असता, 'हशि च' या सूत्राचा कोणीच प्रतिपक्षी राहत नसल्यामुळें, ते सूत्र प्रवृत्त होऊन 'र' चे उत्व होते व 'मनोरथ' हें इष्ट रूप सिद्ध होत ) या विषयासंबधानें 'पूर्वत्रासिद्धे नास्ति विप्रतिषेधोऽभावादुत्तरस्य' हें वार्तिक ('पूर्वत्रासिद्धम्' ८. २ १ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी) पठित केले आहे. हे वचन असल्यामुळें, सापादिक विभक्तिप्रत्ययनिमित्तक कार्य प्रथम होत व नतर उत्व मत्व ही त्रैपादिक कार्यें होतात असे ('एत ईद्बहुवचने' सू ४३८ या सूत्रावरील कौमुदीत ) व्याख्यान केले आहे. ('अदम् + औ' या स्थली 'औ' या विभक्तिप्रत्ययाच्या निमित्तामुळें 'अदस्' यातील अन्त्य सकाराचे जागीं 'त्यदादीनाम' सू २६५ या सापादिक सूत्रानें अकार होऊन व नतर 'अतो गुणे' सू. १९१ आणि 'वृद्धिरेचि' सू. ७२ या सापादिक सूत्रानी पररूप व वृद्धिरूप एकादेश हीं कार्यें अनुक्रमें होऊन 'अद अ औ = अद औ = अदौ' असे रूप प्रथम सिद्ध झाल्यावर 'अदसोऽसे :' सू ४१९ या त्रैपादिक सूत्राची नतर प्रवृत्ति होऊन त्या सूत्रानें दकाराचे जागीं मकार व दकारापुढील 'औ' चे जागीं ऊकार होऊन

'अमू' असे इष्ट रूप सिद्ध होते. तसेच 'अदस् + जस्' या स्थली 'त्यदादीनामः, अतो गुणे, जसः शी' सू. २१४ व 'आद्‌गुण.' सू. ६९ ही सापादिक सूत्रे प्रवृत्त होऊन 'अदे' असे रूप झाल्यावर 'एत ईद्‌बहुवचने' हे त्रैपादिक सूत्र नंतर प्रवृत्त होते व त्या सूत्राने दकाराचे जागी मकार होऊन व त्या दकारापुढील एकाराचे जागी ईकार होऊन 'अमी' असे इष्ट रूप सिद्ध होते. सारांश सापादिक शासन व त्रैपादिक शास्त्र ही समानबल नसल्यामुळे, प्रकृत सूत्र प्रवृत्त होत नाही व त्रैपादिक शास्त्र परशासन असून देखील ते प्रथम प्रवृत्त न होता, सापादिक पूर्वशासनच प्रथम प्रवृत्त होते )

शब्दरत्न—अभावादुत्तरस्येति । आहार्याभावारोपादित्यर्थः ॥

'*अभावादुत्तरस्य*' यातील '*अभावात्*' या पदाचा '*आहार्याभावारोपात्*' असा अर्थ आहे, म्हणजे जरी त्रिपादी विद्यमान आहे तरी सपादसप्ताध्यायीच्या दृष्टीने ती विद्यमान नाही असा तिचे ठिकाणी अभावाचा आरोप करून ती विद्यमान नाही असे मानावे लागते असा अर्थ आहे.

मनोरमा—सूत्रे सु इति पृथक्पदं लुप्तषष्ठीकमित्याह—एतत्तदोर्य.सुरिति । एतत्तदर्थगतसङ्ख्याभिधायी यः सुस्तस्येत्यर्थः । एतत्तदोर्विहित इति व्याख्याने तु परमस ददाति परमैष ददातीत्यादौ न स्यात् । अर्थद्वारकसम्बन्धाश्रयणे लिङ्गं तु "अनञ्समासे" इति बोध्यम् । अकोः किमिति । साकच्कयोः शब्दान्तरत्वादप्रसङ्ग इति प्रश्नः । एषक इति । "अकोः" इति प्रतिषेध एव "तन्मध्यपतितस्तद्‌ग्रहणेन गृह्यते" इति परिभाषां ज्ञापयतीति भावः ।

'एतत्तदो. सु लोपो' सू. १७६ या सूत्रातील 'सु' हे लुप्तषष्ठीक भिन्न पद असल्यामुळे या सूत्रावरील कौमुदीत 'एतत्तदोर्यः सुस्तस्य लोप. स्याद्धलि' असे व्याख्यान केले आहे व त्या कौमुदीतील पंक्तीचा 'एतद्' व 'तद्' यांच्या *अर्थातील संख्या सांगणारा* जो 'सु' प्रत्यय त्याचा लोप होतो असा अर्थ आहे. प्रकृत सूत्रातील 'एतत्तदोः सु' या पदाचा 'एतत्त-

दोर्विहित य सु' असा अर्थ केल्यास, 'परमस ददाति, परमैष ददाति' इत्यादि स्थली 'सु' प्रत्ययाचा लोप न होण्याची आपत्ति येईल (कारण वरील दोन्ही स्थली सु' हा विभक्तिप्रत्यय 'तद' व एतद् या प्रातिपदिकाहून विहित-झाला-नसून, तो 'परमतद्' व 'परमैतद् या सामासिक शब्दाहून विहित-झाला-आहे 'तद्' व 'एतद् या शब्दाहून झालेल्या 'सु' प्रत्ययाचा 'सुपो धातुप्रातिपदिकयो सू ६५० या सूत्रानें लुक् झाला आहे व ता लुक् झाल्यावर 'कृत्तद्धितसमासाश्च सू १७९ या सूत्रानें 'परमतद्, परमैतद्' याना प्रातिपदिकसंज्ञा होऊन तद्या सामासिक शब्दाहून 'सु' प्रत्यय झाला आहे हे लक्षात ठेवावें एतत्तदोर्विहित य सु' असा प्रकृत सूत्रातील 'एतत्तदो सु' या पदाचा अर्थ केला तर वर सागितल्याप्रमाण 'सु' प्रत्यय 'तद्, एतद्' याहून झाला नसून 'परमतद्, परमैतद्' याहून झाला असल्यामुळें, त्या 'सु' प्रत्ययाचा लोप न होण्याची आपत्ति येईल व 'परमस ददाति' इत्यादि इष्ट प्रयोग सिद्ध होऊ शकणार नाहीत असे दीक्षिताच म्हणण आहे प्रकृत स्थली षष्ठीचा अर्थ विहितसबध नसून) अवयवारकसबध आहे असे जें वर म्हटल आहे त्याला प्रकृत सूत्रातील 'अनञ्समास' हे पद प्रमाण आहे हे ध्यानात ठेवावें (प्रकृत सूत्रातील 'सु लोप' या पदाचा 'सो लोप सुलोप' असा षष्ठीसमास केला नाही व 'सुलोप' असें एक सामासिक पद मानले नाही, कारण 'एतत्तदो य सु तस्य लोप' असा 'एतत्तदो सु लोप' याचा अर्थ होण वर सागितल्याप्रमाण इष्ट असल्यामुळें व 'एतत्तदो' हे षष्ठ्यन्त पद 'सु' या पदाशी विशेषणरूपानें अन्वित होत असणार पद असल्यामुळें आणि 'समर्थ पदविधि' सू. ६४७ असे सूत्र व 'सविशेषणाना वृत्तिन' असे भाष्यवचन असल्यामुळें, ज्याप्रमाणे 'ऋद्धस्य राज पुरुष' या स्थली एकार्थीभावसामर्थ्याभावामुळें 'ऋद्धस्य राजपुरुष' असा समास होऊ शकत नाही त्याचप्रमाणे प्रकृत स्थली 'सो लोप सुलोप' असा समास, त्या दोन पदात एकार्थीभाव होण्याचे सामर्थ्य नसल्यामुळें, होऊ शकत नाही म्हणून 'सु' हे लुप्तषष्ठीक भिन्न

पद मानले आहे. आता 'एकशत पष्ठयर्थाः'—म्हणजे पष्ठीचे अनेक अर्थ आहेत—असे भाष्यवचन असल्यामुळे, 'एतत्तदोः' ही कोणत्या प्रकारच्या संबंधाची बोधक पष्ठी आहे हा प्रश्न सहजच उपस्थित होतो. ही स्थानपष्ठी मानता येत नाही; कारण 'एतत्तदोः स्थाने सुः' असा अर्थ मुळीच संभवत नाही. ही अवयवपष्ठी देखील मानता येत नाही; कारण 'सु' हा 'एतद्, तद्' यांचा अवयव नसून त्याहून भिन्न असा प्रत्यय आहे. आनन्तर्य किंवा सामीप्य या अर्थाची बोधक ही पष्ठी आहे—म्हणजे 'एतत्तदोः अनन्तरः समीपवर्ती वा यः सुः' या अर्थाची बोधक ही पष्ठी आहे—असेहि मानता येत नाही; कारण आनन्तर्य किंवा सामीप्य असा पष्ठीचा अर्थ होत नाही हे संज्ञाप्रकरणात पूर्वी सांगितलेच आहे. ही 'विहित' या अर्थाची बोधक पष्ठी मानल्यास कोणते दोष येतात हे नुकतेच वर सांगितले आहे. 'एतत्तदोः परः यः सुः' असाहि अर्थ होणे संभवत नाही; कारण प्रकृत सूत्रात 'एतत्तद्भ्याम्' असे पञ्चम्यन्त पद नाही व 'तस्मादित्युत्तरस्य' ही परिभाषा असल्यामुळे, 'एतत्तदोः' या पष्ठीचा तसा अर्थ करता येत नाही. म्हणून दीक्षितांनी ही अर्थ-द्वारकसंबंधबोधिकापष्ठी मानली आहे व ती तशा प्रकारची पष्ठी मानण्यास दीक्षित प्रकृत सूत्रातील 'अनञ्समासे' हे पद प्रमाण मानतात. नञ्समास 'नञ्' सू. ७५६ या सूत्राने होतो व ते सूत्र 'तत्पुरुषः' सू ७४६ या अधिकारात पठित असल्यामुळे, नञ्समास हा तत्पुरुषसंज्ञक समास ठरतो आणि 'उत्तरपदार्थप्रधान-स्तत्पुरुषः' असे भाष्यवचन असल्यामुळे, नञ्समासात 'नञ्' या पूर्व पदाचा अर्थ प्रधान नसून, त्या समासातील उत्तरपदाचा अर्थ प्रधान असतो. त्यामुळे तशा सामासिक शब्दाहून होणारा 'सु' प्रत्यय उत्तरपदार्थगत संख्येचे अभिधान करणारा ठरतो. उदाहरणार्थ, 'राज्ञः पुरुषः राजपुरुषः' या स्थली 'राजपुरुष' या सामासिक शब्दाहून होणारा 'सु' प्रत्यय जसा 'पुरुष' या उत्तरपदाच्या अर्थातील 'एक' या संख्येचा बोधक आहे त्याचप्रमाणे 'न ब्राह्मणः

अब्राह्मणः' या नञ्समासात देखील सामासिक शब्दाहून होणारा 'सु' प्रत्यय 'ब्राह्मण' या उत्तरपदाच्या अर्थामध्ये असणाऱ्या सख्येचा बोधक आहे. म्हणून 'न सः असः, न एषः अनेषः' या स्थली देखील सामासिक शब्दाहून होणारा 'सु' प्रत्यय 'तद्, एतद्' या उत्तरपदातील अर्थगत सख्येचा अभिधायी–बोधक–ठरतो हे उघड आहे. नञ्समासात उत्तरपदार्थ प्रधान असून तसा सामासिक शब्दाहून होणारा 'सु' प्रत्यय उत्तरपदार्थगत सख्येचा बोधक आहे असे न मानता, उत्तरपदार्थ अप्रधान आहे व 'सु' प्रत्यय तदर्थगत सख्येचा बोधक नाही असे मानले तर, नञ्समासातील उत्तरपद सर्वनामसज्ञक पद असल्यास, ते उपसर्जनीभूत मानल्याने, 'सञ्जोप-सर्जनीभूतास्तु न सर्वादयः' या वार्तिकान्वये त्याला सर्वनामसज्ञा होणार नाही व त्यामुळे 'त्यदादीनामः' इत्यादि सूत्रानी सर्वनामाला होणारी कार्ये त्याला होऊ शकणार नाहीत. त्यामुळे 'न [illegible] असः = नञ् + तद् + सु' या स्थली 'तद्' यातील अन्त्य दकाराचे जागी 'त्यदादीनामः' सू. २६५ या सूत्राने अकारादेश न होता व 'तदोः सः सावनन्त्ययोः' सू. ३८१ या सूत्राने 'तद्' यातील तकाराचे जागी सकार न होता 'अतद् + सु' अशी स्थिति होईल व त्यामुळे 'हल्ङ्याब्भ्य' सू २५२ या सूत्राने 'सु' प्रत्ययाचा लोप होईलच, व अशा रीतीने प्रकृत सूत्रातील 'अनञ्समासे' या पदाचे ग्रहण व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते, कारण त्या सूत्रात ते पद नसले तरी, वर सागितल्याप्रमाणे, 'सु' लोप होऊ शकतोच. पण ज्याअर्थी पाणिनीने प्रकृत सूत्रात त्या पदाचे मुद्दाम ग्रहण केले आहे त्याअर्थी हे ज्ञापित होते की, नञ्समासात उत्तरपदार्थ प्रधान असतो व तसा सामासिक शब्दाहून होणारा 'सु' प्रत्यय त्या समासातील उत्तरपदार्थगत सख्येचा बोधक असतो. त्यामुळे 'एततदोः सु लोपः' एवढेच सूत्र केले असते तर, 'असः शिवः, अनेषः शिवः' या स्थली देखील 'सु' प्रत्ययाचा लोप झाला असता. पण तसे होणे इष्ट नसल्यामुळे पाणिनीने प्रकृत सूत्रात 'अनञ्समासे' या पदाचे ग्रहण

केले आहे व अशा रीतीनें त्या पदाचें ग्रहण चरितार्थ ठरून त्या पदाच्या ग्रहणसामर्थ्यानें हे ज्ञापित होतें की, 'एतत्तदो' ही अर्थ-द्वारकसवधबोधिकापष्ठी आहे व त्यामुळेंच दीक्षितांनी 'एतत्तदोः विहितः यः सुः' असा अर्थ न करिता 'एतत्तदर्थगतसस्याभिधायी यः सुः' असा अर्थ मनोरमेंत केला आहे.) 'अकोः किम्' असा जो प्रकृत सूत्रावरील कौमुदीत प्रश्न केला आहे तो अशा आशयानें केला आहे की, ('एतद्, तद्' या शब्दांना 'अव्ययसर्वनाम्नामकच्प्राक्टेः' सू. २०२६ या सूत्रानें 'अकच्' प्रत्यय केला असता त्या शब्दांचे मूळ स्वरूप बदलून ते भिन्न प्रकारचे शब्द होत असल्यामुळे, तशा) 'अकच्' प्रत्यययुक्त शब्दांपुढें येणाऱ्या 'सु' प्रत्ययाचा लोप होण्याची प्रकृत सूत्रान्वयें प्राप्तीच नाही. असें असून देखील प्रकृत सूत्रांत 'अकोः' असा प्रतिषेध मागितला असल्यामुळें 'तन्मध्यपतित-स्तद्ग्रहणेन गृह्यते'—परि. ९०—ही परिभाषा ज्ञापित होते. (सारांश अव्यय व सर्वनाम यांहून 'अकच्' प्रत्यय झाला असता, जरी शब्दस्वरूपात बदल होतो तरी तें शब्दस्वरूप त्या शब्दाच्या मूळ स्वरूपाहून भिन्न आहे असें मानलें जात नाही, कारण तो प्रत्यय मूळ शब्दाच्या 'टि'च्या पूर्वी होत असल्यामुळें व अशा रीतीनें त्या शब्दाच्या आदि व अन्त्य वर्णांच्या मध्यें तो येत असल्यामुळें, मूळ शब्दानें तशा अकच्प्रत्यययुक्त शब्दाचे देखील ग्रहण होते. त्यामुळें 'एषक' हा अकच्प्रत्ययविशिष्ट 'एष' च आहे असें मानता येतें व प्रकृत सूत्रांत 'अकोः' या पदाचें ग्रहण केलें नसतें तर, 'एषक' या शब्दापुढील 'सु' प्रत्ययाचा लोप झाला असता व 'एषको रुद्रः' असा इष्ट प्रयोग सिद्ध न होता, 'एषक रुद्रः' असा अनिष्ट प्रयोग होण्याची आपत्ति आली असती. ती आपत्ति टाळण्या-करिताच प्रकृत सूत्रांत 'अकोः' या पदाचे ग्रहण केलें आहे व अशा रीतीनें तें ग्रहण वरील परिभाषेचे ज्ञापक ठरतें असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे. वरील परिभाषेचें विस्तृत विवरण परि-भाषेन्दुशेखराच्या मराठी भाषान्तरात पान ३१९—२० मध्यें केलें आहे व ते वाचल्यास त्या परिभाषेचा अर्थ पूर्णपणे ध्यानात येईल.)

शब्दरत्न—लिङ्गमिति । विहितविशेषणे, तद्वैयर्थ्यं स्पष्टमेवेति भावः ।

मनोरमेंत 'अर्थद्वारकसम्बन्धाश्रयणे लिङ्ग तु अनञ्समासे इति बोध्यम्' असे जे म्हटले आहे त्याचे कारण हे की, 'एततदोः विहित य सु' असा अर्थ केल्यास, प्रकृत सूत्रातील 'अनञ्समासे' या पदाचे ग्रहण व्यर्थ ठरते हे उघड आहे (कारण नञ्समास केल्यावर जो सामासिक शब्द सिद्ध होतो त्याहून 'सु' प्रत्यय होत असल्यामुळे व त्या समासात जे 'एतद्, तद्' शब्द चरमावयव आहेत त्याहून तो प्रत्यय होत नसल्यामुळें, तसा समासात, वरील अर्थ बरोबर मानल्यास, 'सु' लोपाची प्राप्तीच होत नाही. म्हणून तसा अर्थ करणे योग्य नाही आणि मनोरमेंत जो अर्थ केला आहे तोच अर्थ बरोबर मानणे योग्य आहे या विषयाचे विस्तृत विवरण मनोरमेंत केलेच आहे)

मनोरमा—बहुलग्रहणेति । अत एव लोपं विना पादपूरणेऽपि क्वचिद्भवति । सास्मा अरम् । सः अस्मै इति च्छेदः ॥

'सोऽचि लोपे' सू. १७७ या सूत्रात ('स्यश्छन्दसिबहुलम्' या पूर्व सूत्रातून) 'बहुलम्' या पदाची अनुवृत्ति होत असल्यामुळें (व 'क्वचित् प्रवृत्ति क्वचिदप्रवृत्ति क्वचिद्विभाषा क्वचिदन्यदेव । शिष्टप्रयोगाननुसृत्य लोके विज्ञेयमेतत् बहुलग्रहे तु' असा 'बहुल' शब्दाची व्याख्या असल्यामुळें) वैदिक प्रयोगात जेथें 'सु' लोप न केला तरी पादपूरण होते तशा ठिकाणी देखील क्वचित् स्थली 'सु' लोप होतो उदाहरणार्थ ('स अस्मै अरम्' या पदाचा) वेदात 'सास्मा अरम्' असा 'सु' लोप करून सन्धि केलेला आढळतो 'सास्मा' याचा 'स अस्मै' असा पदच्छेद आहे. (वरील वैदिक उदाहरणात 'सु'लोप न करिता देखील त्या 'सु' चे 'ससजुषो रु' या सूत्रानें रुत्व करून व नंतर 'अतो रो.' सू. १६३ या सूत्रानें त्या 'रु' चे उत्व करून व 'आद्गुण.' सू. ६९ या सूत्रानें गुण करून 'एङः पदान्तादति' सू. ८६ या सूत्रानें पूर्वरूप

सन्धि केला असता 'सोऽस्मा अरम्' असा जो सन्धियुक्त प्रयोग सिद्ध होतो त्यानें देखील पादपूरण होतेच. तरी पण प्रकृत सूत्रात 'बहुलम्' या पदाची अनुवृत्ति असल्यामुळें त्या वैदिक प्रयोगात 'सु' लोप करुन 'स अस्मा' या पदाचा 'सास्मा' असा 'अक सवर्णे दीर्घः' सू. ८५ हें सूत्र प्रवृत्त करुन सन्धियुक्त प्रयोग केला आहे.)

शब्दरत्न—सास्मा अरमिति । सोस्मा अरमिति सन्धावपि पादपूर्त्तेः। न च "प्रकृत्यान्तः पादम्—" इति पूर्वरूपस्याभावेन न पादपूर्त्तिः। "सोऽयमागात्" इत्यादावविधानापि प्रातिशाख्येन सिद्धेः। एवकाराऽवधारणपरतया न व्याख्येयम्। "सोऽहमाजन्म–" इत्यादौ बहुलग्रहणेन क्वचिदप्रवृत्त्याऽपि सिद्धेरिति तात्पर्यम् ॥

('सु' लोप न करिता) 'सोऽस्मा अरम्' असा सन्धि करुन प्रयोग केला असता तरी पादपूरण होऊ शकलेच असते. (तरी पण प्रकृत सूत्रात 'बहुलम्' या पदाची अनुवृत्ति केल्यानें 'सास्मा अरम्' या प्रयोगाची उपपत्ति लावता येते व 'सर्वे विधयश्छन्दसि विकल्प्यन्ते'—परि. ३५—या परिभाषान्वयें देखील त्या प्रयोगाची उपपत्ति लावता येते.) 'सो अस्मा अरम्' या स्थली ('एङः पदान्तादति' सू. ८६ या सूत्रानें पावलेला) पूर्वरूप सन्धि, 'ऋक्पादमध्यस्थः एङ् प्रकृत्या स्यात् अति परे' या अर्थाच्या वाचक 'प्रकृत्याऽन्त:पादम्' सू. ३५१८ हें सूत्र असल्यामुळें, होऊ शकत नव्हता व ('सो अस्मा अरम्' अशी प्रकृतिभाव केल्यानें स्थिति राहिल्यामुळें) पादपूरण होऊ शकले नसतें अशी कोणी शंका केल्यास, त्या शंकेला उत्तर हें आहे की, सोऽयमागात्' इत्यादि स्थली जसा ('अव्यादवद्यादव' सू. ३५१९ या सूत्रानें पावलेला प्रकृतिभाव न करिता) पूर्वरूप सन्धि केला आहे तसा सन्धि ('सो अस्मा अरम् = सोऽस्मा अरम्' या स्थली देखील) प्रातिशाख्यान्वयें करता आला असता. म्हणून (प्रकृत सूत्रात 'बहुलम्' या पदाची अनुवृत्ति केल्यानेंच सर्व इष्ट लौकिक व वैदिक प्रयोगाची सिद्धि होऊ शकत असल्यामुळें, 'सु' लोप केला असता जर पादपूरण

होत असेल तरच 'सु'लोप करावा असे प्रकृत सूत्राचे ) अवधारणरूप व्याख्यान करू नये, (व वर सांगितल्याप्रमाणे 'बहुलम्' या शब्दाचा 'क्वचित् प्रवृत्ति क्वचिदप्रवृत्तिः' असा अर्थ होत असल्यामुळें) क्वचित् स्थली प्रकृत सूत्र प्रवृत्त न केल्यानें देखील 'सोऽहमाजन्म-शुद्धानाम्' इत्यादि प्रयोगांत न केलेल्या 'सु' लोपाची उपपत्ति लावता येते असा दीक्षिताच्या म्हणण्याचा तात्पर्यार्थ आहे. (साराश प्रकृत सूत्रावरील कौमुदींत 'पादश्चेल्लोपे सत्येव पूर्येत' असा जो दीक्षितानी प्रकृत सूत्राचा अवधारणरूप अर्थ केला आहे तो प्राचीन वैयाकरणाच्या मतास अनुसरून केला असून दीक्षिताचे स्वत:चे असेच मत आहे की, प्रकृत सूत्रात 'बहुलम्' या पदाची अनुवृत्ति केल्यानें व त्यामुळें प्रकृत सूत्राची 'क्वचित् प्रवृत्तिः क्वचिदप्रवृत्ति'– म्हणजे कोठें प्रवृत्ति व कोठें अप्रवृत्ति–केल्यानें सर्व वैदिक व लौकिक इष्ट प्रयोग सिद्ध होऊ शकत असल्यामुळें, तसा अवधारणरूप अर्थ करू नये तसा अर्थ केल्यास, 'सास्मा अरम्' या वैदिक प्रयोगाची उपपत्ति लावण्याकरिता प्रकृत सूत्रात 'बहुलम्' या पदाची अनु-वृत्ति करणें भाग आहे व तशी अनुवृत्ति केल्यानेंच जर सर्व इष्ट प्रयोगाची सिद्धि होऊ शकते तर अवधारणारूप अर्थ करून फायदा काय ? 'सोऽहमाजन्मशुद्धानाम्' या स्थली 'सु'लोप केल्यास व 'अक सवर्णे दीर्घ' सू ८५ या सूत्रानें दीर्घ एकादेश केल्यास, 'साहमाजन्मशुद्धानाम्' असा प्रयोग होऊन त्यानें पादपूरण होतेच. 'सु'लोप न केला तरी पादपूरण होतेच. अशा स्थली 'क्वचिदप्रवृत्ति.' या वचनान्वयें देखील 'सु' लोपाभावाची उपपत्ति लावता येते म्हणून अवधारणरूप अर्थ करण्याची काही गरज नाही असा दीक्षिताच्या म्हणण्याचा तात्पर्यार्थ आहे असे शब्दरत्नकार म्हणतात. आतां 'सोऽयमागादित्यादाविवात्रापि प्रातिशाख्येन सिद्धे.' असे जें शब्द-रत्नात म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे की, 'रयतुः सोऽयमा-गात्' या ऋचेत 'सो' यातील ओकारापुढें 'अयम्' यातील अकार असून त्या अकारापुढें यकार आला असल्यामुळें व

'प्रकृत्याऽन्त:पादमव्यपरे' सू. ३५१८ या सूत्रात 'अव्यपरे' असा प्रतिषेध असल्यामुळें, 'सोऽयमगात्' या स्थली प्रकृतिभाव न होता पूर्वरूप सन्धीच झाला पाहिजे, परतु ओकारापुढें 'अयम्' हा शब्द आल्यास, प्रकृतिभावच होतो असे 'अव्यादवद्याद्' सू. ३५१९ या अपवादक उत्तरसूत्रात सागितले असल्यामुळें, 'सोऽयमगात्' या स्थली पूर्वरूप सन्धि न होता 'सो अयमगात्' असा प्रकृतिभाव झाला पाहिजे. असे असून देखील त्या ऋचेंत प्रकृतिभाव न करिता 'एङः पदान्तादति' सू. ८६ या सूत्रानें होणारा जो पूर्वरूप सन्धि केला आहे त्याला शौनकीयप्रातिशाख्याचा आधार आहे असें शब्दरत्नकाराचें म्हणणे आहे, व दीक्षितानी देखील 'अव्यादवद्यात्' या सूत्रावरील कौमुदीत याच आशयाची 'प्रातिशाख्ये तु वाचनिक एवायमर्थ.' ही पक्ति लिहिली आहे. शौनकीय प्रातिशाख्यातील द्वितीय पटलाच्या १४व्या श्लोकात 'अन्तःपादमकाराच्चेत् संहितायां लघोर्लघु । यकाराद्यक्षरं परं वकाराद्यपि वा भवेत्' असा नियम सागितला आहे व त्या श्लोकाचा असा अर्थ आहे कीं, 'एङ्' पुढें ह्रस्व अकार आल्यास व त्या अकारापुढें वकार किंवा यकार आला असून त्या वकारापुढें किंवा यकारापुढें लघु स्वर आला असल्यास पूर्वरूप सन्धीच होतो, व या प्रातिशाख्य नियमान्वयें 'सोऽयमगात्' असाच प्रयोग शुद्ध ठरतो. त्याचप्रमाणे 'सास्मा अरं सोत नः सेन्द्र विश्वा । सेति सास्माकमनवद्य सासि' या त्या प्रातिशाख्यातील द्वितीय पटलात दिलेल्या तेहतिसाव्या श्लोकात सागितलेल्या नियमान्वयें 'सास्मा अरम्' हा प्रयोग व तसेच 'सोऽस्माक यो द्वयेभ्योऽन्यकृतेभ्य.' या त्या पटलातील पचविसाव्या श्लोकात सागितलेल्या नियमान्वयें 'सोऽस्मा अरम्' हा प्रयोग देखील शुद्ध ठरतो असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे. )

॥ स्वादिसन्धिप्रकरणं समाप्तम् ॥

॥ पञ्चसन्धिप्रकरण समाप्तम् ॥

---

## ॥ अथाजन्तपुंल्लिङ्गप्रकरणम् ॥

मनोरमा – अर्थवदधातु प्रत्यय प्रत्ययान्त चेति । सूत्रे तन्त्रादिना उभय विवक्षितमिति भाव । तथा हि प्रत्ययस्यैव पर्युदासे "कृत्तद्धित" इति सूत्रेण तद्धितान्तस्य सञ्ज्ञाविधान व्यर्थं स्यात् । न च तत्रापि तदन्त न ग्राह्यमिति वाच्यम्, "अर्थवत्" इत्यनुवृत्तिसामर्थ्यात्तदन्तग्रहणात् । प्रशसाया हि मतुप् । एकार्थीभावेन लौकिके प्रयोगे प्रसिद्धत्व च प्रशसामूलम् । न च "अर्थवत्" इत्यस्य पूर्वसूत्रे चरितार्थता, धातुप्रत्ययपर्युदासेनैव तल्लाभात् । तस्मात्प्रत्ययान्त च वर्जयित्वेत्युचितमेव । यदि तु प्रत्ययो न पर्युदस्येत तर्हि "सात्पदाद्यो" इति सूत्रे सातिग्रहण व्यर्थं स्यात् । "अर्थवत्" इति किम् ? धन, वनमित्यादौ प्रतिवर्णं सञ्ज्ञा मा भूत् । तस्या च सत्या स्वादय स्यु । ननु सङ्ख्याकर्मादिरभावात् न भविष्यन्तीति चेत, न, एकवचनमुत्सर्गत करिष्यते इति सिद्धान्तात् । हुफशादिभ्य इव सोर्दुर्वारत्वात् । न च अर्थवद्ग्रहणपरिभाषयाऽनर्थक न स्यादिति वाच्यम्, तस्या विशिष्टरूपोपादानविषयत्वात् । "अधातु" इत्यादिपर्युदासबलेन यद्यप्यर्थवत्त्व लभ्यते, तथापि उत्तरार्थं तदित्युक्तम् । एतच्च "सुप्तिङन्तम्" इति सूत्रे भाष्ये ध्वनितम् ।

('अर्थवदधातुरप्रत्यय –प्रातिपदिकम्' सू १७८ या सूत्रातील 'अप्रत्यय' या पर्युदासाचा) प्रत्यय प्रत्ययान्तच वर्जयित्वा' असा जो कौमुदीत अर्थ केला आहे त्याचे कारण हे आहे की 'अप्रत्यय' यातील 'प्रत्यय' या शब्दाचा 'प्रत्यय' व 'प्रत्ययान्त' असा दोन्ही प्रकारचा अर्थ प्रकृत सूत्रात तन्त्रादिकाना विवक्षित आहे ('सकृदुच्चरित शब्दाऽनेकार्थपरत्व यत्र तत्र तन्त्रमिति व्यवहार' अशी 'तन्त्र' या शब्दाची भाष्यकाराना व्याख्या दिली आहे जेथे एकादा अनेकार्थवाचक शब्दापासून एकापेक्षा अधिक अर्थाचा बोध व्हावा या इच्छेने तो शब्द उच्चारला जातो अशा ठिकाणी मागे सञ्ज्ञाप्रकरणात सांगितल्या-

प्रमाणें तन्त्र व आवृत्ति या साधनाचा उपयोग केला असता, त्या शब्दाच्या अनेक अर्थांचा बोध होतो. 'प्रत्यय' हा शब्द जसा प्रत्ययाचा वाचक आहे तसाच तो 'प्रत्ययग्रहणे यस्मात्स विहितस्तदादेस्तदन्तस्य ग्रहणम्'–परि. २३–या परिभाषान्वयें प्रत्ययान्ताचा देखील वाचक आहे. म्हणून तो अनेकार्थवाचक शब्द दोनदा उच्चारला असता त्यापासून प्रत्यय व प्रत्ययान्त या दोन्ही अर्थांचा आवृत्तीच्या सहाय्यानें बोध होतो, व प्रकृत स्थली हे दोन्ही अर्थ पाणिनीला विवक्षित असल्यामुळें, 'अप्रत्यय' या पर्युदासाचें 'प्रत्यय व प्रत्ययान्त व वर्जयित्वा' असें कौमुदीत व्याख्यान केलें आहे असें दीक्षिताचें म्हणणें आहे.) 'अप्रत्यय' या पर्युदासानें केवळ प्रत्ययालाच प्रातिपदिकसंज्ञेचा निषेध केला आहे (व प्रत्ययान्ताला प्रातिपदिकसंज्ञेचा निषेध केला नाही) असें मानलें तर, 'कृत्तद्धितसमासाश्च' सू १७९ या सूत्रानें तद्धितान्ताला प्रातिपदिकसंज्ञा होण्याचें जें विधान केलें आहे तें व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. ('कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रातील 'कृत्' व 'तद्धित' या प्रत्ययवाचक शब्दांनी प्रत्ययग्रहणपरिभाषान्वयें–परि. २३–कृदन्त व तद्धितान्त यांचें ग्रहण होतें व कृदन्ताला, तद्धितान्ताला आणि समासाला प्रातिपदिकसंज्ञा व्हावी म्हणून पाणिनीनें 'कृत्तद्धितसमासाश्च' हें सूत्र मुद्दाम केलें आहे. प्रकृत सूत्रातील 'अप्रत्ययः' या पदानें प्रत्ययान्ताचा पर्युदास केला नाही असें मानलें तर, अर्थवदधातुः' या प्रकृत सूत्रानेंच तद्धितान्ताला प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकली असती व अशा रीतीनें 'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रात तद्धितान्तवाचक 'तद्धित' या शब्दाचें ग्रहण करण्याची काहींच गरज नव्हती. परंतु त्या शब्दाचें त्या सूत्रात ग्रहण केलें असल्यामुळें हें स्पष्ट होतें की, प्रकृत सूत्रातील 'अप्रत्ययः' या शब्दानें प्रत्ययान्ताचा देखील पर्युदास केला आहे व त्या पर्युदासामुळें तद्धितान्ताला जी प्रातिपदिकसंज्ञा प्राप्त होऊ शकत नव्हती ती त्याला व्हावी याकरिता त्या सूत्रात तद्धितान्तवाचक 'तद्धित' या शब्दाचें ग्रहण केलें आहे )

'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रातील 'तद्धित' या पदानें देखील (तद्धितप्रत्ययाचेच ग्रहण होत असून ) तद्धितान्ताचे ग्रहण होत नाही असें कोणी म्हटल्यास, ते म्हणणे बरोबर नाही; कारण त्या सूत्रात ('अर्थवदधातु:' या पूर्व सूत्रातून) 'अर्थवत्' या पदाची अनुवृत्ति होत असल्यामुळें, त्या अनुवृत्तीच्या सामर्थ्यानें 'तद्धित' या शब्दानें तद्धितान्ताचे ग्रहण होतें. ( 'भूमनिन्दाप्रशंसासु … भवन्ति मतुबादय' या कारिकान्वयें ) 'अर्थवत्' या स्थली 'प्रशंसा' या अर्थाचा वाचक 'मतुप्' प्रत्यय झाला आहे आणि लौकिक प्रयोगात ( केवळ तद्धित प्रत्ययाचा प्रयोग होत नसून, प्रकृति व तीहून होणारा तद्धित प्रत्यय या दोहोंचा ) एकार्थीभाव झाल्यावर निष्पन्न होणाऱ्या तद्धितान्त शब्दाचाच लोकात प्रयोग होणे प्रसिद्ध असल्यामुळें, तद्धितान्त शब्द हाच प्रशस्तार्थाचा वाचक ठरतो ( आणि म्हणून 'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रातील 'तद्धित' या शब्दानें केवळ तद्धित प्रत्ययाचे ग्रहण न होता, तद्धितान्ताचेच ग्रहण होऊ शकत. ) 'अर्थवदधातु.' या प्रकृत सूत्रात 'अर्थवत्' या पदाचे ग्रहण चरितार्थ आहे असं कोणी म्हटल्यास, ते म्हणणं बरोबर नाही; कारण त्या सूत्रातील 'अधातु:' व 'अप्रत्ययः' या पर्युदासाच्या सामर्थ्यानेंच अर्थवान् शब्दाना प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकते हें आपोआपच सिद्ध होतं. ( प्रकृत सूत्रात 'अर्थवत्' या पदाचे ग्रहण आवश्यक नसून, त्या पदाची 'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रात अनुवृत्ति व्हावी व त्या अनुवृत्तीच्या सामर्थ्यानें 'कृत्, तद्धित' या शब्दानी कृदन्त, तद्धितान्त याचे ग्रहण व्हावे याकरिता ते पद प्रकृत सूत्रात घातलं आहे असें जें सिद्धान्तीचे म्हणणे आहे त्यावर शंकाकार असे म्हणतो कीं, ते पद प्रकृत सूत्रात असणे आवश्यक ठरते; कारण प्रकृत सूत्रात त्या पदाचे ग्रहण न केल्यास, अर्थरहित वर्णसमुदायाला देखील प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति येते. या शंकेवर दीक्षित असे उत्तर देतात की, धातु व प्रत्यय हे दोन्ही अर्थवान् असून प्रकृत सूत्रात त्यांचा पर्युदास केला असल्यामुळें, 'नञिवयुक्तम्'–परि. ७५–

या परिभाषान्वयें धातु व प्रत्यय याहून भिन्न पण तत्सदृश, म्हणजे त्यांच्यासारखे अर्थवान्, असे अर्थवान् शब्दच प्रातिपदिकसंज्ञक होऊ शकतात. म्हणून प्रकृत सूत्रात 'अर्थवत्' या पदाचें ग्रहण केलें नसतें तरी, धातु व प्रत्यय खेरीज करून इतर अर्थवान् शब्दानाच प्रातिपदिकसंज्ञा झाली असती. अशा रीतीनें त्या सूत्रात 'अर्थवत्' या पदाचें ग्रहण आवश्यक ठरत नसल्यामुळें, 'कृत्तद्धितसमासाश्च' या उत्तर सूत्रात त्या पदाची अनुवृत्ति व्हावी एवढ्याचकरिता त्या पदाचें प्रकृत सूत्रात ग्रहण केलें आहे असें मानलें पाहिजे, व तसें मानलें असता, लाकात – भाषेंत – केवळ तद्धितप्रत्ययाचा प्रयोग होत नसून तद्धितान्ताचा प्रयोग होत असल्यामुळें, उत्तर सूत्रातील 'तद्धित' या शब्दानें प्रशस्तार्थवाचक तद्धितान्ताचेंच ग्रहण होऊ शकतें असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे.) म्हणून प्रकृत सूत्रातील 'अप्रत्ययः' याचें 'प्रत्ययान्तं च वर्जयित्वा' असें जें व्याख्यान कौमुदींत केलं आहे तें योग्य ठरत हें उघड आहे. (प्रकृत सूत्रात प्रत्ययान्ताचा पर्युदास केला नाही असें मानल्यास, 'कृत्तद्धित-समासाश्च' या सूत्रात कृदन्ताला व तद्धितान्ताला जें प्रातिपदिकसंज्ञा होण्याचें विधान केलें आहे तें विधान, वर सांगितल्याप्रमाणें, व्यर्थ ठरण्याची आपत्ति येत असल्यामुळें, प्रकृत सूत्रातील 'अप्रत्यय.' या पर्युदासानें प्रत्ययान्ताचा पर्युदास करणें जरी योग्य ठरतें तरी, 'प्रत्यय प्रत्ययान्त च वर्जयित्वा' असें व्याख्यान करून कौमुदींत जो प्रत्ययाचा देखील पर्युदास केला आहे तसा पर्युदास करण्याची काय गरज होती असें कोणी म्हटल्यास, त्यावर दीक्षित असें उत्तर देतात कीं,) जर प्रकृत सूत्रातील 'अप्रत्यय.' या पदानें प्रत्ययाचा पर्युदास केला नाही (व केवळ प्रत्ययान्ताचा पर्युदास केला) तर, 'सात्प-दाद्यो' सू. २१२३ या सूत्रातील 'साति' या प्रत्ययाचें ग्रहण व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. (प्रत्ययान्ताला प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकत नाही व प्रत्ययाला ती संज्ञा होऊ शकते असें मानल्यास, 'अग्नि' या शब्दाहून 'विभाषा साति कार्त्स्न्ये' सू. २१२२ या सूत्रानें

‘साति’ प्रत्यय केला असता ‘अग्निसात्’ असे जें रूप होतें त्यातील ‘साति = सात्’ हा प्रत्यय प्रातिपदिकसंज्ञक होऊन त्याहून ‘ङ्याप्-प्रातिपदिकात्’ सू. १८२ या अधिकारसूत्रान्वयें सुबुत्पत्ति होईल व ‘साति = सात्’ हा शब्द व्यपदेशिवद्भावानें सातिप्रत्ययान्त मानता येत असल्यामुळें ‘तद्धितश्चासर्वविभक्तिः’ सू. ४४८ या सूत्रान्वयें ‘सात्’ याला अव्ययसंज्ञा होईल आणि ‘अव्ययादाप्सुपः’ सू. ४५२ या सूत्रानें विभक्तिप्रत्ययाचा लुक् झाला तरी, ‘प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्’ सू. २६२ या सूत्रान्वयें ‘सात्’ ची पदसंज्ञा कायम राहून ‘सात्’ हें पद मानलें जाऊ शकतेंच व या पदात सकार आदि असल्यामुळें त्या सकाराचें आपोआपच षत्व होऊ शकणार नाही व अशा रीतीनें ‘सात्पदाद्योः’ या सूत्राऐवजी ‘पदादेः’ एवढेंच सूत्र केल्यानें ‘साति’ मधील ‘स्’ चें षत्व टाळता येऊ शकत असल्यामुळें, त्या सूत्रातील ‘सात्’ या पदाचें ग्रहण व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते परंतु पाणिनीनें त्या सूत्रात ‘सात्’ या प्रत्ययाचें ग्रहण केलें असल्यामुळें त्यावरून हें स्पष्ट होते की, प्रत्ययाला प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकत नाही आणि ‘साति’ या प्रत्ययातील सकाराचें ‘आदेशप्रत्यययोः’ सू. २१२ या सूत्रानें जें षत्व होण्याची आपत्ति येत होती ती टाळण्याकरिता त्या सूत्रात ‘सात्’ या प्रत्ययाचें ग्रहण केलें आहे व अशा रीतीनें तें ग्रहण चरितार्थ होऊन प्रत्ययाला प्रातिपदिकसंज्ञा होत नाही याचें ज्ञापक ठरतें आणि म्हणून ‘अप्रत्ययः’ या पर्युदासाचा ‘प्रत्ययान्त वर्जयित्वा’ एवढाच अर्थ न करिता, वरील ज्ञापकाच्या आधारें ‘प्रत्ययं प्रत्ययान्तं च वर्जयित्वा’ असा जो कौमुदीत अर्थ केला आहे तो योग्य ठरतो असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे) प्रकृत सूत्रात ‘अर्थवत्’ या पदाचें ग्रहण अशाकरिता केलें आहे की, ‘धनम्, वनम्’ इत्यादि स्थळी प्रत्येक वर्णाला प्रातिपदिकसंज्ञा न व्हावी. त्या वर्णांना प्रातिपदिकसंज्ञा झाल्यास (‘ङ्याप्-प्रातिपदिकात्’ या अधिकारसूत्रान्वयें) प्रत्येक वर्णांतून सुबुत्पत्ति होण्याची आपत्ति येईल (प्रकृत सूत्रावरील भाष्यात १ २ ४५

भाष्यकार म्हणतात–'अर्थवदिति व्यपदेशाय, वर्णानां च मा भूदिति। किं च स्यात्? । वनम् धनमिति न लोपः प्रातिपदिकान्तस्य इति न लोप. प्रसज्येत ।' या भाष्याचा अर्थ हा आहे की, 'अर्थवदधातु.' या सूत्रानें जी प्रातिपदिकसंज्ञा होणें सांगितलें आहे ती अमक्यालाच व्हावी असे विशेष रीतीनें ज्ञात व्हावें याकरितां या सूत्रांत 'अर्थवत्' या पदाचें ग्रहण केलें आहे व अर्थवानांशिवाय इतरांना, म्हणजे अनर्थक वर्णांना, ती संज्ञा होऊं नये असा त्या पदाच्या ग्रहणाचा हेतु आहे. वर्णाला प्रातिपदिकसंज्ञा झाली असतां, 'धन, वन' इत्यादि शब्दांतील प्रत्येक वर्णाला प्रातिपदिकसंज्ञा होईल व त्यामुळें त्याहून सुबुत्पत्ति होईल व 'हल्ङ्याब्भ्यः' सू २५२ या सूत्रानें जरी 'सु' प्रत्ययाचा लोप होईल तरी प्रत्ययलक्षणानें त्या वर्णाला पदसंज्ञा होईल. व 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' सू. २३६ या सूत्रानें नकाराचा लोप होण्याची आपत्ति येईल. आता संख्या व कर्मादिकारक यांचे वाचक 'सु' इत्यादि विभक्तिप्रत्यय असल्यामुळें व 'धन, वन' इत्यादि शब्दांत असणाऱ्या वर्णांनी) संख्येचा किंवा कर्मादिकारकाचा बोध होत नसल्यामुळें, त्या वर्णांहून सुबुत्पत्ति होण्याची आपत्ति येऊच शकत नाही असे कोणी म्हटल्यास, ते म्हणणें बरोबर नाही, कारण (जेथें संख्या किंवा कारक विवक्षित नाहीत तथा स्थली देखील) औत्सर्गिक एकवचनाचा प्रत्यय होऊं शकतो असा भाष्यांत सिद्धान्त सांगितला आहे म्हणून 'हुफट्' इत्यादि शब्दाहून जसा औत्सर्गिक 'सु' प्रत्यय होतो त्याचप्रमाणें प्रत्येक वर्णाहून 'सु' प्रत्यय होणें टाळतां येऊं शकणार नाही. (प्रकृत सूत्रांतून 'अर्थवत्' हें पद गाळल्यास, 'धन, वन' यांतील प्रत्येक अनर्थक वर्णाला प्रातिपदिकसंज्ञा होईल व त्या प्रत्येक वर्णाहून सुबुत्पत्ति होण्याची आपत्ति येईल असे जें दीक्षितांनी म्हटलें आहे त्यावर शंकाकार असें म्हणतो की, त्या वर्णांना प्रातिपदिकसंज्ञा झाली तरी त्याहून सुबुत्पत्ति होण्याची आपत्ति येत नाही, कारण सुबुत्पत्ति होणें हें केवळ प्रातिपदिकसंज्ञेवर अवलंबून नसून, जेथें

एकत्व द्वित्व इत्यादि संख्या व कर्ता, कर्म, करण इत्यादि कारक यांचा बोध करून देणें आहे तेथेंच स्वादि विभक्तिप्रत्यय प्रातिपदिकाहून करता येऊं शकतात, परंतु 'वन, धन' यांतील वर्णांचे ठिकाणी संख्या व कारक या दोहोंचाहि अभाव असल्यामुळें, म्हणजे त्यांचे ठिकाणी हे दोन्ही संभवत नसल्यामुळें, त्यांना प्रातिपदिकसंज्ञा झाली तरी त्यांहून सुबुत्पत्ति होऊं शकत नाही. या शंकेवर दीक्षित असें उत्तर देतात की, 'स्वौजस्' सू. १८३ या सूत्रांत निर्दिष्ट असलेले विभक्तिप्रत्यय वाटेल त्या प्रातिपदिकाहून करता येतात व जेथें त्या प्रत्ययांनी संख्या दाखवावयाची असते तेथें त्यांचा नियम केला जातो, पण जेथे संख्येचा अभाव असेल तेथें औत्सर्गिक 'सु' हा प्रथमेचा विभक्तिप्रत्यय केला जातो असा भाष्यसिद्धान्त आहे आणि त्या सिद्धान्तान्वयें, प्रकृत सूत्रांतून 'अर्थवत्' हें पद गाळल्यास, प्रत्येक वर्णाला प्रातिपदिकसंज्ञा होईल व त्याहून 'सु' हा प्रथमेच्या एकवचनाचा औत्सर्गिक प्रत्यय होण टाळता येऊं शकणार नाही। प्रकृत सूत्रावरील भाष्यांत देखील भाष्यकारांनी 'इमे पुनर्वर्णा अत्यन्तायैवानर्थकाः। यथा तर्हि रथाङ्गानि विहृतानि प्रत्येकं व्रजिक्रियां प्रति असमर्थानि भवन्ति तत्समुदायश्च रथः समर्थः एवमेषां वर्णानां समुदाया अर्थवन्तोऽवयवा अनर्थका इति' असें सांगून व त्यानंतर 'निपातस्यानर्थकस्य प्रातिपदिकत्वम्' हें वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचे व्याख्यान करितांना भाष्यकार म्हणतात--'सत्यामपि प्रातिपदिकसंज्ञायां स्वाद्युत्पत्तिर्न प्राप्नोति। किं कारणम्? । न हि प्रातिपदिकसंज्ञायामेव स्वाद्युत्पत्तिः प्रतिबद्धा। किं तर्हि? । एकत्वादिष्वर्थेषु स्वादयो विधीयन्ते। न चैषाम्--अनर्थकनिपातानाम्--एकत्वादयः सन्ति। नैष दोषः अविशेषेणोत्पद्यन्ते, उत्पन्नानां नियमः क्रियते।' आणि या भाष्याचाच दीक्षितांनी मनोरमेच्या वरील पंक्तींत अनुवाद केला आहे.) अर्थवद्ग्रहणपरिभाषा असल्यामुळें, त्या परिभाषेच्या योगानें अनर्थकाचे ठिकाणी सुबुत्पत्ति होऊं शकणार नाही--म्हणजे

'अर्थवद्ग्रहणेनानर्थकस्य'–परि. १४–ही परिभाषा असल्यामुळें, जीं प्रातिपदिकें अर्थवान् आहेत त्याहूनच 'ङ्याप्प्रातिपदिकात्' या अधिकारसूत्रान्वयें सुबुत्पत्ति होईल व वर्णरूप अनर्थक प्रातिपदिकांहून सुबुत्पत्ति होऊच शकणार नाही–असे कोणी म्हटल्यास तें म्हणणें बरोबर नाही; कारण 'अर्थवद्ग्रहणे' ही परिभाषा अशाच ठिकाणीं लागू पडते कीं, जेथें सूत्रांत प्रातिपदिकविशेषाचें ग्रहण केलें आहे. ('ङ्याप्प्रातिपदिकात्' सू. १८२ या अधिकारसूत्रांत प्रातिपदिकविशेषाचें ग्रहण केलें नसून 'प्रातिपदिक' या सामान्य प्रातिपदिकवाचक शब्दाचें ग्रहण केलें असल्यामुळें, त्या सूत्राला 'अर्थवद्ग्रहणे' ही परिभाषा लागू पडत नाही आणि त्यामुळें प्रकृत सूत्रांतून 'अर्थवत्' हें पद गाळल्यास, वर सांगितल्याप्रमाणें, अनर्थक वर्णांना प्रातिपदिकसंज्ञा होऊन त्याहून औत्सर्गिक 'सु' प्रत्यय होण्याची आपत्ति येईल व तो प्रत्यय केला असतां जरी 'हल्ङ्याब्भ्यः' सू. २५२ या सूत्रानें त्याचा लोप होईल तरी प्रत्ययलक्षणानें प्रत्येक वर्ण पदसंज्ञक ठरेल व त्यामुळें 'घन, वन' इत्यादि स्थलीं 'न्' हून 'सु' प्रत्यय व नंतर 'सु' लोप केल्यावर 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' सू. २३६ या सूत्रानें नकारलोप होण्याची आपत्ति येईल.) प्रकृत सूत्रांतील 'अधातु' इत्यादि पर्युदासाच्या सामर्थ्यानें अर्थवान् शब्दानाच प्रातिपदिकसंज्ञा होते हा अर्थ प्रकृत सूत्रांतूनच जरी निघू शकतो तरी, त्या सूत्रांत 'अर्थवत्' या पदाचें जें ग्रहण केलें आहे तें त्या पदाची उत्तर सूत्रांत–'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रांत–अनुवृत्ति व्हावी याकरितां केलें आहे हें पूर्वीं सांगितलेंच आहे आणि 'सुप्तिङन्तं पदम्' १.४.१४ या सूत्रावरील भाष्यांत हें ध्वनित केलें आहे. (हें भाष्य शब्दरत्नांत दिलें आहे व त्याचें विवरण तेथें करण्यांत येईल).

मनोरमा–यत्त्वाहुः– पर्युदासो नार्थवत्त्वं गमयति, अनर्थकयोरपि धातुप्रत्यययोर्दर्शनात् । अधीते,- यावकः इति अधिपूर्वस्येङः

प्रयोगात् विशिष्ट एव अर्थवान्, न तु केवलः, इङ् अध्ययने इत्याद्यर्थनिर्देशस्तु अवयवे समुदायार्थारोपात् । एवं कप्रत्ययोऽनर्थकः, यावच्छब्दादपि तदर्थप्रतीतेः । "ओपधेश्च विभक्तावप्रथमायाम्" "अकर्तरि च कारके–" इति विभक्तिकारकग्रहणाभ्यां 'अर्थवद्ग्रहणे' न्यायस्यानित्यत्वकल्पनाच्चेति । अत्रेदं वक्तव्यम्—धातुरनर्थक इति तावद्व्याहतम् क्रियावाचकत्वं विना धातुत्वायोगात् । आरोपित तदिति चेत्, सत्यम्, तावतैवेष्टसिद्धेः । प्रकृतिप्रत्ययविभागस्तत्तदर्थविभागश्च सर्वः कल्पित एव । परमार्थतस्तु स्फोट एवार्थवानिति सिद्धान्तात् । उक्तं च हरिणा—

> उपायाः शिक्षमाणानां बालानामुपलालनाः ।
> असत्ये वर्त्मनि स्थित्वा ततः सत्यं समीहते ॥१॥

इति । कथमन्यथा इङो द्विर्वचनमडागमश्च स्युः । तथा च प्रत्याहाराह्निके (अर्थवन्तो वर्णाः) इति प्रघट्टके 'अध्येति' 'अधीते' इत्यत्रेकारोऽर्थवानिति भाष्ये स्पष्टमेवोक्तम् । एवं कप्रत्ययोऽप्यर्थवानेव, स्वार्थिकानां प्रकृत्यर्थेनैवार्थवत्त्वात् । कल्पनामात्रमिदमिति चेद्, न, उक्तोत्तरत्वात् । नैषा कल्पना शास्त्रकृत्सम्मतेति चेत्, न, "द्वितीयतृतीयचतुर्थतुर्याणि" इति सूत्रे पूरणात्स्वार्थेऽन्प्रत्ययस्य पूरणार्थताया भाष्यकारैरेवोक्तत्वात् । 'प्रत्ययः' इति महासंज्ञां कुर्वतः सूत्रकृतोऽपि सम्मतमेवेदम् । यदपि "ओपधेश्च" इत्यादि, तदपि न, अनित्यत्वेऽप्यौत्सर्गिकप्रवृत्त्या इष्टसिद्धेः, इष्टस्थलेऽप्रवृत्तौ न्यायस्य निर्विषयत्वापाताच्च, अनित्यत्वज्ञापनस्य कप्चिद्विषयत्वे अर्थवद्ग्रहणस्यैव ज्ञापकत्वसंभवाच्च । उत्तरार्थस्यापि इह किंचित् क्रियो इति न्यायेन इह करणस्य सफलत्वौचित्यात्, "ओपधेश्च" इत्यादौ विभक्तिकारकग्रहणयोरेवैत्य सति प्रत्याख्यानसम्भवाच्चेति दिक् ।

प्रकाशकाराचे असे म्हणणे आहे की, प्रकृत सूत्रातील ('अपात्, अप्रत्यय' या) पर्युदासांनी अर्थवान् शब्दांनाच प्राति-

पदिकसंज्ञा होऊ शकते असा अर्थ निघू शकत नाही, कारण कित्येक धातु व प्रत्यय अनर्थक देखील आहेत. 'अधीते, यावक.' ही जनुक्रमें अर्थरहित धातूची व प्रत्ययाची उदाहरणे होत. 'अधि' या उपसर्गपूर्वक 'इङ्' धातूचाच भार्षेत (अध्ययन करणे या अर्थामध्यें) प्रयोग होत असल्यामुळें, अध्युपसर्गपूर्वकच 'इङ्' धातु अर्थवान् ठरतो. केवळ 'इङ' धातु म्हणजे अध्युपसर्गरहित 'इङ्' धातु अर्थवान् नाही. धातुपाठात 'इङ् अध्ययने' इत्यादि जो अर्थनिर्देश केला आहे तो अवयवाचे– 'इङ्' या अवयवाचे–ठिकाणी समुदायाच्या–'अधि+इङ्' या समुदायाच्या–अर्थाचा आरोप करून केला आहे. त्याचप्रमाणे ('यावक' यातील 'यावादिभ्य. कन्' सू. २०९७ या सूत्रानें 'याव' या शब्दाहून झालेला स्वार्थे) 'कन्' प्रत्यय देखील अनर्थक आहे; कारण ('यावक' या 'कन्' प्रत्ययान्त शब्दाहून ज्या अर्थाचा बोध होतो) त्याच अर्थाचा 'याव' या (प्रत्ययरहित) शब्दाहून देखील बोध होतो. ('यावादिभ्य. कन्' या सूत्रातील 'याव' या शब्दाची 'यवानामय याव.' अशी वृत्ति आहे व 'यवापासून तयार केलेला पदार्थ' असा 'याव' या शब्दाचा अर्थ आहे. या 'याव' शब्दाहून 'याव एव यावक.' या अर्थामध्यें स्वार्थे 'कन्' प्रत्यय केला असता, 'याव' या शब्दाहून ज्या अर्थाचा बोध होतो त्याहून अधिक अर्थाचा बोध 'कन्' प्रत्ययान्त 'यावक' शब्दाहून होत नाही व म्हणून तो 'कन्' प्रत्यय अर्थरहित ठरतो असे प्रकाशकाराचे म्हणणे आहे) दुसरे असे की, 'ओपदेशश्च विभक्तावप्रथमायाम्' सू. ३५३४ व 'अकर्तरि च कारके सू. ३१८६ या दोन सूत्रात ('अप्रथमायाम्' व 'अकर्तरि' असा पर्युदास असून देखील) 'विभक्तौ' व 'कारके' या पदाचे त्या सूत्रात ग्रहण केले असल्यामुळें हे स्पष्ट होते की, 'नञिवयुक्तम्'–परि. ७५–ही परिभाषा अनित्य आहे. ('नञिवयुक्तम्' या परिभाषान्वयें 'अप्रथमायाम्' या नञ्युक्त पदाचा प्रथमाभिन्न पण प्रथमासदृश असा अर्थ होतो आणि प्रथमाभिन्न

व प्रथमासदृश अशी द्वितीया इत्यादि विभक्तीच असू शकते आणि म्हणून 'ओषधेश्च' या सूत्रात 'विभक्ती' हे पद घालण्याची काहीच गरज नव्हती. त्याचप्रमाणे 'अकर्तरि च कारके' या सूत्रातील 'अकर्तरि' या नञ्युक्त पर्युदासाचा 'कर्तृभिन्न किन्तु कर्तृसदृश' असा वरील परिभाषान्वयें अर्थ होतो आणि कर्तृभिन्न व कर्तृसदृश अशी कर्म करण इत्यादि कारकेंच असू शकतात. असे असून देखील त्या सूत्रात 'कारके' या पदाचे जें ग्रहण केलें आहे तें व्यर्थ ठरतें. पण तसें ग्रहण केलें असल्यामुळें हें स्पष्ट होतें की, 'नञिवयुक्तम्' ही परिभाषा अनित्य आहे आणि अशा अनित्य परिभाषेच्या आधारावर, प्रकृत सूत्रातील 'अधातु, अप्रत्ययः' या पर्युदासाच्या सामर्थ्यानें अर्थवान् शब्दानाच प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकत असल्यामुळें प्रकृत सूत्रातील 'अर्थवत्' या पदाचे ग्रहण व्यर्थ ठरतें, असा निष्कर्ष काढणें अयोग्य आहे असा प्रकाशकाराच्या म्हणण्याचा आशय आहे, व त्याचें असेंहि म्हणणें आहे की, सर्वच धातु व प्रत्यय अर्थवान् नसून काही धातु व प्रत्यय अनर्थक असल्यामुळें देखील, तसा निष्कर्ष काढणें योग्य नाहीं यावर दीक्षित असें उत्तर देतात की,) वर जें प्रकाशकारानी म्हटलें आहे त्यावर हें सांगणें आवश्यक आहे कीं, धातूचे ठिकाणी अर्थवत्ता नाही असें म्हणणें हा वदतोव्याघात होय. कारण 'क्रिया' या अर्थाचा वाचक असल्याशिवाय शब्दाला धातुसंज्ञा होऊ शकत नाही धातूचे ठिकाणी अर्थ आरोपित केला जातो असें जरी मानलें तरी, तेवढ्यानेंच इष्टसिद्धि होऊ शकते, म्हणजे धातु अर्थवान् मानता येतो (प्रकाशकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, भाषेंत प्रत्ययरहित केवळ धातूचा प्रयोग होत नसल्यामुळें धातूचे ठिकाणी अर्थवत्ता नाहीं हें आपोआपच सिद्ध होते. धातूहून प्रत्यय येत्यावर तसा प्रत्ययसहित धातूचे ठिकाणीं अर्थवत्ता येते व तसा प्रत्ययसहित धातूचाच भाषेंत प्रयोग केला जातो म्हणून केवळ धातु अर्थवान् मानता येत नाहीं. प्रकृति-प्रत्ययरूप समुदायाचे ठिकाणीं जी अर्थवत्ता येते ती धातुरूप अवय-

याचे ठिकाणी केवळ आरोपित केली जाते. पण यशा आरोपित अर्थानें धातु अर्थवान् ठरू शकत नाही. यावर दीक्षित असें उत्तर देतात की, 'क्रियावाचिनो भ्वादयः धातुसंज्ञाः स्युः' अशी धातूची व्याख्या असल्यामुळें, धातु अर्थवान् नाही हें म्हणणें वरील व्याख्ये-विरुद्ध ठरतें. दुसरें असें की, प्रकृतिप्रत्ययरूप समुदायाच्या अर्थाचा धातूचे ठिकाणीं आरोप केला जातो हें म्हणणें जरी खरें मानलें तरी, तशा आरोपित अर्थानें धातूचे ठिकाणीं अर्थवत्ता येतेच. आरोपित अर्थानें शब्दाचे ठिकाणीं अर्थवत्ता येत नाही असें मानल्यास, 'डित्थ' इत्यादि अनर्थक 'यदृच्छा' शब्दाहून सुबुत्पत्ति होऊं शकणार नाही. त्याचे ठिकाणीं आरोपित अर्थवत्ता मानल्यानेंच त्याहून सुबुत्पत्ति करता येते ) प्रकृति व प्रत्यय असा विभाग करणें व त्याचा अर्थ भिन्न आहे असें मानणें हें सर्व कल्पितच आहे व वास्तविक 'स्फोट' हाच अर्थवान् आहे असा सिद्धांत आहे. ('स्फोट' कशाला म्हणतात यासंबधानें सर्वदर्शन-संग्रहांतील पाणिनीय दर्शनांत माधवानें असें म्हटलें आहे—'किं वर्णाः समस्ता व्यस्ता वार्थप्रत्ययं जनयन्ति । नाद्यः । वर्णानां क्षणिकानां समूहासम्भवात् । नान्त्यः । व्यस्तवर्णभ्योऽर्थ-प्रत्ययासम्भवात् । न च व्याससमासाभ्यामन्यः प्रकारः समस्तीति । तस्माद्वर्णानां वाचकत्वानुपपत्तौ यद्बलादर्थप्रतिपत्तिः स स्फोटः । वर्णातिरिक्तो वर्णाभिव्यङ्ग्योऽर्थप्रत्यायको नित्यः शब्दः स्फोट इति तद्विदो वदन्ति । अत एव स्फुटयते व्यज्यते वर्णैरिति स्फोटो वर्णा-भिव्यङ्ग्यः, स्फुटति स्फुटीभवत्यस्मादर्थ इति स्फोटोऽर्थप्रत्यायक इति स्फोटशब्दार्थमुभयथा निराहुः ।') हरीनें आपल्या कारिकेंत असें म्हटलें आहे की, (प्रकृतिप्रत्ययविभागकल्पना आणि त्यांचे अर्थ भिन्न आहेत ही कल्पना हे सर्व व्याकरणशास्त्र शिकणाऱ्या) अज्ञ विद्यार्थ्यांला त्या शास्त्राचें ज्ञान करून देण्याचें केवळ उपाय होत. असत्य मार्गाचें अवलंबन करून त्या योगानें सत्य अर्थाचा बोध करून घेता येतो. 'इङ्' धातु अर्थवान् नाही असें मानलें तर,

त्याचे द्विर्वचन व त्याला अडागम इत्यादि कसे होऊं शकतील? म्हणूनच प्रत्याहाराह्निकात 'अर्थवन्तो वर्णाः' या मथळ्याखाली भाष्यकारानी 'अध्येति, अधीते' यातील 'इ' हा धातु अर्थवान् आहे असे अगदी स्पष्टपणे म्हटले आहे. ('हयवरट्' या शिवसूत्रा वरील भाष्यात 'अर्थवन्तो वर्णा धातुप्रातिपदिकप्रत्ययनिपातानामेक-वर्णानामर्थदर्शनात्' हे वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचे व्याख्यान करिताना भाष्यकार म्हणतात–'धातव एकवर्णा अर्थवन्तो दृश्यन्ते । एति अध्येति अधीत इति ।') त्याचप्रमाणे 'कन्' प्रत्यय देखील अर्थवान्च आहे, कारण स्वार्थिक प्रत्यय (प्रकृतीच्या अर्थाचे वाचक असल्यामुळे) प्रकृतीच्या अर्थानें अर्थवान् ठरतात. स्वार्थिक प्रत्यय अर्थवान् आहेत हे मानणे केवळ कल्पनामूलक आहे असे म्हटल्यास, ते म्हणणे बरोबर नाही व या शंकेवर पूर्वी उत्तर दिलेच आहे. (प्रकाशकाराचे असे म्हणणे आहे की, स्वार्थिक प्रत्ययाला स्वतःचा काही अर्थ नसून त्याचे ठिकाणी प्रकृतीच्या अर्थाचा केवळ आरोप केला जातो आणि म्हणून स्वार्थिक प्रत्यय अर्थवान् मानता येत नाही. यावर दीक्षितानी पूर्वी असे उत्तर दिले आहे की, ज्याचे ठिकाणी आरोपित अर्थवत्ता असते तो देखील अर्थवान् मानता येतोच व म्हणून स्वार्थिक प्रत्यय अर्थवान् नाही हे म्हणणें अयोग्य ठरते.) स्वार्थिक प्रत्ययाचे ठिकाणी प्रकृतीचा अर्थ आरोपित केल्यानें तो अर्थवान् ठरतो अशी कल्पना करणे भाष्यकारादिकाना समत नाही असे म्हणणे असल्यास, ते म्हणणे बरोबर नाही; कारण 'द्वितीयतृतीयचतुर्थतुर्याणि' सू. २–२–३ या सूत्रावरील भाष्यात पूरणार्थक 'तीय' प्रत्ययान्त शब्दाहून जो स्वार्थे 'अन्' प्रत्यय होतो तो देखील पूरणार्थकच प्रत्यय आहे असे भाष्य-कारानीच म्हटले आहे. ('द्वेस्तीयः, त्रेः सम्प्रसारणं च' सू. १८५८, १८५५ या सूत्रानीं 'द्वि,त्रि' या शब्दाहून पूरणार्थक 'तीय' प्रत्यय होतो व अशा पूरणार्थक 'तीय' प्रत्ययान्त भागवाचक शब्दाहून 'पूरणाद्भागे तीयादन्' सू. १९९४ या सूत्रानें

स्वार्थिक 'अन् = अ' प्रत्यय होतो. हा 'अन्' प्रत्यय स्वार्थिक–प्रकृतीच्या अर्थाचाच बोधक–असून देखील, भाष्यकारानी तो पूरणार्थक प्रत्यय आहे असे 'द्वितीयतृतीयचतुर्थ' या सूत्रावरील भाष्यात म्हटले आहे. त्या सूत्रात 'अन्यतरस्याम्' या पदाचे ग्रहण का केले आहे हा प्रश्न करून त्या प्रश्नाचे उत्तर देताना भाष्यकार असे म्हणतात की, विकल्पेंकरून षष्ठीसमास व्हावा हे त्या पदाच्या ग्रहणाचे प्रयोजन आहे आणि हे सिद्ध करिताना ते म्हणतात.– 'क्रियमाणेऽपि वै अन्यतरस्याङ्ग्रहणे षष्ठीसमासो न प्राप्नोति। किं कारणम्?। पूरणगुणेति प्रतिषेधात्। नैतत्पूरणान्तम्; अनेतत्पर्यवपन्नम्। एतदपि पूरणान्तमेव। कथम्?। पूरण नामार्थस्तमाह तीयशब्दः, अतः पूरणम्। योऽसौ पूरणान्तात्स्वार्थे भागेऽन्, सोऽपि पूरणमेव। एव तर्ह्यन्यतरस्याङ्ग्रहणसामर्थ्यात्षष्ठीसमासो भविष्यति।' 'पूरणाद्भागे तीयादन्' ५-३-४८ या सूत्रावरील भाष्यात देखील भाष्यकारानी असेच म्हटले आहे. या दोन्ही भाष्यावरून हे स्पष्ट होते की, स्वार्थिक प्रत्यय प्रकृत्यर्थाचे बोधक असल्यामुळे त्या अर्थानें अर्थवान् ठरतात. म्हणून स्वार्थिक प्रत्यय अर्थरहित आहेत असे जें प्रकाशकाराचे म्हणणे आहे ते भाष्यविरुद्ध असल्यामुळे चूक ठरतें. तसेच 'इङ्' धातु अनर्थक आहे असे जें त्याचे म्हणणे आहे ते देखील वर सांगितल्याप्रमाणे भाष्यविरुद्ध असल्यामुळें चूक ठरतें. सारांश, प्रत्येक धातु व प्रत्येक प्रत्यय अर्थवान् असल्यामुळें, प्रकृत सूत्रातील 'अधातुः अप्रत्ययः' या पर्युदासाच्या बलानेंच हे स्पष्ट होते की, अर्थवान् शब्दानाच प्रातिपदिकसंज्ञा होते आणि त्यामुळें प्रकृत सूत्रातील 'अर्थवत्' या पदाचे ग्रहण व्यर्थ ठरतें.) 'प्रत्यय.' अशी महासंज्ञा–अन्वर्थक संज्ञा–करणाऱ्या सूत्रकार पाणिनीला देखील हेच संमत आहे. म्हणजे प्रत्येक प्रत्यय अर्थवान् आहे हेंच पाणिनीला देखील संमत आहे. ('प्रत्याययति इति प्रत्ययः' म्हणजे जो अर्थाचा बोध करून देतो तो प्रत्यय होय, अशी 'प्रत्यय' शब्दाची व्युत्पत्ति आहे. म्हणून 'प्रत्यय' ही संज्ञा त्या शब्दाच्या अर्थाला धरून केली

असल्यामुळें अन्वर्थक ठरते आणि या सञ्ज्ञेवरूनच हे सिद्ध होतें की, प्रत्येक प्रत्यय मग तो स्वार्थिक असो किंवा भिन्न प्रकारचा असो, पाणिनीच्या मते अर्थवान् असतोच.) 'ओपघेरच' इत्यादि जें प्रकाश-कारानी म्हटलें आहे – म्हणजे 'ओपघेरच विभक्तावप्रथमायाम्' या सूत्रात 'अप्रथमायाम्' या पर्युदासाचे व तसेच 'अकर्तरि च कारके' या सूत्रात 'अकर्तरि' या पर्युदासाचें ग्रहण केलें असून देखील पुन्हा त्या दोन सूत्रात 'विभक्तौ' व 'कारके' हीं पदें अनु-क्रमें घातली असल्यामुळें 'नञिवयुक्तम्' ही परिभाषा अनित्य ठरते व तशी अनित्य परिभाषा प्रकृत सूत्राचे ठिकाणी प्रवृत्त करून या सूत्रातील 'अर्थवत्' या पदाचे ग्रहण व्यर्थ आहे असें मानणें अयोग्य आहे असें जें प्रकाशकारानी म्हटलें आहे – ते देखील बरोबर नाहीं; कारण ती परिभाषा अनित्य असली तरी तिच्या औत्सर्गिक प्रवृत्तीनें इष्टसिद्धि करून घेता येते इष्ट स्थलाचे ठिकाणी देखील ती परि-भाषा प्रवृत्त न केल्यास ( तिच्या प्रवृत्तीला कोणतहि स्थळ राहत नसल्यामुळें ) ती निर्विषय, म्हणजे व्यर्थ, ठरण्याची आपत्ति येते ती परिभाषा अनित्य आहे याचे काहीं तरी ज्ञापक असणे आवश्यक आहे असे म्हणणें असल्यास, प्रकृत सूत्रातील 'अर्थवत्' या पदाचें ग्रहणच त्या परिभाषेच्या अनित्यत्वाचें ज्ञापक मानता येऊ शकते 'अर्थवत्' या पदाची उत्तर सूत्रात अनुवृत्ति व्हावी याकरिता त्या पदाचें प्रकृत सूत्रात जें ग्रहण केलें आहे ते काहीं तरी प्रयोजना-करिता केलें आहे ह 'इह किंचित् त्रपो' या न्यायान्वयें मानणें उचित आहे. ( इष्टसिद्धि करण्याकरिताच परिभाषा रचल्या असल्यामुळें, एखादी परिभाषा अनित्य असली तरी, तिची प्रवृत्ति होणें हा तिचा नैसर्गिक धर्म आहे. जेथें तशी अनित्य परिभाषा प्रवृत्त केल्यानें इष्टसिद्धि न होता अनिष्ट सिद्धि होण्याची आपत्ति येते तशाच ठिकाणीं तिची प्रवृत्ति करणे योग्य नाही. इतर सर्वत्र तिची औत्सर्गिक प्रवृत्ति होतेच व तिच्या प्रवृत्तीचा तशा स्थली कोणत्याहि रीतीनें प्रतिबंध करता येत नाही. इष्ट स्थलीं देखील

अनित्य परिभाषा प्रवृत्त न केल्यास ती करून न केल्यासारखीच होईल व अशा रीतीनें ती व्यर्थ ठरण्याची आपत्ति येईल म्हणून 'नञिवयुक्तम्' ही परिभाषा जरी अनित्य आहे तरी तिची प्रवृत्ति सूत्राचे ठिकाणी होणारी औत्सर्गिक – स्वाभाविक – प्रवृत्ति रोखता येत नाही आणि ती परिभाषा प्रकृत सूत्राचे ठिकाणी प्रवृत्त केल्यास, या सूत्रातील पर्युदासाच्या बळानेंच अर्थवान् शब्दानाच प्रातिपदिकसंज्ञा होते हे सिद्ध होत असल्यामुळें, या सूत्रातील 'अर्थवत्' या पदाचे ग्रहण व्यर्थ ठरत हे उघड आहे आणि त्या पदाची उत्तर सूत्रात अनुवृत्ति व्हावी एवढ्याच हेतूनें प्रकृत सूत्रात त्या पदाचे ग्रहण केले आहे मग असे जर आहे तर उत्तर सूत्रातच त्या पदाचे ग्रहण का केले नाहीं व प्रकृत सूत्रात त्या पदाचे पाणिनीनें ग्रहण का केले आहे असे कोणी म्हटल्यास, त्यावर दीक्षित असे उत्तर देतात की, प्रकृत सूत्रात 'अर्थवत्' या पदाचे ग्रहण व्यर्थ ठरत असून देखील पाणिनीनें ज्याअर्थी त्या पदाचे ग्रहण केले आहे त्याअर्थी तसे करण्यात पाणिनीचा काही तरी हेतु असावा हे 'इह किंचित् नया' या न्यायान्वयें उघड होतें, व तो हेतु हाच की, 'नञिवयुक्तम्' ही परिभाषा अनित्य आहे हे त्या पदाच्या ग्रहणानें ज्ञापित व्हावे ती परिभाषा नित्य असती तर प्रकृत सूत्रात 'अर्थवत्' या पदाचे ग्रहण करण्याची काहींच गरज नव्हती, कारण अर्थवान् शब्दानाच प्रातिपदिकसंज्ञा होते हे प्रकृत सूत्रातील पर्युदासानी या परिभाषान्वयें सिद्ध होऊच शकले असते पण ही परिभाषा अनित्य असल्यामुळें तिची प्रवृत्ति न केल्यास, प्रकृत सूत्रातून इष्ट अर्थ निष्पन्न न होण्याची आपत्ति येते ती टाळण्याकरिता या सूत्रात 'अर्थवत्' या पदाचे ग्रहण केले आहे व अशा रीतीनें ते ग्रहण चरितार्थ होऊन त्या परिभाषेच्या अनित्यत्वाचे ज्ञापक ठरते या मनोरमेंतील पंक्तीत 'इह किंचित् नयो' या ज्या न्यायाचा उल्लेख केला आहे तो न्याय 'इकोऽचि विभक्तौ' ७ १ ७३ या सूत्रावरील भाष्यात पठित असलेल्या दोन कारिकांचे अन्तिम चरण आहे 'इकोऽचि' सू ३२० या सूत्रात

'अचि' या पदाचे ग्रहण का केले आहे असा त्या भाष्यात भाष्य-कारानी प्रश्न केला आहे त्या पदाचे ग्रहण जरी त्या सूत्रात केले नसत तरी, इगन्त नपुंसक अङ्गापुढें हलादि विभक्तिप्रत्यय आल्यानें जो 'नुम् = न्' झाला असता त्या 'नुम्' चा 'न लोप प्रातिपदिकान्तस्य' सू २३६ या सूत्रानें लोप होऊं शकलाच असता, कारण 'त्रपु + भ्याम' इत्यादि स्थली जरी नुमागम होऊन 'त्रपुन् भ्याम्' अशी स्थिति झाली असती तरी, 'स्वादिष्वसर्वनामस्थाने' सू २३० या सूत्रानें 'त्रपुन्' या अङ्गाला पदसंज्ञा झाल्यानें 'त्रपुन्' यातील अन्त्य नकाराचा 'न लोप ' सू २३६ या सूत्रानें लोप होऊं शकलाच असता व अशा रीतीनें सर्व इष्ट रूपें सिद्ध होऊं शकलीच असती 'अचि' या पदाची उत्तर सूत्रात अनुवृत्ति व्हावी याकरिता त्या सूत्रात 'अचि' या पदाचे ग्रहण केले आहे असे जर मानल तर, उत्तर सूत्रातच त्या पदाच ग्रहण केले पाहिजे होतें व 'इकोऽचि' या सूत्रात त्या पदाच ग्रहण करण्याची काहीच आवश्यकता नव्हती असें असून देखील ज्याअर्थी आचार्य पाणिनीनें त्या सूत्रात 'अचि' या पदाच ग्रहण केले आहे त्याअर्थी हे स्पष्ट होत की, तस ग्रहण करण्याच काही तरी प्रयोजन असलेच पाहिजे, व त प्रयोजन ह की, 'त्रपु' या इगन्त नपुंसक प्रातिपदिकापुढें 'सु' हा सबुद्धीचा प्रत्यय आला असता, 'त्रपु' या अङ्गाला नुमागम होऊ नये पण 'स्वमोर्न-पुंसकात्' सू ३१९ या सूत्रानें 'सु' प्रत्ययाचा लुक् होऊन 'त्रपु' या अङ्गापुढें 'सु' प्रत्यय राहत नसल्यामुळें, नुमागमाची प्राप्ति होऊंच शकत नाही 'सु' प्रत्यय कायमच आहे असे 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' सू २६२ या सूत्रान्वये मानल्यानें नुमागमाची प्राप्ति होते असे दखाल म्हणता येत नाही, कारण 'न लुमताङ्गस्य' सू २६३ हा निषेध असल्यामुळें व प्रश्न स्थली प्रत्ययलक्षणानें अङ्गाला कार्य करण असल्यामुळें, 'प्रत्ययलोप' हे सूत्र येथें प्रवृत्त होऊंच शकत नाही व त्यामुळें नुमागमाची प्राप्तीच होत नाही अशा रीतीनें 'अचि' या पदाच ग्रहण सर्व प्रकारें व्यर्थ ठरत असून देखील

पाणिनीनें त्या सूत्रात त्या पदाचे ग्रहण का केले आहे ? या प्रश्नाचे भाष्यकार असे उत्तर देतात की, 'न लुमताङ्गस्य' हा निषेध अनित्य आहे हे ज्ञापित व्हावें याकरिता त्या सूत्रात 'अचि' या पदाचें ग्रहण केले आहे. पण तो निषेध नित्य मानल्यानें जर 'त्रपु + सु' या स्थली नुमागम होणे आपोआप टळते तर तो निषेध अनित्य मानण्याची गरज काय ? यावर भाष्यकार असे उत्तर देतात की, तो निषेध अनित्य मानण्याचे प्रयोजन हे आहे की, 'हे त्रपो' असें देखील सबुद्धीचे रूप सिद्ध व्हावें—म्हणजे 'हे त्रपु सु' या स्थली 'सु' या सबुद्धिप्रत्ययाचा 'स्वमोर्नपुंसकात्' या सूत्रानें लुक् झाला असता देखील 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' हे सूत्र प्रवृत्त होऊन व त्या सूत्रान्वयें 'सु' प्रत्यय कायमच आहे असे मानले जाऊन 'ह्रस्वस्य गुणः' सू २४२ या सूत्रानें 'त्रपु' यातील अन्त्य उकाराचा गुण व्हावा व 'त्रपो' असे सबुद्धीचे इष्ट पाक्षिक रूप सिद्ध व्हावें. सारांश 'इकोऽचि' या सूत्रातील 'अचि' या पदाचे ग्रहण 'न लुमताङ्गस्य' हा निषेध अनित्य आहे याचे ज्ञापक आहे व तो निषेध अनित्य असल्यामुळेंच 'हे त्रपो' असे सबुद्धीचें इष्ट पाक्षिक रूप सिद्ध होऊ शकतें, आणि अशा रीतीनें त्या ग्रहण चरितार्थ ठरतें. 'इकोऽचि विभक्तौ' या सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात- 'अज्ग्रहणं किमर्थम् ? । इकोऽचि व्यञ्जने मा भूत् । इकोऽचीत्युच्यते व्यञ्जनादौ मा भूत्—त्रपुभ्यां त्रपुभिः । अस्तु, लोपः । अस्त्वत्र नुम्, न लोपः प्रातिपदिकान्तस्येति नलोपो भविष्यति।' यानंतर 'अचि' या पदाच्या ग्रहणाची इतर प्रयोजनें सांगून व त्या सर्व प्रयोजनांचें खण्डन करून असें शेवटी भाष्यकार म्हणतात—'उत्तरार्थं तर्ह्यज्ग्रहणं कर्तव्यम्, अस्थिदधिसक्थ्यक्ष्णामनङुदात्तः—अजादौ यथा स्यादिह मा भूत्—अस्थिभ्याम्, अस्थिभिरिति । यद्युत्तरार्थं स्यात्तत्रैवायमज्ग्रहणं कुर्वीत, इह हि क्रियमाणे यदि किंचित्प्रयोजनमस्ति तदुच्यताम् । इहापि क्रियमाणे प्रयोजनमस्ति । किम् ? । अजादौ यथा स्यादिह मा भूत्—त्रपु, जतु । एतदपि नास्ति प्रयोजनं, विभक्तावित्युच्यते, न

चाऽत्र विभक्ति पश्यामः । प्रत्ययलक्षणेन । न लुमताङ्गस्येति प्रत्यय-लक्षणस्य प्रतिषेधः । एवं तर्हि सिद्धे सति यदग्रहणं करोति तज्ज्ञा-पयत्याचार्यो भवतीह कश्चिदन्योऽपि प्रकारः प्रत्ययलक्षणं नामेति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् ? । हे त्रपु, हे त्रपो । अत्र गुणः सिद्धो भवति ।' या भाष्याचे विवरण वर केलेच आहे व हाच 'इह किंचित् त्रपो इति' हा न्याय होय. हा न्याय प्रकृत सूत्रास लावल्यास, जरी या सूत्रातील 'अर्थवत्' या पदाचे ग्रहण उत्तर सूत्रात त्याची अनुवृत्ति होण्याकरिता केले आहे तरी, ते ग्रहण उत्तर सूत्रात न करिता प्रकृत सूत्रातच केले आहे याचे काही तरी विशिष्ट प्रयोजन असलेच पाहिजे असे मानणे उचित आहे व ते प्रयोजन हेच की, 'नञिवयुक्तम्' ही परिभाषा अनित्य आहे हे ज्ञापित व्हावे. अशा रीतीने ती परिभाषा अनित्य आहे हे प्रकृत सूत्रातील 'अर्थवत्' या पदानेच ज्ञापित होत असल्यामुळे) 'ओप-धेश्च विभक्तावप्रथमायाम्' व 'अकर्तरि च कारके' या सूत्रात 'विभक्तौ' व 'कारके' या ज्या पदाचे ग्रहण केले आहे ती पदे ('नञिवयुक्तम्' या परिभाषान्वये) प्रत्याख्यात करता येतात. (प्रथमाध्यायातील प्रकृत सूत्रातच 'नञिवयुक्तम्' या परिभाषेच्या अनित्यत्वाचे ज्ञापक उपलब्ध असल्यामुळे व ती परिभाषा अनित्य मानण्यास अनेक ज्ञापकाची गरज नसून प्रकृत सूत्रातील 'अर्थवत्' एवढे एक ज्ञापक देखील पुरे असल्यामुळे, उत्तराध्यायातील वरील दोन सूत्रातून 'विभक्तौ' व 'कारके' ही व्यर्थ ठरत असलेली पदे गाळता येतात, कारण ती पदे 'नञिवयुक्तम्' ही परिभाषा अनित्य आहे हे ज्ञापित व्हावे एवढ्याकरिताच कायम ठेवणे इष्ट वाटत होते. पण आता प्रकृत पूर्वसूत्रातील ज्ञापक उपलब्ध झाल्यामुळे, ती दोन पदे कायम ठेवण्याची काही आवश्यकता नाही व ती पदे गाळल्याने पदलाघव होते हे उघड आहे. 'नञिवयुक्तम्' ही परिभाषा जरी अनित्य आहे तरी, 'अनित्यत्वेऽप्यौत्सर्गिकप्रवृत्त्या इष्टसिद्धेः' असे जे वर म्हटले आहे त्याअन्वये ती परिभाषा प्रवृत्त करून

'विभक्तौ' व 'कारके' या पदाचे प्रत्याख्यान करता येते व अशा रीतीनें पदलाघवरूप इष्ट फल साधता येते-)

मनोरमा— "अधातुः" इति किम् ? 'अहन्' नलोपो मा भूत । न च कार्यकालपक्षे प्रत्ययान्तत्वेन पर्युदासोऽस्त्विति वाच्यम्, प्रत्ययलक्षणेनोक्तपर्युदासाप्रवृत्तेः "न ङिसम्बुद्ध्योः" इति निषेधेन ज्ञापितत्वात् । कथमन्यथा राजेत्यादौ नलोपः स्यात् । अप्रत्ययः किम् ? हरिषु, करोषि । अत्र सुप्सिपोर्मा भूत् । अप्रत्ययान्तः किम् ? तत्रैव विभक्तिविशिष्टयोर्मा भूत् । न चान्तवद्भावेन काण्डे, कुड्ये, इत्यादौ प्रातिपदिकत्वं स्यादेव । तथा च "ह्रस्वो नपुंसके—" इति ह्रस्वत्वं सोरुत्पत्तिश्च स्यादिति वाच्यम्, कार्यकालपक्षेणेष्टसिद्धेः । यथोद्देशेऽपि 'विभक्त्येकादेशो नान्तवत्' "सप्तम्यधिकरणे च" इत्यादिनिर्देशात् । "ह्रस्वो नपुंसके—" इति सूत्रे प्रातिपदिकग्रहण या उक्तार्थे सामान्यापेक्ष ज्ञापकमस्तु ।

प्रकृत सूत्रात 'अधातुः' या पदाचे ग्रहण अशाकरिता केले आहे की, 'अहन्' यातील अन्त्य नकाराचा लोप होण्याची आपत्ति न यावी. (प्रकृत सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतातः—'अधातु-रिति किमर्थम् ? । अहन् वृत्रम्' । म्हणजे 'अहन् वृत्रम्' या वाक्यातील 'अहन्' या क्रियापदाला प्रातिपदिकसंज्ञा होऊ नये याकरिता प्रकृत सूत्रात 'अधातु' हे पद घातले आहे. 'अ हन् तिप्' या स्थली 'इतश्च' सू २२०७ या सूत्रानें 'तिप् = ति' प्रत्ययातील इकाराचा लोप होऊन 'अहन् त्' अशी स्थिति झाली असता, 'हल्ङ्याब्भ्यः' सू २५२ या सूत्रानें 'त्' या अपृक्त प्रत्ययाचा लोप होऊन, 'अहन्' असे जें रूप होते त्यात जरी अडागम आहे तरी तो 'यदागमा.' –परि. ११ – या परिभाषान्वयें धातूचा अवयव होत असल्यामुळें, केवळ धातूच शिल्लक आहे असे म्हणता येत. प्रकृत सूत्रातून 'अधातुः' हे पद गाळले तर, 'अहन्' या अर्थवान् अप्रत्ययान्त शब्दाला प्रातिपदिकसंज्ञा होईल व त्याला प्रत्यय-

लक्षणानें पदसंज्ञा असल्यामुळें ते प्रातिपदिकान्त पद आहे असे मानले जाऊन 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' या सूत्रानें त्यातील अन्त्य नकाराचा लोप होण्याची आपत्ति येईल असे दीक्षितांचे म्हणणे आहे. यावर शंकाकार अशी शंका करतो की, प्रकृत सूत्रांत 'अप्रत्ययः = प्रत्ययं प्रत्ययान्तं च वर्जयित्वा' असा पर्युदास असल्यामुळें व 'अहन्' या स्थली जो 'त्' या प्रत्ययाचा 'हल्ङ्याब्भ्यः' या सूत्रानें लोप झाला आहे तो प्रत्यय प्रत्ययलक्षणानें विद्यमान आहे असे मानतां येत असल्यामुळें आणि अशा रीतीनें 'अहन्' हा शब्द प्रत्ययान्त ठरत असल्यामुळें) त्याच्या प्रत्ययान्तत्वामुळें 'अहन्' याला 'अप्रत्ययः' या पर्युदासान्वयें कार्यकालपक्षांत प्रातिपदिकसंज्ञा होऊं शकत नाही (व त्यामुळें 'अहन्' यातील अन्त्य नकाराचा लोप होण्याची आपत्ति मुळींच येत नाही. या शंकेवर दीक्षित असे उत्तर देतात की,) ही शंका बरोबर नाही; कारण प्रत्ययलक्षण मानून 'अप्रत्यय' या पर्युदासाची प्रवृत्ति करतां येत नाहीं हे 'न ङिसम्बुद्धयोः' सू. ३५२ या निषेधक सूत्रावरून ज्ञापित होतें. तसें न मानल्यास, 'राजा' इत्यादि स्थली नकारलोप कसा होऊं शकेल ? ('न ङिसम्बुद्धयो' या सूत्रावरील काशिकावृत्तींत 'अस्मादेव नलोपप्रतिषेधवचनादप्रत्यय इति प्रत्ययलक्षणेन प्रातिपदिकसंज्ञा न प्रतिषिध्यते इति ज्ञाप्यते' असेंच म्हटलें आहे. शंकाकाराचें असें म्हणणें आहे की, प्रकृत सूत्रांतून 'अधातुः' हें पद गाळलें तरी, 'अहन्' या पुढील ज्या 'त्' प्रत्ययाचा लोप झाला आहे तो प्रत्यय 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' सू. २६२ या सूत्रान्वयें विद्यमान आहे असें मानल्यानें 'अहन्' हा शब्द प्रत्ययान्त ठरत असल्यामुळें, प्रकृत सूत्रांतील 'अप्रत्ययः = अप्रत्ययान्तः' या पर्युदासाच्या बळानेंच तो शब्द कार्यकालपक्षांत प्रातिपदिकसंज्ञक ठरत नाही व त्यामुळें त्यातील अन्त्य नकाराचा लोप होण्याची आपत्ति मुळींच येत नाही. या शंकेवर दीक्षित असें उत्तर देतात की, प्रातिपदिकसंज्ञा करतेवेळीं ज्या शब्दाहून प्रत्यय होऊन प्रत्ययाचा

लोप झाला आहे तो शब्द प्रत्ययलक्षणानें प्रत्ययान्तच आहे असे मानून प्रकृत सूत्रातील 'अप्रत्ययान्त' या पर्युदासाच्या सामर्थ्यानें तो प्रातिपदिकसंज्ञक ठरत नाही असे मानता येत नाही. तसें मानल्यास, 'राजन् सु' या स्थलीं 'सर्वनामस्थाने चासम्बुद्धौ' सू २५० या सूत्रानें उपधा दीर्घ होऊन व 'हल्ङ्याब्भ्यः' सू २५२ या सूत्रानें 'सु' प्रत्ययाचा लोप होऊन 'राजान्' अशी स्थिति झाली असता, ज्या 'सु' प्रत्ययाचा लोप झाला आहे तो प्रत्ययलक्षणानें विद्यमान आहे असे मानल्यानें जशी 'राजान्' याला 'सुप्तिङन्तं पदम्' या सूत्रानें होणारी पदसंज्ञा होते त्याचप्रमाणें 'राजान्' हा शब्द प्रत्ययक्षणानें प्रत्ययान्त आहे असे मानून प्रकृत सूत्रातील 'अप्रत्यय = अप्रत्ययान्त' या पर्युदासाची प्रवृत्ति केल्यास, तो 'राजान्' शब्द प्रातिपदिकसंज्ञक होणार नाही व त्यामुळें 'प्रातिपदिकसंज्ञक यत्पद तदन्तस्य नकारस्य लोपः स्यात्' या अर्थाचे वाचक 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' सू २३६ हें सूत्र प्रवृत्त होऊं शकणार नाही व 'राजान्' यातील अन्त्य नकाराचा लोप होणार नाही आणि 'राजा' असे प्रथमेच्या एकवचनाचें इष्ट रूप सिद्ध होऊं शकणार नाही. प्रातिपदिकसंज्ञा करतेवेळीं 'अप्रत्ययान्त' या प्रकृत सूत्रातील पर्युदासाचा प्रत्ययलक्षण मानून प्रवृत्ति करता येत नाही याचें 'न ङिसम्बुद्ध्योः' सू ३५२ हें निषेधक सूत्र ज्ञापक आहे. 'हे राजन् सु' या स्थलीं 'हल्ङ्याब्भ्यः' सू २५२ या सूत्रानें संबुद्धीच्या 'सु' प्रत्ययाचा लोप झाल्यावर जरी 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' या सूत्रान्वयें 'राजन्' शब्द प्रत्ययान्त आहे असें मानल्यानें त्याला पदसंज्ञा होते तरी, तो त्या रीतीनें प्रत्ययान्त ठरत असल्यामुळें प्रकृत सूत्रातील 'अप्रत्यय' या पर्युदासाच्या बलानें प्रातिपदिकसंज्ञक ठरत नाही असें मानल्यास, 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' या सूत्रानें नकारलोपाची प्राप्तीच होत नाही. तसेंच 'परमे व्योमन्' या वैदिक प्रयोगांत 'व्योमन् + ङि' अशा स्थितींत 'सुपां सुलुक्' सू ३५६१ या सूत्रानें 'ङि' प्रत्ययाचा लुक् केल्यावर 'व्योमन्'

हा शब्द प्रत्ययलक्षणानें प्रत्ययान्त आहे असे मानून त्याच्या प्रत्ययान्त-त्वामुळें त्याला प्रकृत सूत्रानें होणारी प्रातिपदिकसंज्ञा न केल्यास, 'न लोप प्रातिपदिकान्तस्य' या सूत्रानें नकारलोपाची प्राप्तीच होत नाही मग न ङिसम्बुद्ध्योः ' हें निषेधक सूत्र करण्याची काय गरज होती ? पण तें निषेधक सूत्र मुद्दाम केले असल्यामुळें हें ज्ञापित होतें कीं, प्रकृत सूत्रातील 'अप्रत्ययः = अप्रत्ययान्तः ' हा पर्युदास प्रत्यय-लक्षणानें प्रत्ययान्त ठरणाऱ्या शब्दांना प्रातिपदिकसंज्ञा न व्हावी याकरिता प्रवृत्त करता येत नाही. त्यामुळें 'अहन्' हा अर्थवान् शब्द जरी प्रत्ययलक्षणानें प्रत्ययान्त आहे असे मानता येते तरी, तो प्रत्ययलक्षणानें प्रत्ययान्त आहे एवढ्यावरून त्याला प्रातिपदिकसंज्ञा होणें बंद करता येत नाही व म्हणून 'अहन्' हें प्रातिपदिकसंज्ञक पद आहे असें मानता येऊं शकत असल्यामुळें, या स्थली न लोप ' सू २३६ या सूत्रानें नकारलोप होण्याची आपत्ति येते. ती आपत्ति टाळण्याकरिता आणि 'अहन्' याला प्रातिपदिकसंज्ञा न होण्याकरिता प्रकृत सूत्रात 'अधातु ' हें पद घातलें आहे व अशा रीतीनें तें पद चरितार्थ व आवश्यक ठरतें असें दीक्षिताचें म्हणणें आहे. वर शंकाकारानें जी शंका उपस्थित केली आहे ती कार्यकाल-पक्षातच संभवते आणि म्हणूनच 'कार्यकालपक्षे प्रत्ययान्तत्वेन पर्युदा-सात्' या मनोरमेतील पंक्तीत 'कार्यकालपक्षे' हें पद घातलें आहे 'न लोप प्रातिपदिकान्तस्य' या सूत्रानें नकारलोप कर्तव्य असता, ज्या शब्दातील अन्त्य नकाराचा लोप करणें आहे तो शब्द प्रातिपदिकसंज्ञक व तसेच पदसंज्ञक असणें आवश्यक आहे. म्हणून कार्यकालपक्षात 'यदा कार्यं तदा संज्ञापरिभाषम्' या वचनान्वयें, ज्या शब्दातील अन्त्य नकाराचा लोप करणें आहे तो शब्द पदसंज्ञक व प्रातिपदिकसंज्ञक आहे किंवा नाही हें ठरविण्याचा प्रसंग येतो व त्यावेळीं 'न लोप' सू. २३६ या सूत्राजवळ प्रातिपदिकसंज्ञाविधायक व पदसंज्ञाविधायक सूत्रें उपस्थित होऊन त्यांची एकवाक्यतापन्न झाली असता, 'अहन्' हा शब्द 'अप्रत्ययः' या पर्युदासामुळें

प्रातिपदिकसंज्ञक ठरतो किंवा नाहीं हें ठरविणें भाग पडतें. परंतु यथोद्देशपक्षांत तसा विचार करण्याचा प्रसंगच येत नाहीं. 'हन हिंसागत्योः' ह्या धातुपाठांत पठित असलेला धातु अर्थवान् असल्यामुळें, प्रकृत सूत्रांत 'अधातुः' हा पर्युदास नसल्यास, त्या पक्षांत 'हन्' हा अर्थवान् धातु उच्चारलक्षणीच त्याला प्रातिपदिकसंज्ञा होतें व नंतर अडागम, 'तिप्' प्रत्यय, त्या प्रत्ययांतील इकाराचा लोप, व अखेरीस अवशिष्ट 'त्' प्रत्ययाचा लोप होऊन 'अहन्' अशी स्थिति झाली असतां, जरी 'अहन्' ला प्रत्ययलक्षणानें पदसंज्ञा होते तरी, 'आ कडारादेका संज्ञा' सू २३२ या अधिकारांत प्रातिपदिकसंज्ञा पठित नसल्यामुळें, उत्तर सूत्रानें होणारी पदसंज्ञा पूर्व सूत्रानें होणाऱ्या प्रातिपदिकसंज्ञेचा बाध करूं शकत नाहीं. त्यामुळें पूर्वी झालेली प्रातिपदिकसंज्ञा बाधित न होतां दोन्ही संज्ञा युगपत् कायम राहिल्यानें 'अहन्' यांतील अन्त्य नकाराचा लोप होण्याची आपत्ति यथोद्देशपक्षांत, प्रकृत सूत्रांत 'अधातुः' हें पद नसल्यास, टाळता येणें अशक्य आहे. हें जाणूनच शंकाकारानें वरील शंका करते वेळीं यथोद्देशपक्षाचा आश्रय न घेतां कार्यकालपक्षाचा आश्रय घेतला आहे. पण कार्यकालपक्षांत देखील शंकाकारानें वर केलेली शंका अयथार्थ ठरते हें दीक्षितांनी वर सिद्ध करून दाखविलेंच आहे. या विषयाचें अधिक विवेचन शब्दरत्नांत करण्यांत येईल.) प्रकृत सूत्रांत '*अप्रत्ययः*' हें पद घालण्याचें प्रयोजन हें आहे कीं, 'हरिषु, करोषि' या स्थलीं झालेल्या 'सुप्' व 'सिप्' प्रत्ययांना प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति न यावी. (त्यांना प्रातिपदिकसंज्ञा झाल्यास, त्याहून '*ङ्याप्प्रातिपदिकात्*' या अधिकारसूत्रान्वयें सुबुत्पत्ति होईल व ते पदसंज्ञक ठरतील आणि त्या दोन्हीं 'सु' व 'सि' या प्रत्ययांतील सकार आदि असल्यामुळें व 'सात्पदाद्योः सू. २१२३ ह्या निषेध असल्यामुळें, त्या आद्य सकाराचें षत्व न होण्याची आपत्ति येईल.) प्रकृत सूत्रांत '*अप्रत्ययः = अप्रत्ययान्त*.' असा जो पर्युदास केला आहे तो अशाकरितां कीं, 'हरिषु, करोषि' या प्रत्ययान्त

शब्दाना प्रातिपदिकसंज्ञा न व्हावी (त्याना प्रातिपदिकसंज्ञा झाल्यास, त्याहून पुन्हा 'ङ्याप्प्रातिपदिकात्' या अधिकारसूत्रान्वयें सुबुत्पत्ति होण्याची आपत्ति येईल. प्रकृत सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी 'अप्रत्यय इति किमर्थम्?। काण्डे कुड्ये' असे म्हटले आहे व त्याचा अर्थ हा आहे की, प्रकृत सूत्रात प्रत्ययान्ताला प्रातिपदिकसंज्ञा होण्याचा जो निषेध केला आहे त्याचे कारण हे की, 'काण्डे, कुड्ये' या प्रत्ययान्ताना–सप्तम्यन्त पदाना–प्रातिपदिकसंज्ञा होऊ नये) 'काण्डे 'कुड्ये' इत्यादि स्थली पूर्वान्तवद्भावानें प्रातिपदिकसंज्ञा होईलच व त्यामुळें 'ऱ्हस्वो नपुंसके प्रातिपदिकस्य' सू. ३१८ या सूत्राने ऱ्हस्व होण्याची व 'सु' प्रत्यय होण्याची प्राप्ति आहेच असे कोणी म्हटल्यास, ते म्हणणे बरोबर नाही; कारण कार्यकालपक्षाचा आश्रय केल्यास (वर दाखविलेल्या आपत्ति सहज टाळता येतात व) इष्टसिद्धि करता येते. (शंकाकार असे म्हणतो की, 'काण्ड + ङि = काण्ड + इ = काण्डे' या स्थली 'आद्गुण.' सू ६९ या सूत्रानें 'ए' असा जो गुणरूप एकादेश होतो तो पूर्वान्तवद्भावाने 'काण्ड' या पूर्व प्रकृतीचा अन्त्यवत् मानल्याने 'काण्ड' या प्रकृतीचे ठिकाणी असणारा प्रातिपदिकत्व धर्म 'काण्डे' याचे ठिकाणी 'अन्तादिवच्च' सू ७५ या अतिदेश-शास्त्रानें येऊ शकतो. हे खरें की, त्याच वेळी परादिवद्भाव मानल्यानें प्रकृत सूत्रातील 'अप्रत्यय' या पर्युदासान्वयें 'काण्डे' हा प्रत्ययान्त ठरून त्याला प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति टाळता येते परंतु 'उभयत आश्रयणे नान्तादिवत्' असे वचन असल्यामुळें, एकेच वेळी पूर्वान्तवद्भाव व परादिवद्भाव करता येत नाही. म्हणून पूर्वान्तवद्भाव प्रथम केला असता, 'काण्डे' याला प्राति-पदिकसंज्ञा होते व तो शब्द नपुंसक असल्यामुळें, 'ऱ्हस्वो नपुंसके प्रातिपदिकस्य' सू. ३१८ या सूत्रानें ऱ्हस्वकार्य होऊन, म्हणजे 'एच इग्घ्रस्वादेशे' सू. ३२३ या सूत्रानें 'काण्डे' यातील अन्त्य 'ए' चा 'इ' होऊन व 'काण्डि' असे रूप होऊन, त्याहून

मुबुत्पत्ति झाली पाहिजे. या शंकेवर दीक्षित असे उत्तर देतात की, 'काण्ड + ङि = काण्डे' या स्थली कार्यकालपक्षात 'ह्रस्वो नपुंसके' या सूत्रानें 'काण्डे' यातील अन्त्य अच् ला ह्रस्व कार्य कर्तव्य असता व तो शब्द ह्रस्वान्त केल्यावर त्याहून 'ङ्याप्प्रातिपदिकात्' या अधिकारसूत्रान्वयें सुबुत्पत्ति कर्तव्य असता, या दोन्ही सूत्रात 'प्रातिपदिक' या संज्ञावाचक शब्दाचें ग्रहण असल्यामुळें, 'काण्डे' हा शब्द प्रातिपदिकसंज्ञक आहे किंवा नाही याचा विचार करतेवेळी 'अर्थवदधातुरप्रत्ययः' हे प्रातिपदिकसंज्ञाविधायक प्रकृत सूत्र उपस्थित होईल व त्या सूत्रात 'अप्रत्ययः = अप्रत्ययान्त.' असा पर्युदास असल्यामुळें व 'काण्डे' हा शब्द प्रत्ययान्त असल्यामुळें, त्या पर्युदासाच्या बलानें 'काण्डे' याला प्रातिपदिकसंज्ञा होणार नाही व त्यामुळें 'ह्रस्वो नपुंसके प्रातिपदिकस्य' व तसेंच 'ङ्याप्प्रातिपदिकात्' या, प्रातिपदिकाला लागू पडणाऱ्या, सूत्राची प्रवृत्ति होऊ शकणार नाही.) यथोद्देशपक्षाचा आश्रय केला तरी, 'विभक्त्येकादेशो नान्तवत्' हा सिद्धान्त 'सप्तम्यधिकरणे च' सू. ६३३ इत्यादि पाणिनीय निर्देशानी ज्ञापित होत असल्यामुळें, त्या पक्षात देखील शंकाकारानें दर्शविलेल्या वरील आपत्ति टाळता येतात. (प्रकृतीचा अन्त्य वर्ण व त्या प्रकृतीपुढील विभक्तिप्रत्ययाचा आद्य वर्ण या दोहोंचे जागी झालेला एकादेश पूर्वान्तवद्भावानें प्रकृतीचा अन्तावयव मानता येत नाही असा 'विभक्त्येकादेशो नान्तवत् या वचनाचा अर्थ आहे. या वचनान्वयें 'काण्डे, कुडये' इत्यादि स्थली प्रकृतीच्या 'अ' या अन्त्य वर्णाचे व त्यापुढील 'ङि = इ' या विभक्तिप्रत्ययाचे जागी 'आद्गुणः' या सूत्रानें झालेला 'ए' हा गुणरूप एकादेश पूर्वान्तवद्भावानें प्रकृतीचा अन्तावयव आहे असे मानता येत नाही व त्यामुळें 'काण्डे, कुडये' याना प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकत नाही. 'सप्तम्यधिकरणे च' इत्यादि पाणिनीय निर्देश वरील सिद्धान्ताचे ज्ञापक आहेत. 'अधिकरण+ङि = अधिकरणे' या स्थली 'अधिकरण' या प्रकृतीतील अन्त्य अकार व त्यापुढील 'ङि = इ' हा प्रत्यय या

दोहोंचे जागी 'ए' हा जो गुणरूप एकादेश झाला आहे तो पूर्वान्तवद्भावानें 'अधिकरण' या प्रकृतीचा अन्तावयव मानल्यास, 'ह्रस्वो नपुंसके' या सूत्रानें नपुंसकलिङ्गी 'अधिकरणे' यातील अन्त्य एकाराचे जागी ह्रस्व 'इ' असा आदेश होण्याची व त्याहून सुबुत्पत्ति होण्याची प्राप्ति होते पण पाणिनीनें ह्रस्व कार्य विना सुबुत्पत्ति न करिता 'अधिकरणे' असा निर्देश वरील सूत्रात केला असल्यामुळे, वर सांगितलेला सिद्धान्त ज्ञापित होतो व या सिद्धान्तान्वयें 'काण्डे, कुडचे,' यांना प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकत नाही हें उघड आहे ) अथवा 'ह्रस्वो नपुंसके प्रातिपदिकस्य' सू ३१८ या सूत्रात केलेले 'प्रातिपदिकस्य' या पदाचे ग्रहण वर जो सिद्धान्त सांगितला आहे त्याचे सामान्यापेक्ष ज्ञापक मानता येऊ शकते ('ह्रस्वो नपुंसके' या उत्तर सूत्रात 'अर्थवदधातु' या प्रकृत पूर्व सूत्रातून "प्रातिपदिक' या शब्दाची अनुवृत्ति होऊ शकत असून देखील पुन्हा त्या सूत्रात 'प्रातिपदिकस्य' या पदाचे जें ग्रहण केले आहे त्यावरून हें ज्ञापित होतें की, प्रकृतीचा अन्त्य वर्ण व त्यापुढील विभक्ति प्रत्ययाचा आद्य वर्ण या दोहोंचे जागी एकादेश होऊन तयार झालेल्या कृत्रिम दीर्घान्त शब्दाला पूर्वान्तवद्भावानें प्रातिपदिकसंज्ञा होत नसून व प्रातिपदिकाला होणारी कार्ये तशा शब्दाला होत नसून मूळच्याच दीर्घान्त प्रातिपदिकाला ती कार्यें होतात अशा रीतीनें 'ह्रस्वो नपुंसके' या सूत्रातील 'प्रातिपदिकस्य' या पदाचे ग्रहण एकादेशानें दीर्घान्त झालेल्या शब्दाला केवळ ह्रस्वकार्याचा निषेध होतो एवढ्यापुरतेच विशेषापेक्ष ज्ञापन न मानता, तशा शब्दाला प्रातिपदिकसंज्ञेचा व त्याहून सुबुत्पत्ति होणे इत्यादि सर्व कार्यांचा निषेध होतो याचे ते सामान्यापेक्ष ज्ञापक मानल्यानें, शकाकारानें दर्शविलेल्या आपत्ति यथोद्देशपक्षात देखील टाळता येतात असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे.

मनोरमा—यत्तु वदन्ति—प्रत्ययपर्युदासो न कर्तव्यः, प्रत्ययान्तपर्युदासेनैव गतार्थत्वात् । व्यपदेशिवद्भावेन तस्यापि प्रत्ययान्तत्वादिति,

तत्र, प्रत्ययग्रहणे यस्मात्स विहितस्तदादेर्ग्रहणात् । केवलस्य च अतथात्वात् । अन्यथा त्वदुक्तरीत्या सुप्तिङोरपि तदन्तत्वात् पदत्वं स्यात् । तथा च हरिषु, करोषि, इत्यादौ षत्वं न स्यात्, "सात्पदाद्योः" इति निषेधात् । अधातुप्रत्ययाविति सिद्धे नञ्द्वयोपादानं स्पष्टार्थम् । महासंज्ञाकरणं श्रुत्यनुरोधात् । तथा चाथर्वणे पठ्यते– "को धातुः ? किं प्रातिपदिकं ? कः प्रत्ययः" ? इति । डित्थादीन्यव्युत्पन्नानीहोदाहरणम् । अव्युत्पत्तिपक्षस्य चेदमेव ज्ञापकमिति प्राञ्चः । यत्तु व्युत्पत्तिपक्षेऽपि निपातार्थमनुकरणार्थं चेदमिति हरदत्तेनोक्तम् । तच्चिन्त्यम्, तथापि प्रकृत्याविकल्पनसम्भवात् । वस्तुतस्तु व्युत्पत्तिपक्षेऽपि बहुपटव इत्याद्यर्थं सूत्रम् । न चैवं 'बहुच्पूर्वः' इत्येव सूच्यतामिति वाच्यम्, 'मूलकेनोपदंशम्' इत्यादौ कृदन्तत्वेनातिप्रसङ्गात् । न च समासग्रहणं नियमार्थमिति निस्तारः, अर्थवत्सूत्रारम्भं विना समासग्रहणस्य नियमार्थत्वायोगादिति दिक् ।

प्रकाशकाराचें असें म्हणणें आहे कीं, प्रकृत सूत्रांत प्रत्ययाचा पर्युदास करण्याची कांही आवश्यकता नाहीं. प्रत्ययान्ताचा पर्युदास केल्यानें प्रत्ययाचा पर्युदास आपोआपच होतो (व त्यामुळें वेगळा प्रत्ययाचा पर्युदास करण्याची कांही गरज राहत नाहीं,) कारण व्यपदेशिवद्भावानें प्रत्यय देखील प्रत्ययान्त मानता येतो पण हे त्याचें म्हणणें बरोबर नाहीं; कारण ज्या प्रकृतीहून शास्त्रानें प्रत्यय होणें सांगितलें आहे ती प्रकृति ज्या समुदायाची आदि आहे अशा प्रत्ययान्त समुदायाचें प्रत्ययग्रहणपरिभाषान्वयें प्रत्ययान्तानें ग्रहण होतें व केवळ प्रत्यय तसा नसतो, म्हणजे त्याच्या पूर्वी प्रकृति राहत नसून तो प्रकृतीच्या अन्तीं नसतो; नाहीं तर तुमच्या–प्रकाशकाराच्या–म्हणण्याप्रमाणें (प्रातिपदिकाहून होणारे) 'सुप्' प्रत्यय व (धातूहून होणारे) 'तिङ्' प्रत्यय हे देखील तदन्तत्वामुळें पदसंज्ञक ठरतील आणि त्यामुळें 'हरिषु, करोषि' इत्यादि स्थलीं ('सु' व 'सि' या प्रत्ययांना पदसंज्ञा झाल्यानें त्यांत सकार हा आदि वर्ण असल्यामुळें त्या सकाराचें) 'सात्पदाद्योः' सू. २१२३

या निषेधान्वयें षत्व होणार नाही. (प्रत्यय या शब्दाचे केवळ प्रत्यय व व्यपदेशिवद्भावानें प्रत्ययान्त असे दोन्ही प्रकारचे अर्थ होतात आणि प्रत्यय व प्रत्ययान्त या दोहोंचाहि प्रकृत सूत्रात पर्युदास होणे इष्ट असल्यामुळें, दीक्षितानी प्रकृत सूत्रातील 'अप्रत्ययः' या पर्युदासात जो 'प्रत्यय' शब्द आहे त्याचे दोनदा उच्चारण करून व एकदा उच्चारलेल्या 'प्रत्यय' शब्दाचा केवळ प्रत्यय असा अर्थ करून व दुसऱ्यानें उच्चारलेल्या त्या 'प्रत्यय' शब्दाचा 'प्रत्ययान्तः' असा अर्थ करून 'अप्रत्ययः' या पदाचा 'प्रत्यय प्रत्ययान्त च वर्जयित्वा' अशा रीतीने कौमुदीत अर्थ केला आहे हे पूर्वी सांगितलेच आहे. प्रकाशकाराना देखील प्रत्यय व प्रत्ययान्त या दोहोंचाहि पर्युदास होणे इष्ट आहेच पण त्याचे म्हणणे असे आहे की, 'अप्रत्ययः' या पदाचा 'अप्रत्यय' व 'अप्रत्ययान्त' असा दोन प्रकारे अर्थ न करिता 'अप्रत्ययान्त' असा एकच अर्थ केल्यानें देखील जसा प्रत्ययान्ताचा पर्युदास होतो तसाच प्रत्ययाचा देखील पर्युदास होतो व त्यामुळें वेगळा प्रत्ययाचा पर्युदास करण्याची काही आवश्यकता नाही; कारण व्यपदेशिवद्भावानें प्रत्यय देखील प्रत्ययान्त मानता येत असल्यामुळें, प्रत्ययान्ताचा पर्युदास केल्यानें प्रत्ययाचा पर्युदास आपोआपच सिद्ध होतो यावर दीक्षित असें म्हणतात की, ज्या समुदायाच्या अन्ती प्रत्यय आहे त्या समुदायात ज्याहून तो प्रत्यय शास्त्रानें विहित आहे तो प्रकृतिरूप शब्द आरंभी असलाच पाहिजे, म्हणजे प्रत्ययान्तानें प्रकृतीच्या आरंभापासून प्रत्ययाच्या अखेरपर्यंत जो समुदाय आहे त्याचे ग्रहण होते, व केवळ प्रत्यय तसा नसतो, म्हणजे त्याच्या आरंभी प्रकृति राहत नसून व तो प्रकृतीच्या अन्ती येत नसून एकटाच विद्यमान असतो. म्हणून 'हरिषु, करोषि' इत्यादि प्रत्ययान्त समुदायातील 'सु सि' हे प्रत्यय प्रत्ययान्त मानल्यास, त्याना 'सुप्तिङन्त पदम्' या सूत्राने होणारी पदसंज्ञा होईल व 'सु, सि' ही पदें मानल्यानें, त्या दोहोंतहि सकार हा आदि वर्ण असल्यामुळें व 'सात्पदाद्योः' हा निषेध असल्यामुळें, त्या सकाराचे 'आदेशप्रत्यययोः'

सू. २१२ या सूत्रानें होणारे षत्व न होण्याची आपत्ति येईल आणि 'हरिसु, करोसि' अशी अनिष्ट रूपें होतील. या विषयाचें अधिक विवरण शब्दरत्नांत करण्यात येईल.) 'अधातुप्रत्ययो' असें एकच सामासिक पद प्रकृत सूत्रात घातल्यानें इष्ट प्रयोजन सिद्ध होत असून देखील, 'अधातु.' व 'अप्रत्ययः' अशी जीं नञ्युक्त दोन पदें घातली आहेत तीं प्रकृत सूत्राचा अर्थ स्पष्ट होण्याकरिता घातली आहेत. (वास्तविक 'अधातुप्रत्ययो' असें एकच सामासिक पद प्रकृत सूत्रात घातलें असतें तर प्रकृत सूत्रात एक पद कमी झालें असतें आणि 'अर्धमात्रालाघवेन'–परि. १३३–या न्यायान्वयें जरी तसें करणें इष्ट होतें तरी, प्रकृत सूत्राचा अर्थ अधिक स्पष्ट व्हावा या हेतूनें पाणिनीनें 'अधातुः, अप्रत्ययः' अशीं दोन पदें प्रकृत सूत्रात घातलीं आहेत असें दीक्षिताचें म्हणणें आहे ) अथर्वण वेदामध्यें 'को धातुः? किं प्रातिपदिकम्? कः प्रत्ययः?' अशी श्रुति पठित असल्यामुळें त्या श्रुतीला धरूनच पाणिनीनें 'प्रातिपदिक' ही महासंज्ञा–अन्वर्थक संज्ञा–केली आहे. (ही अन्वर्थक संज्ञा आहे असें जें म्हटलें आहे त्याचें कारण हे की, प्रत्येक सुबन्त पदात प्रातिपदिक उपलब्ध आहेच; कारण प्रातिपदिकाहूनच सुबुत्पत्ति होत असते.) 'डित्थ' इत्यादि अव्युत्पन्न, म्हणजे प्रकृतिप्रत्ययविभागरहित, प्रातिपदिकें प्रकृत सूत्राची उदाहरणे आहेत. पाणिनीला अव्युत्पत्तिपक्ष मान्य होता याचें प्रकृत सूत्रच ज्ञापक ठरतें असें सार्थकारिकें म्हटलें आहे. (धातूहून औणादिक कृत्प्रत्यय होऊन सर्व प्रातिपदिकें सिद्ध झालीं आहेत असा व्युत्पत्तिपक्ष जर पाणिनीला मान्य असता तर त्याला प्रकृत सूत्र करण्याची काहींच गरज नव्हती; कारण 'कृत्तद्धितसमासाश्च'

अव्युत्पन्न शब्दच प्रकृत सूत्राचीं योग्य उदाहरणे ठरत असून, व्युत्पन्न प्रातिपदिके 'कृत्तद्धितसमासाश्च' या पुढील सूत्राचीं उदाहरणे ठरतात. सारांश, पाणिनीला व्युत्पत्तिपक्ष मान्य नव्हता याचे प्रकृत सूत्र ज्ञापक ठरते असे प्राचीनांचे म्हणणे आहे.) हरदत्ताचे असे म्हणणे आहे की, व्युत्पत्तिपक्ष मानला तरी निपाताना व अनुकरणवाचक शब्दाना प्रातिपदिकसंज्ञा होण्याकरिता प्रकृत सूत्र आवश्यक आहे ('डित्थादीन्यव्युत्पन्नान्युदाहरणानि। व्युत्पत्तौ कृदन्तादेव सिद्धम् सर्वे नाम धातुजमिति, तथापि पक्षेऽव्ययार्थमनुकरणशब्दार्थं च सूत्रमारम्यमेव' असे हरदत्तानें पदमञ्जरीत म्हटले आहे) पण हे म्हणणे बरोबर मानता येत नाही, कारण निपात व अनुकरणवाचक शब्द देखील धातूहून औणादिक प्रत्यय होऊन सिद्ध झाले आहत असे मानता येऊ शकते वास्तविक व्युत्पत्तिपक्ष मानला तरी त्या पक्षात देखील 'बहुपटु' इत्यादि शब्दाना प्रातिपदिकसंज्ञा व्हावी याकरिता प्रकृत सूत्र असणे आवश्यक आहे ('विभाषा सुपोबहुच्पुरस्तात्' सू २०२३ या सूत्रानें 'ईषदसमाप्ति' या अर्थामध्ये 'पटु' या शब्दाला 'बहुच्' प्रत्यय झाला असून तो प्रत्यय इतर प्रत्ययाप्रमाणे प्रकृतीच्या पुढें न होता 'पटु' या प्रकृतीच्या पूर्वी झाला आहे त्यामुळें 'बहुपटु' हा शब्द तद्धितप्रत्ययान्त ठरत नसून तद्धितप्रत्ययादि ठरतो व 'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्राने तद्धितान्ताला होणारी प्रातिपदिकसंज्ञा त्या शब्दाला होऊ शकत नाही. ती संज्ञा तद्या अर्थवान् शब्दाला व्हावी याकरिता व्युत्पत्तिपक्षात देखील प्रकृत सूत्र असणे आवश्यक आहे असे दीक्षिताचे म्हणणे आहे.) पण असेच जर आहे, म्हणजे ज्या शब्दाना 'बहुच्' प्रत्यय झाला आहे अशा शब्दाना व्युत्पत्तिपक्षात प्रातिपदिकसंज्ञा व्हावी एवढ्याचकरिता प्रकृत सूत्र केले आहे असे जर म्हणणे असेल तर, (एवढें मोठें प्रकृत सूत्र न करिता त्या ऐवजी लहानसे) 'बहुच्पूर्व'—म्हणजे ज्या शब्दापूर्वी 'बहुच्' प्रत्यय झाला आहे त्याला प्रातिपदिकसंज्ञा होते—असे सूत्र केल्यानें काम भागू शकले असते असे कोणी म्हटल्यास, ते म्हणणे बरोबर

नाही; कारण जर प्रकृत सूत्र नसते तर, 'मूलकेनोपदशम्' इत्यादि स्थली कृदन्तत्वामुळें संपूर्ण समुदायाला ('कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रानें) प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति आली असती. 'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रातील 'समास' ग्रहण नियमार्थ असल्यामुळें वरील आपत्ति येऊ शकत नाही असे कोणी म्हटल्यास, त्याला उत्तर हें आहे कीं, प्रकृत सूत्र आरंभिल्याशिवाय 'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रातील 'समास' या पदाचें ग्रहण नियमार्थ आहे असें मानता येत नाहीं (तृतीयान्त उपपद असले तरच 'उप' या उपसर्गपूर्वक 'दश्' धातूहून 'उपदशस्तृतीयायाम्' सू. ३३६८ या सूत्रानें 'णमुल्' हा कृत्प्रत्यय होणें सांगितलें असल्यामुळें, 'मूलकेनोपदशम्' हा उपपदपूर्वक 'णमुल्' प्रत्ययान्त समुदाय 'कृद्ग्रहणे गतिकारकपूर्वस्यापि ग्रहणम्'–परि. २८–या परिभाषान्वयें कृदन्त ठरतो व या संपूर्ण कृदन्त अर्थवान् समुदायास, प्रकृत सूत्र नसल्यास, 'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति येते. पण प्रकृत सूत्रात 'अप्रत्ययः = अप्रत्ययान्तः' हा पर्युदास असल्यामुळें व 'मूलकेन' हा शब्द प्रत्ययान्त असल्यामुळें, त्या प्रत्ययान्त शब्दाला प्रातिपदिकसंज्ञा न होता, 'उपदशम्' एवढ्याच अंशाला प्रातिपदिकसंज्ञा होते. यावर शंकाकार अशी शंका करतो की, 'समास एवार्थवता समुदायानां प्रातिपदिकसंज्ञो भवति नान्य इति' असें प्रकृत सूत्रावरील भाष्यात भाष्यकारांनी म्हटलें असल्यामुळें, 'मूलकेनोपदशम्' या असमस्त पदसमुदायाला, प्रकृत सूत्र नसले तरी, प्रातिपदिकसंज्ञा होऊं शकत नाही. पण दीक्षित म्हणतात कीं, पदसमुदायाला प्रातिपदिकसंज्ञा होणें असेल तर ती समासालाच होते असा जो भाष्यकारांनी नियम सांगितला आहे तो प्रकृत सूत्राच्या आधारावरच सांगितला आहे. प्रकृत सूत्रानेंच अर्थवान् पदसमुदायाला प्रातिपदिकसंज्ञा होण्याची प्राप्ति आहे व 'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रांतील 'समास' या पदाचें ग्रहण नियमार्थ मानल्यानें त्या प्राप्तीचें निवारण करता येते. पण जर प्रकृत सूत्र नसलें तर अर्थवान् पद-

समुदायाला प्रातिपदिकसंज्ञेची प्राप्तीच होत नसल्यामुळें, समासग्रहण नियमार्थ मानता येत नाही. म्हणून ते समासग्रहण नियमार्थ ठरण्याकरिता प्रकृत मूत्र असणे आवश्यक आहे व हे सूत्र असल्यामुळें आणि 'मूलकेनोपदशम्' हा पदसमुदाय सामासिक शब्द नसल्यामुळें, त्याला प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति टळते.)

शब्दरत्न—व्यर्थं स्यादिति । न च 'अस्यापत्यम्–इः' इत्यादौ प्रत्ययत्वप्रयुक्तनिषेधबाधनेन तच्चरितार्थम् । 'अ अस् इ' इत्यवस्थाया प्रवृत्तसंज्ञाया एकदेशविकृतन्यायेन सुलभत्वात् । एकार्थीभावेनेति । न चैतत्प्रत्ययमात्रस्य, तन्मात्रे एकार्थीभावाभावादिति भावः । एकार्थीभावश्च—यस्य प्रातिपदिकसंज्ञा चिकीर्षिता तन्मात्रवृत्तिरेव ग्राह्यः । तेन 'पञ्चनावप्रियः' इति समासघटकपञ्चनावेत्यस्य तद्धितान्तत्वसमासत्वयोरपि न प्रातिपदिकत्वम्, प्रियशब्दान्त एव तत्रैकार्थीभावो न तु तन्मात्र इत्यदोषात् । न च, क्विबन्ते दोषः । तत्र धातोरेव विशिष्टार्थबोधकत्वेन अर्थवद्द्वितीयाभावेन पृथगर्थानामेकोपस्थितिजनकत्वरूपैकार्थीभावाभावादिति वाच्यम्, अलौकिके वाक्ये कल्पितैकार्थीभावस्य तत्राप्यारोपेणादोषात् । व्यर्थं स्यादिति । अनेन प्रत्ययपर्युदासे मानमुक्तम् । सातेः प्रातिपदिकत्वे हि तत औत्सर्गिकैकवचने तस्यापि सुबन्तत्वेन पदत्वे पदादित्वादेव निषेधसिद्धेस्तद्व्यर्थमिति भावः ।

'प्रत्ययस्यैव पर्युदासे कृत्तद्धित इति मूत्रेण तद्धितान्तस्य संज्ञाविधान व्यर्थ स्यात्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्यावर शंकाकार अशी शंका करतो की, अस्यापत्यम् इ' इत्यादि स्थली प्रत्ययत्वामुळें होणाऱ्या निषेधाचा बाध करून 'कृत्तद्धित' सू. १७९ या सूत्रातील (तद्धितप्रत्ययवाचक) 'तद्धित' हे पद चरितार्थ ठरतें. पण (शब्दरत्नकार म्हणतात की,) ही शंका बरोबर नाही; कारण 'अ अस् इ' अशा स्थितीत (या तद्धितान्त समुदायाला) जी प्रातिपदिकसंज्ञा होते ती एकदेशविकृतन्यायानें 'इ' चे ठिकाणी सहज प्राप्त होऊ

शकते. (दीक्षितानी मनोरमेंत असे म्हटलें आहे की, प्रकृत सूत्रातील 'अप्रत्ययः' या पर्युदासानें प्रत्ययान्ताचा देखील पर्युदास न करिता केवळ प्रत्ययाचा पर्युदास केला तर, 'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रातील तद्धितान्तवाचक 'तद्धित' या पदानें तद्धितान्ताला *प्रातिपदिकसंज्ञा होण्याचें जें विधान केले आहे तें व्यर्थ* ठरण्याची आपत्ति येते; कारण केवळ प्रत्ययाला प्रातिपदिकसंज्ञा होण्याचा निषेध केला आहे व प्रत्ययान्ताला ती संज्ञा होण्याचा निषेध केला नाही असे मानल्यास, प्रकृत सूत्रानेंच, अर्थवान् असणाऱ्या, तद्धितान्ताला प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकलीच असती. मग त्याला ती संज्ञा होण्याकरिता 'कृत्तद्धित' या सूत्रात 'तद्धित = तद्धितान्त' या पदाचें ग्रहण का केले आहे? प्रकृत सूत्रातील 'अप्रत्यय.' या पदानें प्रत्ययान्ताचा देखील पर्युदास होतो असें मानले तरच, तद्धितान्ताला प्रातिपदिकसंज्ञा व्हावी याकरिता तें ग्रहण चरितार्थ व आवश्यक ठरते याचर शंकाकार असें म्हणतो की, 'विष्णु' या अर्थाच्या वाचक 'अ' या प्रातिपदिकाहून अपत्यार्थक 'इञ्' प्रत्यय 'अत इञ्' सू १०९५ या सूत्रानें केल्यावर 'अस्यापत्यम् इः = अ + ङस् + इञ् = अ + अस् + इ' अशी स्थिति झाली असता, 'सुपो धातुप्रातिपदिकयो' सू ६५० या सूत्रानें 'ङस्' प्रत्ययाचा लुक् होऊन व 'यस्येति च' सू ३११ या सूत्रानें 'अ' या प्रकृतीचा लोप होऊन केवळ 'इ' हा तद्धित प्रत्ययच शिल्लक राहतो व त्या प्रत्ययरूप 'इ' ला प्रकृत सूत्रातील 'अप्रत्ययः' या प्रत्ययाच्या पर्युदासामुळें जो प्रातिपदिकसंज्ञेचा निषेध होता, म्हणजे जी प्रातिपदिकसंज्ञा प्राप्त होत नाही, त्या निषेधाला बाधून 'कृत्तद्धित' या सूत्रातील केवळ तद्धितप्रत्ययवाचक 'तद्धित' या शब्दाच्या ग्रहणामुळें *'इ' याला प्रातिपदिकसंज्ञा होते. जर त्या सूत्रातील 'तद्धित' या* शब्दानें तद्धितान्ताचें ग्रहण केलें तर 'इ' हा केवळ तद्धित प्रत्यय असून तद्धितान्त नसल्यामुळें, त्याला प्रातिपदिकसंज्ञा न होण्याची

आपत्ति येते. अशा रीतीनें वर सांगितल्याप्रमाणे 'कृत्तद्धित' या सूत्रातील 'तद्धित' या पदाचे ग्रहण व्यर्थ न ठरता चरितार्थ व आवश्यक ठरते या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, 'अ ङस् इञ् या अवस्थेत तद्धित 'इञ्' प्रत्ययान्त समुदायाला 'कृत्तद्धित' या सूत्रानें जो प्रातिपदिकसंज्ञा होते तो, त्या समुदायातील 'ङस्' प्रत्ययाचा लुक् व 'अ' या प्रकृतीचा लोप वर सांगितल्या-प्रमाणे झाल्यावर 'इञ्=इ' हा जो तद्धित प्रत्ययरूप भाग अवशिष्ट राहतो त्याला, एकदेशविकृतन्यायानें होऊ शकतेच. 'एकदेशविकृतमनन्यवत्' -परि ३७-हा न्याय जेथे अध्यपेक्षा अधिक शब्दस्वरूप नाहीसे झाले आहे किंवा बदलले आहे तेथें लागू पडत नाही असे पूर्वी सांगितले आहे व प्रकृत स्थली अर्ध्यापेक्षा अधिक शब्दस्वरूप नाहीसे झाले असल्यामुळें येथें वास्तविक वरील परिभाषा लागू पडत नाही व त्या परिभाषान्वयें 'इ' हा तद्धितान्त आहे असे मानता येत नाही. तरी पण 'अ ङस् इञ्' या स्थली त्या संपूर्ण समुदायाचे जागी जो 'इञ् = इ' झाला आहे तो 'स्थानिवदादेश' सू ४९ या सूत्रानें स्थानिवद्भावानें तद्धितान्त मानता येता, आणि अशा रीतीनें 'इ' हा तद्धितान्त ठरत असल्यामुळे, 'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रातील तद्धितान्त-वाचक 'तद्धित' या पदाच्या ग्रहणानें 'इ' याला प्रातिपदिकसंज्ञा होण्यात काही अडचण येत नाही. सारांश, त्या सूत्रातील 'तद्धित' हा शब्द तद्धितान्त या अर्थाचा वाचक मानल्याने शंकाकारानें दर्शविलेली आपत्ति येत नसल्यामुळे, त्यानें केलेली शंका अयोग्य ठरते असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे) 'एकार्थीभावेन लौकिके प्रयोगे प्रसिद्धत्वं च प्रशासामूलम्' असे जे मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, प्रशस्त अर्थवत्ता केवळ प्रत्ययाचे ठिकाणी राहत नसते, कारण (एकार्थीभाव होण्याकरिता दोन किंवा अधिक शब्दांची गरज असल्यामुळे, प्रकृति व प्रत्यय हे दोन्ही असले तरच त्या दोहोंच्या अर्थाचा एकार्थीभाव होऊ शकतो व) केवळ प्रत्यय असल्यास

एकार्थीभाव होणे शक्य नाहीं. (प्रकृत सूत्रातून 'कृत्तद्धितसमासाश्च' या उत्तर सूत्रात 'अर्थवत्' या पदाची अनुवृत्ति होते व त्या पदातील 'मतुप्' प्रत्यय 'प्रशंसा' या अर्थाचा वाचक असल्यामुळें आणि जरी प्रकृति व प्रत्यय हे दोन्ही अर्थवान् असतात तरी केवळ तद्धित प्रत्यय किंवा ज्या प्रकृतीहून तद्धित् प्रत्यय होतो त्याचे ठिकाणीं प्रशस्त अर्थ द्योतित करण्याचें सामर्थ्य नसून, प्रकृतीहून तद्धितप्रत्यय केल्यावर तशा तद्धितान्त शब्दाचे ठिकाणीच, दोहोंच्या अर्थांचे एकत्रीकरण झाल्यानें, प्रशस्तार्थ द्योतित करण्याचें सामर्थ्य येत असल्यामुळें, 'अर्थवत्' या विशेषणानें युक्त असणाऱ्या 'कृत्तद्धित' या सूत्रातील 'तद्धित' या शब्दानें केवळ तद्धित प्रत्ययाचें ग्रहण न होता, तद्धितान्ताचेच ग्रहण होतें, व तद्धितान्त शब्द प्रत्ययान्त असल्यामुळें व प्रकृत सूत्रात 'अप्रत्ययः = अप्रत्ययान्तः' हा पर्युदास असल्यामुळे, प्रकृत सूत्रानें तद्धितान्ताला जी प्रातिपदिक-संज्ञा होऊं शकत नव्हती ती त्याला व्हावी याकरिता 'कृत्तद्धित' या सूत्रात प्रशस्तार्थद्योतक तद्धितान्त वाचक 'तद्धित' शब्दाचें ग्रहण केलें आहे हें पूर्वी मनोरमेंत सांगितलेंच आहे. प्रकृति व प्रत्यय हे दोन्ही अर्थवान् असून देखील त्या दोहोंच्या अर्थांचा एकत्रीभाव झाल्याशिवाय त्यांचे ठिकाणीं प्रशस्त अर्थ, म्हणजे लौकिक प्रयोगांत ज्ञात होण्यालायक अर्थ, द्योतित करण्याचें सामर्थ्य नाहीं असें जें वर म्हटलें आहे त्याचें कारण हें आहे कीं, मात्र केवळ प्रकृतीचा किंवा केवळ प्रत्ययाचा प्रयोग केला तर त्यांच्या अर्थांचा बोध होणें शक्य

भाष्यकार म्हणतात–'यदप्युच्यते कृत्तद्धितसमासाश्चेत्यन्तग्रहणं कर्तव्यमिति । न कर्तव्यम् । अर्थवदिति वर्तते, कृत्तद्धितान्तं चैवार्थवन्न केवला कृतस्तद्धिता वा ।' येथें हे सांगणे आवश्यक आहे की, मतुप्सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी 'मतुप्' प्रत्ययाचे जे अनेक अर्थ सांगितले आहेत त्यापैकी 'प्रशंसा' हा एक अर्थ आहे हे त्या भाष्यात दिलेल्या 'भूमनिन्दाप्रशंसासु नित्ययोगेऽतिशायने । सम्बन्धेऽस्ति विवक्षायां भवन्ति मतुबादय ।।' या कारिकेवरून स्पष्ट होते ) ज्याला प्रातिपदिकसंज्ञा करणे आहे त्याचेच ठिकाणी असणारा एकार्थीभाव अभिप्रेत आहे त्यामुळें पञ्चनावप्रिय' या स्थली 'पञ्चनाव' हा समासावयव जरी तद्धितान्त व सामासिक शब्द आहे तरी त्याला प्रातिपदिकसंज्ञा होत नाही प्रियश ब्दान्त 'पञ्चनावप्रिय' या संपूर्ण शब्दाचे ठिकाणी एकार्थीभाव झाला असून 'पञ्चनाव' या अवयवातच केवळ एकार्थीभाव झालेला नसल्यामुळें, येथें काही दोष येत नाही' (तद्धितार्थोत्तरपदसमाहारे च' सू ७२८ या सूत्रानें तीन प्रकारे द्विगुसमास होणे सांगितले आहे या तीन प्रकारापैकी उत्तर पद पुढें असताना झालेला 'पञ्चनावप्रिय' यातील 'पञ्चनाव' हा संख्यापूर्वक द्विगुसमास होय व या 'नौ' शब्दान्त द्विगुसमासाला 'नावो द्विगो' सू ८०१ या सूत्रानें समासान्त तद्धित 'टच् = अ' प्रत्यय होऊन व 'एचोऽयवायाव' सू ६१ या सूत्रानें 'नौ' यातील 'औ' च जागी आवादेश होऊन 'पञ्चनाव' असे अदन्त रूप सिद्ध झाले आहे 'पञ्चनाव' हा शब्द सामासिक असून तद्धित 'टच्' प्रत्ययान्त असल्यामुळें, या अर्थवान् तद्धितान्त व सामासिक शब्दाला 'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा का होऊ नये ? या प्रश्नाचे उत्तर हे आहे की, वर सांगितल्याप्रमाणे एकार्थीभाव झाल्यानें प्रशस्तार्थवाचक होणाऱ्या तद्धितान्ताला त्या सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकत असल्यामुळें व उत्तर पद पुढें असताना होणाऱ्या द्विगुचा भाषेत स्वतंत्र रीतीनें प्रयोग होत नसून त्याचे

दोष येतो, म्हणजे त्याला प्रातिपदिकसंज्ञा न होण्याची आपत्ति येते, कारण (धातूहून 'क्विप् = व्' प्रत्यय केला असता, त्या अपृक्त प्रत्ययाचा 'वेरपृक्तस्य' सू ३७५ या सूत्रानें लोप झाल्यावर) अवशिष्ट धातु हाच विशिष्ट अर्थाचा–'धातुनिरूपितक्रियेचा कर्ता' या विशिष्ट अर्थाचा–बोधक होत असल्यामुळें व अथवान् द्वितीयाचा–क्विप्प्रत्ययाचा–अभाव असल्यामुळे, दोन भिन्न अर्थांचे एकत्रीकरण होऊन सिद्ध झालेल्या अर्थाची उपस्थिति करून देणे अशा प्रकारचा जो एकार्थीभाव तो तेथे विद्यमान नाही (या शकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की,) ही शंका बरोबर नाही, कारण अलौकिक प्रक्रियावाक्यात कल्पित असलेला जो एकार्थीभाव त्याचा लुप्त क्विबन्ताचे ठिकाणी देखील आरोप केल्यानें काही दोष येत नाही ('प्रसूते इति प्रसू = प्रसू + क्विप् + सु' या स्थली 'सू' हा धातु 'षूङ् प्राणिगर्भविमोचने' या धातुपाठान्वयें 'प्रसविणे' या अर्थाचा वाचक आहे व या धातूहून 'सत्सूद्विषद्रुहदुह' सू २९७५ या सूत्राने 'कर्तरि' या अर्थामध्ये क्विप्प्रत्यय केला असता, 'प्रसू' याचा 'प्रसविणारी' असा अर्थ होतो येथें शंकाकार असे म्हणतो की, 'सू' धातूहून होणाऱ्या 'क्विप् = व्' या अपृक्त प्रत्ययाचा 'वेरपृक्तस्य' या सूत्रानें लोप होत असल्यामुळें व त्या प्रत्ययाचा लोप झाल्यावर 'सू' धातूच शिल्लक राहत असल्यामुळें, 'य शिष्यते स लुप्यमानार्थाभिधायी' या वचनान्वयें तो अवशिष्ट 'सू' धातूच 'प्रसविणारी' या कर्तृविशिष्ट क्रियारूप अर्थाचा बोधक होतो व तो धातु असल्यामुळें आणि प्रकृत सूत्रात 'अधातु' असा पर्युदास असल्यामुळें, त्याला प्रातिपदिकसंज्ञा न होण्याची आपत्ति येते हं खरे की, 'प्रसू' हा लुप्तक्विबन्त शब्द कृदन्त आहे पण क्विप्प्रत्ययाचा लोप झाला असल्यामुळें, प्रकृति व प्रत्यय यांच्या अर्थांचा एकार्थीभाव होऊन उत्पन्न होणारी प्रशस्तार्थवत्ता 'प्रसू'चे ठिकाणी नाही आणि 'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रात 'अर्थवत्' या पदाची अनुवृत्ति केल्यानें प्रकृति व प्रत्यय या दोहोंच्या अर्थांचे एकत्रीकरण होऊन ज्या कृदन्ताचे ठिकाणी प्रशस्तार्थवत्ता

येते त्यालाच त्या सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकत असल्यामुळें आणि लुप्तक्विबन्त 'प्रभू' चे ठिकाणी, प्रत्ययाचा लोप झाल्याकारणानें, तशा प्रशस्तार्थवत्तेचा अभाव असल्यामुळें, 'प्रभू' याला प्रातिपदिकसंज्ञा न होण्याची व त्यामुळें त्याहून सुबुत्पत्ति न होण्याची आपत्ति येते. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात की, 'प्र भू + क्विप्' या अलौकिक प्रक्रियावाक्यांत प्रकृति व प्रत्यय या दोहोंच्या अर्थांचा जो एकार्थीभाव कल्पिला जातो त्या एकार्थीभावाचा, क्विप्प्रत्ययाचा लोप होऊन अवशिष्ट राहिलेल्या 'प्रभू' चे ठिकाणी, आरोप केल्यानें त्या आरोपित प्रशस्तार्थवत्तेमुळें 'प्र भू' हा कृदन्त 'कृत्तद्धित' या सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञक ठरण्यात व त्याहून सुबुत्पत्ति होण्यात कांही अडचण येत नाहीं आणि शंकाकाराची शंका अयोग्य ठरते.) 'यदि तु प्रत्ययो न पर्युदस्येत तर्हि सात्पदाद्योः इति सूत्रे सातिग्रहणं व्यर्थं स्यात्' या मनोरमेंतील पंक्तींत, प्रकृत सूत्रांतील 'अप्रत्ययः' या पदानें केवळ प्रत्ययाचा देखील पर्युदास करणें आवश्यक आहे याला प्रमाण सांगितलें आहे. 'साति = सात्' हा प्रत्यय प्रातिपदिक मानल्यास त्याहून औत्सर्गिक एकवचनाचा प्रत्यय केला असतां, तो देखील सुबन्त होऊन त्याला पदसंज्ञा होईल (व त्यांतील सकार पदाचा आद्य अवयव ठरेल) व त्यामुळें 'सात्पदाद्योः' या सूत्रांतील 'पद दि' या शब्दानेंच षत्वनिषेध होऊं शकेल आणि त्या सूत्रांतील 'सात्' याचें ग्रहण व्यर्थ ठरण्याची आपत्ति येईल असा दीक्षितांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. (या विषयाचें विवरण पूर्वी मनोरमेंत केलेंच आहे.)

शब्दरत्न – सोर्दुर्वारत्वादिति । तस्य च समुदायप्रातिपदिकत्वेन तदवयवत्वाल्लुक् । समुदायसंज्ञा चान्तरङ्गत्वादवयवेभ्यः प्रातिपदिकत्वात्सुपि सति प्रवर्तते, इति तस्य तदवयवत्वमक्षतम् । पचति, ध्वनतीत्यादौ नावयवानां सा, धातुप्रत्ययान्तपदयोस्तदवयवपरत्वेन तत्र तन्नियमात् । तस्मादव्युत्पन्नप्रातिपदिकावयवेभ्यस्तदुत्पत्तिरापाद्या ।

धनशब्दस्य धिनोतेर्धनमिति व्युत्पत्तिपक्षे तु वनादयुदाहरण बोद्ध्यम्। ध्वनित चेदं भाष्यकैयटयोः। तस्मान्नलोपाद्यापत्तिर्दोष:। इदमव्ययेभ्य इव तेभ्योऽपि सुप एकवचनाभ्युपगमेन। वस्तुतस्तु तदुत्पत्ति सत्येव गमके, यथाऽव्ययेभ्य उत्पत्तौ "अव्ययादाप्सुपः" इति गमकम्, नान्यत्र, 'एकवचनम्' इति महासञ्ज्ञाकरणात्। प्रकृते तु न तथा गमकम्। अत एव "ङ्याप्–" इति सूत्रे प्रातिपदिकाधिकाराभावे तिङन्तेभ्यस्तदुत्पत्तिमाशङ्क्य चेकत्वादीनामुक्तत्वान्नेति समाहितं भाष्ये, त्वन्नीत्यौत्सर्गिकमेकवचन दुर्वारमेव। अत एवाग्रे भाष्येऽर्थवत्पदस्य दशदाडिमानीत्यादिपदसमुदायो निरर्थको व्यावर्त्यत्वेन प्रदर्शितः। तत्र हि "सुपो धातु" इत्यस्य प्राप्तिरिति तदेवास्य मुख्य व्यावर्त्यम्। पचत कल्पमित्यादौ तत्प्रवृत्तौ रूपप्सूत्रस्य भाष्य गमकम्। समास-ग्रहणकृतनियमस्तु अर्थवत्समुदायविषयक इति भाष्ये स्पष्टमिति न तेनास्य व्यावृत्तिरिति दिक्।

(आता प्रकृत सूत्रात 'अर्थवत्' या पदाचे ग्रहण न केल्यास, 'धन, वन' इत्यादि शब्दातील प्रत्येक वर्णाला प्रातिपदिकसञ्ज्ञा होईल व त्याहून सुबुत्पत्ति होण्याची आपत्ति येईल आणि जरी 'धन, वन' इत्यादि शब्दातील वर्णांचे ठिकाणी सख्या व कारक याचा अभाव आहे तरी, 'एकवचनमुत्सर्गत करिष्यते' या सिद्धान्तान्वये त्या प्रत्येक वर्णाहून औत्सर्गिक 'सु' प्रत्यय होणे टाळता येऊ शकणार नाही असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचे शब्दरत्नकार पुढील पद्धतीत विवरण करितात 'धन, वन' इत्यादि शब्दातील प्रत्येक वर्णाला प्रातिपदिकसञ्ज्ञा झाल्यानें त्या प्रत्येक वर्णाहून जो औत्सर्गिक 'सु' प्रत्यय होईल) तो, समुदायाला प्रातिपदिकसञ्ज्ञा होत असल्यामुळें, त्या समुदायाचा अवयव झाल्याकारणानें त्याचा ('सुपो धातुप्राति-पदिकयो' सू ६५० या सूत्रानें) लुक् होईल अन्तरङ्गत्वामुळें वर्णरूप अवयवाना प्रथम प्रातिपदिकसञ्ज्ञा होऊन त्याहून सुबुत्पत्ति झाल्यावर समुदायाचे ठिकाणी प्रातिपदिकसञ्ज्ञा प्रवृत्त होत असल्या-मुळें, प्रत्येक वर्णाहून झालेला 'सु' प्रत्यय समुदायाचा अवयव

ठरण्यांत काही बाध येत नाहीं. ('धन, वन' इत्यादि समुदायाना जर प्रथम प्रातिपदिकसंज्ञा झाली असती व त्यानंतर समुदायातील वर्णरूप अवयवाना प्रातिपदिकसंज्ञा झाली असती तर, त्या वर्णांहून होणारे विभक्तिप्रत्यय समुदायाचे अवयव ठरले नसते, कारण समुदायाला प्रातिपदिकसंज्ञा झाल्यावर त्या विभक्तिप्रत्ययाची उत्पत्ति झाली आहे असें मानावे लागले असते आणि त्यामुळें त्या विभक्तिप्रत्ययाचा 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' या सूत्रानें लुक् होऊ शकला नसता. परंतु समुदायाच्या अपेक्षेनें त्या समुदायातील वर्णांची प्रथम उपस्थिति होत असून नंतर समुदायाची उपस्थिति होत असल्यामुळें, प्रथमोपस्थित वर्णांना प्रातिपदिकसंज्ञा होणे हं कार्य अन्तरङ्ग ठरते व नंतर उपस्थित होणाऱ्या समुदायाला प्रातिपदिकसंज्ञा होणे हे कार्य त्याच्या मानानें बहिरङ्ग ठरते. त्यामुळें समुदायातील वर्णांना प्रथम प्रातिपदिकसंज्ञा होऊन त्याहून सुबुत्पत्ति झाल्यावर अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्यययुक्त वर्णांच्या समुदायाला प्रातिपदिकसंज्ञा होते आणि अशा रीतीनें वर्णांहून झालेले विभक्तिप्रत्यय देखील समुदायाचे अवयव ठरत असल्यामुळें, 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' या सूत्रानें त्या विभक्तिप्रत्ययाचा लुक् होण्यात काही अडचण येत नाही. पण अशा रीतीनें त्या विभक्तिप्रत्ययाचा लुक् होऊन त्याचे समुदायात श्रवण होण्याची आपत्ति जरी टळते तरी, प्रत्येक वर्णाला प्रत्ययलक्षणानें जी पदसंज्ञा होते त्यामुळें नलोप, जश्त्व इत्यादि अनिष्ट कार्यें होण्याची जी आपत्ति येते ती टाळता येऊ शकणार नाहीं. ती आपत्ति टाळण्याकरिता प्रकृत सूत्रात 'अर्थवत्' या पदाचे ग्रहण केले आहे 'हयवरट्' या शिवसूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात–' यदि तर्हिमे वर्णा अर्थवन्तोऽर्थवत्कृतानि प्राप्नुवन्ति । कानि ? । अर्थवत्प्रातिपदिकमिति प्रातिपदिकसंज्ञा, प्रातिपदिकादिति स्वाद्युत्पत्ति, सुबन्तं पदमिति पदसंज्ञा । तत्र को दोष. । पदस्येति नलोपादीनि प्राप्नुवन्ति । धन वनमिति ।.' पण वर्ण अर्थवान् नसून वर्णसंघात अर्थवान् असल्या-

मुळें, वर दर्शविलेली आपत्ति टळते असे भाष्यकारांनी पुढें म्हटले आहे सारांश प्रकृत सूत्रात 'अर्थवत्' या पदाचे ग्रहण केले असल्या-मुळें, अनर्थक वर्णांना प्रातिपदिकसंज्ञा होत नाही व त्यामुळें सुबुत्पत्ति न झाल्यानें पदसंज्ञा होत नाही आणि नलोप होणे इत्यादि सर्व आपत्ति टळतात ) 'पचति, ध्वनति' इत्यादि तिङन्त समुदा-यातील वर्णांना प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकत नाही, कारण (प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'अधातु, अप्रत्यय' यांतील) 'धातु' व 'प्रत्यय=प्रत्ययान्त' या शब्दांनी त्यांच्या अवयवाचें ग्रहण केलें जात असल्यामुळें, त्या निषेधानीच त्यांच्या वर्णरूप अवयवांना प्रातिपदिक-संज्ञा होण्याचा निषेध होतो (प्रकृत सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात–'अप्रत्यय इति शक्यमकर्तुम् । कस्मान्न भवति काण्डे कुड्ये इति ?। कृत्तद्धितग्रहणं नियमार्थं भविष्यति । कृत्तद्धितान्तस्यैव प्रत्ययान्तस्य प्रातिपदिकसंज्ञा भवति नान्यस्येति' । या भाष्याचा असा अर्थ आहे की, प्रकृत सूत्रातून 'अप्रत्यय' हे पद गाळले, म्हणजे प्रत्ययान्ताला प्रातिपदिकसंज्ञा होत नाही असा निषेध न केला, तरी चालू शकते पण तो निषेध केला नाही तर 'काण्डे, कुड्ये' या प्रत्ययान्त पदांना प्रातिपदिकसंज्ञा का होऊ नये ? त्यांना प्रातिपदिकसंज्ञा होत नाही याचे कारण हे की, पुढील सूत्रात 'कृत्, तद्धित' हे जे शब्द उच्चारले आहेत ते नियमार्थ होतील व नियमाचें स्वरूप असे होईल की, प्रकृत सूत्राने प्रत्ययान्त शब्दांना प्रातिपदिक-संज्ञा होणे असेल तर कृत्प्रत्ययान्त किंवा तद्धितप्रत्ययान्त अशाच शब्दांना ती होईल व इतर प्रत्ययान्त शब्दांना ती संज्ञा होणार नाही हा जो वरील भाष्यात नियम सांगितला आहे त्या नियमान्वयेच कृत्तद्धितान्तभिन्न इतर प्रत्ययान्त समुदायाला प्रातिपदिकसंज्ञेचा निषेध आपोआपच सिद्ध होत असल्यामुळें, प्रकृत सूत्रांतील 'धातु' व 'प्रत्यय' या पदांनी त्यांच्या अवयवाचें ग्रहण होते असे शब्दरत्न-काराच्या म्हणण्याचे तात्पर्य आहे आणि हेच तात्पर्य सरला-टीकेतील 'प्रत्ययान्तस्य प्रत्ययस्य वा प्रातिपदिकसंज्ञा चेत् कृदन्तत-

द्वितान्तयोः कृत्तद्धितयोरेव वेति। तथा च समुदायस्य तेनैव व्यावृत्तिसिद्धौ धातुप्रत्ययपदे तदवयवपरे इति तात्पर्यम्' या पंक्तीत विशदरीतीनें सांगितले आहे. त्यामुळें 'पचति, घ्नन्ति' या तिङन्त समुदायातील धातु व प्रत्यय यांचे जे अवयव आहेत त्यांना प्रकृत सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञेचा निषेध होतो.) वरील विवरणावरून हें स्पष्ट होतें की, अव्युत्पन्न प्रातिपदिकाच्या अवयवभूत वर्णांहूनच सुबुत्पत्ति होण्याची आपत्ति देता येते (कारण वर सांगितल्याप्रमाणें धातु व प्रत्ययान्त या शब्दांनी तदवयवभूत वर्णांचें ग्रहण होतें व त्या वर्णांना प्रातिपदिकसंज्ञा होत नाही असें मानलें असल्यामुळें, ज्यात धातु नाही व जो प्रत्ययान्तहि नाही अशा अव्युत्पन्न प्रातिपदिकाच्याच वर्णरूप अवयवांना, प्रकृत सूत्रात 'अर्थवत्' हें पद नसल्यास, प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति येते असें म्हणता येतें हें उघड आहे.) 'धिनोतीति धनम्' अशा रीतीनें ('धिवि प्रीणने' या धातूहून औणादिक प्रत्यय होऊन) 'धन' हें प्रातिपदिक सिद्ध झालें आहे व तें व्युत्पन्न प्रातिपदिक आहे असें मानल्यास, (प्रकृत सूत्रात 'अर्थवत्' हें पद नसल्यास, ज्या शब्दातील वर्णांना प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति येते ते शब्द) 'वन' इत्यादि अव्युत्पन्न प्रातिपदिकें हीच उदाहरणें होत असें समजावें. (यास्कानें निरुक्तात 'धिनोतीति धनम्' अशी 'धन' या शब्दाची व्युत्पत्ति दिली आहे यास्काच्या मतें 'धिवि' या इदित् धातूहून औणादिक प्रत्यय होऊन 'धन' हा शब्द सिद्ध झाला आहे. 'वन' या शब्दाची निरुक्तात कोठेंहि व्युत्पत्ति दिली नाही. म्हणून 'धन' हें व्युत्पन्न प्रातिपदिक ठरत असून 'वन' हें अव्युत्पन्न प्रातिपदिक ठरतें आणि ज्याअर्थी अव्युत्पन्न प्रातिपदिकातील वर्णांना, प्रकृत सूत्रात 'अर्थवत्' हें पद नसल्यास, प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति येते असें वर म्हटलें आहे त्याअर्थी 'वन' इत्यादि अव्युत्पन्न प्रातिपदिकें तशा प्रकारची आपत्ति येण्याची उदाहरणें होत.) भाष्यकार व कैयट यांनी (अव्युत्पन्न प्रातिपदिकें हीच उदाहरणें देऊन) हें ध्वनित केलें आहे,

म्हणजे अव्युत्पन्न प्रातिपदिकातील वर्णांनाच प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति येते हे ध्वनित केले आहे. म्हणून (प्रकृत सूत्रात 'अर्थवत्' हे पद नसल्यास, अव्युत्पन्न प्रातिपदिकातील वर्णाहून होणाऱ्या 'सु' प्रत्ययाचे श्रवण होण्याची आपत्ति न येता) नलोप वगैरे होण्याचीच आपत्ति येते (कारण अव्युत्पन्न प्रातिपदिकातील वर्णाहून सुबुत्पत्ति केली तरी, 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू ६५० या सूत्रानें त्या विभक्तिप्रत्ययाचा लुक् होणारच.) ज्याप्रमाणे (संख्या किंवा कारक इत्यादिकांचा ज्याहून बोध होत नाही अशा) अव्ययाहून एकवचनाचा औत्सर्गिक प्रत्यय होतो असे मानले आहे. त्याचप्रमाणे अव्युत्पन्न प्रातिपदिकातील संख्याकारक-बोधरहित वर्णाहून देखील औत्सर्गिक एकवचनाचा प्रत्यय होईल असे गृहीत धरून त्याहून तसा प्रत्यय होण्याची आपत्ति (मनोरमेंत) दिली आहे वास्तविक काही गमक–ज्ञापक–असले तरच (संख्या-कारकबोधरहित शब्दाहून) सुबुत्पत्ति करता येते. उदाहरणार्थ (संख्याकारकबोधरहित) अव्ययाहून सुबुत्पत्ति होते याचे 'अव्ययादाप्सुपः' सू ४५२ हे सूत्र गमक–ज्ञापक–आहे (कारण अव्ययाहून होणाऱ्या विभक्तिप्रत्ययाचा लुक् होतो असे त्या सूत्रात सांगितले असल्यामुळें, त्यावरूनच हा निष्कर्ष निघतो की, अव्ययाहून सुबुत्पत्ति होते संख्याकारकबोधरहित) इतर शब्दाहून (देखील) सुबुत्पत्ति होते याचे ते सूत्र ज्ञापक ठरत नाही. (त्यामुळें अव्यय खेरीज करून इतर संख्याकारकबोधरहित शब्दाहून सुबुत्पत्ति करता येत नाही) कारण 'एकवचन' अशी अन्वर्थक संज्ञा केली आहे. ('एक उच्यते अनेन इति एकवचनम्' अशी 'एकवचन' या शब्दाची व्युत्पत्ति आहे या अन्वर्थक व्युत्पत्तीवरूनच हे सिद्ध होते की, जेथें एकत्वरूप संख्येचा बोध करणे आहे तेथेंच एकवचनाचा प्रत्यय करता येतो आणि हेच 'द्व्येकयोर्द्विवचनैकवचने' सू. १८६ या सूत्रात सांगितले आहे म्हणून ज्या शब्दाहून संख्येचा मुळीच बोध होत नाही त्याहून एकवचनाचा प्रत्यय कसा होऊ शकणार? तशा शब्दाहून

देखील एकवचनाचा प्रत्यय करता येतो असे मानल्यास, 'एकवचन' हे अन्वर्थक संज्ञाकरण व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. अव्ययाहून औत्सर्गिक एकवचनाचा प्रत्यय करता येतो याचे जसे पाणिनीय शास्त्रात 'अव्ययादाप्सुप:' हे ज्ञापक आढळते तशा प्रकाराचे ज्ञापक प्रकृत विषयासंबधानें, म्हणजे अव्युत्पन्न प्रातिपदिकातील प्रत्येक वर्णाहून औत्सर्गिक एकवचनाचा प्रत्यय करता येतो या विषयासंबधानें, पाणिनीय शास्त्रात कोठेंहि आढळत नाही. असे आहे म्हणूनच, म्हणजे काही तरी ज्ञापक असल्याशिवाय संख्याकारकबोधरहित शब्दाहून औत्सर्गिक एकवचनाचा प्रत्यय करता येत नसल्यामुळेंच, 'ङ्याप्प्रातिपदिकात्' ४. १. १ या अधिकारसूत्रात 'प्रातिपदिक' असा अधिकार नसल्यास तिङन्ताहून देखील सुबुत्पत्ति होण्याची आपत्ति येईल अशी त्या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी शंका उपस्थित करून त्या शंकेचे अशा रीतीनें निराकरण केले आहे की, तिङ्प्रत्ययानें एकत्व इत्यादि अर्थाचा बोध करून दिला असल्यामुळें ('उक्तार्थानामप्रयोग:' या न्यायान्वयें) तिङन्ताहून सुबुत्पत्ति होऊ शकत नाही. (त्या सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात--'ङ्याप्प्रातिपदिक ग्रहणं किमर्थम् ?। ङ्याप्प्रातिपदिकात्स्वादयो यथा स्यु:, धातोर्मा भूवन्निति। *नैतदस्ति प्रयोजनम्। धातोस्तव्यदादयो विधीयन्ते,* तेऽपवादास्वाद्‌बाधका भविष्यन्ति। तिङन्तात्तर्हि मा भूवन्निति। एकत्वादिष्वर्थेषु स्वादयो विधीयन्ते; ते चात्र तिडा उक्ता एकत्वादय इति कृत्वा उक्तार्थत्वान्न भविष्यन्ति।') तुमच्या--दीक्षितांच्या--म्हणण्याप्रमाणे ('ङ्याप्प्रातिपदिकात्' या सूत्रातून 'प्रातिपदिकात्' हे पद गाळल्यास, तिङन्ताहून देखील) औत्सर्गिक एकवचनाचा प्रत्यय होण्याची आपत्ति टाळता येणें अशक्य आहे. (गमक नसले तरी अव्युत्पन्न प्रातिपदिकातील अनर्थक वर्णाहून, प्रकृत सूत्रात 'अर्थवत्' हे पद नसल्यास, औत्सर्गिक 'सु' प्रत्यय होण्याची आपत्ति येते असे जें दीक्षिताचे म्हणणे आहे ते बरोबर मानल्यास, 'ङ्याप्प्रातिपदिकात्' या सूत्रातून 'प्रातिपदिकात्' हे पद गाळले

तर, तिङन्ताहून देखील औत्सर्गिक एकवचनाचा प्रत्यय होणें त्याना टाळता येणे अशक्य आहे; कारण गमक नसले तरी औत्सर्गिक एकवचनोत्पत्ति होतेच असे त्याच्या म्हणण्यावरून स्पष्ट होते पण तिङन्ताहून देखील तसा एकवचनाचा प्रत्यय होण्याची खरोखरच आपत्ति येत असती तर भाष्यकारानी 'ङ्याप्प्रातिपदिकात्' या सूत्रावरील भाष्यात तसे म्हटलें असतें पण तसें भाष्यकारानी न म्हणता त्या आपत्तीचें इतर रीतीनें निवारण केलें असल्यामुळें हे स्पष्ट होत की, सङ्ख्याकारकबोधरहित शब्दाहून, काही तरी गमक असल्याशिवाय, औत्सर्गिक एकवचनाचा प्रत्यय करता येत नाही. म्हणून अव्युत्पन्न प्रातिपदिकातील वर्णाहून, प्रकृत सूत्रातून 'अर्थवत्' हे पद गाळल्यास, औत्सर्गिक एकवचनाचा प्रत्यय होण्याची आपत्ति येते असे जें दीक्षितानी म्हटलें आहे त बरोबर मानता येत नाही असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा भावार्थ आहे.) म्हणूनच–म्हणजे प्रातिपदिकातील अवयवभूत अनर्थक वर्णाना प्रातिपदिकसञ्ज्ञा झाली तरी, गमक उपलब्ध नसल्यामुळें, त्याहून सुबुत्पत्ति होण्याची आपत्ति येत नाहीं असे असल्यामुळेंच–प्रकृत सूत्रावरील पुढील भाष्यात भाष्यकारानी 'दश दाडिमानि' इत्यादि अनर्थक पदसमुदायाला प्रातिपदिकसञ्ज्ञा न व्हावी याकरिता प्रकृत सूत्रात 'अर्थवत्' या पदाचे ग्रहण केले आहे असे म्हटले आहे. त्या अनर्थक पदसमुदायाला प्रातिपदिकसञ्ज्ञा झाल्यास, 'सुपो धातुप्रातिपदिकयो' सू. ६५० या सूत्रानें प्रत्येक पदापुढील विभक्तिप्रत्ययाचा लुक् होण्याची आपत्ति येते हेच वास्तविक 'अर्थवद्'ग्रहणाचे मुख्य व्यावर्त्य आहे, म्हणजे अशा निरर्थक पदसमुदायातील पदापुढें असणाऱ्या विभक्तिप्रत्ययाचा लुक् न व्हावा हेच प्रकृत सूत्रातील 'अर्थवत्' या पदाच्या ग्रहणाचे मुख्य प्रयोजन आहे. (प्रकृत सूत्रावरील भाष्यात 'अर्थवत्यनेकपदप्रसङ्गः' हे वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचे व्याख्यान करिताना भाष्यकार म्हणतात– 'अर्थवदिति प्रातिपदिकसञ्ज्ञायामनेकस्यापि पदस्य प्रातिपदिकसञ्ज्ञा

प्राप्नोति—दश दाडिमानि, षडपूपाः, कुण्डमजाजिनं पललपिण्डः अधरोरुकमेतत्कुमार्याः स्फैयकृतस्य पिता प्रतिशीन इति। समुदायो-ऽत्रानर्थकः।' या भाष्यात ज्या 'दश दाडिमानि' इत्यादि पद-समुदायाचा निर्देश केला आहे त्यातील प्रत्येक पद जरी अर्थवान् आहे व 'दश दाडिमानि, षडपूपाः' इत्यादि लहान वाक्यें अर्थवान् आहेत तरी त्या वाक्याचा व इतर पदाचा परस्पराशी अन्वयरूप संबंध नसल्यामुळें, वरील समुदाय अर्थवान् ठरत नाही. त्यामुळें प्रकृत सूत्रातून 'अर्थवत्' हे पद गाळल्यास, वरील अनर्थक समुदायाला प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति येते; कारण हा अनर्थक समुदाय धातु, प्रत्यय किंवा प्रत्ययान्त नाही. समुदायातील प्रत्येक पद जरी प्रत्ययान्त आहे तरी समुदायाहून प्रत्यय झाला नसल्यामुळें, समुदाय प्रत्ययान्त ठरत नाही. या संबधानें कैयटानें 'प्रतिपदं तु नैव संज्ञा प्राप्नोत्यप्रत्यय इति निषेधात्। समुदायस्य तु निषेधो न प्रवर्तते, प्रत्ययग्रहणे यस्मात्स विहित इति वचनात्, समुदायाच्च प्रत्ययस्याविधानात् प्रत्ययान्तत्वाभावात्' असें म्हटलें आहे. साराश वरील अनर्थक समुदाय धातु,प्रत्यय व प्रत्ययान्त याच्या कक्षेंत येत नसल्यामुळें, प्रकृत सूत्रात 'अर्थवत्' हे पद नसल्यास, त्याला प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति येते व त्या समुदायाला प्राति-पदिकसंज्ञा झाल्यास, समर्थ नसल्यामुळें, त्या समुदायाहून जरी औत्सर्गिक एकवचनाचा प्रत्यय होऊ शकत नाही तरी, 'सुपो धातु-प्रातिपदिकयोः' सू. ६५० या सूत्राची प्रवृत्ति होऊन प्रत्येक पदापुढील विभक्ति प्रत्ययाचा लुक् होण्याची आपत्ति येते. अशा अनर्थक पदसमुदायाला प्रातिपदिकसंज्ञा न व्हावी व त्या समुदायातील प्रत्येक पदापुढील विभक्तिप्रत्ययाचा लुक् होण्याची आपत्ति न यावी हे वास्तविक प्रकृत सूत्रातील 'अर्थवत्' या पदाच्या ग्रहणाचे प्रयोजन असून, 'धन, वन' इत्यादि शब्दातील अनर्थक वर्णांना प्रातिपदिक-संज्ञा न व्हावी हे त्या पदाच्या ग्रहणाचे प्रयोजन नाही; कारण त्या अनर्थक वर्णांना प्रातिपदिकसंज्ञा झाली तरी, वर सांगितल्याप्रमाणें

गमकाच्या अभावी, त्याहून सुबुत्पत्ति होऊं शकत नसल्यामुळें, पदसंज्ञा होण्याची व तन्निमित्तक नलोप वगैरे अनिष्ट कार्यें होण्याची आपत्ति येत नाही. मग असें जर आहे तर ' अर्थवद्ग्रहण किमर्थम् ?। अर्थवदिति व्यपदेशाय । वर्णाना मा भूदिति । किं च स्यात् ?। वन धनमिति नलोपः प्रातिपदिकान्तस्येति नलोपः प्रसज्येत ' या भाष्याची वाट काय ? हे भाष्य तर शब्दरत्नातील वरील विधानाविरुद्ध आहे. याचे उत्तर हेच को, पूर्व भाष्य, म्हणजे 'अर्थवद्ग्रहण किमर्थम्' इत्यादि भाष्य, एकदेशीची उक्ति असून, उत्तर भाष्य हेच सिद्धान्त-भाष्य आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.) ' पचत.कल्पम् ' इत्यादि स्थळी जी सुबुत्पत्ति होते तिचे ' प्रशसाया रूपप् ' ५. ३ ६६ या सूत्रावरील भाष्य ज्ञापक आहे. ( ज्या शब्दानें एकत्वादि सख्येचा बोध होत नाही अशा शब्दाहून, काही तरी गमक असल्याशिवाय, सुबुत्पत्ति करता येत नाही असें वर म्हटले आहे. यावर शकाकार अशी शका करतो की. 'पचतिरूपम् पचतोरूपम्' इत्यादि स्थळी 'क्रियाप्रधानमाख्यातम्' या वचनान्वयें लिङ्गवचनरहित क्रिया-प्रधान ' पचति, पचत 'या शब्दाहून स्वार्थे 'रूपप्'प्रत्यय केला असता, रूपप्प्रत्ययान्त शब्द लिङ्गवचनादिकाचा बोधक होऊ शकत नाही. तरी पण काही गमक नमून देखील त्याहून जसा नपुसकाच्या एकवचनाचा 'अम्' प्रत्यय होतो त्याचप्रमाणे 'धनम्, वनम्' इत्यादि समुदायातील वर्णांहून एकवचनाचा औत्सर्गिक 'सु' प्रत्यय होऊ शकतो व तसा प्रत्यय होण्याची दीक्षितानी जी आपत्ति मनोरमेंत दर्शविली आहे ती यथार्थ आहे या शकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात की, 'प्रशसाया रूपप्' सू २०२१ या सूत्रानें तिङन्ताहून 'रूपप्' प्रत्यय झाला असता त्या रूपप्प्रत्ययान्त शब्दाहून जो नपुसकाच्या प्रथमेच्या एकवचनाचा प्रत्यय होतो त्याला त्या सूत्रावरील भाष्यच प्रमाण आहे त्या भाष्यात भाष्यकार म्हणतात– 'यदि तर्ह्येका क्रिया द्विवचनबहुवचनानि न सिध्यन्ति–पचतः पचन्तीति । नैतानि क्रियापेक्षाणि किं तर्हि ? । साधनापेक्षाणि । इहापि तर्हि-प्राप्नुवन्ति

[पचतिरूप] पचतोरूप पचन्तिरूपमिति । तिङोक्तत्वात्तस्यार्थनि-सम्बन्धस्य न भविष्यति । एकवचनमपि तर्हि न प्राप्नोति । समयाद्भविष्यति । द्विवचनबहुवचनान्यपि तर्हि समयात्प्राप्नुवन्ति । एवं तर्ह्येकवचनमुत्सर्गतः करिष्यते-तस्य द्विबहोरर्थयोर्द्विवचन-बहुवचने अपवादौ भविष्यतः।' या भाष्याचा भावार्थ हा आहे की, जर क्रिया एकच आहे तर 'पचत. पचन्ति' इत्यादि द्विवचनाचे व बहुवचनाचे प्रयोग कसे होतात ? या प्रश्नाचें उत्तर हें आहे की, ते प्रयोग क्रियागतसंख्येच्या योगें होत नसून कर्तृकारकगत संख्येच्या अपेक्षेनें त्या प्रयोगात वचनभेद केला जातो. मग असे आहे तर, 'पचतोरूपम्, पचन्तिरूपम्' या स्थली 'रूपे,रूपाणि' असा द्विवचनाचा व बहुवचनाचा प्रयोग का होऊ नये ? तसा प्रयोग होत नाही याचे कारण हे की, तिङ्प्रत्ययानें वचनाचें अभिधान केले असल्यामुळें व 'उक्तार्थानामप्रयोग.' असा न्याय असल्यामुळें, 'रूपे, रूपाणि' असा प्रयोग होत नाही. मग 'पचति-रूपम्' या स्थली 'तिप्' या एकवचनाच्या प्रत्ययानें एकवचनाचें अभिधान केल असल्यामुळें, वरील न्यायान्वयें 'रूपम्' असा एकवचनाचा प्रयोग देखील होऊ नये. 'प्रत्यय', परश्च' सू. १८०, १८१ अशी सूत्रें असल्यामुळें व 'न केवला प्रकृतिः प्रयोक्तव्या नापि केवल. प्रत्यय.' असा नियम असल्यामुळें, एकवचनाचा प्रयोग होतो. मग त्याच नियमान्वयें द्विवचनाचे व बहुवचनाचे प्रयोग देखील करता येऊ शकतात. असेच जर म्हणणे आहे तर मग 'द्वेक्योर्द्विवचनैकवचने' सू. १८६ असे सूत्र पठित न करिता 'द्व्योर्द्विवचनम्,' 'बहुषु बहुवचनम्' अशी सूत्रें पठित करावीं. तशीं सूत्रें पठित केल्यानें संख्यानिरपेक्ष एकवचनाचा प्रयोग उत्सर्गरूपानें करता येतो व द्विवचन आणि बहुवचन त्याचे अपवाद होतील. सारांश या भाष्या-मध्यें 'पचतोरूपम्, पचन्तिरूपम्' इत्यादि स्थली 'रूपम्' हा एक-वचनाचा प्रत्यय करता येतो असे भाष्यकारांनी म्हटले असल्यामुळें, त्या भाष्याच्या गमकरूप आधारें वास्तविक तसा प्रत्यय केला जातो असे

शब्दरत्नकाराचे म्हणणे आहे.) अर्थवान् पदसमुदायाला प्रातिपदिक-संज्ञा होऊ नये याकरिता 'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रात 'समास' या शब्दाचे ग्रहण नियमार्थ केले आहे असे प्रकृत सूत्रावरील भाष्यात स्पष्ट सांगितले असल्यामुळें, 'दश दाडिमानि' इत्यादि अनर्थक पदसमुदायाची त्या नियमानें व्यावृत्ति होऊ शकत नाही. (सारांश तशा अनर्थक पदसमुदायाला जी प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति येते ती 'कृत्तद्धित' या सूत्रातील 'समास' ग्रहणानें टाळता येऊ शकत नाही, कारण अर्थवान् पदसमुदायाला जी प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति येते ती त्या 'समास' ग्रहणानें टाळता येते. पण 'दश दाडिमानि' इत्यादि परस्परान्वयरहित पदसमुदाय अर्थवान् नसल्यामुळें, त्याला जी प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति येते ती प्रकृत सूत्रात 'अर्थवत्' या पदाचे ग्रहण केले असल्यामुळेंच, टाळता येऊ शकते )

शब्दरत्न–यद्यप्यर्थवत्त्वमिति । व्याख्यानादर्थवत्त्वेनैव सादृश्यं गृह्यत इति भावः । उक्तमिति । एतेनैवमुक्तमेव पुनर्वार्तिकेनोच्यत इति सूचितम् । भाष्ये इति । एवं हि तत्र भाष्यम्–"अर्थवदिति वर्तते कृत्तद्धितान्तं चैवार्थवत्, न केवलाः कृतस्तद्धिता वेति" कृत्तद्धित-इति सूत्रेऽन्तग्रहणं न कार्यम्" इति । "अर्थवद्ग्रहणानुवृत्ति-सामर्थ्यादेव चेदृशार्थलाभः" इति कैयटः । समुदायार्थारोपादिति । तेन तन्मात्रस्य क्रियावाचित्वनिबन्धनधातुत्वसिद्धिरिति भावः । तत् = क्रियावाचकत्वम् । तसदर्थविभागश्चेति । तस्य तस्येति कृतद्विर्वच-नेन षष्ठीसमासे, स सोऽर्थविभाग इति कर्मधारये वा विभक्तिलुकि इदं साधु । एतेनान्यान्यप्रादुर्भावादिति "अपादाने पञ्चमी" इति सूत्रस्थ-भाष्यप्रयोगोऽपि व्याख्यातः। सुबन्तत्वमपि द्विःप्रयोगपक्ष इव स्थाने द्विर्व-चनपक्षेऽप्याद्यान्यशब्दे प्रकृतित्वबुद्ध्याऽन्त्यस्यशब्दे प्रत्ययत्वबुद्ध्या सूपपादम् । सर्वं इति । धातूपसर्गविभागः, वृत्तिष्वेकार्थीभावश्चं-चमेवेति भावः । स्फोट एवेति । पदरूपो वाक्यरूपो वेत्यर्थः । लोकाना तत्रैव शक्तिग्रहेण बोधादिति भावः । अत एव तस्य परमार्थत्वम्, लोके

बोधजनकत्वात् । शास्त्रेण प्रकृतिप्रत्ययविभागव्युत्पादनेन विशिष्ट-पदस्यैव तत्तदर्थबोधनद्वारा विशिष्टे पदे विशिष्टार्थबोधकत्वमेव बोध्यते । 'उपलालना:' इत्यस्य भवन्तीति शेषः । न तु वास्तवा इति भावस्तदाह–असत्ये इति । आरोपिते इत्यर्थः । लोकानान्त-सच्छब्दजन्यबोधानुपयोगित्वात्तत्त्वम् । सत्यं–विशिष्टशक्त्या बोधकं पदादीत्यर्थः । स्फुरिति । अधिजगे, अध्यगीष्टेत्यादौ । अर्थवत्त्वादिति । आरोपितार्थवत्त्वादित्यर्थः । शास्त्रकृत् = भाष्यकृदादिः । सम्मतेति । तद्धितविषये इति शेषः । औत्सर्गिकप्रवृत्तौ हेतुमाह–इष्टस्थले ऽपीति । यः पञ्चम्यर्थहेतुत्वानुवादकः । कथञ्चिदिति । अनेन तदनावश्यक-त्वमेवेति ध्वनयति । ननूत्तरत्र चरितार्थस्य कथं ज्ञापकत्वमत आह–उत्तरार्थस्यापीति । "इकोचि" इति सूत्रेऽज्ग्रहणस्योत्तरार्थतामुक्त्वा भाष्ये उक्तम्–इह किं चित् 'त्रपो' इति । "न लुमता" इति निषेधानित्यत्वज्ञापनद्वारा 'त्रपो' इत्यत्र गुणः फलमिति तदर्थः । इत्यं मतीति । लघुना ऽनेनैवानित्यत्वज्ञापनमाश्रित्य न्यायानुसरणेन तयोः प्रत्याख्यानसम्भव इति भावः ।

'यद्यप्यर्थवत्त्वं लभ्यते' असे जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे की, येथें व्याख्यानामुळें अर्थवत्तारूप सादृश्याचें ग्रहण केलें जातें. (प्रकृत सूत्रात 'अर्थवत्' हा शब्द नसला तरी 'अधातुः, अप्रत्ययः' या पर्युदासाच्या सामर्थ्यानें 'नञिवयुक्तम्' या परिभाषान्वयें अर्थवान् शब्दानाच प्रातिपदिकसंज्ञा होऊं शकते असें दीक्षितांनीं मनोरमेंत म्हटलें आहे व त्याचें कारण हें कीं, धातुप्रत्ययभिन्न पण धातुप्रत्ययसदृश असे इतर अर्थवान् शब्दच असू शकतात, व येथें इतर प्रकारचें सादृश्य न घेता अर्थवत्तारूप सादृश्यच घेतलें आहे याचें कारण शब्दरत्नकार असें देतात कीं, वार्तिककार व भाष्यकार यानीं जें व्याख्यान केलें आहे त्या व्याख्या-नान्वयें अर्थवत्तारूप सादृश्यच येथें घेतलें जाऊं शकते. सर्व निपाताचे ठिकाणी निपातत्व हा साधारण धर्म जरी आहे तरी सर्व निपात अर्थवान् नसून काहीं निपात अर्थरहित आहेत व तशा अनर्थक

निपातांना देखील प्रातिपदिकसंज्ञा व्हावी व ती झाल्याने त्याहून सुबुत्पत्ति होऊन पदसंज्ञा झाली असता, पदसंज्ञेच्या निमित्तामुळे 'तिङ्ङतिङ' सू ३९३५ इत्यादि सूत्रांनी होणारी कार्ये व्हावी याकरिता वार्तिककारानें प्रकृत सूत्रावर 'निपातस्यानर्थकस्य प्रातिपदिकत्वम्' हे वार्तिक पठित केले आहे या वार्तिकावरून हे स्पष्ट होते की, प्रातिपदिकसंज्ञा होण्यास अर्थवत्ता असणे आवश्यक आहे म्हणून 'अधातु, अप्रत्यय' या पर्युदासांनी जर इतर प्रकारच्या सादृश्याचे ग्रहण केले असते तर इष्ट प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकली नसती ती व्हावी याकरिता प्रकृत सूत्रातील पर्युदासांनी वरील वार्तिकाच्या व भाष्यकारांनी जें त्याचें व्याख्यान केले आहे त्याच्या आधारें अर्थवत्तारूप सादृश्याचेंच ग्रहण केले जाते असे शब्दरत्नकाराचे म्हणणे आहे आता प्रकृत सूत्रात 'अर्थवत्' या पदाचे ग्रहण, त्याची उत्तर सूत्रात अनुवृत्ति व्हावी याकरिता, केले आहे असे पूर्वी मनोरमेंत सांगितले असून देखील) 'उत्तरार्थं तदित्युक्तम्' असे जे मनोरमेंत पुन्हा म्हटले आहे त्यावरून दीक्षित हे सुचवितात की, जरी हे पूर्वी सांगितले आहे तरी हेंच म्हणणे योग्य आहे याचे दृढीकरण व्हावे, म्हणजे वाचकाच्या मनावर हे पूर्णपणे ठसावे, याकरिता त्याची पुनरावृत्ति केली आहे 'सुप्तिङन्त-मिति सूत्रे भाष्ये ध्वनितम्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचे कारण हे की, त्या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारांनी असे म्हटले आहे की, 'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रात 'अर्थवत्' या पदाची अनुवृत्ति आहे, कृदन्त व तद्धितान्त हेच अर्थवान् आहेत, केवळ कृत्प्रत्यय किंवा तद्धितप्रत्यय अर्थवान् नाहीत आणि त्यामुळें 'कृत्तद्धित' या सूत्रात 'अन्त' या शब्दाचे ग्रहण करण्याची काही आवश्यकता नाही त्या भाष्याच्या वृत्तीत कैयटानें असे म्हटले आहे की, 'कृत्तद्धित-समासाश्च' या सूत्रात 'अर्थवत्' या पदाची अनुवृत्ति होत असल्या-मुळें, त्या अनुवृत्तीच्या सामर्थ्यानें, भाष्यात जसा वर अर्थ सांगितला आहे तसा अर्थ निष्पन्न होतो (या भाष्यावरून हे स्पष्ट होते

की, प्रकृत सूत्रातून 'अर्थवत्' या पदाची 'कृत्तद्धित' या उत्तर सूत्रात अनुवृत्ति होते ) 'अवयवे समुदायार्थारोपात्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, ('अधि+इ' या समुदायाच्या अर्थाचा 'इ' या अवयवाचे ठिकाणी आरोप केल्यानें) क्रियावाचकत्वरूप हेतूमुळें क्रियावाचक शब्दाला होणारी धातुसंज्ञा 'इ' याला होते. 'आरोपित तदिति चेत्' या मनोरमेच्या पङ्क्तीतील 'तत्' या पदाचा 'क्रियावाचकत्वम्' असा अर्थ आहे. 'तत्तदर्थविभागश्च' असे जें मनोरमेंत सामासिक पद घातले आहे ते, ('नित्यवीप्सयोः' सू. २१४० या सूत्रानें) 'तस्य तस्य' असे द्विर्वचन करून 'अर्थः' या पदाशी षष्ठीतत्पुरुषसमास केल्यानें किंवा 'सः सः' असे द्विर्वचन करून 'अर्थविभाग.' या पदाशी कर्मधारयसमास केल्यानें व अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाचा ('सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू. ६५० या सूत्रानें) लुक् केल्यानें, सिद्ध होते. सिद्ध होते. 'अपादाने पञ्चमी' सू. २-३-२८ या सूत्रावरील भाष्यात 'अन्यान्यप्रादुर्भावात्' असा जो प्रयोग केला आहे त्याचे देखील वर सांगितल्याप्रमाणेच समर्थन करता येते. (वीप्सा गम्यमान असताना 'नित्यवीप्सयोः' या सूत्रानें पदाचे द्विर्वचन होऊ शकते तरी, 'कर्मव्यतिहारे सर्वनाम्नो द्वे वाच्ये, समासवच्च बहुलम्'–सू. २१४७ वरील वार्तिक–हे वार्तिक असल्यामुळें, क्रियाविनिमयरूप अर्थ गम्यमान असतानाच सर्वनामाचे द्विर्वचन करता येते व द्विर्वचन केलेल्या त्या सर्वनामपदाचा समास होऊ शकतो. क्रियाविनिमयरूप अर्थ गम्यमान नसून देखील 'तत्तदर्थविभागः' किंवा 'अन्यान्यप्रादुर्भावात्' या स्थली सर्वनामाचे जें द्विर्वचन करून द्विवचन केलेल्या पदाचा जो समास केला आहे तसे करणे वरील वार्तिकाविरुद्ध आहे अशी शङ्काकाराची शङ्का आहे. या शङ्केवर 'अपादाने पञ्चमी' या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तीत कैयटानें 'भाष्यकारवचनप्रामाण्यादन्यान्यशब्दस्य साधुत्वं द्रष्टव्यम्' एवढेंच उत्तर दिले आहे. याचे स्पष्टीकरण करिताना उद्योतकारानी असे म्हटले आहे

की, सत्यपि द्वित्वे विभक्त्यन्तस्यैव द्वित्वापत्तेः कर्मव्यतिहाराऽभावेन समासवद्भावाऽप्राप्तेरेकशेषेण बाधाच्च द्वन्द्वाऽप्राप्तौ कथमन्यान्येतीत्यत आह–भाष्यकारेति । तत्प्रामाण्यात्कर्मव्यतिहाराऽभावेपि बहुलग्रहणात्क्वचित्समासवद्भाव इत्यर्थः ।' त्याच्या म्हणण्याचा भावार्थ हा आहे की, 'सर्वस्य द्वे' या अधिकारात पठित असलेल्या 'नित्यवीप्सयोः' या सूत्राने विभक्त्यन्त पदाचेच द्विर्वचन करता येते पण प्रकृत स्थली क्रियाविनिमयरूप अर्थ गम्यमान नसल्यामुळें त्या विभक्त्यन्त पदाचा समास होऊ शकत नाही व 'सरूपाणामेकशेष' सू. १८८ या एकशेषविधायक सूत्रानें द्वन्द्वाचा बाध केला असल्यामुळें द्वन्द्वसमास देखील होऊ शकत नाही तथापि 'अन्यान्यप्रादुर्भावात' या भाष्यप्रयोगावरून हे सिद्ध होते की, वरील वार्तिकात 'बहुलम्' या पदाचे ग्रहण केले असल्यामुळें त्या शब्दाच्या सामर्थ्यानें, क्वचित् स्थली क्रियाविनिमयरूप अर्थ गम्यमान नसून देखील सर्वनामाचे द्विवचन होते व समासवद्भाव होतो आणि त्यामुळे 'तत्तदर्थविभाग, अन्यान्यप्रादुर्भावात्' हे प्रयोग साधु ठरतात, आणि शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा देखील हाच आशय आहे ) ज्याप्रमाणे द्वि प्रयोगपक्षात आद्य 'अन्य' शब्द प्रकृति मानून व द्वितीय 'अन्य' शब्दापुढें असलेला 'स्य' प्रत्यय हा प्रत्यय मानून 'अन्यस्य अन्यस्य' या समुदायाला सुबन्त मानता येते त्याचप्रमाणे स्थाने द्विवचनपक्षात देखील त्याच रीतीनें समुदायाला सुबन्त मानता यते ('सर्वस्य द्वे' या अधिकारसूत्रानें होणाऱ्या पदद्वित्वासंबधानें द्वि प्रयोग व स्थाने द्विर्वचन असे दोन पक्ष आहेत प्रथम पक्ष हा की, तेच पद दोनदा उच्चारले जाते व हाच द्वि प्रयोगपक्ष होय दुसरा पक्ष हा की, एक पदाचे जागी दोन पदाचा आदेश होतो व यालाच स्थाने द्विर्वचनपक्ष म्हणतात प्रथम पक्षात 'अन्यस्य' ह षष्ठ्यन्त पद दोनदा उच्चारले असल्यामुळें दोन्ही 'अन्यस्य' ही पदें सुबन्त ठरतात पण 'अन्यस्य अन्यस्य' हा समुदाय सुबन्त ठरत नाही प्रथम 'अन्य' शब्द प्रकृति आहे

व द्वितीय 'अन्य' शब्दापुढील 'स्य' प्रत्यय हा प्रत्यय आहे असे मानल्यानें 'अन्यस्य अन्यस्य' हा समुदाय सुवन्त ठरतो व या सुवन्त समुदायाचा 'प्रादुर्भाव.' या शब्दाशी 'सुबन्त सुबन्तेन समस्यते' या वचनान्वयें षष्ठीतत्पुरुषसमास होण्यात काही अडचण येत नाही आणि 'सुपो धातुप्रातिपदिकयो.' या सूत्रानें प्रत्येक पदापुढील विभक्तिप्रत्ययाचा लुक् होऊन 'अन्यान्यप्रादुर्भाव.' असे रूप सिद्ध झाते. द्वितीय पक्षात, म्हणजे स्थाने द्विर्वचनपक्षात, 'अन्यस्य' या पदाच जागी 'अन्यस्य अन्यस्य' असा आदेश होतो असे मानलं असल्यामुळें व 'अन्यस्य' हा स्थानी सुवन्त असल्यामुळें, 'अन्यस्य अन्यस्य' हा समुदायरूप आदेश स्थानिवद्भावानें सुवन्त ठरण्यात काही अडचण येत नाही व त्या सुवन्त समुदायाचा 'प्रादुर्भाव:' या सुवन्ताशी षष्ठीतत्पुरुषसमास होऊ शकतो. पण या पक्षात अशी अडचण येते की, प्रथम 'अन्य' शब्दापुढील 'स्य' हा आदेशावयव ठरत असून प्रत्यय मानता येऊ शकत नसल्यामुळे, 'सुपो धातुप्रातिपदिकयो:' या सूत्रानें त्याचा लुक् कसा व्हावा ? या प्रश्नाचे उत्तर हे आहे की, 'अन्यस्य' याचे जागी झालेल्या 'अन्यस्य अन्यस्य' या आदेशात प्रकृतिप्रत्ययभाव अस्तमित, म्हणजे नाहीसा, झाला नसून, कायम आहे असे 'अनस्तमितावयवभेदस्यैवादेशत्वम्' या सिद्धान्तान्वयें मानल्यानें प्रथम 'अन्य' शब्दापुढील 'स्य' हा प्रत्यय ठरून त्याचा देखील लुक् होण्यात काही अडचण येत नाही.)

मनोरमेंत 'सर्व. कल्पित एव' असे जें म्हटले आहे त्यातील 'सर्व:' या शब्दाचा धातूपसर्गविभाग व वृत्तीत होणारा एकार्थीभाव हाही सर्व कल्पितच आहे असा अर्थ आहे. मनोरमेंत 'स्फोट एव अर्थवान्' असे जें म्हटले आहे त्यातील 'स्फाट.' या शब्दानें पदरूप किंवा वाक्यरूप स्फोटाचे ग्रहण होतें; कारण लोकाना पदापासून किंवा वाक्यापासूनच शक्तिग्रहानें अर्थबोध होत असल्यामुळें, पदस्फोट व वाक्यस्फोट असे दोन प्रकारचे स्फोट मानले आहेत आणि म्हणूनच, म्हणजे स्फोट हाच लोकाना अर्थबोध करून देणारा

असल्यामुळेंच, तोच खरा मानला आहे (आणि प्रकृतिप्रत्ययविभाग इत्यादि सर्व कल्पित मानले आहेत सभापतिमिश्र म्हणतात– 'ध्वनिव्यङ्ग्यो नित्योऽर्थवाचक स्फुटत्यर्थोऽस्मात् इति व्युत्पत्या स्फोट इत्युच्यते। स च न तात्त्विकरूपेण प्रत्यक्षविषय, किन्तु पदादिरूपेणैवेति पदादीनामप्यर्थवत्वव्यवहार । वास्तविकवाचकत्व तु अक्षिगोलकगतेन्द्रियस्याप्रत्यक्षत्वेऽपि प्रत्यक्षज्ञानजनकत्वमिव स्फोटस्यैव) पाणिनीय शास्त्रानें ज्याप्रमाणे विशिष्ट–प्रकृतिप्रत्ययविशिष्ट–पदाचा प्रकृतिप्रत्ययरूप विभाग करून त्याची व्युत्पत्ति दर्शविली जाते त्याचप्रमाणे प्रकृति व प्रत्यय यांच्या अर्थाच्या बोधाच्या द्वारे हेंहि ज्ञापित केलें जाते की, प्रकृतिप्रत्ययविशिष्ट पदाचेच ठिकाणी विशिष्ट अर्थबोधक शक्ति आहे (जरी प्रकृति व प्रत्यय हे दोन्ही अर्थवान् आहेत तरी केवळ प्रकृतीचा किंवा केवळ प्रत्ययाचा भाषेंत प्रयोग होत नसून प्रकृतिप्रत्ययविशिष्ट शब्दाचाच भाषेंत प्रयोग होत असतो व त्याचेच ठिकाणी लौकिक अर्थवत्ता–लौकिक व्यवहारात अर्थबोध करून देण्याची शक्ति–आहे त्या प्रकृतिप्रत्ययविशिष्ट शब्दाचे ठिकाणी असणारी ही शक्ति त्याच्या प्रकृतीचे किंवा प्रत्ययाचे ठिकाणी असणारी शक्ति नसून स्वतन्त्र शक्ति आहे. त्याचप्रमाणे वाक्याचे ठिकाणी वाक्यार्थबोध करून देणारी स्वतन्त्र शक्ति आहे जरी पाणिनीच्या अष्टाध्यायीत या स्वतन्त्र पदशक्तीचा किंवा वाक्यशक्तीचा कोठेंहि साक्षात् उल्लेख केला नाहीं व केवळ प्रकृतिप्रत्ययविभागरूप अन्वाख्यान करून शब्दाची व्युत्पत्ति दर्शविली आहे तरी स्वतन्त्र पदशक्ति व वाक्यशक्ति आहे हें बोधित करण्यामध्येच त्या व्युत्पत्तीचे तात्पर्य आहे, म्हणजे पदाचे किंवा वाक्याचे ठिकाणी स्वतन्त्र अर्थबोधकशक्ति आहे हें ज्ञापित करण्याच्या हेतूनेंच पाणिनीनें आपल्या शास्त्रात प्रकृतिप्रत्ययविभागरूप व्युत्पत्ति दर्शविली आहे सारांश प्रकृतिप्रत्ययविभाग इत्यादि जे पाणिनीय शास्त्रात सांगितलें आहेत ते विद्यार्थ्यांना सहज अर्थबोध व्हावा याकरिता सुचविलेले उपाय असून ते वास्तव नव्हत व ध्वनिव्यङ्ग्यस्फोट हाच

पदाच्या किंवा वाक्याच्या अर्थाची अभिव्यक्ति करणारा होय असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. या पंक्तींचा भावार्थ देताना भैरवीकार म्हणतात—'प्रतिवाक्यं सकलग्रहासम्भवाल्लघुभूत उपाय शास्त्रेण वाक्यस्य साक्षादन्वाख्यानं। एवञ्च तत्तदवयवस्य तत्तदर्थानां च प्रदर्शनं वाचकस्य समुदायस्य विशिष्टार्थस्य च बोधनतात्पर्यकमिति भाव।') हरीच्या कारिकेतील 'उपलालना' या पदापुढें 'भवन्ति' हे क्रियापद अध्याहृत आहे व 'उपलालना' या पदाचा 'न तु वास्तवाः', म्हणजे वास्तविक खरे नव्हेत, असा अर्थ आहे. त्या कारिकेतील 'असत्य' या पदाचा 'आरोपित' असा अर्थ आहे. लौकिक व्यवहारात पदापासून अर्थबोध होतेवेळी कल्पित प्रकृतिप्रत्ययविभाग व त्यांचे कल्पित भिन्न भिन्न अर्थ यांचा काहीच उपयोग होत नसून प्रकृतिप्रत्ययविशिष्ट अखण्ड पदापासूनच त्या अखण्ड पदाचे ठिकाणी असणाऱ्या विशिष्ट शक्तीनें अर्थबोध होत असल्यामुळें, ते कल्पित प्रकृतिप्रत्ययविभाग व त्यांचे भिन्न भिन्न कल्पित अर्थ असत्य ठरतात. कारिकेतील 'सत्यम्' या पदाचा विशिष्ट शक्तीनें अर्थबोध करून देणारें 'पदादि' असा अर्थ आहे (व 'पदादि' यांतील 'आदि' या पदानें वाक्याचा संग्रह होतो) 'कथमन्यथा इङो द्विवचनमडादयश्च स्युः' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे तें 'अधिजगे, अध्यगीष्ट' इत्यादि उदाहरणांसंबंधानें म्हटलें आहे ('अधिजगे' या रूपांत 'इङ्' धातूचे जागीं 'गाङ्

सू. २४६२ या सूत्रानें 'गा' यातील आकाराचे जागी ईकारादेश होऊन आणि यणादेश, सिचाचे षत्व व 'त' प्रत्ययातील तकाराचे ष्टुत्व होऊन 'अध्यगीष्ट' असे लुङाचे रूप होते विकल्पानें होणारा 'गाङ्' आदेश न केल्यास अजादि 'इङ्' धातूला 'आट्' आगम होऊन व 'आटश्च' सू २६९ या सूत्रानें वृद्धिरूप एकादेश होऊन आणि वर सांगितल्याप्रमाणे यणादेश, षत्व व ष्टुत्व होऊन 'अध्यैष्ट' असे पाक्षिक लुङाचे रूप होते ) 'स्वार्थिकाना प्रकृत्यर्थेनैवार्थवत्त्वात्' या मनोरमेतील पक्तीतील 'अर्थवत्त्वात्' या पदाचा 'आरोपितार्थवत्त्वात्' असा अर्थ आहे (कारण स्वार्थिक प्रत्यय प्रकृतीचाच अर्थ सांगणारे असल्यामुळे त्याचे ठिकाणी वास्तविक स्वतत्र अर्थवत्ता नाही तथापि त्याचे ठिकाणी प्रकृतीचा अर्थ आरोपित केला जात असल्यामुळें, तशा आरोपित अर्थवत्तेने ते अर्थवान् मानले जातात.) 'शास्त्रकृत्सम्मता' या मनोरमेतील पदातील 'शास्त्रकृत्' याचा 'भाष्यकृदादि,' म्हणजे भाष्यकारादिक, असा अर्थ आहे, व 'शास्त्रकृत्सम्मता' या मनोरमेतील पदापुढें 'तद्धितविषये' हे पद अध्याहृत आहे (कारण स्वार्थिक प्रत्यय तद्धित प्रत्यय आहेत आणि म्हणूनच भाष्यकारानी स्वार्थिक तद्धित प्रत्यय प्रकृतीच्या अर्थाचे बोधक असतात असे सांगितले आहे ) 'नञिवयुक्तम्' ही परिभाषा अनित्य मानली तरी तिची इष्ट स्थली औत्सर्गिक प्रवृत्ति होतेच याला 'इष्टस्थलेऽप्यप्रवृत्तौ न्यायस्य निर्विषयत्वापाताच्च' असा मनोरमेंत हेतु दिला आहे या मनोरमेच्या पक्तीतील 'च' हे पद पञ्चमीचा अर्थ जो 'हेतु' त्याचे केवळ अनुवादक आहे ('निर्विषयत्वापातात्' ही हेत्वर्थे पञ्चमी असून त्यापुढील 'च' हे पद 'समुच्चय' या अर्थाचे वाचक नसून त्या पञ्चमीचा अर्थ जो 'हेतु' आहे त्याचाच केवळ अनुवाद करणारे पद आहे असे शब्दरत्नकाराचे म्हणणे आहे 'चेति अन्वाचयसमाहारेतरेतरसमुच्चयविनियोगतुल्ययोगिताऽवधारणहेतुषु' असे 'च' या निपाताचे अनेक

अर्थ आहेत व प्रकृत स्थळी त्याचा 'हेतु' असा अर्थ आहे.) 'अनित्यत्वज्ञापनस्य कथञ्चिदावश्यकत्वे' या मनोरमेंतील पङ्क्तीत 'कथञ्चित्' हे पद घातले असल्यामुळें दीक्षित असें सुचवितात की, 'नञिवयुक्तम्' ही परिभाषा अनित्य मानण्याची वास्तविक काहीच गरज नाही. उत्तर सूत्रात अनुवृत्ति होण्याकरिता चरितार्थ ठरत असलेले 'अर्थवत्' हें पद ('नञिवयुक्तम्' या परिभाषेच्या अनित्यत्वाचे) ज्ञापक कसें मानता येतें अशी कोणी शंका केल्यास, त्या शंकेचें मनोरमेंत 'उत्तरार्थस्यापि…सफलत्वौचित्यात्' असें उत्तर दिले आहे. (कोणतेंहि सूत्रनिर्दिष्ट पद कशाचेंहि ज्ञापक ठरण्याकरिता तें सूत्रात असणे अनावश्यक आहे असें मानता आलें पाहिजे. 'अर्थवत्' या पदाची -'कृत्तद्धित' या उत्तर सूत्रात अनुवृत्ति व्हावी याकरिता तें पद प्रकृत सूत्रात घातले आहे असें मानल्यास, तें पद अनावश्यक ठरत नसून चरितार्थ ठरते आणि त्यामुळें तें पद 'नञिवयुक्तम्' या परिभाषेच्या अनित्यत्वाचें ज्ञापक मानता येत नाही अशी शंकाकाराची शंका आहे. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात की, जरी 'अर्थवत्' हें पद उत्तर सूत्रात अनुवृत्त होणें आवश्यक आहे तरी तें पद प्रकृत सूत्रात असणें आवश्यक नसल्यामुळें व अशा रीतीनें तें पद प्रकृत सूत्रात अनावश्यक ठरत असल्यामुळें, तें पद 'नञिवयुक्तम्' या परिभाषेच्या अनित्यत्वाचें ज्ञापक आहे व ती परिभाषा अनित्य मानली जावी हेंच तें पद प्रकृत सूत्रात घालण्याचें प्रयोजन आहे असें मानता येते.) 'इकोऽचि विभक्तौ' सू. ३२० या सूत्रात केलेले 'अचि' या पदाचें ग्रहण त्या सूत्रात अनावश्यक असून उत्तर सूत्रात त्या पदाची अनुवृत्ति व्हावी एवढ्याचकरिता तें पद त्या सूत्रात घातलें आहे असें त्या सूत्रावरील भाष्यात सांगून भाष्यकारांनी 'इह किञ्चित् त्रपो इति' असें म्हटलें आहे व त्याचा अर्थ हा आहे की, ('अचि' हें पद 'इकोऽचि विभक्तौ' या सूत्रात घालण्याचें प्रयोजन एवढेंच आहे की,) 'न लुमताङ्गस्य' सू. २६३ हें निषेधक सूत्र अनित्य आहे हें ज्ञापित

व्हावें व त्या निषेधक सूत्राच्या अनित्यत्वामुळे (संबुद्धीच्या 'सु' प्रत्ययाचा 'स्वमोर्नपुंसकात्' सू ३१९ या सूत्रानें जरी लुक् झाला आहे तरी तो प्रत्यय प्रत्ययलक्षणानें विद्यमान आहे असे मानल्यानें 'ह्रस्वस्य गुण' सू २४२ या सूत्रानें) गुण होऊन 'हे त्रपो' असे रूप सिद्ध व्हावे (याचे विवेचन पूर्वी मनोरमेंत केलेच आहे.) 'इत्थं सति प्रत्याख्यानसम्भवाच्च' असे जे मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, 'अर्थवत्' हे लहानसे पदच वरील परिभाषेच्या अनित्यत्वाचे ज्ञापक मानल्यानें त्या परिभाषान्वयें ('ओपधेश्च विभक्तौ' व 'अकर्तरि च कारके' या सूत्रातील 'विभक्तौ' व 'कारके' या) दोन्ही पदाच प्रत्याख्यान करता येऊ शकते (वरील दोन सूत्रातील 'विभक्तौ' व 'कारके' ही पदे 'नञिवयुक्तम्' या परिभाषेच्या अनित्यत्वाचेच केवळ ज्ञापक ठरतात व अशा रीतीनें ती पदें एकच फल साध्य करणारी पदें आहेत परतु प्रकृत सूत्रातील 'अर्थवत्' हें पद त्या परिभाषेच्या अनित्यत्वाचे ज्ञापक ठरत असून उत्तर सूत्रात अनुवृत्ति होण्याच्या देखील उपयोगी पडते आणि अशा रीतीनें हे फलद्वयसाधक पद आहे म्हणून हे फलद्वयसाधक एक लहानसे पद वरील परिभाषेच्या अनित्यत्वाचे ज्ञापक मानणे यात लाघव असून वरील दोन सूत्रातील दोन केवळ एकफलसाधक पदें ज्ञापक मानण्यात गौरव आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे व ते पुढें असे म्हणतात की, वरील परिभाषा जरी अनित्य मानली तरी, इष्ट स्थली तिची औत्सर्गिक प्रवृत्ति रोखता येत नसल्यामुळें, त्या परिभाषेच्या आधारें 'विभक्तौ' व 'कारके' या पदाचे वरील दोन सूत्रातून प्रत्याख्यान सहज करता येते.)

शब्दरत्न— 'नलोप इति । सुबुत्पत्तिस्तु नोक्ता, "भूवादयो" इत्यस्य लविधौ, तिबादिविधौ चोपस्थितेर्निरवकाशतया अपवादैस्तिबादिभिर्बाधात् । कार्यकालपक्षे इति । न च ययोर्द्देशेऽपि प्रत्ययान्तत्वस्य भावित्वेनाकृतव्यूहपरिभाषया फलाभावेन च संज्ञाया अप्रवृत्तिरितिवाच्यम्, अकृतव्यूहपरिभाषाया अनित्यत्वात्, असत्त्वाच्च,

भविष्यति किं चित्रकृतमित्यभिसन्धिमात्रेणात्र पक्षे संज्ञायाः प्रवृत्तेः प्रगृह्यसंज्ञाप्रकरणे कैयटेनोक्तत्वाच्च । यथोद्देशपक्षेण पर्युदासे लक्ष्यसिद्धेः शङ्कासमाधाने अत्र निर्दिष्टे । न हि व्यवस्थितयोः पक्षयोरन्यतरेण लक्ष्ये सिद्धे पक्षान्तरेण शङ्काऽनुचितेत्यर्थस्य प्रगृह्यसंज्ञाप्रकरणे भाष्ये ध्वनितत्वादिति कश्चित् । कथमन्यथेति । न च राजेत्यादौ कृदन्तत्वात्प्रवृत्तिः, तत्रापि "अप्रत्ययः—" इत्यस्य सम्बन्धात् । अत एव 'वाक्षी', 'विवृक्षू' इत्यादौ परादिवद्भावेन न सुपो लुक् । न च सुब्लोपविषयमेव ज्ञापकम्, असति बाधके प्रमाणानां सामान्ये पक्षपात इत्यर्थस्यापि ज्ञापनात् । अन्यथा सूत्रोपस्थितबुद्धिमात्रविषयता स्यादिति राजपुरुषासिद्धिः । स्पष्टा चेयं रीतिः "सार्वधातुकमपित्" इत्यत्र भाष्ये । प्रकृतसूत्रभाष्ये चेवं स्पष्टम् ।

'अधातुः इति किम् ?। अहन् नलोपो मा भूत्' या मनोरमेंतील पङ्क्तींत नकारलोप होण्याची आपत्ति दिली आहे, पण सुबुत्पत्ति होण्याची आपत्ति दिली नाही व त्याचें कारण हें की, 'भूवादयो धातवः' या धातुसंज्ञाविधायक सूत्राशीं ('वर्तमाने लट्' सू. २१५१ इत्यादि) लकारविधायक सूत्रांत व 'तिप् तस् झि' सू. २१५८ इत्यादि लादेशविधायक सूत्रांत उपस्थिति होत असल्यामुळें, निरवकाशत्वामुळें तिबादिविधायक सूत्रें सुबादिविधायक सूत्रांचीं अपवादरूप सूत्रें ठरून त्यांचा बाध करतात (व त्यामुळें धातूहून सुबुत्पत्ति होण्याचा प्रसङ्गच येत नाहीं. प्रकृत सूत्रांत 'अधातुः' हा पर्युदास नसल्यास धातूंना जरी प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति येते तरी, त्यांची मूळची धातुसंज्ञा नष्ट होऊं शकत नाहीं; कारण धातुसंज्ञा व प्रातिपदिकसंज्ञा या दोन्ही 'आ कडारादेका संज्ञा' सू. २३२ या अधिकाराच्या कक्षेंत येत नसून, तो अधिकार सुरु होण्यापूर्वी पठित आहेत. म्हणून धातूंना प्रातिपदिकसंज्ञा झाल्यास, 'ङ्याप्-प्रातिपदिकात्' सू. १८२ या अधिकारसूत्रान्वयें 'अहन्' या धातूहून सुबुत्पत्ति होण्याची प्राप्ति आहे असें कोणी म्हटल्यास त्यावर

शब्दरत्नकार असे म्हणतात की, धातूहून देखील जर सुबुत्पत्ति केली तर, 'धातो' या अधिकारात पठित असलेली लकारविधायक व तिबादिविधायक सूत्रें सर्वथा निरवकाश ठरतील व निरवकाशत्वा-मुळें ती सूत्रें 'येन नाप्राप्ते'–प ५८–या न्यायान्वयें सुबादिविधायक सूत्राची अपवादक सूत्रें ठरून व त्याचा बाध करून स्वत:च प्रवृत्त झाल्यानें, धातूहून सुबुत्पत्ति होण्याची आपत्ति मुळीच येत नाहीं. तसेंच गमकाचा अभाव असल्यामुळें, 'अहन्' या धातूहून औत्सर्गिक एकवचनाचा प्रत्यय देखील करता येत नाही व म्हणूनच दीक्षितानी मनोरमेंत सुबुत्पत्ति होण्याची आपत्ति न देता 'अहन्' यातील नकारलोप होण्याचीच आपत्ति दिली आहे, कारण 'अहन्' हें तिङन्त असल्यामुळें 'सुप्तिङन्तं पदम्' या सूत्रान्वयें प्रत्ययलक्षणानें पदसंज्ञक आहेच व प्रकृत सूत्रातून 'अधातुः' हें पद गाळल्याच, त्याला प्रातिपदिकसंज्ञा होऊन ते प्रातिपदिकान्त पद ठरते व त्यामुळें 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' सू २३६ हे सूत्र प्रवृत्त होण्याची आपत्ति येते आता येथें शकाकार अशी शका करतो की, प्रकृत सूत्रात 'अधातु' हा पर्युदास नसला व केवळ 'अप्रत्यय' = अप्रत्य-यान्त' एवढाच पर्युदास असला तरी कार्यकालपक्षात 'अहन्' हा शब्द प्रत्ययान्त ठरत असल्यामुळें त्याला त्या पक्षात प्रातिपदिकसंज्ञा होऊच शकत नाही अशी मनोरमेंत जी शका उपस्थित केली आहे ती शका यथोद्देशपक्षात देखील उपस्थित होऊ शकते, कारण) यथोद्देशपक्षात देखील 'अहन्' (धातूहून तिबादि प्रत्यय केल्यावर) हा शब्द पुढें प्रत्ययान्त होणारा असल्यामुळें व त्याला त्यावेळी, म्हणजे तिबादि प्रत्यय उत्पन्न होण्यापूर्वी, (प्रातिपदिक) संज्ञा केल्यानें कोणतेहि फल निष्पन्न होऊ शकत नसल्यामुळें, 'अकृतव्यूहा पाणिनीयाः'–प. ५६–या परिभाषान्वयें त्या शब्दाचे ठिकाणीं ती संज्ञा प्रवृत्त होऊ शकत नाही (या शकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की,) ही शका बरोबर नाही, कारण 'अकृतव्यूहा' ही परिभाषा (मानली तरी

ती) अनित्य आहे व वास्तविक तशी परिभाषाच नाही, आणि प्रगृह्यसंज्ञा करण्यात कैयटानें असें म्हटलें आहे की, पुढें काही फल होईल असा केवळ संभव असताना देखील यथोद्देशपक्षात संज्ञेची प्रवृत्ति करता येते. (शंकाकाराची शंका अशी आहे की, प्रकृत सूत्रांत 'अधातुः' हा पर्युदास नसला व 'अप्रत्ययः = अप्रत्ययान्तः' एवढाच पर्युदास असला तरी, यथोद्देशपक्षात अडागमसहित 'अहन्' या धातूहून 'तिप्' इत्यादि प्रत्यय होण्यापूर्वी जरी त्याला प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति येते तरी, त्याहून 'तिप्' प्रत्यय होताक्षणींच तो प्रत्ययान्त ठरत असल्यामुळें, 'अप्रत्ययः' या पर्युदासाच्या बलानें त्याची प्रातिपदिकसंज्ञा नष्ट होणारच. म्हणून 'तिप्' प्रत्यय करण्यापूर्वी 'अहन्' याला प्रातिपदिकसंज्ञा करून काहींच फायदा नाही. आणि 'निमित्तं विनाशोन्मुखं दृष्ट्वा तत्प्रयुक्तं कार्यं न कुर्वन्ति' या अर्थाची बाधक 'अकृतव्यूहाः' ही परिभाषा असल्यामुळें, 'अहन्' याला त्यावेळी, म्हणजे त्याहून 'तिप्' प्रत्यय करण्यापूर्वी, प्रातिपदिकसंज्ञा करताच येत नाहीं आणि त्यामुळें 'अहन्' याहून 'तिप् = त्' प्रत्यय केल्यावर त्या प्रत्ययाचा 'हल्ङ्याब्भ्यः' सू. २५२ या सूत्रानें लोप झाला असता तो शब्द जरी प्रत्ययलक्षणानें पदसंज्ञक ठरतो तरी तो प्रातिपदिकसंज्ञक नसल्यामुळें आणि अशा रीतीनें 'अहन्' हा शब्द प्रातिपदिकान्त पद ठरत नसल्यामुळें, यथोद्देशपक्षात देखील त्याच्या अन्त्य नकाराचा लोप होण्याची आपत्ति येत नाही. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात की, ज्या 'अकृतव्यूह' परिभाषेच्या आधारावर वरील शंका उपस्थित केली आहे ती परिभाषा अनित्य मानली असल्यामुळें व भाष्यात ती परिभाषा मुळींच आढळत नसल्याकारणानें ती नाहींच असें मानावें लागत असल्यामुळें, तशा अनित्य व अवास्तव परिभाषेच्या आधारावर केलेली वरील शंका अनुपपन्न ठरते. दुसरें असें की, 'ईदूदेद्द्विवचनं प्रगृह्यम्' सू. १-१-११ या सूत्रावरील भाष्याच्या वर्तीत कैयटानें 'यद्यप्यत्र्द्विय प्रयोजनविशेषं प्रयोजनमात्रमभिसन्धाय

भविष्यति किञ्चिदनेन प्रयोजनमिति सञ्ज्ञापरिभाषं प्रणीयते, तदा सम्भवत्येऽवाय पक्षो यथाश्रुतग्राहिप्रतिपत्तपेक्ष.' असे म्हटले आहे व शब्दरत्नकार असे म्हणतात की, या कैयटोक्तिवरून हे सिद्ध होतें की, सञ्ज्ञा करतेवेळी जरी काही तात्कालिक फल होण्याचा सभव नसला तरी, त्यावेळी सञ्ज्ञा केल्यानें जर पुढें काही फल निष्पन्न होण्याचा सभव असेल तर तशा स्थितीत देखील त्यावेळी सञ्ज्ञा करता येते, व या कैयटोक्तीच्या आधारे 'अहन्' याहून तिबादि प्रत्यय करण्यापूर्वी त्याला, प्रकृत सूत्रात 'अधातु' हा पर्युदास नसल्यास, प्रातिपदिकसञ्ज्ञा करता येते, कारण त्यावेळी त्याला ती सञ्ज्ञा केली असता पुढें त्याला पदसञ्ज्ञा झाल्यावर 'न लोप प्रातिपदिकान्तस्य' या सूत्रानें त्यातील अन्त्य नकाराच्या लोपाची प्राप्ति होते म्हणून तो शब्द पुढें प्रत्ययान्त झाल्यावर 'अप्रत्यय' या पर्युदासान्वयें त्याची प्रातिपदिकसञ्ज्ञा नष्ट होणार एवढयावरून त्याला त्यावेळी प्रातिपदिकसञ्ज्ञा होणे बद करता येत नाही, व अशा रीतीनें 'अहन्' याहून तिबादिप्रत्यय होण्यापूर्वी तो यथोद्देश-पक्षात, 'अधातु' या पर्युदासाच्या अभावी, प्रातिपदिकसञ्ज्ञक ठरत असल्यामुळें, त्याहून 'त्' प्रत्यय होऊन त्या प्रत्ययाचा 'हल्ङ्याब्भ्य' सू २५२ या सूत्रानें लोप झाल्यावर 'अहन्' हा शद्ब प्रातिपदिकान्त पद ठरतो व त्यामुळें त्याच्या अन्त्य नकाराचा "न लोप' सू २३६ या सूत्रानें लोप होण्याची आपत्ति येते ती आपत्ति जशी कार्यकाल-पक्षात टाळता येते तशी यथोद्देशपक्षात टाळता येत नाही, कारण पूर्वी सागितल्याप्रमाणे 'अहन्' याहून तिबादि प्रत्यय उत्पन्न होण्या-पूर्वी त्याला जी प्रातिपदिकसञ्ज्ञा होते ती प्रत्ययोत्पत्ति झाल्यावर पदसञ्ज्ञा झाली तरी नष्ट होत नाही आणि म्हणूनच दीक्षितानी केवळ कार्यकालपक्षाचा आश्रय करून नलोप होण्याची शका उपस्थित केली आहे व त्या शकेचे निरसनहि केले आहे ) प्रकृत सूत्रात ('अधातु' हा) पर्युदास असल्यानें यथोद्देशपक्षात (नलोपाची आपत्ति टळून 'अहन्' इत्यादि) इष्टरूपाची सिद्धि होत असल्यामुळें,

(कार्यकालपक्षाचा आश्रय करून मनोरमेत) जी शंका उपस्थित केली आहे व तिचें जें समाधान सांगितले आहे हे दोन्ही व्यर्थ ठरतात; कारण दोन्ही पक्ष–यथोद्देशपक्ष व कार्यकालपक्ष–व्याकरण-शास्त्रात मानले असून त्यांची व्यवस्था लावून दिली असल्यामुळें, जर एका पक्षाचा आश्रय केल्यानें इष्ट रूपाची सिद्धि होते तर दुसऱ्या पक्षाचा आश्रय करून त्या पक्षात शंका देखील उपस्थित करणें योग्य नाही हे प्रगृह्यसंज्ञाप्रकरणावरील–'ईदूदेद्द्विवचनं प्रगृह्यम्' सू. १.१.११ या सूत्रावरील–भाष्यात ध्वनित केले आहे असें एका वैयाकरणाचें म्हणणें आहे. (तें भाष्य बरेच विस्तृत आहे, पण प्रकृत विषय नीट ध्यानात येण्याकरिता त्याचा भैरवीत थोडक्यात साराश दिला आहे व तो असा–'तत्र हि अग्नी इत्याह इत्यत्र प्राक् प्रगृह्यसंज्ञाया तस्य स्थाने गुरोरनृत इति प्लुते, ईदूदेत् इति तपर-करणात् पुनः प्रगृह्यसंज्ञा प्रकृतिभावफलिका न प्राप्नोति, प्लुतसंज्ञाकृतस्य प्रकृतिभावस्य त्वप्रवृत्तिरप्लुतवदुपस्थित इत्यप्लुत-वद्भावस्य विधानात्, प्रगृह्यसंज्ञाविधायकसूत्रदृष्ट्या प्लुतस्यासिद्धत्वं तु न भवति, कार्यकालपक्षे प्रगृह्यसंज्ञाया प्लुतप्रगृह्येत्येतदेकवाक्य-तया स्वरसन्धिस्थलसंपरत्या सिद्धःप्लुतः स्वरसन्धिप्थित्यनेन सिद्धत्वस्य बोधनादित्याद्यङ्क्य यथोद्देशपक्षाश्रयणेन समाहितं, तेनास्य ध्वनित-त्वादित्यर्थः।' या भैरवीचा भावार्थ हा आहे की, 'अग्नी इत्याह' या उदाहरणात 'अग्नी' हे ईदन्त द्विवचन असल्यामुळें 'ईदूदेत्' सू. १०० या सापादिक सूत्रानें 'अग्नी' याला प्रथम प्रगृह्यसंज्ञा झाल्यावर नंतर 'गुरोरनृतः' सू. ९७ या त्रैपादिक सूत्रानें 'अग्नी' यातील अन्त्य ईकाराचे जागी प्लुत झाला असता, प्लुत त्रिमात्रिक व दीर्घ द्विमात्रिक असल्यामुळें आणि 'ईदूदेत्' या सूत्रात तपरकरण केलें असल्यामुळें, 'अग्नी' याची प्रगृह्यसंज्ञा कायम राहून नाही व त्यामुळें 'प्लुतप्रगृह्या अचि नित्यम्' सू. ९० या सूत्रानें प्रगृह्य-संज्ञेच्या निमित्तानें होणारा प्रकृतिभाव होऊ शकत नाही. तसेच प्लुतसंज्ञेच्या निमित्तानें त्या सूत्रानें होणारा प्रकृतिभाव देखील होऊ

शकत नाही, कारण 'अग्नी' या शब्दापुढें 'इति' हा अवैदिक शब्द असल्यामुळें, 'अप्लुतवदुपस्थिते' सू ९८ या सूत्रानें प्लुत अप्लुतासारखा होतो, म्हणजेच प्लुताच्या निमित्तानें होणारा प्रकृतिभाव होऊ शकत नाही 'ईदूदेत्' या सापादिक सूत्राने होणाऱ्या प्रगृह्यसंज्ञेच्या दृष्टीने 'गुरोरनृत' इत्यादि त्रैपादिक सूत्रानी होणारी प्लुतसंज्ञा 'पूर्वत्रासिद्धम्' या वचनान्वयें असिद्ध ठरत असल्यामुळें तो झालीच नाही असे मानल्यानें, वरील उदाहरणात प्रगृह्यसंज्ञेच्या निमित्तानें होणारा प्रकृतिभाव होऊ शकतो असे देखील म्हणता येत नाही, कारण 'प्लुतप्रगृह्या अचि नित्यम्' या प्रकृतिभावविधायक सूत्रात 'प्लुत' व 'प्रगृह्य' या दोहोंचेहि ग्रहण केले असल्यामुळें, प्रकृतिभाव करतेवेळी 'यदा कार्यं तदा संज्ञापरिभाषम्' या कार्यकालपक्षात प्लुतसंज्ञाविधायक व प्रगृह्यसंज्ञाविधायक सूत्रे 'प्लुतप्रगृह्य' या सूत्राच्या प्रदेशात उपस्थित होऊन व त्या सूत्राशी एकवाक्यतापन्न होऊन ती सर्व सूत्रें एकप्रदेशस्थ होत असल्यामुळें व अशा रीतीनें त्यांच्यातील पूर्वपरभाव नाहीसा होत असल्यामुळे, त्या कार्यकालपक्षात प्रगृह्यसंज्ञेच्या दृष्टीनें प्लुतसंज्ञा असिद्ध ठरत नाही व म्हणूनच 'सिद्ध प्लुत. स्वरसन्धिषु' असा सिद्धान्त मानला आहे सारांश कार्यकालपक्षाचा आश्रय केल्यास, प्रगृह्यसंज्ञेच्या दृष्टीनें प्लुतसंज्ञा असिद्ध ठरत नसल्यामुळे, वरील उदाहरणात प्रगृह्यसंज्ञेच्या निमित्तानें होणारा प्रकृतिभाव न होण्याची आपत्ति येते यावर भाष्यकार म्हणतात-- 'एवं तर्हि किं न एतेन कार्यकाल संज्ञापरिभाषमिति । यथोद्देशमेव संज्ञापरिभाषम् । तत्र चासावसिद्धस्तस्यासिद्धत्वात् तत्काला एव भवन्ति ।' या भाष्याचा आशय हा आहे की, जर कार्यकालपक्ष मानल्यानें दोष येतो तर त्या पक्षाचा आश्रय करण्याची गरज काय ? आम्ही यथोद्देशपक्षच मानू व त्या पक्षात प्रगृह्यसंज्ञेच्या दृष्टीनें प्लुत असिद्ध ठरेल आणि तो असिद्ध मानल्यानें, म्हणजे प्लुत झालाच नाही व दीर्घ कायमच आहे असे मानल्यानें, प्रगृह्यसंज्ञा

कायम राहून, प्रगृह्यसंज्ञेच्या निमित्तानें होणारा प्रकृतिभाव करण्यात काही अडचण येणार नाही. साराश व्याकरणशास्त्रात यथोद्देशपक्ष व कार्यकालपक्ष हे दोन्ही पक्ष सारखेच प्रमाणभूत मानले असल्यामुळें व काही कार्ये करतेवेळी यथोद्देशपक्षाचा आश्रय करावा व इतर कार्ये करतेवेळी कार्यकालपक्षाचा आश्रय करावा अशा तऱ्हेची दोन्ही पक्षाची, इष्टकार्यसिद्धी-करिता, भाष्यकारादिकानी व्यवस्था लावून दिली असल्यामुळें, ज्या पक्षाचा आश्रय केल्यानें इष्ट रूपाची सिद्धि होत असेल त्या पक्षाचा आश्रय करून त्या रूपाची सिद्धी करावी व दुसऱ्या पक्षाचा आश्रय केल्याने इष्ट रूपाची सिद्धि होऊ शकत नाही अशी शका देखील उपस्थित करणे अयोग्य आहे असे वरील भाष्यावरून ध्वनित होत असल्यामुळें, कार्यकालपक्षाचा आश्रय करून मनोरमेंत 'कार्यकालपक्षे प्रत्ययान्तत्वेन पर्युदासोऽस्तु' ही जी शका उपस्थित केली आहे व 'प्रत्ययलक्षणेनोक्तपर्युदासा-प्रवृत्तेः……ज्ञापितत्वात्' असे जें त्या शकेचे समाधान केले आहे ती दोन्ही व्यर्थ ठरतात; कारण यथोद्देशपक्षाचा आश्रय केल्यानें मनोरमेंत केलेली शका उपस्थितच होत नाही असे एका वैयाकरणाचे म्हणणे आहे. या पक्तीत त्या वैयाकरणाचा नामनिर्देश न करिता 'कश्चित्' हे अरुचिप्रदर्शक पद घातले असल्यामुळें, शब्दरत्नकाराना त्या वैयाकरणाचे म्हणणे मान्य नाही हे ध्वनित होते व याचे कारण भैरवीत 'अत्रारुचिबीज तु यथोद्देशपक्षे यद्यप्युक्तरीत्या निर्वाहः तथापि पक्षान्तरे सम्बुद्धिपदस्योक्तार्थज्ञापनपरत्व भाष्यकृदुक्त-मनुपपन्नमेवेति' असे दिले आहे) 'राजा' इत्यादि स्थली कृदन्तत्वा-मुळें ('न लोपः प्रातिपदिकान्तस्य' सू. २३६ या सूत्राची) प्रवृत्ति होऊ शकते हे म्हणणे बरोबर नाही, कारण 'कृत्तद्धितसमासाश्च' या उत्तर सूत्रात देखील (प्रकृत सूत्रातून) 'अप्रत्यय' हे पद अनुवृत्त होते. ('राजृ दीप्तौ' या धातूहून 'कनिन्युवृषि' उ. सू. १५८ या सूत्रानें औणादिक 'कनिन्=अन्' प्रत्यय होऊन 'राजन्' असा

जो औणादिक कृत्प्रत्ययान्त शब्द सिद्ध होतो त्याला 'कृत्तद्धित' या सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा होते. त्याहून प्रथमेच्या एकवचनाचा 'सु' प्रत्यय केला असता, 'सर्वनामस्थाने चासम्बुद्धौ' सू. २५० या सूत्रानें उपधा दीर्घ होऊन व 'हल्ङ्याब्भ्य' सू. २५२ या सूत्रानें 'सु' प्रत्ययाचा लोप होऊन 'राजान्' अशी स्थिति होते व जरी 'सु' प्रत्ययाचा लोप झाला आहे तरी 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' सू. २६२ या सूत्रानें त्याला पदसंज्ञा होते आणि प्रत्ययलक्षणानें 'सु' प्रत्यय कायमच आहे असे मानल्यानें 'अप्रत्यय.' या पर्युदासामुळें 'राजान्' याला कार्यकालपक्षात प्रकृत सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा जरी होऊ शकत नाही तरी, तो एकदेशविकृत शब्द 'राजन्' हा कृदन्त शब्दच आहे असे मानता येत असल्यामुळें, 'कृत्तद्धित' या सूत्रानें त्याला प्रातिपदिकसंज्ञक मानता येते व अशा रीतीनें 'राजान्' हे प्रातिपदिकसंज्ञक पद ठरत असल्यामुळें, 'न लोप. प्रातिपदिकान्तस्य' या सूत्रानें अन्त्य नकाराचा लोप होऊन 'राजा' असे इष्ट रूप कार्यकालपक्षात सिद्ध होण्यात काही अडचण येत नाही आणि म्हणून 'कथमन्यथा राजेत्यादौ नलोपः स्यात्' असे जें दीक्षितानी मनोरमेंत म्हटले आहे ते चूक ठरते असे शंकाकाराचे म्हणणे आहे. या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, 'कृत्तद्धित' या सूत्रात देखील प्रकृत सूत्रातून 'अप्रत्यय' या पदाची अनुवृत्ति होत असल्यामुळें, प्रत्ययलक्षण मानून 'अप्रत्ययः' या पर्युदासाची प्रवृत्ति केल्यानें 'राजान्' याला जशी प्रकृत सूत्रानें कार्यकालपक्षात प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकत नाही तशीच 'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रानें देखील त्याला ती संज्ञा होऊ शकत नाही; कारण वर सांगितल्याप्रमाणे त्या सूत्रात 'अप्रत्यय' हे पद अनुवृत्त होत असल्यामुळें, त्या सूत्राचा 'अप्रत्ययान्त यत् कृदन्त तद्धितान्त च तत् प्रातिपदिकसंज्ञं स्यात्' असा अर्थ होतो व ज्या 'सु' प्रत्ययाचा लोप झाला आहे तो प्रत्यय प्रत्ययलक्षणानें कायम आहे असे मानल्यास, 'राजान्' हा कृदन्त शब्द विभक्तिप्रत्ययान्त ठरत असल्यामुळें,

'अप्रत्ययः' या पर्युदासाच्या बळानें त्याला 'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रानें देखील प्रातिपदिकसंज्ञा होऊं शकत नाहीं व त्यामुळें 'राजान्' हें पद प्रातिपदिकसंज्ञक ठरत नसल्यामुळें, त्यातील अन्त्य नकाराचा लोप न होण्याची व 'राजा' असें इष्ट रूप सिद्ध न होण्याची आपत्ति येते. 'प्रत्ययलक्षणेनोक्तपर्युदासाप्रवृत्तेः...... ज्ञापितत्वात्' असें जें दीक्षितांनी मनोरमेंत म्हटलें आहे तें बरोबर मानल्यानेंच, वरील आपत्ति टाळता येऊं शकते. सारांश प्रत्ययलक्षणानें प्रत्ययान्त मानून 'अप्रत्ययः' या पर्युदासाची प्रवृत्ति करणें व त्या योगानें प्रातिपदिकसंज्ञा होणें बंद करणें योग्य नाहीं.) असें असल्यामुळेंच, म्हणजे 'कृत्तद्धित' या सूत्रांत प्रकृत सूत्रांतून 'अप्रत्ययः' या पदाची अनुवृत्ति होत असल्यामुळेंच, 'दाक्षी, दिदृक्षू' इत्यादि स्थलीं परादिवद्भावानें 'सुप्' चा लुक् होत नाहीं. ('दक्षस्य अपत्यं पुमान् दाक्षिः' या स्थलीं 'दक्ष' या अदन्त प्रातिपदिकाहून 'अत इञ्' सू. १०९५ या सूत्रानें अपत्यार्थक 'इञ्' प्रत्यय होऊन व 'तद्धितेष्वचामादेः' सू. १०७५ या सूत्रानें आद्य अचाची वृद्धि होऊन आणि 'यस्येति च' सू. ३११ या सूत्रानें 'दक्ष' यातील अन्त्य अकाराचा लोप होऊन 'दाक्षि' असें तद्धितान्त रूप सिद्ध होतें. तसेंच 'द्रष्टुमिच्छुः दिदृक्षुः' या स्थलीं 'सन्' प्रत्ययान्त 'दृश्' धातूहून 'सनाशंसभिक्ष उः' सू. ३१४८ या सूत्रानें 'उ' हा कृत्प्रत्यय होऊन 'दिदृक्षु' असें कृदन्त रूप सिद्ध होतें. 'कृत्तद्धितसमासाश्च' सू. १७९ या सूत्रान्वयें हे वरील दोन्हां शब्द प्रातिपदिकसंज्ञक ठरतात. या शब्दांहून प्रथमेच्या द्विवचनाचा 'औ' प्रत्यय केला असता, 'प्रथमयोः पूर्वसवर्णः' सू. १६४ या सूत्रानें पूर्वसवर्णदीर्घरूप एकादेश होऊन 'दाक्षी, दिदृक्षू' अशीं प्रथमेच्या द्विवचनाचीं रूपें सिद्ध होतात. 'दाक्षि + औ = दाक्षी, दिदृक्षु + औ = दिदृक्षू' या स्थलीं 'अन्तादिवच्च' सू ७५ या सूत्रान्वयें 'ई' व 'ऊ' हे एकादेश परादिवद्भावानें 'औ' प्रत्ययच आहेत असा बुद्धि केल्यास, 'दाक्षी' व 'दिदृक्षू' हे शब्द विभक्तिप्रत्ययान्त,

म्हणजे 'ओ' प्रत्ययान्त, ठरतात व 'कृत्तद्धित' या सूत्रात प्रकृत सूत्रातून 'अप्रत्ययः' या पदाची अनुवृत्ति होत असल्यामुळें, त्या कृत्तद्धितान्त शब्दांना, ते विभक्तिप्रत्ययान्त ठरत असल्यामुळें, प्रातिपदिकसंज्ञा होत नाही व त्यामुळें 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू. ६५० हे सूत्र प्रवृत्त होऊ शकत नाही व विभक्ति-प्रत्ययाचा लुक् होण्याची आपत्ति टळते. 'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रात प्रकृत सूत्रातून 'अप्रत्ययः' या पदाची अनुवृत्ति होत नाही असे मानल्यास, 'दाक्षी' व 'दिदृक्षू' हे शब्द विभक्तिप्रत्ययान्त असून देखील पूर्वान्तवद्भावानें प्रातिपदिकसंज्ञक ठरून व त्याहून झालेला विभक्तिप्रत्यय प्रातिपदिकावयव ठरून 'सुपो धातुप्रातिप-दिकयोः' या सूत्रानें त्या विभक्तिप्रत्ययाचा लुक् होण्याची आपत्ति येते. ती आपत्ति टाळण्याकरिता 'कृत्तद्धित' या सूत्रांत 'अप्रत्ययः' या पदाची अनुवृत्ति मानणे आवश्यक आहे व तशी अनुवृत्ति होत असल्यामुळें, त्या सूत्राचा असा अर्थ निष्पन्न होतो की, कृदन्त व तद्धितान्त शब्द जरी प्रातिपदिकसंज्ञक होतात तरी त्याहून विभक्तिप्रत्यय केला असता, तशा विभक्तिप्रत्ययान्त कृत्तद्धितान्त शब्दांना प्रातिपदिकसंज्ञा होत नाही ) जेथें 'सुप्' चा, म्हणजे प्रातिपदिकाहून होणाऱ्या विभक्तिप्रत्ययाचा, लोप झाला आहे तेथें 'अप्रत्ययः' या पर्युदासाची प्रवृत्ति करता येत नाही एवढ्याचेच 'न ङिसम्बुद्ध्योः' सू. ३५२ हें सूत्र ज्ञापक आहे ( व 'अहन्' इत्यादि स्थली जेथें धातूहून होणाऱ्या प्रत्ययाचा लोप झाला आहे तेथें ते ज्ञापक लागू पडत नाही ) हे मानणे बरोबर नाही, कारण 'असति बाधके प्रमाणानां सामान्ये पक्षपातः', म्हणजे काहीं बाधक नसल्यास ज्ञापक विशेषापेक्ष न ठरता सामान्यापेक्ष ठरतें, हे देखील (प्रकृत सूत्रातील 'अधातुः' या पदाच्या ग्रहणानें) ज्ञापित होतें. असे न मानल्यास, म्हणजे 'न ङिसम्बुद्ध्योः' हे सूत्र सामान्या-पेक्ष ज्ञापक न मानता विशेषापेक्ष ज्ञापक मानलें तर, त्या सूत्रात 'ङि' प्रत्यय व सम्बुद्धिप्रत्यय या दोहोंचाच निर्देश केला असल्या-

मुळें, तें सूत्र त्या दोन प्रत्ययापुरतेंच ज्ञापक ठरेल (व जेथें त्या दोन प्रत्ययाचा लोप झाला आहे तशाच ठिकाणीं 'अप्रत्ययः' या पर्युदासाची प्रत्ययलक्षणानें प्रवृत्ति करता येऊं शकत नाहीं असे मानावे लागेल) व त्यामुळें 'राजपुरुष' हें रूप सिद्ध होऊं शकणार नाहीं. ('न ङिसम्बुद्धयोः' सू. ३५२ या सूत्रांत प्रातिपदिकाहून होणाऱ्या 'ङि' व 'सम्बुद्धि' या दोन प्रत्ययाचें ग्रहण केलें असल्यामुळें, प्रातिपदिकाहून होणाऱ्या 'स्वौजम्' सू. १८३ इत्यादि विभक्ति प्रत्ययाचा जेथें लोप झाला असेल तशाच ठिकाणीं प्रत्ययलक्षणानें प्रकृत सूत्रांतील 'अप्रत्यय.' या पर्युदासाची प्रवृत्ति करता येत नाही एवढ्याचपुरतें तें सूत्र, 'तुल्यजातीयस्य ज्ञापकम्' या भाष्यवचनान्वयें, ज्ञापक मानता येतें, कारण त्या सूत्रांत ज्या दोन प्रत्ययाचें ग्रहण केलें आहे त्याच्या जातीचे प्रातिपदिकाहून होणारे 'सु' इत्यादि विभक्तिप्रत्ययच आहेत. धातूहून होणारे तिबादि प्रत्यय त्याच्या जातीचे नसून भिन्न जातीचे आहेत. म्हणून तिबादि प्रत्ययाचा लोप झाला असता, प्रत्ययलक्षणानें 'अप्रत्यय' या पर्युदासाची प्रवृत्ति करता येत नाही याचें वरील सूत्र ज्ञापक मानता येत नाही. 'अहन्' या स्थलीं धातूहून होणाऱ्या 'तिप्' प्रत्ययाचा—'इतश्च' सू २२०७ या सूत्रानें 'तिप् = ति' या प्रत्ययातील इकाराचा लोप होऊन अवशिष्ट राहिलेल्या 'त्' या अपृक्त प्रत्ययाचा 'हल्ङ्याब्भ्यः' सू. २५२ या सूत्रानें—लोप झाला असल्यामुळें, तो लुप्त प्रत्यय प्रत्ययलक्षणानें विद्यमान आहे असें मानून 'अप्रत्ययः' या पर्युदासाची प्रवृत्ति करण्यांत वरील विशेषापेक्षा ज्ञापक आड येत नाहीं प्रत्ययलक्षण मानून तो पर्युदास प्रवृत्त केल्यानें 'अहन्' हा शब्द प्रत्ययान्त ठरत असल्यामुळें, त्याला प्रातिपदिकसंज्ञा होऊं शकत नाही व अशा रीतीनें 'अहन्' हें प्रातिपदिकसंज्ञक पद मानता येत नसल्यामुळें, 'न लोप. प्रातिपदिकान्तस्य' सू. २३६ हें सूत्र प्रवृत्त होऊं शकत नाहीं व 'अहन्' यातील अन्त्य नकाराचा लोप होण्याची आपत्ति मुळींच येत नाही. म्हणून 'अधातु इति किम् ?

अहन् नलोपो मा भूत्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे ते चूक ठरते असे शंकाकाराचे म्हणणे आहे या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, प्रकृत सूत्रात 'अधातु' या पदाचे ग्रहण केले असल्यामुळें त्यावरून हे ज्ञापित होते की, वरील ज्ञापक विशेषापेक्ष नसून सामान्यापेक्ष आहे–म्हणजे 'सु' इत्यादि विभक्तिप्रत्ययाचा लोप झाला असता प्रत्ययलक्षणानें 'अप्रत्यय' या पर्युदासाची प्रवृत्ति करता येत नाही एवढ्याचपुरतें वरील सूत्र विशेषापेक्ष ज्ञापक नसून 'सुप्' प्रत्ययाचा किंवा 'तिङ्' प्रत्ययाचा लोप झाला असला तरी प्रत्ययलक्षण मानून 'अप्रत्यय' या पर्युदासाची प्रवृत्ति करता येत नाही व प्रातिपदिकसंज्ञा होणे बंद करता येत नाही याचे ते सूत्र सामान्यापेक्ष ज्ञापक आहे तसे न मानल्यास, प्रकृत सूत्रातील 'अधातु' या पदाचे ग्रहण व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते, कारण धातूला प्रातिपदिकसंज्ञा झाली तरी त्याहून सुबुत्पत्ति होऊ शकत नाही व गमकाचा अभाव असल्यामुळें एकवचनाचा औत्सर्गिक प्रत्यय देखील होऊ शकत नाही हे पूर्वी सिद्ध केलेच आहे नलोप होण्याची आपत्तीच काय ती शिल्लक राहते ती आपत्ति देखील प्रत्ययलक्षणानें 'अप्रत्यय' या पर्युदासाची प्रवृत्ति करून प्रातिपदिकसंज्ञा होऊ न दिल्यानें जर सहज टाळता येऊ शकते तर मग प्रकृत सूत्रात 'अधातु' या पदाचे ग्रहण का केले आहे? ते व्यर्थ न ठरावे याकरिता वरील ज्ञापक सामान्यापेक्ष आहे असे मानणे आवश्यक आहे जर वरील ज्ञापक शंकाकाराच्या म्हणण्याप्रमाणे विशेषापेक्षच ज्ञापक मानणे योग्य आहे असे मानले तर त्या ज्ञापकसूत्रात 'ङि' प्रत्यय व सम्बुद्धीचा प्रत्यय या दोनच प्रत्ययांचा निर्देश केला असल्यामुळें, तेवढ्या दोनच प्रत्ययांपुरते ते सूत्र वास्तविक ज्ञापक मानावे लागेल व इतर 'सुप्' प्रत्ययाच्या विषयात ते सूत्र ज्ञापक मानता येऊ शकणार नाही आणि त्यामुळें 'राज्ञ पुरुष राजपुरुष = राजन् ङस् पुरुष सु' या स्थली 'सुपो धातुप्रातिपदिकयो' या सूत्रानें 'ङि' प्रत्ययाचा किंवा सम्बुद्धीच्या प्रत्ययाचा लुक् होत

नसून 'ङस्' प्रत्ययाचा लुक् होत असल्यामुळें, प्रत्ययलक्षण मानून 'अप्रत्ययः' या पर्युदासाची प्रवृत्ति केल्यास, 'राजन्' हा शब्द प्रत्ययलक्षणानें प्रत्ययान्त ठरून प्रातिपदिकसंज्ञक होणार नाही व त्यामुळें 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' हे सूत्र येथें प्रवृत्त होऊं शकणार नाही व 'राजन्' यातील अन्त्य नकाराचा लोप न होण्याची आपत्ति येईल. ती आपत्ति टाळण्याकरिता शंकाकाराला देखील वरील ज्ञापक सर्व 'सुप्' प्रत्ययांना लागू पडणारें सामान्या-पेक्ष ज्ञापक आहे असें मानणें भागच पडतें. सारांश शंकाकार व दीक्षित या दोहोंमध्यें एवढाच फरक आहे की, शंकाकार ज्ञापकाच्या कक्षेंत सर्व 'सुप्' प्रत्ययांचा समावेश करतो व दीक्षित त्याखेरीज 'तिङ्' प्रत्ययाचा देखील समावेश करतात, आणि त्याच्या तशा करण्याला प्रकृत सूत्रातील 'अधातुः' हा निर्देश प्रमाण असल्यामुळें, त्याचें म्हणणें स्वीकारणेंच योग्य आहे. त्यामुळें 'अहन्' या स्थलीं ज्या 'त्' प्रत्ययाचा लोप झाला आहे तो 'त्' प्रत्यय कायम आहे असें, प्रातिपदिकसंज्ञा करतेवेळीं, प्रत्ययलक्षणानें मानतां येऊं शकत नसल्यामुळें, 'अहन्' हे प्रातिपदिकसंज्ञक पद ठरून त्यातील अन्त्य नकाराचा लोप होण्याची दीक्षितांनीं मनोरमेंत जी आपत्ति दर्शविली आहे ती अगदी योग्य ठरते असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा भावार्थ आहे.) 'सार्वधातुकमपित्' सू. १.२.४ या सूत्रावरील भाष्यांत हीच रीति स्वीकारली आहे, म्हणजे ज्ञापक सामान्यापेक्ष मानल्यास जर काही बाध येत असेल तरच तें विशेषापेक्ष ज्ञापक मानावें व काहीं बाध येत नसल्यास तें सामान्यापेक्ष ज्ञापक मानणेंच उचित आहे असें त्या भाष्यावरून सिद्ध होतें. प्रकृत सूत्रावरील भाष्यांत देखील हेंच स्पष्टपणें सांगितलें आहे, म्हणजे प्रत्ययलक्षण मानून 'अप्रत्ययः' या पर्युदासाची प्रवृत्ति करतां येत नाही याचें 'न ङिसम्बुद्ध्योः' हें सूत्र ज्ञापक आहे, असें भाष्यकारांनी स्पष्ट म्हटलें आहे. ('सार्वधातुकमपित्' या सूत्रावरील भाष्यांत भाष्य-कारांनी असा प्रश्न केला आहे कीं, त्या सूत्रांत 'सार्वधातुकम्' हें

पद का घातले आहे व त्या प्रश्नाचे असे उत्तर दिले आहे की, जर 'अपित्', म्हणजे पित्‌भिन्न प्रत्यय ङित् होतो, एवढेच सूत्र केले असते तर पित्‌भिन्न आर्धधातुकप्रत्यय ङित् झाला असता व त्यामुळें 'कर्ता, हर्ता' इत्यादि स्थली जो 'तृच्' प्रत्यय झाला आहे तो पित् नसल्यामुळें ङित् झाला असता आणि 'क्ङिति च' सू. २२१७ हें निषेधक सूत्र असल्यामुळें, 'सार्वधातुकार्धधातुकयो.' सू. २१६८ या सूत्रानें होणारा गुण झाला नसता व वरील इष्ट रूपें सिद्ध न होण्याची आपत्ति आली असती. पण पुढें भाष्यकार असे म्हणतात की, वर दर्शविलेली आपत्ति आली नसती, कारण पाणिनीनें कांही आर्धधातुकप्रत्ययाना इत्संज्ञक ङकार हा अनुबन्ध लावला असल्यामुळें हे सूचित होते की, पित्‌भिन्न आर्धधातुक प्रत्यय वरील सूत्रानें ङित् होत नाहीत पाणिनीनें ज्या आर्धधातुकप्रत्ययाना ङकारानुबन्ध लावला आहे ते 'चङ्, अङ्, नजिङ्, ङ्वनिप्, अथङ्, नङ्' हे प्रत्यय होत. ङित्करणरूप वर जें ज्ञापक दाखविले आहे ते सार्वधातुक-प्रत्ययानां देखील लागू पडेल असे कोणी म्हटल्यास, तें म्हणणे बरोबर नाही, कारण 'चङ्' वगैरे प्रत्ययाच्या जातीचे, म्हणजेच आर्धधातुक, जे प्रत्यय आहेत त्यानाच ते ज्ञापक लागू शकते. पण भाष्यकार पुढें म्हणतात कीं तसे मानल्यास, 'चङ्' व 'अङ्' हे दोन प्रत्यय लुङ् पुढें असताना मध्यें होणाऱ्या विकरणासबधाचेच ज्ञापक होतील, 'नजिङ्' प्रत्ययातील ङकार वर्तमानकालवाचक प्रत्ययाचाच व 'ङ्वनिप्' प्रत्ययातील ङकार भूतकालवाचक प्रत्ययाचाच ज्ञापक होईल, 'अथङ्' प्रत्ययातील ङकार उणादि प्रत्ययाच्या सबधानेंच ज्ञापक होईल व 'नङ्' प्रत्ययातील ङकार 'घञ्' प्रत्ययाच्या अर्थामध्यें होणाऱ्या प्रत्ययाचाच ज्ञापक होईल आणि त्यामुळें 'कर्ता, हर्ता' इत्यादि उदाहरणात जो 'तृच्' प्रत्यय झाला आहे त्याला वर दाखविलेल्या ज्ञापकापैकी कोणतेच ज्ञापक लागू पडत नसल्यामुळें तो 'तृच्' प्रत्यय ङित् होण्याची आपत्ति येईल आणि ती आपत्ति टाळण्याकरिता त्या सूत्रात 'सार्वधातुकम्'

हें पद असणे आवश्यक आहे. या भाष्याचा भावार्थ सांगताना भैरवी-कारानी 'एवं च यथा बाधकसत्वात् तत्र न सामान्यापेक्षत्वं किन्तु विशेषापेक्षत्वेन चारितार्थ्यमित्युक्तं तथा अत्रापि बाधकसत्वे विशेषापेक्षत्वं तदभावे तु सामान्यापेक्षत्वं भविष्यतीति तात्पर्यम्' असे म्हटले आहे व याचा अर्थ पूर्वी दिलाच आहे. प्रकृत सूत्रावरील भाष्यात 'सुब्लोपे च प्रत्ययलक्षणत्वात्' हें वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचे व्याख्यान करिताना भाष्यकार म्हणतात 'सुब्लोपे च प्रत्ययलक्षणेन प्रतिषेधः प्राप्नोति। राजा, तक्षा। प्रत्ययलक्षणेन प्रत्ययो नेति प्रतिषेध प्राप्नोति। नैष दोष. । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न प्रत्ययलक्षणेन प्रतिषेधो भवतीति यदय न ङिसम्बुद्धयोः इति प्रतिषेध शास्ति।' या भाष्यावरून हं स्पष्ट होतें की, प्रकृत सूत्रातील 'अप्रत्यय.' या पर्युदासाश्री प्रत्ययलक्षणानें प्रवृत्ति करता येत नाही).

शब्दरत्न–अत्र सुप्सिपोरिति। तयोः प्रातिपदिकत्वे तत्सामर्थ्यादौत्सर्गिकैकवचने तल्लक्षणापत्तिः। विभक्त्यर्थस्य लिङ्ग प्रति स्वरूपायोग्यत्वेन न नपुंसकत्वाश्रयोविभक्तिलुक्। तत्सत्त्वे तु पदादित्वेन पत्वनिषेधापत्तिर्दोष इति भावः। तत्रैवेति। अत्राप्यौत्सर्गिकैकवचनापत्तिः, "सुपो धातु–" इति लुगापत्तिश्च, पचेरन्नित्यादौ नलोपापत्तिश्चेति भावः। स्यादेवेति। पूर्वं विभक्त्युत्पत्तये जातस्यातिदेशेन विभक्त्यन्ते बुद्धिरिति भावः। यथोद्देशेऽपीति। अपिना कार्यकालपक्षेऽपि। न हि तत्र पक्षे उपदेशेनैवैकवाक्यता नातिदेशेनेत्यत्र मानमस्ति, अतिदेशैकवाक्यतयैव ह्रस्वप्राप्ते' सुवचत्वात्। प्रातिपदिकग्रहणं चेति। नपुंसकवृत्तित्वस्य प्रातिपदिकधर्मत्वान्नपुंसके वर्तमानस्येत्यर्थेनैव प्रातिपदिकलाभे सिद्धे तस्य व्यर्थत्वादिति भावः। उक्तार्थे = विभक्त्येकादेशस्यान्तवत्त्वाभावे। सामान्यापेक्षमिति। अन्यथा ह्रस्व एव न स्यात्स्वाद्युत्पत्तिस्तु स्यादेवेति भावः। यद्यपीदं प्रातिपदिकग्रहणं सत्त्वप्रधानप्रातिपदिकग्रहणार्थम्, तेनात्र न ह्रस्वः, मूलोक्तार्थे ज्ञापिते चारितार्थ्यं दुर्निरूपं च। सख्याकर्माद्ययोगात्स्वाद्युत्पत्तिरपि न, औत्सर्गिकमेकवचनमपि न, गमकं विना तदनुत्पत्तेः।

"सुपो धातु–" इति लुगपि न, धातुसाहचर्येण सुप्तिङित रसमभिव्याहृतस्यैव तेन लुग्विधानात्। एव च प्रत्ययान्तपर्युदासो न कर्तव्य इति सूत्रशेषे भाष्ये ध्वनितम्। पचेरन्, सर्वस्मिन्नित्यादौ नकारोच्चारणसामर्थ्येन न नलोपः, तथाप्येतावत्क्लिष्टकल्पनापेक्षया लाघवात्प्रत्ययान्तपर्युदास एवोचित इति भाव. ।

'अप्रत्यय किम्? हरिपु, करोषि। अत्र सुप्सिपोर्मा भूत्' असे जे मनोरमेत म्हटले आहे त्याचा भावार्थ ह्या आहे की, (प्रकृत सूत्रातून 'अप्रत्यय' हे पद गाळल्यास, 'हरिपु, करोषि' या स्थली 'सु, सि' या प्रत्ययाना प्रातिपदिवसंज्ञा होईल व) त्याना ती संज्ञा झाल्यानें त्या संज्ञेच्या सामर्थ्यानें ('ङ्याप्प्रातिपदिकात्' या अधिकारसूत्रान्वयें) औत्सर्गिक एकवचनाचा प्रत्यय होऊन त्या प्रत्ययाचे श्रवण होण्याची आपत्ति येईल, म्हणजे त्या प्रत्ययाचा लुक् न होता तो प्रत्यय कायम राहील (जरी 'सु, सि' या प्रत्ययाहून औत्सर्गिक एकवचनाचा प्रत्यय झाला तरी, 'सामान्ये नपुसकम्' या वचनान्वयें 'सु, सि' हीं नपुसक प्रातिपदिके मानल्यानें 'स्वमोर्नपुसकात्' सू. ३१९ या सूत्रानें त्या प्रत्ययाचा लुक् होईलच व त्यामुळे त्या प्रत्ययाचे श्रवण होण्याची जी वर आपत्ति दर्शविली आहे ती बरोबर नाहीं असे कोणी म्हटल्यास, त्या शकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की) विभक्ति प्रत्ययाच्या अर्थामध्यें लिङ्गबोध करून देण्याचे सामर्थ्य नसल्यामुळें (व तसे सामर्थ्य प्रत्ययभिन्न अर्थवान् प्रातिपदिकातच असल्यामुळें) 'स्वमोर्नपुसकात्' या सूत्राने नपुसकत्वाच्या आश्रयाने जो विभक्तिप्रत्ययाचा लुक् होणे सांगितले आहे तो लुक् (प्रत्ययाहून झालेल्या औत्सर्गिक एकवचनाच्या प्रत्ययाचा) होऊ शकणार नाही (प्रकृत सूत्रावरील भाष्याच्या अखेरीस भाष्यकार म्हणतात–'कस्य च नपुसक गुण· ? । प्रातिपदिकस्य' व तसेच 'ह्स्वो नपुसके प्रातिपदिकस्य' १·२ ४७ या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तीत कैयटानें देखील 'नपुसकलिङ्ग द्रव्यस्यैव सम्भवति। द्रव्यवाचित्व च प्रातिपदिकस्यैव, न तु सुबन्तस्य, शक्तिप्रधानत्वात्,

नापि तिङन्तस्य, क्रियाप्रधानत्वात्' असें म्हटलें आहे यावरून हें स्पष्ट होतें की, विभक्तिप्रत्ययांत लिङ्गबोधन करण्याचें सामर्थ्य नसून तें प्रातिपदिकांतच असतें म्हणून विभक्तिप्रत्ययांहून औत्सर्गिक एकवचनाचा प्रत्यय केला असता, तो प्रत्यय नपुंसकलिङ्गबोधक प्रातिपदिकाहून झाला नसल्यामुळें, त्याचे ठिकाणीं 'स्वमोर्नपुंसकात्' या सूत्राची प्रवृत्ति होऊं शकत नाहीं व त्या प्रत्ययाचा लुक् होऊं शकत नाहीं ) जर 'सु, सि' हे प्रत्यय नपुंसकलिङ्गाचे बोधक प्रातिपदिक आहेत असें मानलें तर (व त्यांहून झालेल्या औत्सर्गिक एकवचनाच्या प्रत्ययाचा लुक् केला तर 'सु, सि' यांना प्रत्ययलक्षणानें पदसंज्ञा होईल व त्यांत) सकार हा आद्य वर्ण असल्यामुळें, 'सात्पदाद्योः' सू २१२३ या निषेधान्वयें, त्या सकाराचें षत्व न होण्याची आपत्ति येईल असा दीक्षितांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे (या विषयाचें विवरण पूर्वी मनोरमेंत केलेंच आहे ) 'अप्रत्ययान्त किम् ? । तत्रैव विभक्तिविशिष्टस्यामी भूत्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे की, (प्रकृत सूत्रांत 'अप्रत्यय = अप्रत्ययान्त' हा पदच्छेद नसल्यास, 'हरिषु, करोषि' या प्रत्ययान्तांना प्रातिपदिकसंज्ञा होऊन) त्यांहून दरील औत्सर्गिक एकवचनाचा प्रत्यय होण्याची आपत्ति येईल व 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू ६५० या सूत्रानें ('सु, सि' या प्रातिपदिकावयव होणाऱ्या) विभक्तिप्रत्ययाचा लुक् होण्याची आपत्ति येईल, आणि त्याचप्रमाणें 'पचरन्' इत्यादि रूपांत अन्त्य नकाराचा लोप होण्याची आपत्ति येईल ('पचतः सर्वस्मिन्' इत्यादि शब्द जरी प्रत्ययान्त नाहींत तरी, प्रकृत सूत्रांत 'अप्रत्ययान्त' हा पदच्छेद नसल्यास, त्यांना प्रातिपदिकसंज्ञा होईल व त्यांहून एकवचनाचा औत्सर्गिक 'सु' प्रत्यय होईल आणि जरी त्या 'सु' प्रत्ययाचा 'हल्ङ्याब्भ्यः' सू २५२ या सूत्रानें लोप होईल तरी प्रत्ययलक्षणानें 'पचरन्, सर्वस्मिन्' हीं प्रातिपदिकसंज्ञक पदें ठरून 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' सू २३६ या सूत्रानें त्यांतील अन्त्य

नकाराचा लोप होण्याची आपत्ति येईल.) 'अन्तवद्भावेन काण्डे कुडये इत्यादौ प्रातिपदिकत्वं स्यादेव' असे जें मनोरमेंतील शकाग्रंथात म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, 'काण्डे, कुडये' इत्यादि स्थली विभक्तिप्रत्यय होण्यापूर्वी 'काण्ड, कुडय' याना विभक्तिप्रत्यय होण्यास कारणीभूत असलेली प्रातिपदिकसंज्ञा 'अन्तादिवच्च' सू ७५ या अतिदेशानें 'काण्डे, कुडये' या विभक्त्यन्त शब्दाचे ठिकाणी पूर्वान्तवद्भावानें होईल (व त्यामुळें 'ह्रस्वो नपुंसके प्रातिपदिकस्य' सू ३१८ या सूत्रानें त्या विभक्त्यन्त शब्दातील अन्त्य एकाराचा ह्रस्व-इकार-होण्याची आपत्ति येईल या विषयाचें विवेचन मनोरमेंत केलेंच आहे ) 'यथोद्देशेऽपि' या मनोरमेंतील पक्तीत 'अपि' हा शब्द घातला असल्यामुळें, ('विभक्त्येकादेशो नान्तवत्' हा जो परिहार यथोद्देशपक्षात सांगितला आहे) तो कार्यकालपक्षात देखील लागू पडतो कार्यकालपक्षात संज्ञासूत्र विधिसूत्राशीच एकवाक्यतापन्न होते व अतिदेशविधायक-सूत्राशी एकवाक्यतापन्न होत नाही असे म्हणण्यास काहीच प्रमाण नाही वास्तविक प्रातिपदिकसंज्ञाविधायक प्रकृत सूत्र 'अन्तादिवच्च' या अतिदेशविधायक सूत्राशी एकवाक्यतापन्न झाल्यानेंच 'काण्डे, कुडये' या स्थलीं ह्रस्वाची प्राप्ति होते असे म्हणता येऊ शकते (दीक्षिताच्या मते 'काण्डे, कुडये' याना कार्यकालपक्षात 'अप्रत्ययान्त' या पर्युदासाच्या बळानें प्रातिपदिकसंज्ञा होत नाही पण शब्दरत्नकार असे म्हणतात की, त्या पक्षात देखील 'अन्तादिवच्च' सू ७५ या सूत्राशी प्रातिपदिकसंज्ञाविधायक प्रकृत सूत्र एकवाक्यतापन्न झाल्यानें पूर्वान्तवद्भावानें 'काण्डे, कुडये' याना प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति येते व 'विभक्त्येकादेशो नान्तवत्' हा सिद्धान्त असल्यामुळेंच ती आपत्ति टळते म्हणून तो सिद्धान्त दोन्ही पक्षात सारखाच लागू करणे उचित आहे ) 'ह्रस्वो नपुंसके इति सूत्रे प्रातिपदिकग्रहणं वा उक्तार्थे सामान्यापेक्षं ज्ञापकमस्तु' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, नपुंसकत्व

हा प्रातिपदिकाचे ठिकाणी राहणारा धर्म असल्यामुळें ('ह्रस्वो नपुंसके' एवढेंच सूत्र केले असते तरी त्या सूत्रातील 'नपुंसके' या पदाचा) 'नपुंसकं वर्तमानस्य' असा अर्थ झालाच असता व त्या अर्थाच्या सामर्थ्यानेंच 'प्रातिपदिकस्य' या पदाचा आपोआपच लाभ–आक्षेप–झाला असता, आणि असे असून देखील पुन्हा त्या सूत्रात 'प्रातिपदिकस्य' या पदाचे जें ग्रहण केलें आहे ते व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. (तें प्रातिपदिकग्रहण व्यर्थ न ठरावे याकरिता हें मानणे आवश्यक आहे की, विभक्तिप्रत्ययाशी एकादेश झाला असता ज्याला पूर्वान्तवद्भावानें प्रातिपदिक मानता येत तथा एकादेशान्त प्रातिपदिकाचा अन्त्य दीर्घ अच् ह्रस्व न होता, जें मूळचे दीर्घ अजन्त प्रातिपदिक आहे त्याच प्रातिपदिकाच्या अन्त्य अचाचा त्या सूत्रानें ह्रस्व होऊ शकतो. असे मानले असता, 'काण्ड, कुड्य' हीं मूळचीं ह्रस्वान्त प्रातिपदिकें असून दीर्घान्त प्रातिपदिकें नसल्यामुळें, विभक्तिप्रत्ययाशी एकादेश झाल्यावर पूर्वान्तवद्भावानें 'काण्डे, कुड्ये' हीं प्रातिपदिकें मानता येऊं शकली तरी, तशा एकादेशानें दीर्घान्त झालेल्या व मूळच्या दीर्घान्त नसलेल्या प्रातिपदिकाचा अन्त्य दीर्घ अच् 'ह्रस्वो नपुंसके' सू. ३१८ या सूत्रानें ह्रस्व होऊ शकत नाही.) मनोरमेंतील वरील पक्तींत 'उत्तार्य' हा जो शब्द आहे त्याचा 'विभक्त्येकादेशस्यान्तवत्त्वाभावे,' म्हणजे 'विभक्त्येकादेश हा पूर्वाचा अन्तवत् होत नाही याचे,' असा अर्थ आहे. 'ह्रस्वो नपुंसके प्रातिपदिकस्य' या सूत्रातील 'प्रातिपदिकस्य' हें पद सामान्यापेक्ष ज्ञापक न मानता विशेषापेक्ष ज्ञापक मानल्यास, ('काण्डे, कुड्ये' या स्थलीं) केवळ ह्रस्वकार्य होणार नाही, परन्तु सुबुत्पत्ति होण्याची आपत्ति येईलच असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. (वरील ज्ञापक विशेषापेक्ष मानल्यानें 'ह्रस्वो नपुंसके प्रातिपदिकस्य' या सूत्रात ज्या ह्रस्वकार्याचे विधान केले आहे तेवढ्याचपुरतें तें ज्ञापक ठरेल व 'ङ्याप्प्रातिपदिकात्' सू. १८२ या अधिकारसूत्रानें प्रातिपदिकाहून सुबुत्पत्ति होण्याचे जें विधान

केले आहे त्याला ते ज्ञापक लागू पडणार नाही- त्यामुळें 'काण्डे, कुडये' या स्थली जरी ऱ्हस्वकार्य होण्याची आपत्ति टळेल तरी सुबुत्पत्ति होण्याची आपत्ति कायम राहीलच. पण प्रातिपदिकाहून जी जी कार्ये होण्याची प्राप्ति आहे त्या सर्व कार्यांना लागू पडणारे तें सामान्यापेक्ष ज्ञापक आहे व ती कार्ये होऊ शकत नाहीत असे मानल्यानेंच सुबुत्पत्ति होण्याची आपत्ति टाळता येते.) 'ऱ्हस्वो नपुंसके प्रातिपदिकस्य' या सूत्रात 'प्रातिपदिकस्य' या पदाचे ग्रहण द्रव्यप्रधान प्रातिपदिकाचें ग्रहण व्हावे याकरिता केले आहे व त्यामुळे 'काण्डे, कुडये' या स्थली (विभक्तिप्रत्ययाचा अर्थ प्रधान व विशेष्य असून द्रव्यवाचक प्रातिपदिकाचा अर्थ अप्रधान व विशेषणरूप असल्यामुळें व अशा रीतीनें 'काण्डे, कुडये' या शब्दांनी द्रव्यप्रधान प्रातिपदिकाचें ग्रहण होत नसून विभक्त्यर्थप्रधान शब्दाचें ग्रहण होत असल्यामुळें) त्या सूत्रानें होणारे ऱ्हस्वकार्य होऊ शकत नाही आणि तसेच त्या सूत्रातील 'प्रातिपदिकस्य' या पदाचे ग्रहण मनोरमेंत सांगितल्याप्रमाणे 'विभक्त्येकादेशो नास्तवत्' या सिद्धान्ताचें ज्ञापक मानल्यास, ते पद 'स्वांशे चरितार्थ' ठरते असे म्हणता येणे अशक्य आहे तसेच 'काण्डे, कुडये' या विभक्त्यर्थप्रधान शब्दाचा संख्या, कारक इत्यादिकाशी योग होणे संभवत नसल्यामुळें त्याहून सुबुत्पत्ति देखील होऊ शकत नाही त्याचप्रमाणे औत्सर्गिक एकवचनाचा प्रत्यय देखील त्याहून होऊ शकत नाही, कारण काही तरी गमक–ज्ञापक–असल्याशिवाय तसा औत्सर्गिक प्रत्यय करता येत नाही (हे पूर्वी सांगितलेच आहे) तसेच 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू. ६५० या सूत्रानें 'सुप्' विभक्तिप्रत्ययाचा लुक् देखील होऊ शकत नाही; कारण त्या सूत्रात 'धातु' या पदाचें ग्रहण केलें असल्यामुळें त्या पदाच्या साहचर्यानें असा अर्थ निष्पन्न होतो की, 'सुप्, तिङ्' व तद्भिन्न प्रत्यय यांचे ज्या समुदायात एकत्र सहोच्चारण झाले आहे त्या समुदायातीलच 'सुप्' चा त्या सूत्रानें लुक् होऊ शकतो ('काण्ड, कुडय' ही द्रव्यप्रधान प्रातिपदिकें

असून त्यांनी 'काण्ड, कुड्य' या द्रव्यरूप अर्थाचा बोध होतो. त्याहून अधिकरणार्थप्रधान 'ङि = इ' हा सप्तमीच्या एकवचनाचा प्रत्यय केला असता, विभक्त्यर्थ प्रधान होऊन प्रातिपदिकार्थ अप्रधान–विभक्त्यर्थाचे विशेषण–होतो व 'काण्डे, कुड्ये' याचा 'काण्डरूपाधिकरणे, कुड्यरूपाधिकरणे' असा अर्थ होतो. या अर्थामध्ये अधिकरणरूप विभक्त्यर्थ प्रधान असून द्रव्यरूप प्रातिपदिकार्थ अप्रधान असल्यामुळें व 'ह्रस्वो नपुंसके' या सूत्रात प्रकृत सूत्रातून 'प्रातिपदिक' या शब्दाची अनुवृत्ति करता येत असून देखील त्या सूत्रात 'प्रातिपदिकस्य' या पदाचे जे मुद्दाम ग्रहण केले आहे ते द्रव्यप्रधानार्थबोधक नपुंसक प्रातिपदिकाचे ग्रहण व्हावे व तशाच प्रातिपदिकाला ह्रस्वकार्य व्हावे याकरिता केले असल्यामुळे, 'काण्डे, कुड्ये' ही जरी पूर्वान्तवद्भावानें प्रातिपदिकें मानली तरी, त्या विभक्त्यर्थप्रधान शब्दांना त्या सूत्रानें सांगितलेले ह्रस्वकार्य होऊ शकत नाही. त्यांना प्रातिपदिक मानल्यास त्याहून सुबुत्पत्ति होण्याची आपत्ति येईल असे म्हणणे असल्यास, तें म्हणणे देखील बरोबर नाही; कारण सख्याकारकबोधक प्रातिपदिकाहूनच सुबुत्पत्ति होऊ शकते व वरील विभक्त्यर्थप्रधान शब्दांचा सख्येंशी किंवा कारकाशी मुळीच योग संभवत नाही हें 'ह्रस्वो नपुंसके' १.२.४७ या सूत्रावरील भाष्यावरून स्पष्ट होतें. त्या सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात– 'तिबन्तं चापि किंचित् विभक्त्यर्थप्रधानं, किं चित् क्रियाप्रधानम् । काण्डे, कुड्ये इति विभक्त्यर्थप्रधानं, रमते ब्राह्मणकुलमिति क्रियाप्रधानम् । न चैतयोरर्थयोर्लिङ्गसङ्ख्याभ्यां योगोऽस्ति।' तसेच कांहीं गमक नसल्यामुळे 'काण्डे, कुड्ये' याहून पूर्वी सांगितल्याप्रमाणे एकवचनाचा औत्सर्गिक प्रत्यय देखील होऊ शकत नाही. आणखी असे की, 'सत्वप्रधानप्रातिपदिकग्रहणार्थं प्रातिपदिकग्रहणम्' असे मानले असतां, जसे 'ह्रस्वो नपुंसके प्रातिपदिकस्य' या सूत्रातील 'प्रातिपदिकस्य' या पदाचे ग्रहण स्वांशे चरितार्थ ठरते तसे ते पद 'विभक्त्यैकादेशो

नान्तवत्' या सिद्धान्ताचे सामान्यापेक्ष ज्ञापक मानल्यास, स्वांशे चरितार्थ ठरत नाही व स्वांशे चरितार्थ ठरणे हें ज्ञापकाचे एक लक्षण असल्यामुळें, ते पद वरील सिद्धान्ताचे ज्ञापक देखील मानता येत नाही. दुसरे असे की, 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' या सूत्रात 'धातु' या पदाचे ग्रहण केले असल्यामुळें त्या पदाच्या साहचर्याने साहचर्यन्यायान्वयें हे ज्ञापित होते की, 'धात्ववयवस्य यादृशस्य सुपो लुग्भवति तादृशस्यैव प्रातिपदिकावयवस्य सुपो लुग्भवति,' म्हणजे धात्ववयव असणाऱ्या ज्या प्रकारच्या 'सुप्' चा लुक् होतो तशाच प्रकारच्या प्रातिपदिकावयव असणाऱ्या 'सुप्' चा लुक् होतो. त्यामुळें त्या सूत्राचा असा अर्थ निष्पन्न होतो की, सुबन्त किंवा तिङन्त व सुप्‌तिङ्भिन्न प्रत्यय यांच्या समभिव्याहाराने — यांचे एकत्रीकरण होऊन — बनलेले जे प्रातिपदिक त्यातील अवयवरूप 'सुप्' चा — अन्तर्वर्ति सुबादिविभक्तिप्रत्ययाचा — लुक् होतो. या अर्थान्वयें 'राज्ञः पुरुषः = राजपुरुष = राजन् ङस् पुरुष सु' या स्थली जो दोन सुबन्तांचा समासरूप समुदाय 'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञक ठरतो त्यातील 'ङस्' व 'सु' या विभक्ति-प्रत्ययांचे सहोच्चारण असल्यामुळें, वरील सूत्रानें त्यांचा लुक् होतो, आणि तसेंच 'पुत्र अम् क्यच्' हा जो सुबन्ताचा व सुप्‌तिङ्भिन्न 'क्यच्' या कृत्प्रत्ययाचा समुदाय आहे तो 'सनाद्यन्ता धातवः' सू. २३०४ या सूत्रानें धातुसंज्ञक ठरत असल्यामुळें, त्या समुदायाचा अवयव जो 'अम्' हा विभक्तिप्रत्यय आहे, त्याचा 'क्यच्' प्रत्यया-सह उच्चार केला असल्यामुळें, त्याचा वरील सूत्रानें लुक् होऊन व 'क्यचि च' सू. २६५८ या सूत्रानें 'पुत्र' यातील अन्त्य अकाराचा ईकार होऊन 'पुत्रीय' असा क्यजन्त नामधातु सिद्ध होऊन त्याची 'आत्मनः पुत्रमिच्छति' या अर्थामध्यें 'पुत्रीयति' इत्यादि रूपें सिद्ध होतात. 'काण्डे, कुड्ये' या स्थली 'ङि = इ' हा एकच 'सुप्' असल्यामुळें व त्याचा इतर 'सुप्' किंवा 'तिङ्' किंवा तद्भिन्न प्रत्यया-यांसह समभिव्याहार–सहोच्चारण–नसल्यामुळें, त्या रूपांतील अन्त्य

तद्वयर्थमेवेति भावः । फलान्तरं तु नास्त्येव, औत्सर्गिकैकवचनस्येष्टसिद्धयर्थं क्वाचित्कत्वेन तदर्थस्य सङ्ख्याकर्माद्ययोगेन च सुबनापत्तेः । न च प्रत्ययान्तस्य प्रातिपदिकत्वे तदवयवसुपो लुगापत्तिः, विधिवैयर्थ्यापत्तेः । तस्माद्धातुसाहचर्याद्विभक्त्यतिरिक्तशब्दघटितप्रातिपदिकावयवस्यैव तेन लुगिति न दोषः ।' या उद्योतावरून हे स्पष्ट होते की, वरील भाष्यात भाष्यकारानी जे म्हटले आहे त्याचा वास्तविक हा आशय आहे की, प्रकृत सूत्रात प्रत्ययान्ताचा पर्युदास करण्याची काही गरज नाही, कारण तो पर्युदास न केल्यास ज्या आपत्ति येऊ पाहतात त्या सर्व आपत्तीचे इतर रीतीनें सहज निवारण करता येते पण प्रकृत सूत्रातून 'अप्रत्ययान्त' हा पर्युदास गाळल्यास 'पचेरन्, सर्वस्मिन्' इत्यादि प्रत्ययान्त नकारान्त पदाना प्रातिपदिकसंज्ञा होईल व ते शब्द प्रतिपदिकसंज्ञक पदें ठरून त्याच्या अन्त्य नकाराचा 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' सू २३६ या सूत्रानें लोप होण्याची आपत्ति येईल अशी कोणी शका घेतल्यास, त्या शकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात की,) 'पचेरन्, सर्वस्मिन्' इत्यादि स्थली नकारोच्चारणसामर्थ्यामुळें, नकाराचा लोप होण्याची आपत्ति येत नाही ('झस्य रन्' सू २२५६, 'ङसिङ्योस्मात्स्मिनौ' सू २१६ या दोन्ही सूत्रात प्रत्ययाच जागी होणारे आदेश मुद्दाम नकारान्त पठित केले असल्यामुळें, त्या आदेशातील अन्त्य नकाराचा 'न लोप' सू. २३६ या सूत्रानें लोप करता येत नाही. नकाराचा लोप होणे इष्ट असते तर पाणिनीनें ते आदेश नकारान्त पठित न करिता नकाररहित पठित केले असते. सारांश प्रकृत सूत्रात 'अप्रत्ययः = अप्रत्ययान्तः' असा प्रत्ययान्ताचा पर्युदास न केल्यास दीक्षितानी मनोरमेंत ज्या आपत्ति दाखविल्या आहेत त्या सर्व आपत्तीचे निवारण 'यद्यपीद प्रातिपदिकग्रहण न नलोप' या शब्दरत्नातील पङ्क्तीत शब्दरत्नकारानी केले आहे तरी पण शब्दरत्नकार पुढें असें म्हणतात की, अशा रीतीनें दीक्षितानी दर्शविलेल्या आपत्तीचे निवारण करता येऊ शकत

असल्यामुळें प्रत्ययान्ताचा पर्युदास करणे जरी अनावश्यक ठरलें) तरी, अनेक क्लिष्ट कल्पना करून प्रत्ययान्ताचा पर्युदास करणे आवश्यक नाहीं असें मानण्यापेक्षा (प्रत्ययान्ताचा पर्युदास केल्यानें कोणतीहि क्लिष्ट कल्पना करावी लागत नसल्यामुळें व अशा रीतीनें तसा) पर्युदास करण्यातच लाघव असल्यामुळें, तसा पर्युदास करणे उचित आहे असा दीक्षितांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे

शब्दरत्न—अतद्भावादिति। यस्माद्विहितस्तदादित्वस्य शास्त्रीयत्वेन व्यपदेशिवद्भावालभ्यत्वादिति भावः। निषेधादिति। यद्यपि व्यपदेशिवद्भावेन कार्यत्वादेरिवास्याप्यशास्त्रीयस्यातिदेशेन लाभसम्भव, अतएव अवतोत्यादौ अवते शब्दनिरूपिताङ्गत्वसिद्धि, व्यतिसे इत्यादौ से इत्यस्य पदत्वसिद्धिश्च, हरित्यादौ कार्यकालपक्षे तद्धितान्तत्व-निबन्धनप्रातिपदिकत्वसिद्धिश्च, यूनापत्ये तत इञन्तत्वनिबन्धनफक्-सिद्धिश्च। तथाप्यसहाय एव व्यपदेशिवद्भावो न तु ससहाये, सनेतरावयवे तत्प्रवृत्ति। स्पष्टा चेयं रीति "आदेच उपदेश" इत्यत्र कैयटे। अत एव सभासन्नयने व्यपदेशिवद्भावेनाकारस्य नादित्वं, हरिद्रापालादिविकारस्य नान्तत्वं, तथा सति वृद्धत्वप्रयुक्तश्छ, इवर्णान्तत्वप्रयुक्तोऽण्प्रत्ययश्च स्यात्। ततोऽत्र न किंचिदनुपपन्नम्। सा च लोकव्यवसिद्धा लोकेऽपि बहुपुत्रसत्त्वे नैकस्मिन् ज्येष्ठकनिष्ठादिव्यवहार, विजातीयकन्यादिसत्त्वे त्वेकस्मिन्नपि तथा व्यवहारो भवत्येवेति बोध्यम्। अत एव हरिष्वित्यादौ सो पदत्वं न। 'निबो चत्वार एकाच" इति भाष्ये त्वेकस्मिन्नित्यस्यापर्यालोचनमूलकदेश्युक्ति-रिति तात्पर्यम्। वस्तुतस्तु पर्युदासेनापायस्वे लक्ष्ये अपवदग्रहणस्य सूत्रेऽपि विभक्तावितरानपेक्षायाऽव्यबोधनाय्यमनुपपन्नमत आह—निबो चत्वार इतीति। तात्पर्यमिति। प्रत्ययपर्युदासान्नायं तन्मूलकम् इति भाव। एतनार्थविप्रतिपत्तिना साम्प्रदायिक—वस्तुतस्त्वित्यादिना। अत्र—सूत्रेऽपीति। अपिनोत्तरसूत्रसङ्ग्रह। तेन कम्पना इत्यादावपि, मूलरीत्यानुपपत्ति स्फुटमेव। ननु भवद्वचनापवत्त्वमलौकिकविग्रहवा-क्यस्यादर्शात्। तदा प्रत्ययस्य प्राप्तिरेव न, इति कथं प्रत्ययपर्युदास…

**व्यर्थः । ध्वनितं चेद प्रत्ययपर्युदासानुक्त्या भाष्ये । "सुप्तिङन्तम्-" इति सूत्रस्थभाष्यकैयटयोरप्यत्रैव तात्पर्यमिति बोध्यम् ।**

'केवलस्य च अतथात्वात्' असे जे मनोरमेत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, 'प्रत्ययग्रहणे यस्मात्स विहितस्तदादे:'— परि. २३—या परिभाषान्वयें प्राप्त होणारा तदादित्वधर्म अशास्त्रीय असल्यामुळें, तसा धर्म प्रत्ययाचे ठिकाणी व्यपदेशिवद्भावानें आणता येऊ शकत नाही। ('व्यपदेशिवदेकस्मिन्'—परि. ३०—या परिभाषान्वयें केवलाचे ठिकाणी—प्रकृतिरहित केवल प्रत्ययाचे ठिकाणी— शास्त्रीय धर्माचाच अतिदेश करता येतो. 'तदादित्व' हा शास्त्रीय धर्म नसून अशास्त्रीय धर्म असल्यामुळें, तशा अशास्त्रीय धर्माचा असहाय प्रत्ययाचे ठिकाणी अतिदेश करता येत नाही व केवळ प्रत्ययाला प्रत्ययान्त मानता येत नाही.) 'एकाच्त्व' हा अशास्त्रीय धर्म असून देखील ज्याप्रमाणें व्यपदेशिवद्भावानें त्याचा अतिदेश केल्यानें त्या धर्माची प्राप्ति होऊ शकते त्याचप्रमाणें 'तदादित्व' हा अशास्त्रीय धर्म असून देखील त्याचीहि अतिदेशानें प्राप्ति करून देता येणे शक्य आहे ('एकाच्' हा अन्यपदार्थप्रधान बहुव्रीहि असून त्याचा 'एकः अच् यस्मिन् वर्णसमुदाये' असा विग्रह होतो. या अर्थान्वयें ज्या वर्णसमुदायामध्यें, उदाहरणार्थ 'गम्, हन्' इत्यादि वर्णसमुदायामध्यें, एक अच् आहे त्याला 'एकाच्' असे म्हणता येते. पण 'इण् गतौ' या धातूत इतर कोणतेहि वर्ण नसून 'इ' हा एक अच् आहे तरी अशा 'इ'चे ठिकाणी व्यपदेशिवद्भावानें एकाच्त्व-रूप अशास्त्रीय धर्माचा अतिदेश करता येतो व त्याला 'एकाच्' असे म्हणता येते. तसें न केल्यास, त्या धातूचे 'एकाचो द्वे प्रथमस्य' सू. २१७५ या सूत्रानें होणारे द्विर्वचन होऊ शकणार नाही व 'इयाय' इत्यादि लिट्लकाराच्या इष्ट रूपाची सिद्धि होऊ शकणार नाही. सारांश 'व्यपदेशिवदेकस्मिन्' ही परिभाषा लौकिक, म्हणजेच अशास्त्रीय, व्यवहाराच्या आधारावर रचली असल्यामुळें, त्या परि-भाषान्वयें अशास्त्रीय धर्माचा देखील अतिदेश करता येतो; आणि,

असे आहे) म्हणूनच 'भवति' इत्यादि स्थलीं 'भू' याला 'शप्' प्रत्ययाचे अङ्ग मानता येते. (भू+शप्+ति=भो+अ+ति=भव्+अ+ति= भव+ति' या स्थली 'भू' नें सुरू होणारें 'भव' हें संपूर्ण शब्द–स्वरूप 'यस्मात्प्रत्ययविधिस्तदादि प्रत्ययेऽङ्गम्' सू. १९९ या सूत्रान्वयें 'तिप्' प्रत्ययाचें अङ्ग मानता येते. पण 'भू' हें शप्-प्रत्ययाचे अङ्ग कसे ठरावे ? 'भू' या स्थली 'भू' हा एकटाच आहे व त्यापुढें इतर वर्णसमुदाय नाही व 'यस्मात्पूर्वमास्ति परमस्ति' अशी 'आदि' शब्दाची व्याख्या असल्यामुळें, या व्याख्ये-प्रमाणे 'भू' ला वास्तविक अङ्गसंज्ञा प्राप्त होऊ नये तथापि 'व्यपदेशिवदेकस्मिन्' या परिभाषान्वयें 'भू' याला अङ्गसंज्ञा प्राप्त होते व ते 'शप्' प्रत्ययाचे अङ्ग मानण्यात काही अडचण येत नाही ) तसेच 'व्यतिसे' इत्यादि स्थली 'से' याला पदसंज्ञा होते. ('वि+अति+अस्+से' या स्थली 'तासस्त्योर्लोप' सू २१९१ या सूत्रानें 'अस्' धातूतील अन्त्य सकाराचा लोप होऊन व 'श्नसोरल्लोपः' सू. २४६९ या सूत्रानें त्या धातूतील अवशिष्ट अकाराचा लोप होऊन आणि अशा रीतीनें संपूर्ण 'अस्' धातु नाहीसा होऊन त्या धातूहून झालेला 'से' हा प्रत्ययच शिलक राहतो. त्या प्रत्ययाचे ठिकाणी प्रत्ययान्तत्वरूप वृद्धि करण्याकरिता व्यपदेशिवद्भाव करणे भाग आहे व व्यपदेशिवद्भाव केल्यानें 'से' हे प्रत्ययान्त ठरुन पद ठरते आणि 'सात्पदाद्योः' सू २१२३ हा निषेध असल्यामुळें, 'से' या पदातील आद्य सकाराचें 'आदेशप्रत्यययोः' सू. २१२ या सूत्रानें होणारें षत्व होत नाही. व्यपदेशिवद्भाव केला नसता तर, 'से' याला पदसंज्ञा झाली नसती आणि तो केवळ प्रत्यय ठरला असता आणि त्यामुळें 'आदेशप्रत्यययो.' सू. २१२ या सूत्रानें त्यातील सकाराचे षत्व होण्याची आपत्ति आली असती व 'व्यतिषे' असे अनिष्ट रूप झालें असते. ) तसेच 'इ:' इत्यादि स्थली 'इ' हा कार्यकालपक्षात तद्धितान्त मानला जात असल्यामुळें ('कृत्तद्धितसमासाश्च' सू १७९ या सूत्रानें) त्याला

प्रातिपदिकसंज्ञा होते व (तो शब्द 'इञ्' प्रत्ययान्त प्रातिपदिक ठरत असल्यामुळें 'यञिञोश्च' सू. ११०३ या सूत्राने ) 'युवापत्य' या अर्थामध्यें त्या इञन्त प्रातिपदिकाहून 'फक्' प्रत्यय होतो. ('अ' हा वर्ण 'विष्णु' या अर्थाचा वाचक आहे. 'अत इञ्' सू. १०९५ या सूत्राने अदन्त प्रातिपदिकाहून अपत्यार्थक 'इञ्' प्रत्यय होणे सांगितले आहे. 'यस्मात्पूर्वमस्ति परमास्ति सोऽन्तः' या व्याख्ये- प्रमाणे 'अ' हा वास्तविक अदन्त मानता येत नाही; कारण तो एकटाच असून त्यापूर्वी कोणताहि वर्ण नाही. तथापि व्यपदेशिवद्भा- वानें त्याला अदन्त मानता येत असल्यामुळें त्याहून 'इञ्' प्रत्यय करता येतो तो प्रत्यय केल्यावर 'अ + इञ् = अ + इ' अशी स्थिति झाली असता 'यचि भम्' सू. २३१ या सूत्रान्वयें 'अ' हे अङ्ग भसंज्ञक होत असून त्या पुढें अजादि तद्धित प्रत्यय येत असल्यामुळें, 'यस्येति च' सू. ३११ या सूत्रानें 'अ' या प्रकृतीचा लोप होऊन 'इञ् = इ' हा प्रत्ययच शिलक राहतो. हा जरी केवळ तद्धित प्रत्यय आहे तरी व्यपदेशिवद्भावानें त्याला तद्धितान्त मानता येते आणि त्यामुळेंच 'कृत्तद्धित' या सूत्रानें त्याला प्राति- पदिकसंज्ञा होऊन त्या इञ्प्रत्ययान्त प्रातिपदिकाहून 'फक्' प्रत्यय होतो. या शब्दरत्नातील पङ्क्तीत जो कार्यकालपक्षाचा मुद्दाम उल्लेख केला आहे व यथोद्देशपक्षाचा उल्लेख केला नाही त्याचे कारण हे की, यथोद्देशपक्षात 'अ + इञ्' अशा स्थितीतच हा 'इञ्' प्रत्ययान्त समुदाय तद्धितान्त ठरून त्याला जी प्रातिपदिकसंज्ञा होते ती 'अ' या प्रकृतीचा लोप झाल्यावर देखील अवशिष्ट राहिलेल्या 'इ' या प्रत्ययाचे ठिकाणी स्थानिवद्भावानें प्राप्त होते. पण कार्यकालपक्षात अवशिष्ट 'इ' ला प्रातिपदिक मानता येते किंवा नाही हे ठरविण्याचा जेव्हा प्रसंग येतो तेव्हा 'कृत्तद्धितसमासाश्च' या प्रातिपदिकसंज्ञाविधायक सूत्राची उपस्थिति होते व त्या सूत्रानें तद्धित प्रत्ययाला प्रातिपदिक- संज्ञा होणे सांगितले नसून तद्धितान्ताला प्रातिपदिकसंज्ञा होणे सांगितले असल्यामुळें आणि अवशिष्ट 'इ' हा वास्तविक तद्धित

प्रत्यय असून तद्धितान्त नसल्यामुळें, त्याचे ठिकाणी व्यपदेशिवद्भाव केल्याशिवाय त्याला कार्यकालपक्षात तद्धितान्त व प्रातिपदिकसंज्ञक मानता येऊ शकत नाही.) तथापि असहायाचेच – एकट्याचेच – ठिकाणी व्यपदेशिवद्भाव करता येतो; ससहायाचे ठिकाणी व्यपदेशिवद्भाव करता येत नाहीं. त्यामुळें जो (समुदायाचा अवयव असून समुदायातील इतर वर्णांसह अवस्थित आहे) तशा समुदायाच्या अवयवाचे ठिकाणी व्यपदेशिवद्भावाची प्रवृत्ति करता येत नाही. (म्हणून 'व्यतिसे' या स्थली 'से' हा प्रत्यय व त्याचप्रमाणें 'इ:' या स्थली 'ई' हा तद्धितप्रत्यय असहाय असल्यामुळें, त्याचे ठिकाणी व्यपदेशिवद्भाव करता येतो. परंतु 'हरिषु, करोषि' या स्थली 'सु, सि' हे प्रत्यय प्रकृतिप्रत्ययविशिष्ट समुदायाचे अवयव असून व त्यांना प्रकृतीचे सहाय असून ते असहाय नसल्यामुळें, त्याचे ठिकाणी व्यपदेशिवद्भाव करता येत नाही व त्याना प्रत्ययान्त मानता येत नाही.) 'आदेच उपदेशेऽशिति' सू. ६.१.४५ या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तीत कैयटानें हाच अर्थ स्पष्ट केला आहे. (त्या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी असा प्रश्न केला आहे की, त्या सूत्रातील 'एच उपदेशे' या पदानी धातुपाठात जो 'एच्' आहे त्याचे ग्रहण करावे किंवा जो एजन्त आहे त्याचे ग्रहण करावे. केवळ एचाचे ग्रहण केल्यास 'ढौक्, त्रौक्' या धातूपुढें 'तृच्' हा अशित् प्रत्यय आला असता, 'ढौ, त्रौ' यातील 'औ' चे जागी आत्कार होण्याची आपत्ति येईल; पण 'एच्' याचा 'एजन्त' असा अर्थ केल्यास ती आपत्ति टळते, कारण वरील दोन्ही धातु धातुपाठात औकारान्त पठित नसून ककारान्त पठित आहेत. पण 'एच्' याचा एजन्त असा अर्थ केला तरी 'ढौक्, त्रौक्' या धातूतील 'ढौ, त्रौ' हे एजन्त आहेत अशी व्यपदेशिवद्भावानें बुद्धि करता येते व तशी बुद्धि केल्यास, त्याचे आत्व होण्याची आपत्ति येतेच. यावर भाष्यकार 'अर्थवता व्यपदेशिवद्भाव:,' म्हणजे जो अर्थवान् आहे त्याचेच ठिकाणी व्यपदेशिवद्भाव करता येतो, असे उत्तर देतात आणि 'ढौक्, त्रौक्'

तो ससहाय आहे ) 'निजो चत्वार एकाचः' असे जें भाष्यात म्हटले आहे ते ('व्यपदेशिवदेकस्मिन्' या परिभाषेतील) 'एकस्मिन्' या पदाच्या अर्थाचा विचार न करिता म्हटले असल्यामुळें, ते भाष्य एकदेशीची उक्ति आहे असे (प्रत्ययान्ताचा जसा पर्युदास करणे आवश्यक आहे तसाच प्रत्ययाचा देखील पर्युदास करणे आवश्यक आहे हे मानणाऱ्या दीक्षिताच्या म्हणण्याचे) तात्पर्य आहे ('एकाचो द्वे प्रथमस्य' ६ १ १ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी 'नेनिजतीत्यत्र निज्शब्दोऽप्येकाच्, इज्शब्दोऽप्येकाच्, इकारोऽप्येकाच् निराद्योपि,' म्हणजे 'निज्' धातूत 'निज्, इज्, इ, नि' असे चार एकाच् आहेत, असे म्हटले असल्यामुळें, शकाकार अशी शका करतो की, 'निज्' धातूतील इकार हा 'निज्' या समुदायाचा अवयव असून देखील तथा ससहाय इकाराला ज्याअर्थी भाष्यकारानी एकाच् मानले आहे त्याअर्थी ससहायाचे ठिकाणी व्यपदेशिवद्भाव करता येत नाही हे म्हणणे भाष्यविरुद्ध ठरते या शकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, ज्या भाष्याच्या आधारावर वरील शका उपस्थित केली आहे ते सिद्धान्तभाष्य नसून एकदेशिभाष्य आहे 'यद्यपि व्यपदेशिवद्भावेनैकाच्त्वादेरिव एकदेश्युक्तिरिति तात्पर्यम्' या शब्दरत्नातील ग्रन्थात 'व्यपदेशिवदेकस्मिन्' या परिभाषेचे व्याख्यान केले आहे शब्दरत्नातील या सर्व पक्ति परिभाषेन्दुशेखरात आढळतात व परिभाषेन्दुशेखराच्या मराठी भाषान्तरात या परिभाषेचे जें विस्तृत विवरण केले आहे ते वाचल्यास, शब्दरत्नातील वरील ग्रन्थ उत्तम रीतीनें ध्यानात येईल ) वास्तविक पाहता 'अधातु, अप्रत्यय' या पर्युदासाच्या सामर्थ्यानेंच 'अर्थवत्' याचा लाभ होत असून=देखील, म्हणजे अर्थवान् शब्दाला प्रातिपदिकसज्ञा होते असा अर्थ निष्पन्न होत असून देखील, प्रकृत सूत्रात 'अर्थवत्' या पदाचे ग्रहण केले असल्यामुळें, या सूत्रात असलेल्या 'अर्थवत्' या पदानें देखील, 'अर्थबोध करून देण्याकरिता विभक्तिप्रत्यय खेरीज करून इतर कशाचीहि अपेक्षा नसणे' अशा प्रकारच्या

तसाच त्या पदाचा उत्तर सूत्रात त्याना अर्थ करणे भाग पडलें असते. प्रकृत सूत्रात 'अर्थवत्' या पदाचा त्यानी जसा अर्थ केला आहे त्या अर्थान्वयें प्रत्ययाचे ठिकाणी वृत्तिमत्वरूप अर्थवत्व असल्यामुळें, या सूत्रानें प्रत्ययाला जी प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति येते तिचे निवारण करण्याकरिता त्याना प्रकृत सूत्रात 'अप्रत्ययः' हा पर्युदास असणे आवश्यक आहे असं मानणे भाग पडले. पण एकाच शब्दाचा पूर्वपरसूत्रात भिन्न रीतीनें अर्थ करणे हें 'सकृदुच्चरितः शब्दः सकृदेवार्थं गमयति' या न्यायाविरुद्ध आहे. दुसरें असें की, एकाच पदाचा भिन्न भिन्न तऱ्हेनें पूर्वपरसूत्रात अर्थ करण्याकरिता गुरुभूत शब्दाधिकाराचा आश्रय करणे आणि प्रकृत सूत्रात त्या पदाचा जसा अर्थ केला आहे तसा अर्थ केला असल्यामुळें प्रत्ययाचा पर्युदास करणे आवश्यक मानणे इत्यादि दोष दीक्षितानी केलेल्या अर्थामध्यें येत असल्यामुळें, त्या सर्व दोषाचे निवारण करण्याकरिता शब्दरत्नकार असें म्हणतात की, प्रकृत सूत्रात व तसेंच 'कृत्तद्धित' या उत्तर सूत्रात 'अर्थवत्' या पदाचा 'विभक्तीतरानपेक्षयाऽर्थबोधकत्वम-र्थवत्वम्' असा एकच रीतीनें पारिभाषिक अर्थ करणें योग्य आहे व तसा अर्थ केल्यास प्रत्ययाचा पर्युदास मानण्याची काही गरज राहत नाही, कारण प्रत्ययाला अर्थबोध करून देण्याकरिता प्रकृतीची अपेक्षा असल्यामुळें, वरील अर्थान्वयें प्रत्ययाचे ठिकाणी प्रातिपदिक-संज्ञेची प्राप्तीच होत नाही. प्रत्ययाचा पर्युदास करणे आवश्यक आहे असें भाष्यकारानी भाष्यात कोठेंहि म्हटले नसल्यामुळें, त्यावरून देखील हेंच ध्वनित होतें की, प्रत्ययाचा पर्युदास करणे व्यर्थ आहे. 'सुप्तिङन्तं पदम्' या सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात— 'यदप्युच्यते कृतद्धितसमासग्रहणं कर्तव्यमिति, न कर्तव्यम् । अर्थवदिति वर्तते, कृत्तद्धितान्तं चैवार्थवन्न केवलाः कृतस्तद्धिता वा ।' या भाष्यावरून देखील हेंच सिद्ध होतें की, प्रकृतीच्या सहाय्याशिवाय प्रत्ययाचे ठिकाणी अर्थबोध करण्याचे सामर्थ्य नाहीं; आणि या भाष्यावर टीका करिताना कैयटानें 'ननु प्रत्ययवत्ता लौकिकप्रयोगेन

ला पदस्यैव, न तु कृत्तद्धितान्तस्यापि, पदस्यैव लोके प्रयोगाऽर्हत्वात् अन्वयव्यतिरेकगम्या = त्वर्थवत्ता केवलानामपि कृत्तद्धितानामस्तीति किमुच्यन्।– न केवल इति। एवं तर्ह्यर्थवद्ग्रहणानुवृत्तिसामर्थ्याल्लौकिकार्थप्रत्यासन्नोऽभिव्यक्ततरो ग्राह्य प्रत्ययान्तेषु लक्ष्यते न आर्धायत इत्यदाप।' असे म्हटल आहे या वरील प्रदीपातील 'लौकिकार्थप्रत्यासन्न' या पदाचा 'लौकिकार्थक यत्पद तदर्थस्य प्रत्यासन्न शास्त्रकल्पितस्वादिप्रकृतेरर्थ' असा उद्योतात अर्थ केला असून, 'प्रत्ययान्तेषु' या पदाचा 'सुबन्तषु' असा अर्थ केला आहे व या कैयटवृत्तीला धरूनच शब्दरत्नकारानी 'अर्थवत्' या पदाचा वर सांगितल्याप्रमाणे दोन्ही सूत्रात सारखा अर्थ केला आहे)

शब्दरत्न–इत्याद्यर्थमिति। अन्यथा विभक्त्यन्तस्योदात्तता स्यात्। प्रातिपदिकत्वे तु पूर्वं विभक्तिलुकि टकारोत्तरस्योदात्तत्वे पुनर्जसि टकाराकारोदात्तत्वसिद्धिरिति भाव। कृदन्तत्वेनेति। न च समासविकल्पविधानस्य वैयर्थ्यम्, समासे एकस्वरश्रवण समासाभावे प्रातिपदिकत्वे तु पूर्वोत्तरपदयोर्भिन्नस्वरश्रवणमिति विशेषात्, दधि उपदशमित्यादौ पक्षे प्रकृतिभावप्रवृत्तेरपि फलस्य वक्तुं शक्यत्वाच्च।

'व्युत्पत्तिपक्षेऽपि बहुपटव इत्याद्यर्थं सूत्रम्' असं जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे का, प्रकृत सूत्र नसत तर 'बहुपटव' हा विभक्तिप्रत्ययान्त शब्द अन्तोदात्त होण्याची आपत्ति आली असती परंतु तो शब्द प्रातिपदिक मानल्यानें प्रथम विभक्तिप्रत्ययाचा लुक् झाल्यावर टकारापुढील उकार उदात्त झाला असता, पुन्हा 'जस्' प्रत्यय आल्यानें टकारापुढील अकार उदात्त होऊन इष्टसिद्धि होते ('ईषदूना पटव बहुपटव' या स्थली 'पटु जस्' या सुबन्ताहून 'विभाषा सुपो बहुच्पुरस्तात्तु' सू २०२३ या सूत्रानें 'बहुच्' प्रत्यय झाला असून 'पटु जस्' या सुबन्तापूर्वी तो झाला आहे प्रकृत सूत्र नसत तर, 'बहुच् पटु जस्' हा समुदाय जरी

अर्थवान् आहे तरी, तो तद्धितान्त किंवा समास नसल्यामुळें, त्याला प्रातिपदिकसंज्ञा झाली नसती व त्या समुदायात 'बहुच्' हा चित् प्रत्यय आदि असून त्या समुदायाच्या अन्ती 'पटु जस्' हें प्रकृति-प्रत्ययविशिष्ट शब्दस्वरूप असल्यामुळे, 'चितः सप्रकृतेर्बह्वकजर्थम्'–सू. ३७१० वरील वार्तिक–या वार्तिकान्वयें तो विभक्तिप्रत्ययान्त शब्द अन्तोदात्त झाला असता. परंतु प्रकृत सूत्र असल्यामुळें, 'बहुच् पटु जस्' या अर्थवान् समुदायाला प्रातिपदिकसंज्ञा होते येथें हें लक्षात ठेवावें की, हा संपूर्ण समुदाय प्रत्ययान्त नाही व त्यामुळे त्याला 'अप्रत्यय = अप्रत्ययान्त' हा पर्युदास लागू पडत नाही. या समुदायातील 'पटु' या शब्दाहून 'जस्' प्रत्यय झाला आहे व तशा जस्प्रत्ययान्त शब्दाहून 'बहुच्' प्रत्यय झाला आहे. अशा रीतीने 'बहुच् पटु जस्' हा समुदाय 'प्रत्ययग्रहणे यस्मात्स विहितः' प. २३ या परिभाषान्वयें अप्रत्ययान्त ठरत असल्यामुळें, त्याला प्रकृत सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा होण्यात काही अडवण येत नाही. त्याला प्रातिपदिकसंज्ञा झाली असता, 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू. ६५० या सूत्रानें प्रातिपदिकावयव असलेल्या 'जस्' या विभक्ति-प्रत्ययाचा लुक् होऊन 'बहुपटु' यातील अन्त्य उकार 'फिषोऽन्त उदात्तः' फिट् सू. १ या सूत्रानें उदात्त होतो व 'बहुपटु' या अन्तोदात्त प्रातिपदिकाहून पुन्हा 'जस् = अस्' हा प्रथमेच्या बहुवचनाचा प्रत्यय केला असता, 'बहु पटु अस्' अशी पुन्हा स्थिति होऊन या स्थितीत 'जसि च' सू. २४१ या सूत्रानें 'बहुपटु' या ह्रस्वान्त अङ्गातील अन्त्य उकाराचा गुण होऊन व 'स्थानेऽन्तरतमः' सू. ३९ या सूत्रानें तो गुण–ओकार–उदात्तस्वरयुक्त होऊन आणि 'एचोऽयवायावः' सू. ६१ या सूत्रानें ओकाराचे जागी अवादेश होऊन, त्या आदेशातील 'अ' हा स्थानिवद्भावानें आन्तरतम्यानें उदात्त होतो व अशा रीतीनें 'बहुपटव' हा शब्द अन्तोदात्त होण्याची आपत्ति टळते व तो मध्योदात्त होतो ) 'मूलकेनोपदंशम् इत्यादौ तृदन्त-त्वेनातिप्रसङ्गात्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे तें बरोबर मानलं

तर समासविकल्पविधायक सूत्र व्यर्थ ठरेल असे कोणी म्हटल्यास ते म्हणणें बरोबर नाहीं; कारण ( 'मूलकोपदंशम्' असा तृतीया-तत्पुरुष ) समास केल्यास, एक स्वराचें -- अन्तोदात्त स्वराचें -- श्रवण होईल व समास न केल्यास, ( 'मूलकेनोपदंशम्' या समुदायास ) प्रातिपदिकसंज्ञा झाली असता, पूर्व पद व उत्तर पद या दोहोंचे ठिकाणी भिन्न स्वराचें श्रवण होईल असा ( समासपक्षात व समासाभावपक्षात स्वरात ) फरक पडेल. तसेंच 'दधि उपदंशम्' इत्यादि स्थली समासाभावपक्षात प्रकृतिभावाची प्रवृत्ति होईल हें एक अधिक फल सांगता येणें शक्य आहे. (प्रकृत सूत्राऐवजी 'बहुधपूर्वः' असें जर सूत्र केलें तर 'मूलकेनोपदंशम्' या संपूर्ण कृदन्त समुदायास प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति येईल असें जें दीक्षितांनी मनोरमेंत म्हटले आहे त्यावर शंकाकार अशी शंका करतो की, 'मूलकेनोपदंशम्' या संपूर्ण कृदन्त समुदायास प्रातिपदिकसंज्ञा झाल्यास, 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू ६५० या सूत्रानें 'मूलकेन' यांतील विभक्ति-प्रत्ययाचा लुक् होऊन 'मूलकोपदंशम्' असेंच रूप होईल व समास केल्यानें देखील तेंच रूप होईल आणि अशा रीतीनें 'तृतीयाप्रभृतीन्यन्यतरस्याम्' सू. ७८४ हें विकल्पानें समास होण्याचें विधान करणारें सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येईल. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात की, ही शंका बरोबर नाहीं; कारण तृतीया-तत्पुरुषसमास केला असता, 'समासस्य' सू. ३७३४ या सूत्रानें 'मूलकोपदंशम्' या समस्त पदांतील अन्त्य अच् उदात्त होऊन व 'अनुदात्तं पदमेकवर्जम्' सू. ३६५० या सूत्रानें त्या पदांतील इतर सर्व अच् अनुदात्त होऊन एकाच अन्तोदात्त स्वराचें श्रवण होईल. पण विकल्पामुळें समास न केल्यास, जरी 'मूलकेनोपदंशम्' या समुदायाला प्रातिपदिकसंज्ञा होईल व ती संज्ञा झाल्यावर जरी 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' या सूत्रानें प्रातिपदिकावयव असणाऱ्या 'टा = इन' या अन्तर्वर्ति विभक्तिप्रत्ययाचा लुक् होऊन 'मूलकोपदंशम्' असेंच रूप होईल तरी, तो सामासिक शब्द नसल्यामुळें

अर्थवान् आहे तरी, तो तद्धितान्त किंवा समास नसल्यामुळें, त्याला प्रातिपदिकसंज्ञा झाली नसती व त्या समुदायात 'बहुच्' हा चित् प्रत्यय आदि असून त्या समुदायाच्या अन्तीं 'पटु जस्' हे प्रकृति-प्रत्ययविशिष्ट शब्दस्वरूप असल्यामुळे, 'चित सप्रकृतेर्बह्वकजर्थम्'— सू ३७१० वरील वार्तिक—या वार्तिकान्वयें तो विभक्तिप्रत्ययान्त शब्द अन्तोदात्त झाला असता. परंतु प्रकृत सूत्र असल्यामुळें, 'बहुच् पटु जस्' या अर्थवान् समुदायाला प्रातिपदिकसंज्ञा होते येथें हे लक्षात ठेवावे का, हा संपूर्ण समुदाय प्रत्ययान्त नाही व त्यामुळें त्याला 'अप्रत्यय = अप्रत्ययान्त' हा पर्युदास लागू पडत नाही या समुदायातील 'पटु' या शब्दाहूनच 'जस्' प्रत्यय झाला आहे व तशा जसप्रत्ययान्त शब्दाहून 'बहुच्' प्रत्यय झाला आहे अशा रीतीने 'बहुच् पटु जस्' हा समुदाय 'प्रत्ययग्रहणे यस्मात् स विहित' प २३ या परिभाषान्वयें अप्रत्ययान्त ठरत असल्यामुळें, त्याला प्रकृत सूत्राने प्रातिपदिकसंज्ञा होण्यात काही अडचण येत नाही त्याला प्रातिपदिकसंज्ञा झाली असता, 'सुपो धातुप्रातिपदिकयो' सू ६५० या सूत्राने प्रातिपदिकावयव असलेल्या 'जस' या विभक्ति-प्रत्ययाचा लुक् होऊन 'बहुपटु' यातील अन्त्य उकार 'फिषोऽन्त उदात्त फिट् सू १ या सूत्रानें उदात्त होतो व 'बहुपटु' या अन्तोदात्त प्रातिपदिकाहून पुन्हा 'जस = अस्' हा प्रथमेच्या बहुवचनाचा प्रत्यय केला असता 'बहु पटु अस्' अशी पुन्हा स्थिति होऊन या स्थितीत 'जसि च' सू २८१ या सूत्रानें 'बहुपटु' या ह्रस्वान्त अङ्गातील अन्त्य उकाराचा गुण होऊन व 'स्थानेऽन्तरतम' सू ३९ या सूत्रानें तो गुण—ओकार—उदात्तस्वरयुक्त होऊन आणि 'एचोऽयवायाव' सू ६१ या सूत्रानें ओकाराचे जागीं अवादेश होऊन, त्या आदेशातील 'अ' हा स्थानिवद्भावानें आन्तरतम्यानें उदात्त होतो व अशा रीतीनें 'बहुपटव' हा शब्द अन्तोदात्त होण्याची आपत्ति टळते व तो मध्योदात्त होतो ) 'मूलकेनोपदंशम् इत्यादौ कृदन्त-त्वगतिप्रसङ्गात्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे ते बरोबर मानत

'बहुच्पूर्व.' हे सूत्र केल्यास दीक्षितांनी मनोरमेंत जो दोष दिला आहे तो अगदी योग्य ठरतो व त्यावर शंकाकारानें जी शंका केली आहे ती चूक ठरते असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.)

मनोरमा—कृत्तद्धितसमासाश्च । "अर्थवत्" इत्यनुवर्तते । तत्सामर्थ्यात्तदन्तविधिः । न हि जहत्स्वार्थायां वृत्तौ कृता तद्धितानां चार्थोऽस्ति । भूतपूर्वगतिलभ्यस्तु न प्रशस्तः । अजहत्स्वार्थायामपि न प्रत्ययमात्रेणार्थपर्यवसानमित्यभिप्रेत्याह—कृत्तद्धितान्ताविति । लिट्, धुक्, इत्यादौ "अधातुः" इति, कर्तव्यादौ अप्रत्ययान्तमिति पर्युदासे प्राप्ते कृदन्ते विधिरयम् । नियमार्थमिति । न च प्रत्ययान्तत्वेन पर्युदासे प्राप्ते विध्यर्थमस्त्विति शङ्क्यम्, वाक्यस्याप्रत्ययान्तत्वात् । प्रत्ययग्रहणे यस्मात्स विहितस्तदादेरेव ग्रहणात् । ननु स्त्रीप्रत्यये तदादिनियमो निषिद्धः, एवं च राजकुमारीत्यादौ विध्यर्थमस्त्विति चेन्मैवम्, *अन्तरङ्गस्यापि हल्ङ्याबिलोपस्य लुग्विषये प्रवृत्त्या श्रूयमाण* एव सुपि समासप्रवृत्तेः । तत्र चाप्रत्ययान्तत्वेन प्रवृत्तायाः संज्ञाया एकदेशविकृतन्यायेन विभक्तिलुगपि सुलभत्वात् । अत एव गोमत्प्रिय इत्यादौ नुमादयो न । लुकः प्रागन्तरङ्गप्रवृत्तौ तु स्युरेव ।

'कृत्तद्धितसमासाश्च' सू १७९ या सूत्रात ('अर्थवदधातु' या पूर्व सूत्रांतून) 'अर्थवत्' या पदाची अनुवृत्ति होते व त्या अनुवृत्तीच्या सामर्थ्यानें तदन्तविधि होतो ('कृत्' व 'तद्धित' या प्रत्ययांत पूर्वी सांगितल्याप्रमाणे लौकिकी अर्थवत्ता नसून ती कृदन्त व तद्धितान्त यातच असल्यामुळे, प्रकृत सूत्रांतील 'कृत्' व 'तद्धित' या शब्दानी कृदन्त व तद्धितान्त याच, ती अनुवृत्ति केल्याने, ग्रहण होते. तशी अनुवृत्ति केली नसती तर, प्रकृत सूत्र संज्ञाविधायक सूत्र असल्यामुळें, 'संज्ञाविधौ प्रत्ययग्रहणे तदन्तग्रहणं नास्ति'— परि २७—या परिभाषान्वयें तदन्तविधि करता आला नसता व कृदन्त आणि तद्धितान्त याना प्रातिपदिकसंज्ञा न होण्याची आपत्ति आली असती व केवळ 'कृत्' आणि 'तद्धित' प्रत्यय याना ती

'समासस्य' हे सूत्र प्रवृत्त होणार नाही व त्यामुळें 'मूलक' व 'उपदश' या दोन्ही पूर्व व उत्तर पदात भिन्न स्वराचे श्रवण होईल; कारण अखंड प्रातिपदिकाचे ठिकाणीच 'फिषोऽन्त उदात्तः' फिट् सू १ या सूत्राची प्रवृत्ति होत असून सखंड प्रातिपदिकाचे ठिकाणी ते सूत्र प्रवृत्त होत नाही साराश समास केल्यानें व न केल्यानें जरी सारखीच रूपें सिद्ध होतात तरी त्याच्या स्वरात फरक पडत असल्या-मुळें, 'तृतीयाप्रभृतीनि' हे समासविकल्पविधायक सूत्र व्यर्थ ठर-ण्याची आपत्ति येत नसून सार्थक ठरतें. आता लौकिक प्रयोगात स्वरयुक्त उच्चारण केले जात नसल्यामुळें स्वरात फरक पडेल एवढ्या एका कारणावरून शकाकारानें घेतलेली शका फेटाळणे योग्य नाही असे कोणी म्हटल्यास, शब्दरत्नकार दुसरें असे कारण देतात की, 'दधि उपदशम्' या स्थली 'दधि' हे द्वितीयान्त उपपद असून उपपूर्वक 'दश्' धातूहून 'परीप्सा'-त्वरा-या अर्थामध्यें 'द्वितीयाया च' सू. ३३७४ या सूत्रानें 'णमुल्' हा कृत्प्रत्यय झाला असल्यामुळें, 'दधि उपदशम्' हा सपूर्ण समुदाय कृद्ग्रहणपरिभाषान्वयें-परि.२८-कृदन्त ठरतो व या स्थली देखील 'तृतीयाप्रभृतीनि' या सूत्रानें समास होणे वैकल्पिक असल्यामुळें समास न केल्यास व प्रकृत सूत्राच्या अभावी सपूर्ण कृदन्त समुदायाला प्रातिपदिकसज्ञा केल्यास, 'दधि' या पुढील 'अम्' या द्वितीयेच्या एकवचनाच्या विभक्तिप्रत्ययाचा 'स्वमोर्नपुंसकात्' सू. ३१९ या सूत्रानें पूर्वीच लुक् झालेला असल्यामुळें, 'सुपो धातुप्रातिपदिकयो' या सूत्राची प्रवृत्ति करण्याची गरज पडत नाही. या स्थली 'दधि' यातील अन्त्य 'इक्' पुढें 'उ' हा असवर्ण अच् असल्यामुळें, 'इकोऽसवर्णे' सू. ९१ या या सूत्रानें वैकल्पिक प्रकृतिभाव होऊ शकतो. समास केल्यास, 'न समासे'-सू. ९१ वरील वार्तिक-या निषेधक वार्तिकान्वयें प्रकृतिभाव होऊ शकत नाही आणि अशा रीतीनें देखील 'तृतीयाप्रभृतीनि' हे सूत्र व्यर्थ न ठरता सार्थक ठरते. साराश प्रकृत सूत्राऐवजी

'बहुच्पूर्वः' हें सूत्र केल्यास दीक्षितांनी मनोरमेंत जो दोष दिला आहे तो अगदी योग्य ठरतो व त्यावर शंकाकारानें जी शंका केली आहे ती चूक ठरते असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.)

मनोरमा—कृत्तद्धितसमासाश्च । "अर्थवत्" इत्यनुवर्तते । तत्सामर्थ्यात्तदन्तविधिः । न हि जहत्स्वार्थायां वृत्तौ कृतां तद्धितानां चार्थोऽस्ति । भूतपूर्वगतिलभ्यस्तु न प्रशस्तः । अजहत्स्वार्थायामपि न प्रत्ययमात्रेणार्थपर्यवसानमित्यभिप्रेत्याह—कृत्तद्धितान्ताविति । लिट्, धुक्, इत्यादौ "अधातुः" इति, कर्तव्यादौ अप्रत्ययान्तमिति पर्युदासे प्राप्ते कृदन्ते विधिरयम् । नियमार्थमिति । न च प्रत्ययान्तत्वेन पर्युदासे प्राप्ते विध्यर्थमस्त्विति शङ्क्यम्, वाक्यस्याप्रत्ययान्तत्वात् । प्रत्ययग्रहणे यस्मात्स विहितस्तदादेरेव ग्रहणात् । ननु स्त्रीप्रत्यये तदादिनियमो निषिद्धः, एवं च राजकुमार्यादौ विध्यर्थमस्त्विति चेन्मैवम्, अन्तरङ्गस्यापि हल्ङ्याब्भ्यादिलोपस्य सुब्विषये ऽप्रवृत्त्या श्रूयमाण एव सुपि समासप्रवृत्तेः । तत्र चाप्रत्ययान्तत्वेन प्रवृत्तायाः संज्ञाया एकदेशविकृतन्यायेन विभक्तिलुक्यपि सुलभत्वात् । अत एव गोमत्प्रिय इत्यादौ नुमादयो न । लुकः प्रागन्तरङ्गप्रवृत्तौ तु स्युरेव ।

'कृत्तद्धितसमासाश्च' सू १७९ या सूत्रात ('अर्थवदधातु' या पूर्व सूत्रातून) 'अर्थवत्' या पदाची अनुवृत्ति होते व त्या अनुवृत्तीच्या सामर्थ्यानें तदन्तविधि होतो. ('कृत्' व 'तद्धित' या प्रत्ययात पूर्वी सांगितल्याप्रमाणे लौकिकी अर्थवत्ता नसून ती कृदन्त व तद्धितान्त यातच असल्यामुळें, प्रकृत सूत्रातील 'कृत्' व 'तद्धित' या शब्दानी कृदन्त व तद्धितान्त यांचे, ती अनुवृत्ति केल्यानें, ग्रहण होते. तशी अनुवृत्ति केली नसती तर, प्रकृत सूत्र संज्ञाविधायक सूत्र असल्यामुळें, 'संज्ञाविधौ प्रत्ययग्रहणे तदन्तग्रहणं नास्ति'— परि. २७—या परिभाषान्वयें तदन्तविधि करता आला नसता व कृदन्त आणि तद्धितान्त याना प्रातिपदिकसंज्ञा न होण्याची आपत्ति आली असती व केवळ 'कृत्' आणि 'तद्धित' प्रत्यय याना ती

सञ्ज्ञा झाली असतो आणि त्याना ती सञ्ज्ञा होऊन कोणताहि लाभ झाला नसता ) जहत्स्वार्थवृत्ति मानल्यास, कृत् व तद्धित प्रत्यय अर्थवान् ठरत नाहीत. भूतपूर्वगतीने लभ्य होणारा अर्थ प्रशस्त अर्थ नव्हे. अजहत्स्वार्थापक्ष मानला तरी देखील, केवळ प्रत्ययानें कोणत्याहि अर्थाचा बोध होत नाही. हा वरील आशय मनात धरूनच प्रकृत सूत्रावरील कौमुदीत 'कृत्तद्धित' या शब्दाचा 'कृत्तद्धितान्तौ' असा अर्थ केला आहे. (जेथें एखादा शब्द आपल्या मूळ अर्थाचा परित्याग करून भिन्न अर्थाचा बोध करितो तशा स्थली जहत्स्वार्थावृत्ति मानली जाते उदाहरणार्थ 'मण्डप.' या स्थली हा 'मण्ड पिबतीति मण्डपः = पेज पिणारा' असा जो मूळ शब्दार्थ त्याचा परित्याग करून तो शब्द 'माडव' या अर्थाचा जो बोध करितो तो जहत्स्वार्थावृत्तीने करितो जेथें एखादा शब्द आपल्या मूळ अर्थाचा परित्याग न करिता त्या अर्थाखेरीज इतर अधिक अर्थाचा बोध करितो तशा स्थली अजहत्स्वार्थावृत्ति मानली जाते उदाहारणार्थ 'पङ्कज, द्विरेफ' इत्यादि स्थली मूळ शब्द आपल्या मूळ अर्थाचा परित्याग न करिता अजहत्स्वार्थावृत्तीनें अधिक अर्थाचे म्हणजे चिखलात उत्पन्न होणारे कमल व ज्यात दोन रेफ आहेत अशा भ्रमर याचे अनुक्रमें बोधक होतात. प्रकृत स्थली जहत्स्वार्थावृत्ति मानली, म्हणजे प्रकृति व प्रत्यय आपापल्या मूळ अर्थाचा परित्याग करतात व प्रकृतिप्रत्ययसमुदायच विशिष्टसमुदायशक्तीनें अर्थाचा बोध करतो असे मानले, तर कृत् व तद्धित प्रत्यय अर्थवान् ठरत नाहीत हें आपोआपच सिद्ध होतें. कृत् व तद्धित प्रत्यय हे जरी इतर प्रत्ययाप्रमाणे अर्थवान् आहेत तरी पूर्वी सागितल्याप्रमाणे त्याचे ठिकाणी लौकिक प्रशस्त अर्थ बोधित करण्याचे सामर्थ्य नाही. ते सामर्थ्य प्रकृतिप्रत्ययविशिष्ट समुदायातच आहे. म्हणून 'साम्प्रतिकाभावे भूतपूर्वगतिः'–परि. ७७–या न्यायान्वयें ते प्रत्यय लावण्यापूर्वी त्याचा जो अर्थ होता त्या अर्थाचे भूतपूर्वगतीनें ग्रहण केले तरी, तो अर्थ लौकिक प्रशस्त अर्थ नसल्यामुळें, ते प्रत्यय

भूतपूर्वगतीनें देखील प्रशस्तार्थवान् ठरत नाहीत हे उघड आहे. अजहत्स्वार्थावृत्ति मानली—म्हणजे प्रकृति व प्रत्यय आपापल्या अर्थाचा परित्याग न करिता दोन्ही मिळून ज्यात प्रकृतीचा अर्थ विशेषण व प्रत्ययाचा अर्थ विशेष्य आहे अशा विशिष्ट अर्थाचे बोधक होतात असे मानले—तरी देखील, केवळ कृत् व तद्धित प्रत्ययानी तशा विशिष्ट अर्थाचा बोध होत नसल्यामुळें, त्याचे ठिकाणी लौकिकी प्रशस्त अर्थवत्ता आहे असे मानता येत नाही, आणि हा आशय मनात धरूनच दीक्षितानी प्रकृत सूत्रातील ‘कृत्’ व ‘तद्धित्’ या शब्दाचा कृदन्त व तद्धितान्त असा कौमुदीत अर्थ केला आहे. या विषयाचे विवरण मागील सूत्रात केलेच आहे व ‘सुप्तिङन्त पदम्’ सू १.४.१४—या सूत्रावरील या विषयासबधाचे भाष्य पूर्वी दिलेच आहे.) ‘लिट्, घुक्’ इत्यादि स्थली ‘अधातु’ या पूर्वसूत्रातील पर्युदासामुळें व ‘कर्ता’ इत्यादि स्थली त्या सूत्रातील ‘अप्रत्यय = अप्रत्ययान्त’ या पर्युदासामुळें जी प्रातिपदिकसज्ञा होऊ शकत नव्हती ती व्हावी याकरिता प्रकृत सूत्रात ‘कृत् = कृदन्त’ या शब्दाचें ग्रहण केले आहे. (‘लिह्, दुह्’ या धातूहून ‘क्विप् = व्’ प्रत्यय केला असता, ‘वेरपृक्तस्य’ सू. ३७५ या सूत्रानें त्या अपृक्त प्रत्ययाचा लोप होऊन मूळ धातूच अवशिष्ट राहतात व जरी ‘हो ढ.’ सू ३२४, ‘झला जशोऽन्ते सू ८४, ‘वाऽवसाने’ सू २२६, ‘दादेर्धातोर्घ.’ सू. ३२५, ‘एकाचो बशो भष्’ सू. ३२६ इत्यादि पाणिनीय सूत्राची प्रवृत्ति केली असता, धातूच्या मूळ रूपात थोडासा फरक पडतो तरी एकदेशविकृतन्यायानें ते धातु मानले जाऊ शकतात आणि जरी त्याहून क्विप् प्रत्यय झाला आहे तरी, ‘क्विबन्ता धातुत्व न जहति’ या सिद्धान्तान्वयें त्याची धातुसज्ञा नष्ट होत नाही व त्यामुळे ‘अधातु’ या पर्युदासान्वयें त्याना प्रातिपदिकसज्ञा होऊ शकत नाही. ती त्याना व्हावी याकरिता प्रकृत सूत्रात ‘कृत् = कृदन्त’ या शब्दाचे ग्रहण केले आहे आणि ‘लिट्, धुक्’ हे शब्द प्रत्ययलक्षणानें क्विप्-प्रत्ययान्त ठरत असल्यामुळें व क्विप् हा कृत्प्रत्यय असल्यामुळें,

ते शब्द कृदन्त मानले जाऊन त्याना प्रकृत सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा होते 'कृ तृच् = कर्तृ' हा शब्द तृच्प्रत्ययान्त असल्यामुळें, पूर्व सूत्रातील 'अप्रत्ययान्त' या पर्युदासामुळें त्याला त्या सूत्रानें जी प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकत नव्हती ती त्याला व्हावी याकरिता देखील प्रकृत सूत्रात 'कृत्' शब्दाचे ग्रहण केले आहे व 'तृच्' हा कृत्प्रत्यय असल्यामुळें 'कर्तृ' हा शब्द कृदन्त ठरून त्याला प्रकृत सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा होते ) 'पूर्वसूत्रेण सिद्धे समासग्रहण नियमार्थम्' असे प्रकृत सूत्रावरील कौमुदीत म्हटले आहे यावर 'अर्थवदधातु' या सूत्रात प्रत्ययान्ताचा पर्युदास केला असल्यामुळें समासाच्या विषयात देखील प्रकृत सूत्र विध्यर्थ मानावे अशी कोणी शंका केल्यास ती शंका बरोबर नाही, कारण वाक्य प्रत्ययान्त मानता येत नाही याचे कारण हे की, 'प्रत्ययग्रहणे यस्मात्सविहित-स्तदादे'–परि २३–या परिभाषेंत 'तदादि' या शब्दाचेच ग्रहण केले आहे ('राज्ञ पुरुष राजपुरुष = राजन् ङस् पुरुष सु' या अलौकिक विग्रहवाक्यात जरी 'सु' प्रत्यय शेवटी दिसतो तरी तो 'पुरुष' या शब्दाहूनच झालेला प्रत्यय आहे व 'राजन् ङस् पुरुष' या समुदायाहून झालेला तो प्रत्यय नव्हे. म्हणून प्रत्ययग्रहणपरि-भाषान्वयें 'राजपुरुष' हा समुदाय प्रत्ययान्त ठरत नसल्यामुळें या समुदायास किंवा 'राम ग्राम गच्छति' इत्यादि वाक्याना 'अप्रत्ययान्त' हा पर्युदास लागू पडत नाही पण हा पदसमुदाय अर्थवान् असल्यामुळे त्याला वास्तविक पूर्व सूत्रानेंच प्रातिपदिक-संज्ञेची प्राप्ति होते असे असून देखील समासाला प्रातिपदिकसंज्ञा व्हावी याकरिता प्रकृत सूत्रात पुन्हा 'समास' या शब्दाचे ग्रहण केले असल्यामुळे, हे सूत्र समाससंबधानें नियमार्थ ठरते, व त्या नियमाचे स्वरूप असे की, जर अर्थवान् शब्दसमुदायाला प्रातिपदिक-संज्ञा करणे असेल तर ती केवळ समासालाच करता येते जर समासाला पूर्व सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा प्राप्त झाली नसती व प्रकृत सूत्रानेंच ती प्राप्त झाली असती तर, प्रकृत सूत्र समाससंबधानें

देखील विध्यर्थक सूत्र मानता आले असते. पण वर सांगितल्याप्रमाणे तशी परिस्थिति नसल्यामुळें, प्रकृत सूत्र समासासबधानें, 'प्राप्ते सति नियमार्थम्' या न्यायान्वयें, नियमार्थक सूत्र मानणेंच योग्य आहे, आणि भाष्यकारानी 'अर्थवत्समुदायाना समासग्रहण नियमार्थं भविष्यति । समास एवार्थवता समुदायाना प्रातिपदिकसंज्ञा भवति नान्यः' असें पूर्वसूत्रावरील भाष्यात स्पष्ट म्हटलें आहे.) स्त्रीप्रत्ययाच्या विषयात, म्हणजे सामासिक शब्दाच्या अन्तीं स्त्रीप्रत्ययान्त शब्द असून तो प्रधान असल्यास, तदादि नियम लागू पडत नाही व त्यामुळें 'राजकुमारी' इत्यादि स्थली (तशा सामासिक शब्दाला प्रातिपदिकसंज्ञा होण्याकरिता प्रकृत सूत्रातील 'समास' या पदाचें ग्रहण नियमार्थ न मानता) विध्यर्थ मानलें पाहिजे असें कोणी म्हटल्यास, त म्हणणें बरोबर नाही, कारण 'हल्ङ्याब्भ्यः' सू. २५२ या सूत्रानें होणारा 'सु' प्रत्ययाचा लोप होणें हें अन्तरङ्गकार्य आहे तरी, ('सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू. ६५० या सूत्रानें होणाऱ्या बहिरङ्ग) लुक्च्या विषयात 'सु' लोपाची प्रवृत्ति होऊ शकत नसल्यामुळें, 'सुप्' प्रत्यय श्रूयमाण–विद्यमान–असतानाच, म्हणजे 'सुप्' प्रत्ययाचा लुक् होण्यापूर्वीच, समास होतो. तशा स्थितीत प्रत्ययान्तत्वाच्या अभावामुळें प्राप्त झालेली प्रातिपदिकसंज्ञा, अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाचा लुक् झाल्यावर देखील, एकदेशविकृतन्यायानें सहज प्राप्त होऊ शकते (शकाकाराची अशी शंका आहे की, 'राज्ञः कुमारी राजकुमारी = राजन् ङस् कुमारी सु' या स्थली 'कुमारी' या शब्दाहून झालेल्या 'सु' प्रत्ययाचा केवळ त्या ङीबन्त शब्दाला मानून 'हल्ङ्याब्भ्य.' या सूत्रानें लोप करणें हें कार्य, पदद्वयनिमित्तक समास होऊन प्रातिपदिकसंज्ञा झाल्यावर 'सुपो धातुप्रातिपदिकयो.' या सूत्रानें त्या 'सु' प्रत्ययाचा लुक् करणें या कार्याच्या मानानें, अन्तरङ्ग आहे व त्यामुळें प्रथम 'सु' लोपाची प्राप्ति आहे, आणि 'सु' लोप प्रथम केल्यास व त्यानंतर समास केल्यास, स्त्रीप्रत्ययान्त 'कुमारी' हा

शब्द उत्तरपदार्थप्रधान षष्ठीतत्पुरुषसमासात प्रधान असल्यामुळें, 'स्त्रीप्रत्यये चानुपसर्जने न' – परि. २६–, म्हणजे स्त्रीप्रत्ययान्त शब्द प्रधान असल्यास तदादिनियम लागू पडत नाही, या परिभाषान्वयें 'राजकुमारी' हा सपूर्ण शब्द स्त्रीप्रत्ययान्त ठरतो व 'अर्थवदधातुरप्रत्ययः' या पूर्व सूत्रात प्रत्ययान्ताचा पर्युदास केला असल्यामुळें, 'राजकुमारी' या, वर सांगितल्याप्रमाणे स्त्रीप्रत्ययान्त ठरत असलेल्या, शब्दाला प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकत नाही. तो संज्ञा त्या सामासिक शब्दाला व्हावी याकरिता प्रकृत सूत्रातील 'समास' या पदाचे ग्रहण विध्यर्थक मानणे आवश्यक आहे येथें हें लक्षात ठेवावे की, 'कुमार' या शब्दाहून 'वयसि प्रथमे' सू. ४७८ या सूत्रानें 'ङीप्' प्रत्यय होऊन 'कुमारी' हा स्त्रीप्रत्ययान्त शब्द सिद्ध होतो. 'राज्ञः कुमारी राजकुमारी' या स्थली जरी 'कुमारी' हाच शब्द स्त्रीप्रत्ययान्त आहे तरी, समासाच्या अन्ती असलेला तो स्त्रीप्रत्ययान्त शब्द प्रधान असल्यामुळें, येथें तदादिनियम लागत नाही, म्हणजे जरी 'कुमार' या शब्दाहून 'ङीप्' प्रत्यय झाला आहे तरी 'कुमारी' एवढाच शब्द स्त्रीप्रत्ययान्त न ठरता 'राजकुमारी' हा सपूर्ण शब्द स्त्रीप्रत्ययान्त ठरतो. अशा प्रत्ययान्त सामासिक शब्दाला जी पूर्व सूत्रानें 'अप्रत्ययः = अप्रत्ययान्तः' या पर्युदासामुळे प्रातिपदिकसंज्ञा प्राप्त नव्हती ती त्याला प्रकृत सूत्रानें व्हावी याकरिता प्रकृत सूत्रातील 'समास' ग्रहण विध्यर्थक मानलें पाहिजे असे शंकाकाराच्या म्हणण्याचे तात्पर्य आहे या शंकेवर दीक्षित असे उत्तर देतात की, जरी 'सु' लोपाच्या मानानें 'सुप' लुक्कार्य बहिरङ्ग आहे तरी, 'अन्तरङ्गानपि विधीन् बहिरङ्गो लुग्बाधते' – परि. ५२ – या परिभाषान्वयें 'सुप्' लुक्कार्य 'सु' लोपाचे बाधक होऊन 'सु' लोप प्रथम होऊ देत नाही. त्यामुळें 'राजन् ङस् कुमारी सु' या स्थली 'सु' लोप होण्यापूर्वीच त्या दोन सुबन्ताच्या समुदायाला समाससंज्ञा होते व त्या अवस्थेंत तो समुदाय ङीबन्त ठरत नाही व 'सु' प्रत्ययान्त देखील मानता येत

नाहीः; कारण 'ङीप्' प्रत्यय केवळ 'कुमार' शब्दाहून झाला असून 'राजकुमार' या सपूर्ण शब्दाहून झाला नाही आणि तसेच 'सु' प्रत्यय हा देखील केवळ 'कुमारी' या शब्दाहून झालेला प्रत्यय असून 'राजकुमारी' या समुदायाहून झालेला प्रत्यय नाही. अशा रीतीनें तो समुदाय प्रत्ययान्त ठरत नसल्यामुळें, त्याला पूर्वसूत्रातील 'अप्रत्ययः = अप्रत्ययान्तः' हा पर्युदास लागू पडत नाही आणि ज्याअर्थी तो समुदाय अर्थवान् आहे त्याअर्थी त्याला पूर्वसूत्रानेंच प्रातिपदिकसंज्ञा होते. साराश 'राजकुमारी' या शब्दाला प्रातिपदिकसंज्ञा होण्याकरिता प्रकृत सूत्रातील 'समास' या पदाचे ग्रहण विध्यर्थक मानण्याची काहीच गरज नाही, व कोणत्याहि अर्थवान् समुदायाला प्रातिपदिकसंज्ञा न होता समासालाच ती संज्ञा व्हावी याकरिता प्रकृत सूत्रात 'समास' या पदाचे ग्रहण केले आहे व अशा रीतीनें ते ग्रहण *विध्यर्थक न ठरता नियमार्थक ठरते असेच मानणे उचित आहे.* 'राजन् ङस् कुमारी सु' या अवस्थेंतच या अर्थवान् अप्रत्ययान्त समुदायाला पूर्व सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा होते हें वर सांगितलेच आहे व ती संज्ञा झाल्यावर 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' या सूत्रानें त्या समुदायातील 'ङस्' व 'सु' या अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययरूप प्रातिपदिकावयवाचा लुक् होतो. तो लुक् झाल्यावर समुदायाच्या स्वरूपात जरी थोडासा फरक पडतो तरी 'एकदेशविकृतमनन्यवत्'—परि. ३७—या परिभाषान्वयें,अवशिष्ट राहिलेल्या समुदायाला प्रातिपदिकसंज्ञा होण्यात काही अडचण येत नाही.) म्हणूनच, म्हणजे 'सु' लोपकार्य अन्तरङ्ग असून देखील प्रथम होऊ शकत नसल्यामुळेंच, 'गोमत्प्रियः' इत्यादि स्थली नुमागमादि कार्यें होत नाहीत. बहिरङ्ग लुक् होण्यापूर्वी 'सु' लोपरूप अन्तरङ्गकार्य होऊ शकले असते तर नुमागमादि कार्यें होण्याची आपत्ति आलीच असती. ('गोमान् प्रियः यस्य सः गोमत्प्रिय· = गोमत् सु प्रिय सु' या स्थितीतच समुदायाला प्रातिपदिकसंज्ञा न केली व समुदायातील अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाचा

'सुपो धातुप्रातिपदिकयो ' या सूत्रानें होणारा लुक् बहिरङ्ग असल्यामुळें पूर्वी न केला आणि 'गोमत्' यापुढील 'सु' प्रत्ययाचा 'हल्ङ्याब्भ्य' सू २५२ या सूत्रानें लोप होणें हे कार्य अन्तरङ्ग असल्यामुळें ते प्रथम केले तर, 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' सू २६२ या सूत्रान्वयें 'गोमत्' यापुढें 'सु' प्रत्यय विद्यमान आहे अशी बुद्धि करता येते आणि त्यामुळे 'उगिदचा सर्वनामस्थाने' सू ३६१ या सूत्रानें नुमागम होऊन व 'अत्वसन्तस्य चाधातो' सू ४२५ या सूत्रानें उपधादीर्घ-कार्य होऊन आणि 'संयोगान्तस्य लोप' सू ५४ या सूत्रानें अन्त्य तकाराचा लोप होऊन, 'गोमत्प्रिय' असे इष्ट रूप सिद्ध न होता, 'गोमान्प्रिय' असे अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येईल परंतु 'सुपो धातुप्रातिपदिकयो' या सूत्रानें होणारा अन्तर्वर्तिविभक्ति-प्रत्ययाचा लुक् बहिरङ्ग असून देखील 'हलङ्याब्भ्य' या सूत्रानें होणाऱ्या अन्तरङ्ग 'सु' लोपाचा बाध करीत असल्यामुळें, 'सु' लोपाची प्रवृत्ति होत नाही व समुदायाला प्रातिपदिकसंज्ञा झाल्यावर अन्तर्वर्ति 'सु' या विभक्तिप्रत्ययाचा लगेच लुक् होत असल्यामुळें व 'न लुमताङ्गस्य' सू २६३ हे निषेधक सूत्र असल्यामुळें, 'प्रत्यय-लोपे प्रत्ययलक्षणम्' या सूत्राची प्रवृत्ति होऊ शकत नाही व त्यामुळे 'गोमत्' शब्दापुढील ज्या 'सु' प्रत्ययाचा लुक् झाला आहे तो प्रत्यय विद्यमान आहे असे मानता येऊ शकत नाही आणि त्यामुळें त्या प्रत्ययाच्या निमित्तामुळें अङ्गाला प्राप्त होणारी नुमागमादि कार्ये होऊ शकत नाहीत आणि 'गोमत्प्रिय.' असे इष्ट रूप सिद्ध होते )

मनोरमा–नन्वेवमपि असमर्थसमासे दशदाडिमादिवदनर्थके विध्यर्थमस्त्विति चेन्न, "अर्थवत्" इत्यस्यानुवृत्तेरुक्तत्वात् । कथं तर्हि असमर्थसमासे सज्ञेति चेद्धर्मिग्राहकमानादेवेति गृहाण । "असूर्य-ललाटयो –" इत्यनेन हि असूर्यशब्दे उपपदे खश् विधीयते । उपोच्चारितं पदं चोपपदम् । पदं च "सुप्तिङन्तम्" इति । नियम-शरीरमाह–यत्र संघाते इत्यादि । पूर्वो भाग इत्युपलक्षणम् । उत्तरस्तु

प्रत्ययो नेत्यपि बोध्यम्, अन्यथा जन्मवानित्यादौ सज्ञा न स्यात्तद्धित-ग्रहणस्य औपगवादौ कृतार्थत्वात् । पूर्वो भागः पदमिति किम् ? बहुज्विशिष्टस्य प्रातिपदिकसज्ञा यथा स्यात्, तेन बहुपटव इत्यत्र प्रथमजसो लुकि बहुपटुशब्दस्य चित्स्वरे पुनर्जसि उपोत्तमोदात्तत्व सिद्ध्यति। यद्वा प्रकृतिप्रत्ययभावानापन्नसधातविषयको नियमोऽस्तु। न चाद्यपक्षे राजपुरुषावित्यादौ पुरुषावित्यादे सज्ञा स्यादिति वाच्यम्। अर्थवत्वेनैव वारणात् । प्रत्ययार्थो हि विशिष्ट एवान्वेति, न तूत्तर-पदार्थमात्रे येन पुरुषावित्यस्यार्थवत्त्व स्यात् । नियमफलमाह–तेनै-त्यादि । नन्वेवमपि मूलकेनोपदशमित्यादौ वाक्यस्य सज्ञा दुर्वारा । कृद्ग्रहणे गतिकारकपूर्वस्यापि ग्रहणात् इति चेन्मैवम्, समासग्रहण-कृतनियमेन परत्वाद् बाधात् । एव च "कृत्तद्धित–" इति सूत्रे कृद्ग्रहणपरिभाषा नोपतिष्ठित एव निष्फलत्वादिति तत्त्वम् ।

वर जें सांगितल आहे ते बरोबर आहे असे मानले तरी, 'दश दाडिमानि' इत्यादि अनर्थक पदसमुदायाला ज्याप्रमाणे (पूर्व सूत्रानें) प्रातिपदिकसज्ञा होऊ शकत नाही त्याचप्रमाणे असमर्थ समासाला ती सज्ञा होऊ शकत नसल्यामुळें, तशा समासाला ती सज्ञा व्हावी याकरिता प्रकृत सूत्रातील 'समास' या पदाचे ग्रहण विध्यर्थक मानले पाहिजे अशी कोणी शका केल्यास, ती शका बरोबर नाहीं, कारण प्रकृत सूत्रात 'अर्थवत्' या पदाची अनुवृत्ति होते हें पूर्वी सांगितले आहे तर मग (असमर्थ समास अनर्थक असल्या-मुळें व अथवान् समासरूप पदसमुदायालाच प्रातिपदिकसज्ञा होऊ शकत असल्यामुळें) असमर्थ समासाला प्रातिपदिकसज्ञा कशी होऊ शकणार असा कोणी प्रश्न केल्यास, त्याला उत्तर हे आहे की, असमर्थसमासरूप धर्माचे ठिकाणी प्रातिपदिकसज्ञारूप धर्म येतो त्याला ('असूर्यललाटयोर्दृशितपो' सू २९५१) हे पाणिनीय सूत्रच प्रमाण आहे 'असूर्यललाटयो' या सूत्रानें 'असूर्य' हा शब्द उपपद असता 'दृश्' धातूहून 'खश्' प्रत्यय होण्याचे विधान केल आहे जें समीप उच्चारलेले असते त्याला उपपद म्हणतात आणि

जें सुबन्त किंवा तिङन्त असते त्याला 'सुप्तिङन्तं पदम्' सू. २९ या सूत्रान्वये पद म्हणतात. (परस्पराशी अर्थामध्यें अन्वित नसणाऱ्या दोन पदाचा जेथें समास केला जातो तेथें तशा समासाला असमर्थ समास म्हणतात 'अश्राद्धभोजिन्, असूर्यपश्या.' इत्यादि असमर्थ-समासाची उदाहरणें होत या वरील उदाहरणात 'नञ्' हा 'श्राद्ध' किंवा 'सूर्य' या शब्दाच्या अर्थाशी संबद्ध नसून क्रियेच्या अर्थाशी अन्वित आहे आणि म्हणूनच 'अश्राद्ध, असूर्य' हे असमर्थसमास ठरतात. 'समर्थ पदविधि' सू ६४७ या सूत्रान्वयें परस्पराशी अर्थामध्यें अन्वित असणाऱ्या पदाचा समास होऊ शकतो व जी पदें परस्पराशी अर्थामध्यें अन्वित नाहीत त्याचा वास्तविक समास होऊ शकत नाही. आणि म्हणूनच तशा समासाला असमर्थसमास म्हणतात व तशा सामासिक शब्दापासून अभिप्रेत असलेल्या इष्ट अर्थाचा बोध होत नसल्यामुळे, तसा समास अर्थरहित ठरतो, व पूर्व सूत्रात 'अर्थवत्' हे पद असल्यामुळे, ज्याप्रमाणे 'दश दाडिमानि, षडपूपा.' इत्यादि पूर्वसूत्रावरील भाष्यात दिलेल्या अनर्थक पदसमुदायाला पूर्वसूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकत नाही त्याचप्रमाणे असमर्थसमासरूप अनर्थक पदसमुदायाला देखील त्या सूत्राने प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकत नाही ती संज्ञा तशा अनर्थक असमर्थ समासाला व्हावी याकरिता प्रकृत सूत्रात 'समास' या पदाचे ग्रहण केले आहे व अशा रीतीनें ते ग्रहण विध्यर्थक ठरते असे शंकाकाराचे म्हणणे आहे. या शंकेवर दीक्षित असे उत्तर देतात की, पूर्वसूत्रातून प्रकृत सूत्रात भाष्यकारानी 'अर्थवत्' या पदाची अनुवृत्ति मानली असल्यामुळे, जशी पूर्वसूत्रानें अनर्थक असमर्थसमासाला प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकत नाही तशीच प्रकृत सूत्राने देखील ती होऊ शकत नाही तशा समासाला प्रातिपदिकसंज्ञा होते हे खरे. पण ती पूर्व सूत्रानें किंवा प्रकृत सूत्रानें होत नसून तशी संज्ञा होण्याला 'असूर्यललाटयो' हे पाणिनीय सूत्र प्रमाण = ज्ञापक आहे 'असूर्य' व 'ललाट' हे शब्द अनुक्रमे कर्मणि उपपद असता, 'दृश्' व 'तप्' या धातूहून

'खश्' प्रत्यय होणें सांगितले आहे. या सूत्रावरील कौमुदीत दीक्षित-म्हणतात – 'असूर्यमित्यसमर्थसमासः । दृशिना नञ- सम्बन्धात् । सूर्यं न पश्यन्तीत्यसूर्यम्पश्या राजदाराः' व काशिकेत देखील असेच म्हटले आहे. वास्तविक 'न सूर्यः असूर्यः = सूर्यभिन्नः' असा 'असूर्य' या नञ्समासाचा विग्रह किंवा अर्थ नसून 'नञ्' हा 'दृश्' धातूस अन्वित होतो व 'सूर्यं न पश्यन्तीत्यसूर्यम्पश्याः' असा खरोखर विग्रह होतो. जरी 'असूर्य' असा असमर्थ समास होऊ शकत नाही तरी ज्याअर्थी तो पाणिनीनें केला आहे त्याअर्थी तो सौत्रसमास साधु मानणें भाग आहे. त्या अनर्थक असमर्थ सामासिकपदाला प्रातिपदिकसंज्ञा व्हावी कशी ? त्याला प्रातिपदिकसंज्ञा झाल्या-शिवाय त्याहून सुबुत्पत्ति होऊ शकत नाही व सुबुत्पत्ति झाल्याशिवाय पदसंज्ञा होऊ शकत नाही. पदसंज्ञा झाल्याशिवाय त्याला 'उपपद' मानता येत नाही. पण पाणिनीनें तर 'असूर्य' हा शब्द 'उपपद' असल्यासच 'दृश्' धातूहून 'खश्' प्रत्यय होणे सांगितले आहे. म्हणून हे विधानच असमर्थसमासाला प्रातिपदिकसंज्ञा होण्यास प्रमाण ठरते, आणि त्यामुळें तशा समासाला प्रातिपदिकसंज्ञा होण्याकरिता प्रकृत सूत्रातील 'समास' या पदाचे ग्रहण विध्यर्थक मानण्याची काही गरज नाही आणि भाष्यकारानी सांगितल्याप्रमाणे ते ग्रहण नियमार्थकच मानणे उचित आहे असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. आता 'समासग्रहण नियमार्थम्' असे जें प्रकृत सूत्रावरील कौमुदीत म्हटले आहे व त्या पक्तीत ज्या नियमाचा उल्लेख केला आहे त्या) नियमाचे स्वरूप 'यत्र सङ्घाते पूर्वो भाग. पद तस्य चेद्भवति तर्हि समासस्यैव' असे प्रकृत सूत्रावरील कौमुदीतील पक्तीत सांगितले आहे. या वरील नियमातील 'पूर्वो भाग· पदम्' हे उपलक्षणात्मक आहे व त्यात 'उत्तरस्तु प्रत्ययो न' याचा देखील समावेश होतो हे जाणावे. तसा समावेश न केल्यास, प्रकृत सूत्रातील 'तद्धित' या पदाचे ग्रहण 'औपगव' इत्यादि शब्दाचे ठिकाणी चरितार्थ होत असल्यामुळें, 'जन्मवान्' इत्यादि

शब्दाना प्रातिपदिकसंज्ञा न होण्याची आपत्ति येईल. ('तदस्यास्ति' सू. १८९४ या सूत्रानें 'जन्मन्' या नकारान्त प्रातिपदिकाहून तद्धित् 'मतुप्' प्रत्यय केला असता, 'स्वादिष्वसर्वनामस्थाने' सू. २३० या सूत्रानें 'जन्मन्' याला पदसंज्ञा होते व त्यामुळेंच 'न लोप प्रातिपदिकान्तस्य' सू. २३६ या सूत्रानें त्यातील अन्त्य नकाराचा लोप होऊन ते पद अदन्त होतें आणि त्यामुळें 'मादु-पधायाश्च' सू १८९७ या सूत्रानें 'मतुप्' प्रत्ययातील मकाराचे जागी वकार होऊन 'जन्म+वतुप्' अशी स्थिति होते. या समु-दायातील 'जन्म' हा पूर्व भाग पदसंज्ञक आहे हें पूर्वी सांगितलेंच आहे 'यत्र सङ्घाते पूर्वो भागः पद समासस्यैव' एवढाच नियम मानल्यास, 'जन्मवत्' हे सामासिक पद नसल्यामुळें, ते तद्धितान्त असून देखील त्याला प्रातिपदिकसंज्ञा न होण्याची आपत्ति येते. यावर कोणी असे म्हणेल की, 'मतुप्' हा तद्धित प्रत्यय असून 'जन्मवत्' या शब्दाच्या अन्तीं तो प्रत्यय असल्यामुळें, 'जन्मवत्' हा शब्द तद्धितान्त ठरतो व त्यामुळें त्याला प्रकृत सूत्रानेंच प्रातिपदिकसंज्ञा होऊं शकते. पण दीक्षित म्हणतात की, हें म्हणणे बरोबर नाहीं, कारण 'उपगो अपत्य पुमान् औपगवः' या स्थली 'तस्या-पत्यम्' सू १०८८ या सूत्रानें अपत्यार्थक 'अण्' प्रत्यय केल्यावर 'उपगु + अण्' या समुदायातील 'उपगु' हा पूर्व भाग पदसंज्ञक नसून 'यचि भम्' सू. २३१ या सूत्रानें भसंज्ञक ठरत असल्यामुळें, अशा ठिकाणी वरील नियम आड न येता 'औपगव' या तद्धितान्ताला प्रातिपदिकसंज्ञा होऊन प्रकृत सूत्रातील 'तद्धित' या पदाचे ग्रहण चरितार्थ ठरूं शकते. म्हणून जेथें समुदायातील पूर्व भाग पद आहे व समुदाय समास नाहीं, म्हणजे सामासिक शब्द नाहीं, तशा ठिकाणी तो समुदाय तद्धितान्त असून देखील त्याला प्रातिपदिकसंज्ञा न होण्याची आपत्ति येते ती आपत्ति टाळण्याकरिता 'यत्र पूर्वो भागः पद उत्तरभागस्तु प्रत्ययो न' असें नियमाचे स्वरूप मानणे आवश्यक आहे. तसें मानलें

असता, 'जन्मवत्' या स्थली 'जन्म' हा पूर्व भाग जरी पदसंज्ञक आहे तरी उत्तरभाग प्रत्यय असल्यामुळें, 'जन्मवत्' हा सामासिक शब्द नसून देखील वरील नियम आड येत नाही व त्या शब्दाला प्रातिपदिकसंज्ञा होते.) वरील नियमात 'पूर्वभागः पदम्' असें जें म्हटलें आहे त्याचें प्रयोजन हें आहे की, 'बहुच्' प्रत्ययविशिष्ट शब्दाला प्रातिपदिकसंज्ञा व्हावी. त्यामुळें 'बहुपटु जस् = बहुपटवः' या समुदायाला (प्रातिपदिकसंज्ञा होते व ती संज्ञा झाल्यावर 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू. ६५० या सूत्रानें) प्रथम 'जस्' या विभक्ति-प्रत्ययाचा लुक् झाला असता, 'बहुपटु' या शब्दाला चित्स्वर होऊन, म्हणजे त्यातील अन्त्य उकार उदात्त होऊन, 'बहुपटु' या प्रातिपदिकाहून पुन्हा 'जस्' प्रत्यय केला असता, ज्यात उपान्त्य स्वर उदात्त आहे असें (इष्टस्वरयुक्त) रूप सिद्ध होते. ('पटु जस्' या सुबन्त समुदायरूप प्रकृतीहून 'विभाषा सुपो बहुच् पुरस्तात्तु' सू. २०२३ या सूत्रानें 'बहुच्' प्रत्यय होऊन तो सुबन्त प्रकृतीच्या पूर्वी होतो आणि 'बहु पटु जस्' अशी स्थिति होते. या समुदायातील 'बहु' हा पूर्वभाग पद नसून प्रत्यय आहे व वरील नियमात 'यत्र पूर्वो भाग. पदम्' हे शब्द असल्यामुळें, हा अर्थवान् समुदाय समास नसून देखील त्याला प्रातिपदिकसंज्ञा होते व 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' या सूत्रानें प्रातिपदिकावयव असलेल्या 'जस्' प्रत्ययाचा लुक् होतो आणि 'बहुपटु' हा प्रातिपदिकसंज्ञक शब्द 'चितः सप्रकृते.' – सू. ३७१० वरील वार्तिक – या वार्तिकान्वयें अन्तोदात्त होतो व त्याहून 'ङ्याप्प्रातिपदिकात्' सू. १८२ या अधिकारसूत्रान्वयें नंतर पुन्हा 'जस् = अस्' प्रत्यय केला असता, 'बहुपटु अस्' या स्थितीत 'जसि च' सू. २४१ या सूत्रानें 'पटु' यातील अन्त्य उकाराचे जागी 'ओ' असा जो गुणादेश होतो तो 'स्थानेऽन्तरतमः' सू. ३९ या सूत्रान्वयें उदात्त होतो आणि त्याचे जागी 'एचोऽयवायावः' सू. ६१ या सूत्रानें 'अव्' आदेश होऊन त्या आदेशातील अकार आन्तरतम्यानें उदात्त होतो. त्यामुळें 'बहु-

पट् अस् = बहुपटो अस् = बहुपटव ' असे जें रूप होते त्यात टकारापुढील अकार उदात्त होतो व इष्ट मध्योदात्तस्वरयुक्त रूप सिद्ध होते. 'यत्र पूर्वो भाग पदम्' हे शब्द जर वरील नियमात नसते तर 'पटु जस्' या सुबन्त प्रकृतीहून झालेला 'बहुच्' प्रत्यय प्रकृतीच्या पूर्वी होत असून पदसंज्ञक नसल्यामुळें व समुदाय तद्धितान्त मानता येत नसल्यामुळें व तसेंच समुदाय समास नसल्यामुळे, त्याला प्रातिपदिकसंज्ञा होऊं शकली नसती व 'जस्' प्रत्ययाचा लुक् झाला नसता आणि त्यामुळें 'पटु जस्' ही बहुच्प्रत्ययाची सुबन्त प्रकृती 'चित सप्रकृते' या वार्तिकानें अन्तोदात्त होऊन 'बहुपटव' यातील वकारापुढील अकार उदात्त होण्याची, म्हणजेच ते रूप अन्तोदात्त होण्याची, आपत्ति आली असती.) अथवा ज्या समुदायातील अवयवाचा परस्पराशी प्रकृतिप्रत्ययभावरूप संबंध नाही तसा समुदाय समास असल्यासच त्याला प्रातिपदिकसंज्ञा होते असे नियमाचे स्वरूप मानावे, म्हणजे 'प्रकृतिप्रत्ययभावानापन्नसङ्घातस्य चेत् प्रातिपदिकसंज्ञा तर्हि समासस्यैव' असे नियमाचे स्वरूप मानावे. (असा नियम मानल्यास, ज्या समुदायातील अवयवामध्यें प्रकृतिप्रत्ययभावरूप संबंध आहे अशा समुदायाला तो नियम लागू शकत नाही. म्हणून 'जन्म + मतुप्' या स्थली प्रकृतिप्रत्ययघटित समुदाय असून तो अर्थवान् असल्यामुळें, त्याला प्रातिपदिकसंज्ञा होते त्याचप्रमाणे 'बहु पटु जस्' हा प्रकृतिप्रत्ययघटित समुदाय असून अर्थवान् असल्यामुळें, त्याला प्रातिपदिकसंज्ञा होण्यात काही अडचण येत नाही ). आद्य पक्ष मानल्यास, म्हणजे 'यत्र पूर्वो भाग पदम् उत्तरभागस्तु प्रत्ययो न' असे जर नियमाचे स्वरूप मानले तर, त्या पक्षात 'राजपुरुषौ' इत्यादि स्थली 'पुरुषौ' इत्यादि शब्दाना प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति येते असे कोणी म्हटल्यास, ते म्हणणे बरोबर नाहीं, कारण अर्थवत्त्व या कारणामुळेंच त्या संज्ञेचे निवारण करता येते. 'औ' या प्रत्ययाचा अर्थ 'राजपुरुष' या संपूर्ण समुदायाच्या अर्थाशी अन्वित होत असून केवळ 'पुरुष' या उत्तर

पदाशी अन्वित होत नसल्यामुळें, 'पुरुषौ' याचे ठिकाणी अर्थवत्ता येऊं शकत नाही. (राज्ञः पुरुषौ राजपुरुषौ = राजन् ङस् पुरुष औ औ' या स्थली 'सुपो धातुप्रातिपदिकयो:' सू. ६५० या सूत्रानें प्रातिपदिकावयव 'ङस्' व प्रथम 'औ' या अन्तर्वर्तिविभक्ति-प्रत्ययाचा लुक् झाल्यावर 'राजपुरुष' या सामासिक प्रातिपदिक-संज्ञक शब्दाहून नंतर 'औ' प्रत्यय केला असता, 'राजपुरुष औ' या स्थितीत 'राजपुरुष' या सामासिक शब्दातील 'पुरुष' या उत्तर पदाला, ज्या अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाचा लुक् झाला आहे तो प्रत्ययलक्षणानें विद्यमान आहे असे मानून, पदसंज्ञा करता येत नाही; कारण 'उत्तरपदत्वे चापदादिविधौ प्रतिषेधः' सू. ४४२ वरील वार्तिक—असें प्रत्ययलक्षणाचें प्रतिषेधक वार्तिक आहे, व मागें सांगितल्याप्रमाणे त्या वार्तिकाचा असा अर्थ आहे की, समासातील उत्तर खंडाला पदसंज्ञा करणे असल्यास, ज्या अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाचा लुक् झाला आहे तो प्रत्ययलक्षणानें विद्यमान आहे असे मानून 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' या सूत्रान्वयें पदसंज्ञा करता येत नाही, पण पदादिविधि करणे असल्यासच, तशा रीतीनें पदसंज्ञा करता येते. वरील वार्तिकान्वयें 'राजपुरुषौ' या सामासिक पदातील 'पुरुष' हा उत्तरखण्ड पदसंज्ञक ठरत नाही. 'पुरुषौ=पुरुष औ' हा समुदाय असा आहे की, यातील पूर्व भाग 'पुरुष' हा पदसंज्ञक नाही व उत्तर भाग 'औ' हा 'राजपुरुष' या समुदायाहून झालेला प्रत्यय असून केवळ 'पुरुष' या शब्दाहून झालेला प्रत्यय नाही आणि त्यामुळें, 'राजपुरुषौ' या समुदायातील 'पुरुषौ' हा शब्द प्रत्ययान्त नसून अर्थवान् असल्यामुळें त्याला प्रातिपदिकसंज्ञा का होऊ नये अशी शंकाकाराची शंका आहे. या शंकेवर दीक्षित असे उत्तर देतात की, 'राजपुरुषौ' हा संपूर्ण सामासिक शब्द जरी अर्थवान् आहे तरी त्यातील अवयव 'पुरुषौ' अर्थवान् नाही वर सांगितल्याप्रमाणे अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाचा लुक् झाल्यावर जो नंतर 'औ' प्रत्यय केला जातो तो 'राजपुरुष'

या संपूर्ण समुदायाहून केला जातो, केवळ 'पुरुष' या अवयवाहून केला जात नाहीं त्यामुळें 'औ' या प्रत्ययाचा अर्थ 'राजपुरुष' या संपूर्ण समुदायाच्या अर्थाशी अन्वित होत असून 'पुरुष' या शब्दाच्या अर्थाशी अन्वित होत नसल्यामुळें, 'पुरुषौ' हा वरील समुदायातील शब्द अर्थवान् ठरत नाही आणि त्यामुळें त्याला प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकत नाही ) तेन वाक्यस्य न' असे जें प्रकृत सूत्रावरील कौमुदीत म्हटले आहे ते वरील नियमाचें फल होय, म्हणजे ते वरील नियमान्वयें सिद्ध होते (कारण वाक्यातील पदामध्यें प्रकृतिप्रत्ययभावरूप संबंध नसतो किंवा पूर्वभाग पद व उत्तरभाग प्रत्यय अशी स्थिति नसते, आणि 'प्रत्ययग्रहणे यस्मात्सविहितस्तदादे' या परिभाषान्वयें जरी वाक्य प्रत्ययान्त ठरत नाही व ते अर्थवान पदाचा समुदाय असून स्वतः अर्थवान् असले तरी, 'अर्थवत्समुदायस्य चेत् प्रातिपदिकसंज्ञा तर्हि समासस्यैव' असा प्रकृत सूत्रातील 'समास' ग्रहणानें नियम सिद्ध होत असल्यामुळे, वाक्याला प्रातिपदिकसंज्ञा होत नाही त्याला अथवान् असल्यामुळें प्रातिपदिकसंज्ञा झाली असती तर त्यातील सर्व सुबन्तपदापुढील विभक्तिप्रत्ययाचा 'सुपो धातुप्रातिपदिकयो' सू ६५० या सूत्रानें लुक् होण्याची आपत्ति आली असती हे पूर्वी सांगितलेच आहे ) असें आहे तरी, म्हणजे वरील नियमान्वयें वाक्याला प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकत नाही तरी, 'कृद्ग्रहणे गतिकारकपूर्वस्यापि ग्रहणम्'–परि २८–ही परिभाषा असल्यामुळे, 'मूलकेनोपदंशम्' इत्यादि वाक्याना प्रातिपदिकसंज्ञा होणे टाळता येणे शक्य नाही अशी कोणी शंका केल्यास, ती शंका बरोबर नाही, कारण प्रकृत सूत्रात जें 'समास' या पदाचे ग्रहण केले आहे ते पर असल्यामुळें, त्याहून निष्पन्न होणाऱ्या नियमानें 'मूलकेनोपदंशम्' इत्यादि कृदन्त समुदायाचे ठिकाणी प्रातिपदिकसंज्ञा परत्वामुळें बाधित होते ('कृत्तद्धितसमासाश्च' या प्रकृत सूत्रात 'कृत्' या पदाचे ग्रहण प्रथम केले असून

नियमान्वयें तिची प्रवृत्ति वर सांगितल्याप्रमाणे बाधित होत असल्यामुळें, ती तशा ठिकाणीं प्रवृत्त होऊं शकत नाही. इतर स्थली कृद्ग्रहणानें किंवा 'समास' ग्रहणानेंच नुकतेंच वर सांगितल्याप्रमाणें प्रातिपदिकसंज्ञा होत असल्यामुळें, कृदन्ताला प्रातिपदिकसंज्ञा होण्याकरितां ती परिभाषा प्रवृत्त करण्याची केव्हांहि गरज पडत नाहीं )

मनोरमा– यत्तु वदन्ति – समासग्रहणं न नियमार्थं किं तु विध्यर्थमेव । अर्थवत्त्वं हि वृत्तिमत्त्वम् । वृत्तिश्च द्विधा । शक्ति-र्लक्षणा च । न च सा समासेऽस्तीति । अत्रेदं वक्तव्यम् । सिद्धान्ते तावदेकार्थीभावाभ्युपगमाद्वृत्तिर्नास्तीति बाधितमेव । मीमांसक-मतेऽपि लक्षणाऽस्त्येव । यदाहुः–

सर्वत्रैव हि वाक्यार्थो लक्ष्य एवेति च स्थितम् ।। इति ।

अथ नैयायिकरीत्योच्येत । तदपि न । बहुपटव इत्याद्यसिद्धेः । तद्धितग्रहणं तद्धिशिष्टपरमिति चेन्न, पचतकीत्याद्यव्याप्तेः । किं चैवं कृद्ग्रहणपरिभाषया मूलकेनोपदंशमित्याद्यव्याप्तिर्दुर्वारैवेत्यास्तां तावत् । चकारोऽनुक्तसमुच्चयार्थः । तेन "निपातस्यानर्थकस्य प्रातिपदिकसंज्ञा वक्तव्या" इति गतार्थम् । येषां द्योत्योऽप्यर्थो नास्ति तदर्थमिदम् । अवदाति । अनुकरणेषु तु अनुकार्येण सहाभेद-विवक्षायामर्थवत्त्वाभावादेव प्रातिपदिकत्वम् । "भू सत्तायाम्" इति यथा । भेदविवक्षाया तु संज्ञा स्यादेव । "भुवो–वुक्" इति यथा ।

प्रकाशकाराचें असें म्हणणें आहे की, प्रकृत सूत्रांतील 'समास' या पदाचें ग्रहण नियमार्थ नसून विध्यर्थच आहे, कारण वृत्तिमत्व हेंच अर्थवत्व होय, म्हणजे ज्या शब्दाचे ठिकाणीं अभिधावृत्तीनें किंवा लक्षणावृत्तीनें अर्थबोध करण्याचें सामर्थ्य आहे तशाच शब्दाला अर्थवान् शब्द म्हणतात. वृत्ति दोन प्रकारची आहे. (१) शक्ति, म्हणजे अभिधाशक्ति, व (२) लक्षणा. या दोन्ही वृत्तींपैकीं

कोणतीहि वृत्ति समासाचे ठिकाणीं नसते, म्हणजे या दोन वृत्तींपैकीं कोणत्याहि वृत्तीनें सामासिक पदाच्या अर्थाचा बोध होत नसतो. यावर असें उत्तर आहे कीं, सिद्धान्तपक्षात एकार्थीभाव मानला असल्यामुळें, म्हणजे समासघटक पदें आपापला भिन्न अर्थ न सांगता परस्परान्वित व एकार्थीभावापन्न होऊन समुदायशक्तीनें एकच अर्थ सांगतात असा सिद्धान्त मानला असल्यामुळें, समासाचे ठिकाणीं वृत्तिमत्त्व नसणें हें म्हणणें बाधित होतें – म्हणजे त्या सिद्धान्तान्वयें चूक ठरतें. मीमांसकांच्या मतें देखील समासाचे ठिकाणीं लक्षणारूप वृत्तिमत्त्व असतेंच, कारण ते म्हणतात – 'सर्व-त्रैव हि वाक्यार्थो लक्ष्य एवेति च स्थितम्,' म्हणजे सर्वत्र वाक्यार्थाचा बोध लक्षणावृत्तीनेंच होत असतो असा सिद्धान्त आहे. प्रकाशकाराचें म्हणणें जर नैयायिकांच्या मताला धरून असलें तरी देखील तें म्हणणें ग्राह्य ठरत नाहीं, कारण त्याचें म्हणणें बरोबर मानल्यास, 'बहुपटवः' इत्यादि स्थलीं इष्टसिद्धि होणार नाहीं, म्हणजे इष्ट प्रातिपदिकसंज्ञा होऊं शकणार नाहीं. (नैयायिकांचें मत असें आहे कीं, केवळ पदांच्याच ठिकाणीं अभिधावृत्तीनें किंवा लक्षणावृत्तीनें अर्थाचा बोध करण्याचें सामर्थ्य असतें. तसें सामर्थ्य वाक्यांत किंवा समासांत नसतें. सारांश त्यांच्या मतें पदेंच केवळ अर्थवान् आहेत व तीं वाक्यघटित किंवा समासघटित पदें ज्या अर्थाचा बोध करितात तोच वाक्यार्थ किंवा सामासिक पदाचा अर्थ होय, म्हणजे वाक्यार्थ किंवा सामासिक पदाचा अर्थ हा त्या वाक्यांतील किंवा समासांतील पदांच्या अर्थाहून भिन्न नसून सर्व पदांचा जो अर्थ आहे तोच वाक्यार्थ किंवा समासार्थ होय. मीमांसक म्हणतात कीं, वाक्यांत किंवा समासांत लक्षणावृत्तीनें अर्थाचा बोध करण्याचें सामर्थ्य असतें. वैयाकरणांच्या मतें वाक्यांत किंवा समासांत आणि तसेच कृदन्त व तद्धितान्त यांत अभिधारूप समुदायशक्तीनेंच अर्थबोध करण्याचें सामर्थ्य असतें. प्रकाशकारानें नैयायिकांच्या मताला अनु-सरून आहे तें बरोबर मानल्यास, 'बहु पटु नस्' हा

पदसंज्ञक नसल्यामुळें त्याचे ठिकाणी अर्थबोध करण्याचे सामर्थ्य नाही असे मानावे लागेल व अशा रीतीनें तो समुदाय अर्थवान् ठरत नसल्यामुळें व तसेच तद्धितान्त देखील नसल्यामुळें, त्याला प्रातिपदिकसंज्ञा न होण्याची व त्यामुळें त्याहून सुबुत्पत्ति न होण्याची आणि 'बहुपटवः' असे इष्ट पदसंज्ञक रूप सिद्ध न होण्याची आपत्ति येते.) प्रकृत सूत्रातील 'तद्धित' या पदाच्या ग्रहणानें (केवळ तद्धितान्ताचेच ग्रहण होत नसून) तद्धितप्रत्ययविशिष्ट शब्दस्वरूपाचें देखील ग्रहण होते (व त्यामुळें 'बहु पटु जस्' हा समुदाय जरी तद्धितान्त नाही तरी तद्धितप्रत्ययविशिष्ट असल्यामुळें, प्रकृत सूत्रातील 'तद्धित' या शब्दानें त्याचें ग्रहण होऊन त्याला प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकते ) असे प्रकाशकाराचे म्हणणे असल्यास, ते म्हणणे बरोबर नाहीं, कारण ते म्हणणे बरोबर मानल्यास, 'पचतकि' इत्यादि स्थली अतिव्याप्तिरूप दोष येतो, म्हणजे प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति येते ( 'अव्ययसर्वनाम्नामकच् प्राक् टेः' सू २०२६ या सूत्रात 'तिङश्च' सू. २००२ या सूत्राची अनुवृत्ति होत असल्यामुळें, 'पचति' या तिङन्ताहून 'टि' चे पूर्वी, म्हणजे अन्त्य इकाराचे पूर्वी, 'अकच् = अक्' प्रत्यय होऊन 'पचतकि' असे रूप होतें. 'पचतकि' हा समुदाय 'अकच्' या तद्धित प्रत्ययानें युक्त आहे, म्हणजे तो तद्धितान्त नाही तरी तद्धितप्रत्ययविशिष्ट आहे, व प्रकृत सूत्रातील 'तद्धित' या शब्दानें केवळ तद्धितान्ताचेंच ग्रहण न होता तद्धितप्रत्ययविशिष्टाचे देखील ग्रहण होते असे मानले तर, प्रकृत सूत्रानें 'पचतकि' याला प्रातिपदिकसंज्ञा होण्याची व त्याहून सुबुत्पत्ति होण्याची आपत्ति येईल.) दुसरे असे की, (प्रकृत सूत्रातील 'तद्धित' या शब्दानें तद्धितप्रत्ययविशिष्टाचे ग्रहण होतें असे मानले तर, या सूत्रातील 'कृत्' ,या शब्दानें कृत्प्रत्ययविशिष्टाचे ग्रहण' होते असे देखील मानावे लागेल व तसे मानल्यास) 'कृद्ग्रहणे'- परि. २८—या परिभाषान्वयें 'मूलकेनोपदंशम्' इत्यादि कृत्प्रत्ययविशिष्ट समुदायाला प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति टाळता येऊ

शकणार नाही. ('मूलकेनोपदंशम्' या कृत्प्रत्ययविशिष्ट समुदायाला प्रातिपदिकसंज्ञा झाल्यास, 'मूलकेन' यातील 'टा = इन' या विभक्तिप्रत्ययाचा लुक् होण्याची व समुदायाहून सुबुत्पत्ति होण्याची आपत्ति येते हे पूर्वी सांगितलेच आहे. प्रकृत सूत्रातील 'समास' या पदाचे ग्रहण नियमार्थ मानल्याने ती आपत्ति टळते. म्हणून प्रकृत सूत्रातील 'समास' या पदाचे ग्रहण जसे प्रकाशकार विध्यर्थक मानतात तसे न मानता ते नियमार्थकच मानणे उचित आहे असा दीक्षितांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे ) या विषयाचे एवढे विवेचन पुरे. या प्रकरणात ज्यांचा निर्देश केला नाही त्यांचे देखील ग्रहण व्हावे, म्हणजे त्यांना देखील प्रातिपदिकसंज्ञा व्हावी, याकरिता प्रकृत सूत्रात 'च' हे पद घातले आहे त्यामुळे 'निपातस्यानर्थकस्य प्रातिपदिकसंज्ञा वक्तव्या' हे वार्तिक गतार्थ – अनावश्यक – ठरते ज्या निपाताचे ठिकाणी द्योत्य अर्थ देखील नाही त्याच्याकरिता, म्हणजे तशा अनर्थक निपातांना प्रातिपदिकसंज्ञा व्हावी याकरिता, हे वरील वार्तिक पठित केले आहे. उदाहरणार्थ 'अवद्यति.' (मागील सूत्रावरील भाष्यात 'निपातस्यानर्थकस्य प्रातिपदिकत्वम्' हे वार्तिक पठित करून त्याचे व्याख्यान करिताना. भाष्यकार म्हणतात–'निपातस्यानर्थकस्य प्रातिपदिकसंज्ञा वक्तव्या । खञ्जति निखञ्जति । लम्बते प्रलम्बते । किं पुनरत्र प्रातिपदिकसंज्ञया प्रार्थ्यते ? । प्रातिपदिकादिति स्वाद्युत्पत्तिः । सुबन्तं पदमिति पदसंज्ञा । पदस्य पदादिति निघातो यथा स्यात् ।' या वरील भाष्यातील 'अनर्थकस्य' हे प्रतीक घेऊन कैयटाने 'निपातानां द्योतकत्वादभिधेयार्थाभावेऽपि द्योत्यार्थसद्भावात् येषामर्थवत्त्वं तेषां सिद्धयत्येव संज्ञा । यस्य तु द्योत्योऽप्यर्थो नास्ति तदर्थं वचनम् ।' असे म्हटले आहे व याचाच अनुवाद दीक्षितांनी मनोरमेत केला आहे. परंतु पुढे ते म्हणतात की, प्रकृत सूत्रातील 'च' ने अशा द्योत्यार्थरहित निपाताचे ग्रहण करता येत असल्यामुळे, वरील वार्तिक मानण्याची काही गरज नाही. 'अवद्यति' हे जे उदाहरण मनोरमेत

दीक्षितानी दिले आहे त्यातील 'अव' हा निपात द्योत्यार्थरहित असून अनर्थक आहे व त्या उदाहरणात 'द्यति' हेच अर्थवान् असून 'अव' हे अनर्थक असल्यामुळें त्याला पूर्व सूत्रानें जी प्रातिपदिकसंज्ञा प्राप्त नव्हती ती प्रकृत सूत्रानें होऊन त्याहून सुबुत्पत्ति होते, व 'स्वरादिनिपातमव्ययम्' सू. ४४७ या सूत्रान्वये 'अव' हा निपात अव्ययसंज्ञक ठरत असल्यामुळे जरी 'अव्ययादाप्सुपः' सू. ४५२ या सूत्राने त्याहून होणाऱ्या औत्सर्गिक 'सु' प्रत्ययाचा, लुक् होतो तरी, प्रत्ययलक्षणानें 'अव' याला पदसंज्ञा होते आणि त्यामुळें 'सुबन्तं समर्थेन समस्यते' या नियमान्वयें त्याचा 'द्यति' या तिङन्ताशी समास होतो आणि तिङन्ताला 'तिङ्ङतिङः' सू. ३९३५ या सूत्रानें निघातस्वर होतो.) अनुकरणाच्या विषयात (हे लक्षात ठेवावे की,) जेथें अनुकार्य व अनुकरण या दोहोंमध्यें अभेदविवक्षा असते तेथें अनुकरणाचे ठिकाणी अर्थवत्त्व नसल्यामुळेंच अनुकरणाला प्रातिपदिकसंज्ञा होत नाही. उदाहरणार्थ 'भू सत्तायाम्.' पण जेथे त्या दोहोंमध्यें भेदविवक्षा असते तेथें अनुकरणाला प्रातिपदिकसंज्ञा होतेच. उदाहरणार्थ 'भुवो वुक्' सू. २१७४. (जेथे अनुकरण व अनुकार्य या दोहोंमध्ये अभेदविवक्षा असते तेथे अनुकरण अर्थरहित असते हे पूर्वी सांगितलेच आहे. म्हणून त्या पक्षात अनर्थक अनुकरणाला प्रातिपदिकसंज्ञा होत नाही. 'भू सत्तायाम्' या धातुपाठातील निर्देशात मूळ धातु जो 'भू' त्याचे अनुकरण अभेदविवक्षा मानून केले आहे. त्यामुळें 'भू' या अनुकरणाला प्रातिपदिकसंज्ञा होत नाही व त्याहून सुबुत्पत्ति होत नाही आणि म्हणूनच धातुपाठात 'भू' असा विभक्तिप्रत्ययरहित निर्देश केला आहे. येथें जर भेदविवक्षा असती तर 'भू' या अनुकरणाला प्रातिपदिकसंज्ञा होऊन त्याहून सुबुत्पत्ति झाली असती व 'भूः सत्तायाम्' असा धातुपाठात निर्देश केला असता. 'भुवो वुक्' या सूत्रात मूळ 'भू' धातूचे सूत्रनिर्दिष्ट 'भू' हें अनुकरण असून दोहोंमध्यें भेदविवक्षा असल्यामुळें, अनुकरण अर्थवान् ठरते व

त्यामुळें त्याला प्रातिपदिकसंज्ञा होऊन त्याहून षष्ठीच्या एक-वचनाचा प्रत्यय केला आहे. सारांश वरील पाणिनीय निर्देशावरूनच हें स्पष्ट होतें की, अभेदानुकरणपक्षांत अनुकरणाला अर्थवत्वाच्या अभावामुळें प्रातिपदिकसंज्ञा होत नाहीं व भेदानुकरणपक्षांत अनु-करण अर्थवान् असल्यामुळें, त्याला प्रातिपदिकसंज्ञा होऊन त्याहून सुबुत्पत्ति होते.)

शब्दरत्न—तत्सामर्थ्यादिति । अन्यथा संज्ञाविधित्वान्न स्यात् । न प्रत्ययमात्रेणेति । प्रकृतेरपेक्षणादिति भावः । अर्थानुवृत्तौ । कर्तृरूपार्थस्याधिकस्य भानेऽपि क्रियावाचकत्वाक्षत्या धातुत्वाक्षतेरिति भावः । स्त्रीप्रत्यये इति । अनुपसर्जनस्त्रीप्रत्यय इत्यर्थः । तस्य येन केनापि रूपेण ग्रहणे तन्निषेध इत्यभिमानः शङ्कितुः । राजकुमारीति । नन्वत्र प्रातिपदिकत्वस्य न फलं लिङ्गविशिष्टपरिभाषयैव तत्कार्य-सिद्धेरिति चेन्न । प्रातिपदिकत्वतद्व्याप्यधर्माणां लिङ्गप्रत्ययरहिते दृष्टाना तद्विशिष्टेऽप्यतिदेशेन तस्या अप्रवृत्तेः । न हि ङ्याब्र-हिते राजकुमारेत्यादौ तदस्ति, ङ्याब्ग्रहणं त्वन्यार्थमिति वक्ष्यते । शङ्किताभिमानानुसारेणोत्तरयति—अन्तरङ्गत्वापीति । सुलनत्वा-दिति । यथोद्देशे इदम् । यदि त्वस्य निषेधस्य प्रत्ययग्रहणपरिभाषा-शेषत्वं एव च यथा सा प्रत्ययग्रहणे एव न तु प्रत्ययाप्रत्ययग्रहणे इति "उगितश्च" इति सूत्रे भाष्ये स्पष्टं, तथास्य निषेधोऽपि स्त्रीप्रत्ययमात्रग्रहणे न तु स्त्रीप्रत्ययास्त्रीप्रत्ययग्रहणे इत्युच्यते तदा न दोषः, समुदायस्य प्रत्ययान्तत्वाभावादिति दिक् ।

'तत्सामर्थ्यात्तदन्तविधिः' असे जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे की, प्रकृत सूत्रांत 'अर्थवत्' या पदाची अनुवृत्ति मानली नसती तर ('संज्ञाविधौ प्रत्ययग्रहणे तदन्तग्रहणं नास्ति'—परि. २७ ही परिभाषा असल्यामुळें व) प्रकृत सूत्र प्रातिपदिकसंज्ञाविधायक सूत्र असल्यामुळें, तदन्तविधि होऊं शकला नसता (व त्यामुळें प्रकृत सूत्रांतील 'कृत्' व 'तद्धित'

याचा कृदन्त व तद्धितान्त असा अर्थ होऊ शकला नसता, पण प्रकृत सूत्रात 'अर्थवत्' या पदाची अनुवृत्ति असल्यामुळें आणि कृत् प्रत्यय व तद्धित प्रत्यय यात लौकिकी प्रशस्त अर्थवत्ता नसून ती कृदन्त व तद्धितान्त यात असल्यामुळें, त्या अनुवृत्तीच्या सामर्थ्यानें तदन्तविधि होऊन कृत् व तद्धित या पदाचा कृदन्त व तद्धितान्त असा तदन्तविधीनें अर्थ सिद्ध होतो ) 'न प्रत्ययमात्रेणार्थपर्यवसानम्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, (प्रत्ययाला अर्थबोध करण्याकरिता विभक्तिप्रत्ययाहून भिन्न अशा) प्रकृतीची अपेक्षा असते (सारांश केवळ प्रत्यय हा लौकिक प्रशस्त अर्थाचा बोध करू शकत नाही तो प्रकृतीशी युक्त झाला असताच प्रकृतिप्रत्ययसमुदायाचे ठिकाणी लौकिकी प्रशस्त अर्थवत्ता येते, आणि मागील सूत्रावरील शब्दरत्नात सांगितल्याप्रमाणे त्या सूत्रातील 'अर्थवत्' या पदाचा व प्रकृत सूत्रात अनुवृत्त होणाऱ्या त्या पदाचा 'विभक्तीतरानपेक्षयाऽर्थबोधकत्वमर्थवत्वम्' असा अर्थ असल्यामुळें, कृत् प्रत्यय व तद्धित प्रत्यय हे प्रशस्तार्थवत्त्वाभावामुळें अनर्थक ठरतात व त्याना प्रातिपदिकसंज्ञा होत नाही. परंतु कृदन्त व तद्धितान्त हे प्रशस्तार्थवान् असल्यामुळें, त्याना ती संज्ञा होते ) 'लिट्, धुक् इत्यादी अधातु इति पर्युदासे प्राप्ते' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, जरी ('लिह्, दुह्' या धातूहून कर्तरि क्विप् प्रत्यय झाला असल्यामुळें) 'लिट्, धुक्' या शब्दाहून 'कर्ता' या अधिक अर्थाचा बोध होतो तरी, त्या धातूचे क्रियावाचकत्व नष्ट होत नसल्यामुळें, त्याना धातु मानता येते (शकाकाराची शंका अशी आहे की, 'लिट्, धुक्' या शब्दाहून केवळ क्रियेचा प्राधान्यानें बोध होत नसून, 'लिह्, दुह्' या धातूहून कर्तरि क्विप् प्रत्यय केला असल्याकारणानें त्या शब्दाहून कर्त्याचा प्राधान्यानें बोध होतो व जरी क्रियेचा बोध होतो तरी तो कर्तृविशिष्ट क्रिया अशा रीतीनें गौणरूपानें बोध होतो आणि म्हणून 'लिट्, धुक्' याना धातुसंज्ञेची

प्राप्तीच होत नाहीं. या शंकेवर हें उत्तर आहे की, 'भूवादयो धातवः' सू. १८ या धातुसंज्ञाविधायक सूत्रांत केवळ क्रियेचा वाचक असणाऱ्या किंवा प्राधान्यानें क्रियेचा वाचक असणाऱ्या शब्दालाच धातुसंज्ञा व्हावी असें सांगितलें नसल्यामुळें, 'लिट्, धुक्' या शब्दांनी जरी केवळ क्रियेचा किंवा प्राधान्यानें क्रियेचा बोध होत नाहीं व कर्तृविशिष्टक्रियेचा बोध होतो तरी, त्याहून क्रियेचाहि बोध होत असल्यामुळें, त्यांचें धातुत्व नष्ट होत नाहीं, आणि म्हणूनच 'अरवसन्तस्य चाधातोः' सू. ४२९ या सूत्रांतील 'अधातोः' हा पर्युदास सार्थक व योग्य ठरतो. सारांश 'लिट्, धुक्' याचे ठिकाणीं क्रियावाचकत्व असल्यामुळें, पूर्व सूत्रांतील 'अधातुः' या पर्युदासान्वयें त्यांना जी पूर्वसूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा होऊं शकत नव्हती ती त्यांना, ते शब्द कृदन्त असल्यामुळें, प्रकृत सूत्रानें होते.) मनोरमेंतील 'स्त्रीप्रत्यये' या पदाचा 'अनुपसर्जनस्त्रीप्रत्यये,' म्हणजे जेथें स्त्रीप्रत्यय प्रधान आहे तशा ठिकाणीं, असा अर्थ आहे. शंकाकारानें मनोरमेंत जी शंका उपस्थित केली आहे ती असें मानून केली आहे की, कोणत्याहि रूपानें स्त्रीप्रत्ययाचें ग्रहण होऊं शकत असल्यास तदादि नियम लागू पडत नाहीं. 'राजकुमारी' या सामासिक शब्दाला प्रकृत सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा केल्यानें कोणतेंहि (अधिक) फल लाभत नाहीं, कारण ('प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणम्'–परि. ७२-या) लिङ्गविशिष्टपरिभाषान्वयेंच प्रातिपदिकाला पावलेलीं कार्यें त्या स्त्रीप्रत्ययविशिष्ट शब्दाला होऊं शकतात असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण लिङ्गबोधकप्रत्ययरहित शब्दाचे ठिकाणीं जें प्रातिपदिकत्व असतें व प्रातिपदिकाचे ठिकाणीं राहणारे धर्म असतात त्यांचा लिङ्गबोधकप्रत्ययुक्त त्या शब्दाचे ठिकाणी त्या परिभाषान्वयें अतिदेश करतां येत असल्यामुळें, प्रकृत स्थलीं, म्हणजे 'राजकुमारी' या उदाहरणांत, ती परिभाषा प्रवृत्त होऊं शकत नाहीं. 'ङीप्' प्रत्ययरहित 'राजकुमार' इत्यादि

शब्दाचे ठिकाणी प्रातिपदिकत्व धर्म नाही. ( 'ङ्याप्प्रातिपदिकात्' सू १८२ या सूत्रात जें ) 'ङी, आप्' याचे ग्रहण केले आहे ते इतर प्रयोजनाकरिता केले आहे हें पुढें सागण्यात येईल. शंकाकाराने आपली शंका ज्या परिभाषेच्या आधारावर उपस्थित केली आहे ती परिभाषा, म्हणजे 'स्त्रीप्रत्यये चानुपसर्जने न' ही परिभाषा, 'राजकुमारी' या उदाहरणास लागू पडते असे गृहीत धरून दीक्षितांनी त्या शंकेचें 'अन्तरङ्गस्यापि ··· सुलभत्वात्' या मनोरमेंतील पक्तीत उत्तर दिले आहे. त्या पक्तींत 'सुलभत्वात्' इत्यादि जें म्हटले आहे ते यथोद्देशपक्षाला धरून म्हटले आहे ( कारण यथोद्देशपक्षात एकदा प्रातिपदिकसंज्ञा झाली असता, पुढें इतर कार्य करतेवेळी ती संज्ञा कायम राहत असल्यामुळें, तिच्या बलावर पुढें प्राप्त होणारी इतर कार्यें करता येतात परंतु कार्यकालपक्षात प्राप्त झालेले कार्य केल्यावर त्या कार्याकरिता केलेली संज्ञा नाहीशी होते व पुढें इतर कार्य प्राप्त झाल्यास, त्या संज्ञेचा उपयोग करता येत नाही व ती कार्यें करण्याकरिता पुन्हा संज्ञा प्राप्त करावी लागते म्हणून 'राजन् ङस् कुमारी सु' या स्थली 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू ६५० या सूत्राने अन्तर्वर्ति विभक्तिप्रत्ययाचा लुक् करतेवेळी यथोद्देशपक्षात त्या समुदायाला जी प्रातिपदिकसंज्ञा होते ती अन्तर्वर्ति विभक्तिप्रत्ययाचा लुक् केल्यानंतर देखील पुढें समुदायाहून सुबुत्पत्ति करतेवेळीं कायम राहते. परंतु कार्यकालपक्षात अन्तर्वर्ति विभक्तिप्रत्ययाचा लुक् होण्याकरिता केलेली प्रातिपदिकसंज्ञा ते लुक्कार्य केल्यावर नाहीशी होत असल्यामुळें, नंतर समुदायाहून सुबुत्पत्ति करतेवेळी पुन्हा प्रातिपदिकसंज्ञा प्राप्त करून देण्याची गरज पडतेच म्हणून 'राजन् ङस् कुमारी सु' या स्थली सुब्लुक् झाल्यावर जशी 'राजकुमारी' या समुदायाला एकदेशविकृतन्यायानें प्रातिपदिकसंज्ञा यथोद्देशपक्षांत प्राप्त करून देता येते तशी ती संज्ञा कार्यकालपक्षात करून देता येत नसल्यामुळें व त्या पक्षात पुन्हा प्रातिपदिकसंज्ञा करण्याची गरज पडत असल्यामुळें,

चकाराच्या शंकेवर दीक्षितांनी जें उत्तर दिले आहे व म्हटले आहे की, समुदायाला प्रातिपदिकसंज्ञा सहज प्राप्त करून देता येते ते म्हणणे कार्यकालपक्षात संभवत नसून यथोद्देशपक्षावच संभवतें आणि म्हणूनच 'यथोद्देशपक्षे इदम्' असे शब्दरत्नात म्हटले आहे.)
जर 'स्त्रीप्रत्यये' – परि. २६ – ही परिभाषा 'प्रत्ययग्रहणे' – परि. २३ – या परिभाषेची शेष, म्हणजे पूरक, परिभाषा आहे असे मानले व त्याप्रमाणे प्रत्ययग्रहणपरिभाषा ही जेथें साक्षात् प्रत्ययाचें ग्रहण केले आहे अशाच ठिकाणी लागू पडते व जेथें अशा शब्दाचें ग्रहण केले आहे की, ज्यानें प्रत्यय व प्रत्ययभिन्न या दोहोंचेंहि ग्रहण होतें अशा ठिकाणी ती परिभाषा लागू पडत नाही असे 'उगितश्च' सू. ४·१·६ या सूत्रावरील भाष्यात सांगितल्या-प्रमाणे मानले जावे. त्याचप्रमाणे 'स्त्रीप्रत्यये' ही निषेधक परि-भाषा देखील जेथें सूत्रात स्त्रीप्रत्ययाचें ग्रहण केले आहे तशाच ठिकाणी लागू पडते व जेथें सूत्रात अशा शब्दाचें ग्रहण केले आहे की, जो शब्द स्त्रीप्रत्ययास व स्त्रीप्रत्ययभिन्न इतर प्रत्ययास सारखाच लागू पडतो अशा ठिकाणी त्या परिभाषेची प्रवृत्ति होऊ शकत नाही असे मानले तर, काही दोष येत नाही, म्हणजे 'राजकुमारी' या शब्दाला प्रातिपदिकसंज्ञा होण्यात काही अडचण येत नाही, कारण 'राजकुमारी' हा समुदाय प्रत्ययान्त नाही. ('राजकुमारी' या उत्तरपदार्थप्रधान षष्ठीतत्पुरुषसमासातील 'कुमारी' हे ङीबन्त उत्तर पद प्रधान असल्यामुळें, 'स्त्रीप्रत्यये चानुपसर्जने न'–परि. २६–या परिभाषान्वयें त्या शब्दाला तदादि नियम लागू पडत नाही आणि म्हणून जरी केवळ 'कुमार' या शब्दाहून 'ङीप्' प्रत्यय झाला असून 'राजकुमार' या समुदायाहून हा प्रत्यय झाला नाही तरी, 'राजकुमारी' हा संपूर्ण समुदाय त्या परिभाषान्वयें स्त्रीप्रत्ययान्त मानता येतो आणि त्यामुळें 'अर्थवद-धातुः' सू. १५८ या पूर्वसूत्रात 'अप्रत्ययः = अप्रत्ययान्तः' पर्युदास वचनाच्या कारणानें, 'राजकुमारी' या स्त्रीप्रत्ययान्त ठरत

शब्दाचे ठिकाणी प्रातिपदिकत्व धर्म नाही. ( 'ङ्याप्प्रातिपदिकात्' सू १८२ या सूत्रात जे ) 'ङी, आप्' याचे ग्रहण केले आहे ते इतर प्रयोजनाकरिता केले आहे हे पुढें सांगण्यात येईल. शंकाकारानें आपली शंका ज्या परिभाषेच्या आधारावर उपस्थित केली आहे ती परिभाषा, म्हणजे 'स्त्रीप्रत्यये चानुपसर्जने न' ही परिभाषा, 'राजकुमारी' या उदाहरणास लागू पडते असे गृहीत धरून दीक्षितांनी त्या शंकेचे 'अन्तरङ्गस्यापि ॰ सुलभत्वात्' या मनोरमेंतील पद्धतीत उत्तर दिले आहे त्या पद्धतीत 'सुलभत्वात्' इत्यादि जें म्हटले आहे ते यथोद्देशपक्षाला धरून म्हटले आहे ( कारण यथोद्देशपक्षात एकदा प्रातिपदिकसंज्ञा झाली असता, पुढें इतर कार्य करतेवेळी ती संज्ञा कायम राहत असल्यामुळें, तिच्या बलावर पुढें प्राप्त होणारी इतर कार्यें करता येतात परंतु कार्यकालपक्षात प्राप्त झालेले कार्य केल्यावर त्या कार्याकरिता केलेली संज्ञा नाहीशी होते व पुढे इतर कार्य प्राप्त झाल्यास, त्या संज्ञेचा उपयोग करता येत नाही व ती कार्यें करण्याकरिता पुन्हा संज्ञा प्राप्त करावी लागते म्हणून 'राजन् ङस् कुमारी सु' या स्थली 'सुपो धातुप्रातिपदिकयो' सू ६५० या सूत्रानें अन्तर्वर्ति विभक्तिप्रत्ययाचा लुक् करतेवेळी यथोद्देशपक्षात त्या समुदायाला जी प्रातिपदिकसंज्ञा होते ती अन्तर्वर्ति विभक्तिप्रत्ययाचा लुक् केल्यावर देखील पुढें समुदायाहून सुबुत्पत्ति करतेवेळीं कायम राहते. परंतु कार्यकालपक्षात अन्तर्वर्ति विभक्तिप्रत्ययाचा लुक् होण्याकरिता केलेली प्रातिपदिकसंज्ञा ते लुक्कार्य केल्यावर नाहीशी होत असल्यामुळें, नंतर समुदायाहून सुबुत्पत्ति करतेवेळी पुन्हा प्रातिपदिकसंज्ञा प्राप्त करून देण्याची गरज पडतच म्हणून 'राजन् ङस् कुमारी सु' या स्थली सुब्लुक् झाल्यावर जशी 'राजकुमारी' या समुदायाला एकदेशविकृतन्यायानें प्रातिपदिकसंज्ञा यथोद्देशपक्षांत प्राप्त करून देता येत तशी ती संज्ञा कार्यकालपक्षात करून देता येत नसल्यामुळें व त्या पक्षात पुन्हा प्रातिपदिकसंज्ञा करण्याची गरज पडत असल्यामुळें,

स्त्रीप्रत्ययान्त शब्दाला मागील सूत्रान्वयें व तसेच पूर्वोक्त लिङ्ग-विशिष्टपरिभाषान्वयें प्रातिपदिकसंज्ञा होऊं शकत नाही. ती संज्ञा त्या शब्दाला होणे इष्ट असल्यामुळें, प्रकृत सूत्रातील 'समास' या पदाचें ग्रहण विध्यर्थक मानणे आवश्यक आहे असा शकाकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. आतां 'राजकुमारी' या शब्दाहून सुबुत्पत्ति व्हावी एवढ्याकरिताच त्या शब्दाला प्रातिपदिकसंज्ञा करून देणे असल्यास त्या शब्दाला जरी प्रातिपदिकसंज्ञा होऊं शकत नाही असं मानले तरी, 'ङ्याप्प्रातिपदिकात्' सू. १८२ या अधिकारसूत्रात 'ङी = ङ्यन्त' याचें ग्रहण केलें असल्यामुळें व 'राजकुमारी' हा शब्द वर सांगितल्याप्रमाणें 'स्त्रीप्रत्यये चानुपसर्जने न' या परिभाषान्वयें ङ्यन्त ठरत असल्यामुळें, त्याहून त्या अधिकार-सूत्रान्वयें सुबुत्पत्ति होण्यात काहीच अडचण येत नाही अशी पुन्हा प्रतिशंका केली जाते. या प्रतिशंकेवर शब्दरत्नात असें उत्तर दिलें आहे कीं, 'ङ्याप्प्रातिपदिकात्' या सूत्रात जें 'ङी, आप्' या स्त्रीप्रत्ययाचें ग्रहण केलें आहे ते ङ्यन्त व आबन्त शब्दाहून सुबुत्पत्ति व्हावी याकरिता केलें नसून भिन्न प्रयोजनाकरितां केलें आहे व तें प्रयोजन त्या सूत्रावरील कौमुदीत 'प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणम् इत्येव सिद्धे-ङ्याब्ग्रहणं ङ्याबन्तात् तद्धितोत्पत्तिर्यथा स्यात् ङ्याभ्यां प्राङ् मा भूदित्येवमर्थम्' या शब्दांत दीक्षितांनी दिलें आहे. आतां मनोरमेंत जी शंका उपस्थित केली आहे त्या शंकेवर दीक्षितांनी यथोद्देश-पक्षाचा आश्रय करून 'अन्तरङ्गस्यापि हल्ङ्यादिलोपस्य... मुलभ-त्वात्' असें मनोरमेंत उत्तर दिलें आहे व त्याचें विवरण पूर्वी मनोरमेंत केलेंच आहे. शब्दरत्नकाराचें असं म्हणणें आहे कीं, मनोरमेंत जी शंका उपस्थित केली आहे व दीक्षितांनी तिचें जें उत्तर दिलें आहे हीं दोन्हीं, 'स्त्रीप्रत्यये चानुपसर्जने न'–परि. २६– ही परिभाषा 'राजकुमारी' या स्त्रीप्रत्ययान्त शब्दाला 'अर्थवद-धातुरप्रत्ययः' या पूर्वसूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा होऊं देण्याच्या आड

असलेल्या शब्दाला जी प्रातिपदिकसंज्ञा होऊं शकत नाही ती त्या सामासिक शब्दाला व्हावी याकरिता प्रकृत सूत्रातील 'समास' *या पदाचे ग्रहण नियमार्थ न मानता विध्यर्थ मानणे आवश्यक आहे;* कारण तें ग्रहण नियमार्थ मानल्यास, स्त्रीप्रत्ययान्त 'राजकुमारी' इत्यादि सामासिक शब्दाना प्रातिपदिकसंज्ञा न होण्याची आपत्ति येते अशी मनोरमेंत शंका उपस्थित केली आहे. या शंकेवर असें प्रतिशंका करण्यात येते की, 'राजकुमारी' इत्यादि शब्दाना प्रातिपदिकसंज्ञा होण्याकरिता प्रकृत सूत्रातील 'समास' ग्रहण विध्यर्थक मानण्याची काहीच गरज नाही, कारण 'राजकुमार' या अर्थवान् सामासिक शब्दाला 'अर्थवदधातु' या पूर्व सूत्रानें जी प्रातिपदिकसंज्ञा होते ती 'राजकुमारी' या स्त्रीप्रत्यय-विशिष्ट शब्दाचे ठिकाणीं 'प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्ट-स्यापि ग्रहणम्'– परि. ७२– या परिभाषान्वयें आपोआपच अतिदेशानें प्राप्त करून देता येते व त्यामुळें प्रातिपदिकाहून होणारी सुबुत्पत्ति इत्यादि सर्व कार्ये 'राजकुमारी' या शब्दाहून होऊं शकतात. या प्रतिशंकेवर शब्दरत्नात असें उत्तर दिले आहे की, 'राजकुमारी' या स्थली 'राजकुमार' या संपूर्ण शब्दाहून 'ङीप्' प्रत्यय झाला नसून त्यातील चरमावयव जो 'कुमार' हा शब्द आहे त्याहून 'ङीप्' प्रत्यय झाला आहे. म्हणून 'प्रातिपदिकग्रहणे'- परि. ७२ या परिभाषान्वयें 'कुमार' या शब्दात जो प्रातिपदिकत्व धर्म आहे तो 'कुमारी' या शब्दात जरी येऊं शकतो तरी 'राज-कुमारी' या शब्दात तो धर्म येऊं शकत नाही. 'राजकुमार' या प्रातिपदिकाहून जर 'ङीप' प्रत्यय झाला असता तर 'राजकुमार' या शब्दानें स्त्रीप्रत्ययविशिष्ट 'राजकुमारी' या शब्दाचे ग्रहण करता येऊं शकले असते व त्याचे ठिकाणीं प्रातिपदिकत्व धर्म अतिदेशानें आणतां येऊं शकला असता. पण 'राजकुमारस्य स्त्री' 'राजकुमारी' अशी प्रकृत स्थलीं स्थिति नसून 'राज्ञः कुमारी राज-कुमारी' अशी वास्तविक स्थिति असल्यामुळें, 'राजकुमारी' या

नत्रा होऊ शकत नाही तो त्याला व्हावी याकरिता प्रकृत सूत्रातील 'समास' या पदाचे ग्रहण विध्यर्थक मानणे आवश्यक आहे. या शंकाकाराच्या म्हणण्यावर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, वर सांगितल्याप्रमाणे प्रत्ययग्रहणपरिभाषेची 'स्त्रीप्रत्यये' ही पूरक परिभाषा असल्यामुळे, प्रत्ययग्रहणपरिभाषेतील 'प्रत्यय' या शब्दाचे भाष्यकारानीं जें 'उगितश्च' ४.१.६ या सूत्रावरील भाष्यात व्याख्यान केले आहे ते 'स्त्रीप्रत्यये' या परिभाषेतील 'प्रत्यय' या शब्दाला देखील सारखेच लागू पडते. त्या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी असा प्रश्न केला आहे की, त्या सूत्रातील 'उगितः' या पदाचा 'उगितः प्रातिपदिकात्' असा अर्थ करावा किंवा 'उगिदन्तात् प्रातिपदिकात्' असा अर्थ करावा. 'उगितः प्रातिपदिकात्' असा अर्थ केल्यास, 'भवती, महती' हीं रूपें सिद्ध होऊ शकतील, पण 'अतिभवती, अतिमहती' ही रूपें सिद्ध होऊ शकणार नाहीत. तदन्तविधीनें हीं रूपें सिद्ध होऊ शकत नाहींत; कारण 'ग्रहणवता प्रातिपदिकेन तदन्तविधिर्नास्ति' – परि. ३१ – अशी प्रतिषेधक परिभाषा आहे. 'उगिदन्तात् प्रातिपदिकात्' असा अर्थ केल्यास, 'अतिभवती, अतिमहती' हीं रूपें सिद्ध होऊ शकतील, पण 'भवती, महती' ही रूपें सिद्ध होऊ शकणार नाहींत. व्यपदेशिवद्भावानें तीं रूपें सिद्ध होऊ शकत नाहींत; कारण 'व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन' – परि. ३२ – अशी परिभाषा आहे. वरील दोन अर्थांपैकी कोणताहि अर्थ मानला तरी, 'प्रत्ययग्रहणे यस्मात्स विहितस्तदादेः' – परि. २३ – ही परिभाषा असल्यामुळें, 'निगोमती, निर्यवमती' हीं रूपें सिद्ध होऊ शकणार नाहींत. यावर उत्तरोत्तर भाष्यकार म्हणतात – 'यद्युगिन्ते, उभयथा निर्गोमती, निर्यवमतीति न सिध्यति, किं कारणम्? । प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादेर्ग्रहणं भवति इति । नैतत् प्रत्ययग्रहणम् । प्रत्ययाप्रत्ययोरेतद्ग्रहणम् । कथम्? । धर्मोप्युगित्, प्रत्ययोप्युगित्, प्रातिपदिकमप्युगित् ।' या भाष्याचा भावार्थ हा आहे की, 'उगितश्च' सू. ४५५

येते असे गृहीत धरून, केली आहेत वास्तविक ती परिभाषा 'राजकुमारी' या स्थली लागू पडत नाही असे दीक्षितानी त्या शकेवर उत्तर द्यावयास पाहिजे होते ती परिभाषा 'राजकुमारी' या स्थली का लागू पडत नाही याचे कारण शब्दरत्नकारानी प्रकृत पक्तीत दिले आहे ते असे म्हणतात की, 'प्रत्ययग्रहणे यस्मात्स विहितस्तदादे'–परि २३– या परिभाषेची 'स्त्रीप्रत्यये चानुपसर्जने न' ही निषेधक परिभाषा असल्यामुळें, ही द्वितीय परिभाषा प्रथम परिभाषेशी क्षेप–पूरक–ठरते व अशा रीतीनें या दोन परिभाषा निषध्यनिषेधकभावाने परस्परसबद्ध असल्यामुळें, पूर्व परिभाषेंतील 'ग्रहणे' हा शब्द उत्तर परिभाषेत सबद्ध होतो व 'स्त्रीप्रत्ययग्रहणे चानुपसर्जने न' अशा रीतीनें ती निषेधक परिभाषा पठित केली पाहिजे आणि त्यामुळें त्या परिभाषेचा असा अर्थ होतो की सूत्रात स्त्रीप्रत्ययाचे ग्रहण केले असल्यास व त्या सूत्रानें स्त्रीप्रत्ययान्ताला काही कार्य होणे सांगितले असल्यास, जेथें स्त्रीप्रत्यय प्रधान आहे तेथें तदादि नियम लागू पडत नाही पण 'अर्थवदधातुरप्रत्यय' सू १७८ या पूर्वसूत्रात जरी 'प्रत्यय' या सामान्य शब्दाचे ग्रहण केले आहे तरी त्या सूत्रात स्त्रीप्रत्ययाचे साक्षात ग्रहण केले नसल्यामुळें, त्या सूत्राचे ठिकाणी 'स्त्रीप्रत्यये' ही परिभाषा मुळीच उपस्थित होऊ शकत नाहीं यावर शकाकार असें म्हणतो की 'प्रत्यय' या सामान्य शब्दानें सर्व प्रकारच्या प्रत्ययाचे ग्रहण होऊ शकत असल्यामुळें त्या शब्दानें स्त्रीप्रत्ययाचे ग्रहण करता येतेच व त्यामुळें त्या सूत्राचे ठिकाणी 'स्त्रीप्रत्यये' ही परिभाषा उपस्थित होण्यात काही प्रत्यवाय येत नाही, आणि ती परिभाषा उपस्थित झाली असता त्या परिभाषान्वयें 'राजकुमारी' हा सपूर्ण शब्द, त्या समुदायातील 'कुमारी' हा स्त्रीप्रत्ययान्त शब्द प्रधान असल्यामुळें, स्त्रीप्रत्ययान्त ठरतो व पूर्व सूत्रात 'अप्रत्यय = अप्रत्ययान्त' असा पर्युदास असल्यामुळें, त्या सूत्रानें 'राजकुमारी' या अर्थवान् समुदायाला जी प्रातिपदिक-

संज्ञा होऊं शकत नाही ती त्याला व्हावी याकरिता प्रकृत सूत्रातील 'समास' या पदाचें ग्रहण विध्यर्थक मानणे आवश्यक आहे. या शंकाकाराच्या म्हणण्यावर शब्दरत्नकार असें उत्तर देतात की, वर सांगितल्याप्रमाणें प्रत्ययग्रहणपरिभाषेची 'स्त्रीप्रत्यये' ही पूरक परिभाषा असल्यामुळें, प्रत्ययग्रहणपरिभाषेंतील 'प्रत्यय' या शब्दाचें भाष्यकारांनी जें 'उगितश्च' ४.१.६ या सूत्रावरील भाष्यात व्याख्यान केलें आहे तें 'स्त्रीप्रत्यये' या परिभाषेंतील 'प्रत्यय' या शब्दाला देखील सारखेंच लागू पडतें. त्या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारांनीं असा प्रश्न केला आहे कीं, त्या सूत्रातील 'उगितः' या पदाचा 'उगितः प्रातिपदिकात्' असा अर्थ करावा किंवा 'उगिदन्तात् प्रातिपदिकात्' असा अर्थ करावा. 'उगितः प्रातिपदिकात्' असा अर्थ केल्यास, 'भवती, महती' ही रूपें सिद्ध होऊं शकतील, पण 'अतिभवती, अतिमहती' ही रूपें सिद्ध होऊं शकणार नाहीत. तदन्तविधीनें तीं रूपें सिद्ध होऊं शकत नाहीत; कारण 'ग्रहणवता प्रातिपदिकेन तदन्तविधिर्नास्ति' – परि. ३१ – अशी प्रतिषेधक परिभाषा आहे. 'उगिदन्तात् प्रातिपदिकात्' असा अर्थ केल्यास, 'अतिभवती, अतिमहती' हीं रूपें सिद्ध होऊं शकतील, पण 'भवती, महती' हीं रूपें सिद्ध होऊं शकणार नाहींत. व्यपदेशिवद्भावानें तीं रूपें सिद्ध होऊं शकत नाहीत; कारण 'व्यपदेशिवद्भावोऽप्रातिपदिकेन' – परि. ३२ – अशी परिभाषा आहे. वरील दोन अर्थांपैकीं कोणताहि अर्थ मानला तरी, 'प्रत्ययग्रहणे यस्मात्स विहितस्तदादेः' – परि. २३ – ही परिभाषा असल्यामुळें, 'निर्गोमती, निर्यवमती' हीं रूपें सिद्ध होऊं शकणार नाहीत. यावर भाष्यकार म्हणतात – 'यदप्युच्यते, उभयथा निर्गोमती, निर्यवमतीति न सिध्यति, किं कारणम्? । प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादेर्ग्रहणं भवति इति । नैतत् प्रत्ययग्रहणम् । प्रत्ययाप्रत्ययोरेतद्ग्रहणम् । कथम्? । धातोरुगित्, प्रत्ययादुगित्, प्रातिपदिकादुगित् ।' या भाष्याचा भावार्थ हा आहे कीं, 'उगितश्च' सू. ४५५

या सूत्रातील 'उगित्' या शब्दाचा ज्यात 'उ, ऋ लृ' इत् आहे असे शब्दस्वरूप असा अर्थ आहे असे शब्दस्वरूप प्रत्ययच असते असे नसून, जें प्रत्यय नाही ते शब्दस्वरूप देखील उगित् असू शकते – वर्ण उगित् असू शकतो उदाहरणार्थ 'अर्वणस्तृ' सू. ३६४ या सूत्रात तकार हा वर्ण 'तृ' असा उगित् पठित आहे. 'शतृ' हा प्रत्यय उगित् पठित आहे व तसेच 'भवतु' हे प्रातिपदिक सर्वादिगणपाठात उगित् पठित आहे सारांश 'उगित्' हा शब्द केवळ प्रत्ययास लागणारा शब्द नसून, प्रत्यय व अप्रत्यय या दोहोनाहि सारखाच लागू पडणारा प्रत्ययाप्रत्ययसाधारण शब्द असल्यामुळें, 'उगितश्च' या सूत्रात प्रत्ययाचें असाधारण रूपानें ग्रहण केले आहे असे मानता येत नाही व त्यामुळें त्या सूत्राचे ठिकाणी प्रत्ययग्रहणपरिभाषा – परि. २३ – उपस्थित होऊ शकत नाही, म्हणजे ती परिभाषा त्या सूत्राला लागू पडत नाही प्रत्ययग्रहणपरिभाषेतील 'प्रत्यय' या शब्दासबधानें भाष्यकारांनी जें वर म्हटले आहे ते त्या परिभाषेशी निर्देधक भावाने सबद्ध असलेल्या 'स्त्रीप्रत्यये' – परि २६ – या परिभाषेंतील 'स्त्रीप्रत्यय' या शब्दास लावल्यास, हे स्पष्ट होते की, जेथें सूत्रात स्त्रीप्रत्ययाचे असाधारणरूपानें ग्रहण केले आहे – उदाहरणार्थ 'ष्यङः सम्प्रसारणम्' सू १००३ या सूत्रात 'ष्यङ्' या स्त्रीप्रत्ययाचे साक्षात् ग्रहण केले आहे – तशाच ठिकाणी 'स्त्रीप्रत्यये' ही परिभाषा उपस्थित होते 'अर्थवदधातुरप्रत्ययः' या पूर्व सूत्रात स्त्रीप्रत्ययाचे असाधारणरूपानें ग्रहण केले नसून, स्त्रीप्रत्यय व स्त्रीप्रत्ययभिन्नप्रत्यय या दोहोनाहि सारख्याच रीतीनें लागू पडणाऱ्या 'प्रत्यय' या साधारण शब्दाचे ग्रहण केले असल्यामुळें, त्या सूत्राचे ठिकाणी, 'अप्रत्ययः = अप्रत्ययान्त' हा पर्युदास 'राजकुमारी' या समुदायाला लावतेवेळी, 'स्त्रीप्रत्यये' ही परिभाषा उपस्थित होत नाही व त्यामुळें 'राजकुमारी' यातील 'कुमारी' हा प्रधान अवयव स्त्रीप्रत्ययान्त आहे तरी, 'राजकुमारी' हा समुदाय प्रत्ययग्रहणपरिभाषान्वयें प्रत्ययान्त ठरत नसल्यामुळें, त्या शब्दाला 'अप्रत्ययः' हा पर्युदास लागू पडत नाही व त्यामुळें

'राजकुमारी' या शब्दाला पूर्व सूत्रानेंच प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकते आणि त्याला ती संज्ञा होण्याकरिता प्रकृत सूत्रातील 'समास' या पदाचे ग्रहण विध्यर्थक मानण्याची काही गरज नाही. म्हणून मनोरमेंत जी शंका उपस्थित केली आहे ती अयोग्य ठरते व दीक्षितांनी देखील ती शंका वर दिलेल्या कारणामुळें अनुपपन्न ठरते असेच म्हणावयास पाहिजे होते असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. *(या विषयाचे विस्तृत विवरण परिभाषेन्दुशेखराच्या मराठी भाषान्तरात पा. ९४–९६ मध्यें केले आहे व ते अवश्य वाचावे.)*

शब्दरत्न– असमर्थसमासे इति । असूर्यम्पश्या इत्यादावित्यर्थः । धर्मिग्राहकेति । प्रातिपदिकसंज्ञा धर्मः, तद्धर्मी असमर्थसमासः, ग्राहक मानं छन्दिविधायकम् । अन्यथा परस्परमसम्बन्धेनैकार्थीभावाभावात्समासो दुर्लभः स्यात् । असूर्यशब्द इति । तत्प्रकृतिके सुबन्त इत्यर्थः । सुपोत्यधिकारात्, उपपदमिति महासंज्ञाकरणाच्च । तदेतदाह । पदं चेत्यादि । शशशृङ्गादिपदानां च बौद्धे तस्मिन् शक्तिरिति न तदर्थमपि समासग्रहणमिति बोध्यम् । यत्र संघाते इतीति । अर्थवतीति शेषः, सजातीयापेक्षनियमस्यौचित्यादिति बोद्ध्यम् । प्रत्ययो नैत्यस्य पूर्वभागप्रकृतिकप्रत्ययो नेत्यर्थः, तेन राजा इयानित्यादौ न दोषः । जन्मवानित्यादावपीति । तत्र पूर्वभागस्य पदत्वादिति भावः । ननु तद्धितग्रहणसामर्थ्यं तत्राह–तद्धितेति । तत्र पूर्वभागस्य भत्वात्पूर्वो भागः पदमित्यत्र च पदशब्देन पदसंज्ञकग्रहणमिति भावः ।

'कथ तर्हि असमर्थसमासे संज्ञा' या मनोरमेच्या पंक्तीतील 'असमर्थसमासे' या पदाचा 'असूर्यम्पश्या इत्यादौ' असा अर्थ आहे, म्हणजे 'असूर्यम्पश्याः' इत्यादि असमर्थसमासाची उदाहरणें होत. मनोरमेंतील 'धर्मिग्राहकमानात्' या पदाचा असा अर्थ आहे की, प्रातिपदिकसंज्ञा हा धर्म असून त्याचा असमर्थ-

समास हा धर्मी आहे व असमर्थसमासाला प्रातिपदिकसंज्ञा होते याचे ग्राहक–प्रमाण–'अमूर्यललाटयोर्दृशितपोः' हे खश्प्रत्ययविधायक सूत्र आहे असमर्थसमासाला प्रातिपदिकसंज्ञा होते याचे ते सूत्र प्रमाण मानले नाही तर, 'नञ्' शब्दाच्या अर्थाचा 'सूर्य' या शब्दाच्या अर्थामध्ये अन्वय होत नसल्यामुळें व अशा रीतीनें 'असूर्य' या असमर्थसमासातील 'नञ्' व 'सूर्य' या शब्दाच्या अर्थाचा एकार्थीभाव होत नसल्यामुळे, असा समास होणे अशक्य आहे (या विषयाचे विवरण मनोरमेंत केलेच आहे) 'असूर्यशब्दे उपपदे' या मनोरमेतील पदाचा 'असूर्यप्रकृतिके सुबन्ते उपपदे,' म्हणजे 'असूय' या प्रकृतीहून द्वितीयाविभक्तीचा प्रत्यय केला असता जें सुबन्त पद होतें तसे उपपद, असा अर्थ आहे, कारण 'असूर्यललाटयो' हे सूत्र 'सुपि' या अधिकारात पठित आहे, म्हणजे या सूत्रात 'सुपि स्थ' या पूर्व सूत्रातून 'सुपि' हे पद अनुवृत्त होतें (आणि तशी अनुवृत्ति होत असल्यामुळच, मनोरमेंतील 'असूर्यशब्द' या पदाचा 'असूर्यप्रकृतिके सुबन्ते' असा अर्थ होतो) आणि दुसरें असें की, 'उपपद' ही पाणिनीनें महासंज्ञा, म्हणजे अन्वर्थक संज्ञा, केली आहे (त्यामुळे 'असूर्यललाटयो' या सूत्रात निर्दिष्ट असलेला 'असूर्य' हा शब्द प्रातिपदिकसंज्ञक झाल्याशिवाय त्याहून सुबुत्पत्ति होऊ शकत नाही व तो पदसंज्ञक होऊ शकत नाही आणि तो पदसंज्ञक झाल्याखेरीज त्याला उपपद ही संज्ञा होऊ शकत नाही) हा वरील आशय मनात धरूनच दीक्षितानी मनोरमेंत 'उपोच्चारित पद चोपपदम्' इत्यादि म्हटले आहे (या विषयाचे विवरण पूर्वी मनोरमेंत केलेच आहे) 'शशशृङ्ग' ('खपुष्प, वन्ध्यासुत') ईत्यादि सामासिक पदाचा बुद्धीमध्यें जो अर्थ विदित होतो त्या अर्थाचे बोधन करण्याची शक्ति तशा शब्दात असल्यामुळें, तशा शब्दाना देखील प्रातिपदिकसंज्ञा होण्याकरिता प्रकृत सूत्रातील 'समास' या पदाचे ग्रहण विध्यर्थक मानण्याची काही गरज नाही हे जाणावे. ('शशशृङ्ग' हा अत्यन्त असत् पदार्थ आहे, कारण सशाला

शिगें नसतात. तरी पण 'शशशृङ्ग' या सामासिक शब्दातील 'शश' व 'शृङ्ग' हे दोन्ही शब्द अर्थवान् असल्यामुळें, आपणास 'शशशृङ्ग' या सामासिक शब्दाचा अर्थ बुद्धीनें करता येतो. अशा रीतीनें त्या शब्दाचा बौद्धिक किंवा कल्पित अर्थ होत असून त्याचे ठिकाणी बुद्धिनिष्ठ अर्थवत्ता असल्यामुळें, तो शब्द अर्थवान् ठरतो व त्यामुळें 'अर्थवदधातुः' या पूर्व सूत्रानेंच त्याला प्रातिपदिकसंज्ञा होते. म्हणून तशा लौकिक व्यवहारात असत्–अनर्थक–मानले जाणाऱ्या शब्दाला प्रातिपदिकसंज्ञा होण्याकरिता प्रकृत सूत्रातील 'समास' या पदाचे ग्रहण विध्यर्थक मानण्याची काहीं गरज नाहीं असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे ) प्रकृत सूत्रावरील कौमुदीत जें नियमाचें स्वरूप सांगितलें आहे त्या पद्धतीतील 'सङ्घाते' या पदापूर्वी 'अर्थवति' हें पद अध्याहृत आहे तें पद अध्याहृत मानण्याचें कारण हें आहे कीं, नियम हा सजातीयासबधानेंच केला जात असतो असेंच मानणें उचित आहे हें जाणावें. ('सङ्घाते' या पदापूर्वी 'अर्थवति' हें पद अध्याहृत न घेतल्यास, त्या पदानें अनर्थक संघाताचें देखील ग्रहण होईल व 'दश दाडिमानि' इत्यादि पूर्वी दिलेल्या अनर्थक समुदायाला देखील कौमुदीत दिलेला नियम लागू पडेल. पण तो समुदाय अर्थवान् नसल्यामुळें, त्याला 'अर्थवदधातुः' या पूर्व सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञेची प्राप्तीच होत नाहीं. म्हणून तशा अनर्थक समुदायाची व्यावृत्ति होण्याकरिता वरील नियम करण्याची कांही गरज नसून, अर्थवान् पदसमुदायाची व्यावृत्ति व्हावी याकरिताच तसा नियम मानण्याची गरज आहे हें स्पष्ट व्हावें याकरितां 'सङ्घाते' या पदापूर्वी 'अर्थवति' हें पद अध्याहृत करणें उचित आहे असं शब्दरत्नकाराचें म्हणणें आहे. दुसरें असें कीं, 'नियमस्य सजातीयापेक्षत्वात्' असें भाष्यात ठिकठिकाणीं सांगितलें असल्यामुळें व पूर्व सूत्रानें अर्थवानालाच प्रातिपदिकसंज्ञा होणें सांगितलें असल्यामुळें, वरील नियमानेंयें अर्थवान् पदसमुदायाचीच व्यावृत्ति करता येते.) 'उत्तरस्तु प्रत्ययो

न' असे जें मनोरमेत म्हटले आहे त्यातील 'प्रत्ययो न' या पदाचा 'पूर्वभागप्रकृतिकप्रत्ययो न,' म्हणजे ज्याची पूर्वभाग प्रकृति आहे असा प्रत्यय नसला पाहिजे, असा अर्थ आहे, व त्या पदाचा असा अर्थ होत असल्यामुळें, 'राजा इयान्' इत्यादि स्थली काही दोष येत नाही ('राजा इयान्' या पदसमुदायात 'राजा' हा पूर्व भाग पद असून त्यापुढें 'इयत्' हा प्रत्यय आहे. म्हणून हा पद-समुदाय अर्थवान् असून त्यातील पूर्व भाग पद असल्यामुळें व तसेच उत्तर भाग प्रत्यय असल्यामुळें, त्या समुदायाला मनोरमेंत दिलेला नियम लागू पडणार नाही आणि त्यामुळे त्याला प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति येईल परंतु मनोरमेंत दिलेल्या नियमातील 'प्रत्यय' या पदाचा 'पूर्वभागप्रकृतिकप्रत्यय' असा अर्थ केल्यानें, 'राजा' या पदसंज्ञक पूर्व भागाला 'इयत्' हा प्रत्यय झाला नसल्यामुळें, 'राजा इयान्' हा पदसमुदाय मनोरमेंत दिलेल्या नियमात वरील अर्थान्वयें अन्तर्भूत होतो व तो समुदाय अर्थवान् असून देखील समास नसल्यामुळें, त्याला प्रातिपदिकसंज्ञा होत नाही 'राजा इयान् या समुदायातील 'इयान्' हा प्रत्यय आहे असे जें शब्दरत्नकारानी म्हटले आहे त्याचे कारण हे की, 'किमिदम्भ्या वो घः' सू १८४१ या सूत्रानें 'इदम्' या शब्दास 'वतुप् = वत्' प्रत्यय होऊन व त्या प्रत्ययातील 'व्' चे जागी 'घ् = इय्' असा आदेश होऊन आणि 'इदकिमोरीश्की' सू १०१८ या सूत्रानें 'इदम्' चे जागी 'ई' असा सर्वादेश होऊन 'ई + इयत्' अशी स्थिति झाली असता, 'य-ई' हे अङ्ग 'यचि भम्' सू २३१ या सूत्रान्वयें भसंज्ञक ठरत असल्यामुळें, 'यस्येति च' सू ३११ या सूत्रानें 'ई' चा लोप होतो साराश या स्थली प्रकृतीचा लोप होऊन 'वतुप्' प्रत्ययाचे रूपान्तर झाल्यानें बनलेला 'इयत्' हा प्रत्ययच शिलक राहतो व 'इयान्' हे प्रकृति नष्ट होऊन अवशिष्ट राहिलेल्या प्रत्ययाचच प्रथमेच्या एकवचनाचे रूप आहे आणि म्हणून पूर्वभाग पद व उत्तर-भाग प्रत्यय याचे शब्दरत्नकारानी हे वाक्य उदाहरण दिले आहे )

'अन्यथा जन्मवान् इत्यादौ सञ्ज्ञा न स्यात्' असे जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचें कारण हें कीं, 'जन्मवत्' या स्थलीं 'जन्म' हा पूर्व भाग पद आहे (व उत्तर भाग 'वत्' हा त्याहून झालेला प्रत्यय असल्यामुळें, 'जन्मवत्' हा शब्द वरील नियमाच्या कक्षेंत येत नाहीं आणि त्यामुळें त्याला प्रातिपदिकसञ्ज्ञा होते ) प्रकृत सूत्रात 'तद्धित' या पदाचें ग्रहण केलें असल्यामुळें त्या पदाच्या ग्रहण-सामर्थ्यानें 'जन्मवान्' या तद्धितान्त शब्दाला प्रातिपदिकसञ्ज्ञा होऊं शकते असें कोणी म्हटल्यास, त्यावर मनोरमेंत 'तद्धितग्रहणस्य औपगवादौ कृतार्थत्वात्' हें उत्तर दिलें आहे 'औपगव = उपगु + अण्' या उदाहरणात 'उपगु' हा पूर्व भाग (पद नसून 'यचि भम्' सू २३१ या सूत्रान्वयें ) भसञ्ज्ञक आहे. ( म्हणून तो समुदाय वरील नियमाच्या कक्षेंत येत नाही.) 'पूर्वो भाग: पदम्' यातील 'पद' या शब्दानें पदसञ्ज्ञक शब्दाचें ग्रहण होणें असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे (तो पूर्व भाग 'सुप्तिङन्त पदम्' या सूत्रान्वयेंच पद-सञ्ज्ञक असला पाहिजे असा आग्रह नसून, 'स्वादिष्वसर्वनामस्थाने' सू. २३० या सूत्रान्वयें तो पदसञ्ज्ञक असला तरी हरकत नाही.)

शब्दरत्न– नन्वत्र पक्षे गवित्ययमाहेत्यादौ दोष, गो इत्यादिना सुबन्तत्वाभावेन पदत्वाभावात् । बुध्यत्सुरित्यादिसमासे पूर्वभागस्य भत्वेन तत्साजात्येन पूर्वो भाग: पदमित्यर्थलाभासम्भवश्चेत्यत आह– यद्वेति । प्रकृतसूत्रे भाष्ये तु अर्थवत्समुदायाना समासग्रहणं नियमार्थ-मित्युक्तम् । अत्र तन्त्रेण षष्ठीतत्पुरुष: कर्मधारयश्च, तत्र षष्ठीसमासे अर्थवद्वितस्य स्वातन्त्र्येनापि प्रयोगार्हार्थवदित्यर्थः । गवित्ययमित्यादावनुकरणस्यानिर्तिपरस्यापि प्रयोगसत्त्वेन तत्त्वमस्त्येव। प्रकृतिप्रत्ययसमुदायस्य तु न व्यावृत्तिः । प्रत्ययस्य स्वातन्त्र्येण प्रयोगार्हार्थवत्त्वाभावात् । सरूपसूत्रे भाष्ये सुबन्तानामित्यनेनेदमेवोप-लक्ष्यते इति स्पष्टमेव कैयटेनोक्तमिति बोध्यम् ।

'यत्र सङ्घाते पूर्वो भाग: पद तस्य चेद्भवति तर्हि समा-सस्यैव' असें जें प्रकृत सूत्रावरील कौमुदींत नियमाचें स्वरूप

दिले आहे ते बरोबर मानल्यास, 'गवित्ययमाह' इत्यादि स्थली दोष येतो; कारण 'गो' इत्यादि अनुकरण सुबन्त नसल्यामुळे, त्याला ( 'सुप्तिङन्त पदम्' सू २९ या सूत्रानें होणारी ) पदसंज्ञा होऊ शकत नाही (आणि म्हणून 'गविति' हा समुदाय वरील नियमाच्या कक्षेत येत नसल्यामुळे, त्याला प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति येते ) तसेच 'वृषण्वसु' (वृषणश्व) इत्यादि सामासिक शब्दात पूर्व भाग ('वृषन्' हा पदसंज्ञक नसून 'वृषण्वस्वश्वयो'–सू ३३८९ वरील वार्तिक– या वार्तिकान्वयें) भसंज्ञक असल्यामुळे, त्या समासाचे सादृश्य लक्षात घेतले असता त्या उदाहरणात 'पूर्वो भाग पदम्' या अर्थाचा लाभ संभवत नाही या वर दाखविलेल्या आपत्ति लक्षात घेऊन दीक्षितानी 'यद्वा प्रकृतिप्रत्ययभावानापन्न सङ्घातविषयको नियमोऽस्तु' असे नियमाचे भिन्न स्वरूप मनोरमेंत सांगितले आहे (व हें नियमाचे स्वरूप मानल्याने 'वृषण्वसु' या शब्दसमुदायातील अवयवामध्यें परस्परात प्रकृतिप्रत्ययभावरूप संबंध नसल्यामुळें, त्या समासरूप समुदायाला प्रातिपदिकसंज्ञा होण्यात काही अडचण येत नाही व तसेच 'गो इति' या समुदायातील अवयवात प्रकृतिप्रत्ययभावरूप संबंध नाही तरी, तो समुदाय समास नसल्यामुळें त्याला प्रातिपदिकसंज्ञा होत नाही ) परंतु प्रकृत सूत्रावरील भाष्यात 'अर्थवत्समुदायाना समासग्रहण नियमार्थम्' म्हणजे 'अर्थवत्समुदायाना प्रातिपदिकसंज्ञा भवति चेत्तर्हि समासस्यैव,' असे नियमाचे स्वरूप सांगितले आहे या भाष्योक्त नियमातील 'अर्थवत्समुदायानाम्'–या पदाचा तन्त्रान–म्हणजे ते पद दोनदा उच्चारून–षष्ठीतत्पुरुष व कर्मधारय असा दोन्ही प्रकारे समास होतो व षष्ठीसमासातील 'अर्थवत्' या शब्दाचा 'स्वातन्त्र्येणापि प्रयोगार्हमर्थवत्' असा अर्थ होतो ('अर्थवत्समुदायाना समासग्रहण नियमार्थम्' या भाष्यवचनातील 'अर्थवत्समुदाय' या शब्दाचा, 'अर्थवता समुदाय' असा एकदा षष्ठीतत्पुरुष व 'अर्थवान् समुदाय' असा पुन्हा कर्म-

धारयसमास केला असता,' अर्थवता यः समुदायः स्वय अर्थवाश्च' असा त्या शब्दातून अर्थ निष्पन्न होतो व त्या अर्थान्वयें, 'दश दाडिमानि' इत्यादि सार्थक पदाच्या अनर्थक समुदायाला प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति टळते. आता 'अर्थवता समुदाय.' या षष्ठीतत्पुरुषसमासातील 'अर्थवताम्' या पूर्व पदाचा 'स्वातन्त्र्येणापि प्रयोगार्हंवताम्' असा अर्थ केल्यानें काय फल निष्पन्न होतें हें शब्दरत्नकार पुढील पक्तींत सागतात.) 'गवित्ययमाह' इत्यादि स्थली 'गो' या अनुकरणापुढें 'इति' हा शब्द नसताना देखील त्या केवळ 'गो' शब्दाचा प्रयोग होत असल्यामुळें, त्याचे ठिकाणी पृथक्प्रयोगार्हतारूप अर्थवत्ता आहेच. ('इति' या शब्दाच्या सहायाशिवाय अनुकरणाचा प्रयोग करता येऊ शकतो हं 'अनुकरण धानितिपरम्' सू. ७६३ या सूत्रावरून सिद्ध होतें. अशा रीतीनें इतराच्या सहायाशिवाय एकट्या अनुकरणाचा स्वतत्ररूपानें प्रयोग करता येऊ शकत असल्यामुळें, त्याचे ठिकाणी देखील पृथक्प्रयोगार्हतारूप अर्थवत्व आहेच आणि हें षष्ठीसमासातील 'अर्थवताम्' या पदाचा जो वर सागितल्याप्रमाणे अर्थ केला आहे त्याचे फल आहे. त्यामुळें 'गविति' यातील दोन्ही शब्द अर्थवान् ठरतात व हा समुदायहि अर्थवान् ठरतो. परतु 'स्वातन्त्र्येण प्रयोगार्होऽर्थवत्पूर्वावयवकः स्वातन्त्र्येण प्रयोगार्होऽर्थवदुत्तरावयवकश्चयोऽर्थवान्, समुदायस्तस्य चेत्तर्हि समासस्यैव.' असं शब्दरत्नात वर दिलेल्या अर्थान्वयें भाष्यकारीय नियमाचे, शब्देन्दुशेखरात व सरलाटीकेत सागितल्याप्रमाणे, स्वरूप सिद्ध होत असल्यामुळें व 'गविति' हा अर्थवान् शब्दाचा अर्थवान्-स्वातन्त्र्येण प्रयोगार्ह-समुदाय समास नसल्यामुळें, त्याला वरील नियमान्वयें प्रातिपदिकसंज्ञा होत नाहीं.) प्रकृतिप्रत्ययसमुदायाची वरील नियमान्वयें व्यावृत्ति होत नाही, म्हणजे तशा समुदायाचा 'अर्थवता समुदाय' यात अन्तर्भाव होत नाही, कारण प्रत्ययाचे ठिकाणीं स्वतत्ररूपानें पृथक्प्रयोगार्हतारूप अर्थवत्व नाही. (म्हणून

'जन्मवान्' इत्यादि प्रकृतिप्रत्ययसमुदायाला प्रातिपदिकसंज्ञा होण्यात वरील भाष्यनियम आड येत नाही, कारण प्रकृति व प्रत्यय हे जरी अर्थवान् आहेत तरी 'न केवला प्रकृतिः प्रयोक्तव्या नापि केवल प्रत्ययः' या भाष्यवचनान्वयें त्यांचे ठिकाणी पृथक्-प्रयोगार्हतारूप अर्थवत्त्व नाही ) 'सरूप' सूत्रावरील भाष्यातील 'सुबन्तानाम्' हे पद याच अर्थाचे उपलक्षण आहे हे या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तीत कैयटानें स्पष्ट म्हटले आहे हें जाणावें 'सरूपसूत्रे भाष्ये' हा शब्दरत्नातील पाठ अशुद्ध असून 'अर्थवत्सूत्रे भाष्ये' हा वास्तविक शुद्ध पाठ आहे कारण 'अर्थवदधातु' १. २. ४५ या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तीत कैयटानें 'सुबन्तानाम्' हे भाष्यातील प्रतीक घेऊन शब्दरत्नात सांगितल्याप्रमाणे म्हटले आहे. त्या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी 'तुल्यजातीयस्य नियम । कश्च तुल्यजातीय ?। यथाजातीयकाना समास । कथं जातीयकाना समास ?। सुबन्तानाम्।' असे म्हटलें आहे. त्या भाष्यातील 'सुबन्तानामिति' असे प्रतीक घेऊन कैयटानें 'एतच्चोपलक्षणम्—भेदससर्गद्वारकार्थवत्त्वयुक्तानाम्।' असे म्हटले आहे व 'भेदससर्गद्वारकार्थवत्त्वयुक्तानाम्' या पदाचे उद्योतात 'वाक्ये पदार्थयोर्विभागेनापि प्रयोगे सति इतरससर्गाकाक्षा भेदससर्ग । स द्वारभूतो यस्य विशिष्टार्थवत्त्वस्य तद्युक्तानामित्यर्थ । समासेऽपि वाक्यीयेनैव तेन विशिष्टार्थवत्त्वम् । न हि प्रकृतिप्रत्यययोर्विभाग, परश्चेति वचनादिति भाव.। एव च समुदायघटका भागा स्वातन्त्र्येणापि प्रयोगार्हा अर्थवन्तो गृह्यन्ते इति तात्पर्यम्।' असे व्याख्यान केले आहे या वरील कैयटाच्या व्याख्यानावरून 'स्वातन्त्र्येणापि प्रयोगार्हमर्थवत्' असें जें शब्दरत्नात म्हटले आहे ते सिद्ध होते. प्रकृत सूत्रावरील शब्देन्दुशेखरात देखील 'पदशब्देनात्र स्वातन्त्र्येणापि प्रयोगार्हमर्थवदगृह्यते। अत एव अर्थवत्समुदायाना समासग्रहण नियमार्थमित्युक्तमत्र भाष्ये । भाष्ये सुबन्तानामित्यनेन भेदससर्गद्वारकार्थवन्त उपलक्ष्यन्ते इति कैयटेन स्पष्टमेवोक्तम्। तेन 'गविरयमाहेत्यादौ

गो इत्यादीना सुबन्तत्वाभावेऽपि न समुदायस्य प्रातिपदिकत्वम्, अनुकरणस्यानिति परस्यापि प्रयोगसत्त्वेन तावन्मात्रस्यापि पृथक्-प्रयोगार्हत्वात् । बहुपटव इत्यादौ प्रातिपदिकत्वसिद्धये स्वातन्त्र्येणेति' असेच म्हटले आहे.)

शब्दरत्न—पुरुषावित्यादेरिति । तत्पूर्वभागस्य "उत्तरपदत्वे च—" इति निषेधेनापदत्वात् । परस्य तत्प्रकृतिकप्रत्ययस्याभावादिति भावः । अर्थवत्स्येनैवेति । उत्तरपदस्य कार्यित्वाभावेन तन्निषेधाप्रवृत्तेश्चे-रपि बोध्यम् । वाक्यस्येति । कृदन्तत्वादिति भावस्तदाह—कृदिति । न चास्य भुजा करणत्वेनोपदंशं प्रति न कारकत्वम् । मूलकस्योपदंशे कर्मत्वेनान्वयो विभक्तिस्तु प्रधानानुरोधिकरणत्वकृता तृतीयैवेति तत्रापि कारकत्वमित्याशयात् । परत्वाद् बाधादिति । नियमस्यार्थतो निषेधेऽपि तात्पर्येणायंपरसूत्रापवादस्यास्य परत्वेन कृदन्तत्वप्रयुक्त-स्यापि निषेधे तात्पर्यादिति भावः । निषेधानां बलवत्त्वाच्चे-त्यपि बोध्यम् । निष्फलत्वादिति । स्पष्टं चेदं "पुयोगात्" इति सूत्रे भाष्यकैयटयोः ।

'पुरुषावित्यादेः संज्ञा स्यात्' असे जें मनोरमेंतील शब्दा-रत्नांत शब्दकारानें म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, 'राजपुरुषौ' यांतील 'पुरुष+औ' या समुदायातील 'पुरुष' या पूर्व भागाला 'उत्तरपदत्वे चापदादिविधौ' सू. ८८२ वरील वार्तिका-च्या निषेधक वार्तिकान्वयें (प्रत्ययलक्षणानें) पदसंज्ञा होऊं शकत नाही व ('पुरुष' या शब्दापुढील 'औ' या अन्तर्वर्तिविभक्ति-प्रत्ययाचा लुक् झाल्यावर 'पुरुष' या शब्दापुढें) जो 'औ' प्रत्यय झालेला आहे त्याची ('राजपुरुष' हा समुदाय प्रकृति असून) 'पुरुष' हा शब्द प्रकृति नव्हे (म्हणजे 'पुरुष औ' हा भाग असा आहे की, ज्यांतील पूर्वभाग पदसंज्ञक नसून उत्तरभाग त्या प्रकृतीहून झालेला प्रत्यय नसल्यामुळें, हा समुदाय 'यत्र संघाते पूर्वो भागः पदमुत्तरभागस्तु तत्प्रकृतिकप्रत्ययो न' या नियमाच्या

कक्षेंत येत नाही आणि म्हणून त्याला प्रातिपदिकसंज्ञेची प्राप्ति होते असे शंकाकाराच्या म्हणण्याचे तात्पर्य आहे. या शंकेवर दीक्षितांनी मनोरमेंत 'अर्थवत्वेनैव वारणात्' असे उत्तर दिले आहे व त्याच्या म्हणण्याचा भावार्थ हा आहे की, 'पुरुष औ' हा समुदाय अर्थवान् नसल्यामुळें, त्याला 'अर्थवदधातुः' या पूर्व सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा होऊं शकत नाही त्याला ती संज्ञा होऊं शकत नाही याचें दुसरे देखील कारण देता येते हे शब्दरत्नकार पुढील पङ्क्तींत सांगतात ) दुसरें असे की, 'राजपुरुषौ' यांतील 'पुरुषौ' या उत्तर-पदाला कोणतेहि कार्य करणे नसल्यामुळें, म्हणजे जें कार्य करणे आहे त्याचा 'पुरुष' हा शब्द कार्यी नसल्यामुळे, 'उत्तरपदत्वे' हे निषेधक वार्तिक या स्थली प्रवृत्त होऊं शकत नाही हे देखील लक्षात ठेवावे. ('राजपुरुषौ' यांतील 'पुरुष' या उत्तरपदाला कोणतेहि कार्य करणे नसून 'पुरुष औ' या समुदायाला प्रातिपदिक-*संज्ञारूप कार्य करणे असल्यामुळें आणि अशा रीतीनें 'पुरुष' हा* शब्द कार्यी ठरत नसल्यामुळें व जेथें उत्तरपदाला कार्य करणे आहे तशाच ठिकाणी 'उत्तरपदत्वे चापदादिविधौ' हे निषेधक वार्तिक प्रवृत्त होत असल्यामुळें, 'पुरुष' या शब्दाला प्रत्ययलक्षणानें पदसंज्ञा करण्यांत ते निषेधक वार्तिक आड येत नाही. त्यामुळें 'पुरुष औ' या समु-दायांतील 'पुरुष' हा शब्द पदसंज्ञक मानतां येतो व त्यापुढील 'औ' हा प्रत्यय 'पुरुष' या प्रकृतीहून झाला नसून 'राजपुरुष' या समुदायरूप प्रकृतीहून झाला असल्यामुळें, 'यत्र पूर्वो भागः पदमुत्तरभागस्तु तत्प्रकृतिकप्रत्ययो न तस्य चेद्भवति तर्हि समास-स्यैव' या नियमान्वये 'पुरुष औ' या समास नसलेल्या समुदायाला प्रातिपदिकसंज्ञा होऊं शकत नाही हे उघड आहे.) 'वाक्यस्य संज्ञा दुर्वारा' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचे कारण हे की, 'मूलकेनोपदंशम्' हा पदसमुदाय ('कृद्ग्रहणे गतिकारक-पूर्वस्यापि ग्रहणम्' या परिभाषान्वयें) कृदन्त ठरतो (व त्यामुळे त्याला प्रकृत सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञेची प्राप्ति होते. 'मूलकेनोपदं

भुङ्क्ते' या वाक्यातील) 'मूलकेन' हे पद 'भुङ्क्ते' या क्रियापदात करणत्वानें अन्वित असल्यामुळें दशरूप क्रियेशीं त्याचा कारकरूपानें अन्वय नाहीं असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण 'मूलक' या शब्दाचा कर्मत्वरूपानें 'उपदशम्' या कृदन्तात अन्वय होतो. या वाक्यात 'मूलकेन' अशी जो तृतीयाविभक्ति केली आहे त्याचें कारण हें कीं, 'मूलक' हा शब्द भुजिक्रियेचें करण असल्यामुळें व ती क्रिया वाक्यात प्रधान असल्यामुळें, प्रधान क्रियेच्या अनुरोधानें तृतीयाविभक्ति केली आहे. तरी पण 'मूलक' हें दशक्रियेचें कारक आहेच; आणि हा आशय मनात धरूनच दीक्षितानीं मनोरमेंत ('कृद्ग्रहणे' या परिभाषान्वयें 'मूलकेनोपदशम्' हा कर्मकारकसहित णमुल्प्रत्ययान्त समुदाय कृदन्त ठरत असल्यामुळें, त्याला प्रकृत सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञेची प्राप्ति होते अशी) शंका उपस्थित केली आहे. ('मूलकेनोपदशं भुङ्क्ते' या वाक्यात 'मूलकेन' या करणकारकाचा 'भुङ्क्ते' या क्रियेमध्यें जरी साक्षात् शाब्दिक अन्वय आहे तरी, 'मूलक' या शब्दाचा दशक्रियेंत देखील कर्मकारकरूपानें आर्थिक अन्वय आहेच आणि त्यामुळें 'मूलकमुपदश्य भुङ्क्ते' असा त्या वाक्याचा अर्थ होतो. म्हणून 'मूलक' हें 'उपदशम्' या णमुल्प्रत्ययान्त कृदन्ताचें कर्मरूप कारक ठरत असल्यामुळें, 'मूलकेनोपदशम्' या समुदायाला, 'कृद्ग्रहणे' या परिभाषान्वयें, कृदन्त मानता येते. येथें द्वितीयाविभक्ति न करिता जी तृतीयाविभक्ति केली आहे ती 'प्रधानेतरयोर्यत्र द्रव्यस्य क्रिययोः पृथक्। शक्तिर्गुणाश्रया तत्र प्रधानमनुरुध्यते ॥' या न्यायाला अनुसरून केली आहे व त्या न्यायाचा असा अर्थ आहे कीं, जेथें एखाद्या पदाचा वाक्यातील प्रधानक्रिया व अप्रधानक्रिया या दोहोंशी भिन्नभिन्न कारकरूपानें अन्वय होतो तेथें त्या शब्दाचा प्रधान क्रियेंत ज्या कारकरूपानें अन्वय होतो तीच कारकविभक्ति त्या शब्दाहून केली जाते. वरील वाक्यात भुजिक्रिया प्रधान असून

दशक्रिया अप्रधान आहे आणि 'मूलक' शब्दाचा भुजिरूप प्रधान क्रियेंत करणरूपानें अन्वय होत असल्यामुळें, 'मूलक' शब्दाहून करणाचा द्योतक तृतीयाविभक्तीचा प्रत्यय केला आहे तरी पण त्या शब्दाचा तसा तृतीयाविभक्तीत प्रयोग केल्यानें, त्या शब्दाचें दशरूप अप्रधान क्रियेंत असणारें कर्मरूप कारकत्व नाहींसें होत नाही, आणि म्हणून 'मूलकेनोपदशम्' हा समुदाय 'कृद्ग्रहण' परिभाषान्वयें कृदन्त ठरतो अशी जी मनोरमेंत शंका उपस्थित केली आहे ती उपपन्न – योग्य – ठरते असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे या शंकेचें निवारण कसें केलें आहे हें मनोरमेंत सांगितलेंच आहे ) 'समासग्रहणकृतनियमेन परत्वात बाधात्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे की, नियमाचें निषेध करण्यामध्यें देखील आर्थिक तात्पर्य असल्यामुळें व 'अर्थवदधातु' या सूत्राचें प्रकृत सूत्र अपवादभूत सूत्र असल्यामुळें, कृदन्तसमुदायाचे ठिकाणी कृदन्तत्वामुळें प्रकृत सूत्रानें प्राप्त होणाऱ्या प्रातिपदिकसंज्ञेचा देखील परत्वामुळें निषेध करण्यामध्यें प्रकृत सूत्रानें सिद्ध होणाऱ्या नियमाचें तात्पर्य आहे आणि ('निषेधाश्च बलीयांस' परि १२१ या परिभाषान्वयें) निषेध अधिक बलवान् असतो हें देखील ध्यानांत ठेवावें ('कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्राची 'कृदन्तस्य प्रातिपदिकसंज्ञा भवति, तद्धितान्तस्य प्रातिपदिकसंज्ञा भवति, समासस्य प्रातिपदिकसंज्ञा भवति' असे तीन भाग करता येतात या तीन भागापैकी प्रथम दोन भाग विध्यर्थक आहेत, म्हणजे पूर्व सूत्रातील 'अप्रत्यय' या पर्युदासामुळें कृदन्ताला व तद्धितान्ताला जी प्रातिपदिकसंज्ञेची प्राप्ति नव्हती ती करून देण्याकरिता प्रकृत सूत्रात 'कृत्' व 'तद्धित' या पदाचें ग्रहण केलें आहे आणि अशा रीतीनें प्रथम दोन भाग अप्राप्तप्रापक विधि ठरतात परंतु समास अर्थवान् असून प्रत्ययान्त नसल्यामुळें, 'अर्थवद्धातु' या पूर्व सूत्रानेंच समासाला प्रातिपदिकसंज्ञा प्राप्त होते असें असल्यामुळें, प्रकृत सूत्रात जें तृतीय वाक्य

घातले आहे ते व्यर्थ ठरू पाहते. ते व्यर्थ न ठरावे याकरिता त्या वाक्याचा 'सिद्धे सत्यारम्भो नियमार्थः' या न्यायान्वयें नियमरूप अर्थ करणे आवश्यक आहे व त्या नियमाचे स्वरूप पूर्वी सांगितलेच आहे. अशा रीतीनें प्रकृत सूत्रातील 'समास' ग्रहण विध्यर्थक ठरत नसून नियमार्थक ठरत असल्यामुळें, ते ग्रहण पूर्व सूत्राचे वैयर्थ्यमूलक अपवादक ठरते आणि कृद्ग्रहणपरिभाषान्वयें कृदन्त ठरणाऱ्या 'मूलकेनोपदंशम्' या समुदायाला कृदन्तत्वामुळें जी प्रातिपदिकसंज्ञेची प्राप्ति होते तिचे देखील प्रकृत सूत्रात 'कृत्, तद्धित' या पदानंतर असेरीस केलेले 'समास' या पदाचे ग्रहण परत्वामुळें बाधक ठरते, म्हणजे 'मूलकेनोपदंशम्' हा समुदाय जरी अर्थवान् कृदन्त समुदाय आहे तरी तो समास नसल्यामुळें समासग्रहणकृत नियमान्वयें त्या समुदायाला प्रातिपदिकसंज्ञा होत नाहीं. येथें हें लक्षात ठेवावे की, ज्याला मीमांसक परिसंख्या म्हणतात त्यालाच व्याकरण-शास्त्रात नियम असे म्हणतात व 'अन्यनिवृत्तिफलको हि नियमः, न तु स्वार्थविधानतात्पर्यकः' असे नियमाचे व्याख्यान केलें असल्यामुळें, समासग्रहणकृत नियमाचे समासाला प्रातिपदिकसंज्ञा व्हावी हे सांगण्यात तात्पर्य नसून समासेतर अर्थवान् समुदायाला जी पूर्व सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञेची प्राप्ति होती तिचा निषेध करण्यात तात्पर्य आहे आणि अशा रीतीनें तें 'समास' ग्रहण निषेधरूपानें फलित होते व 'निषेधाश्च बलीयांसः' प. १२१ या न्यायान्वयें विधायक सूत्रापेक्षा निषेध बलवत्तर ठरत असल्यामुळें, तो समासग्रहणफलित निषेध जसा परत्वामुळें 'मूलकेनोपदंशम्' या कृदन्त समुदायाला प्रकृत सूत्रानें प्राप्त होणाऱ्या प्रातिपदिकसंज्ञेचा बाध करतो तसाच तो, निषेधक असल्यामुळें निषेधकत्वामुळें देखील, वरील परिभाषा-न्वयें त्या संज्ञेचा बाध करतो असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.) प्रकृत सूत्रात 'कृद्ग्रहणे' ही परिभाषा उपस्थित केल्यानें कोणतेंहि फल निष्पन्न होत नाहीं असें जें मनोरमेंत म्हटले आहे ते 'प्रयोगादा-

ख्यायाम्' सू. ४.१.४८ या सूत्रावरील भाष्यावरून व तसेच कैयटवृत्तीवरून स्पष्ट होते. (त्या भाष्यात भाष्यकार म्हणतात- 'ननु चेदानीं प्रातिपदिकसंज्ञायामप्येतया परिभाषया-कृद्ग्रहणपरिभाषया - शक्यमिहोपस्थातुम् ? । नेत्याह । इह हि मूलकेनोपदंशं भुङ्क्ते इति वाक्येऽपि लुक् प्रसज्येत ।' या भाष्याचे व्याख्यान करिताना कैयटानें 'तस्मात् स्थितमेतत् कृत्तद्धितसमासाश्चेत्यत्र कृद्ग्रहणपरिभाषा नोपतिष्ठते । यस्मादप्रत्यय इत्यस्य प्रतिषेधस्य बाधनार्थं तत्र कृद्ग्रहणम् । परिभाषोपस्थाने तु सति, मूलकेनोपदंशं भुङ्क्ते इति वाक्यस्यापि स्यात् । तथा च समासग्रहणाद्यो नियमः सबाध्येत । मध्येऽपवादा इति न्यायाच्च अप्रत्यय इत्यय निषेधः कृद्ग्रहणे न बाध्येत, न तु समासग्रहणकृतो नियमः । तत्र परत्वात्समासग्रहणेन गतिकारक पूर्वस्यापि कृदन्तस्य वाक्यस्य प्रातिपदिकसंज्ञाया निवर्तनात् यस्मात् कृद्विहितस्तदादेरेव कृदन्तस्य प्रातिपदिकसंज्ञाऽवतिष्ठते ।' या वरील भाष्यान्वयें व कैयटव्याख्यानान्वयें हें स्पष्ट होते की, प्रकृत सूत्राचे ठिकाणी कृद्ग्रहणपरिभाषा प. २८ उपस्थित होत नाही. त्यामुळें 'मूलकेनोपदंशम्' या कारकसहित कृदन्ताला प्रातिपदिकसंज्ञा न होता, ज्याहून 'णमुल्' हा कृत् प्रत्यय झाला आहे त्या णमुल्प्रत्ययान्त 'उपदंशम्' या प्रत्ययग्रहणपरिभाषान्वयें कृदन्त ठरणाऱ्या, शब्दालाच प्रकृत सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा होते )

शब्दरत्न – न च समासे इति । नापि वाक्ये इति बोध्यम् । एकार्थीभावेति । एकोपस्थितिनियामिका समुदायशक्तिरेवात्रैकार्थीभाव इति भावः । एवं समासे वृत्तिः सिद्धा । वाक्येऽपि शक्तिरस्ति । विशेषणविशेष्यभावादौ तच्छक्तेरर्थवत्सूत्रभाष्यादावुक्तत्वात् । लक्षणेति । वृत्तौ वाक्ये चेति भावः । असिद्धेरिति । समास इव तद्धितेऽपि शक्तिलक्षणयोरभावादिति भावः । पचतकीत्यादाविति । न च पूर्ववर्तित्वोत्तरवर्तित्वाभ्यामेव वैशिष्ट्यं निवेशनीयम्, विनिगमनाविरहेण मध्यवर्तीत्वस्यापि ग्रहणापत्तेरित्याशयात् । किं च बहुपटवस्तिष्ठन्तीति

वाक्यस्यापि समासापत्तिः । एवं—समासग्रहणस्य नियमार्थत्वाभावे । न चार्थवत्त्वाभावाद्वारणं, न्यायनये उत्तरसूत्रे तदसम्बन्धात् । "तृतीयाप्रभृतीनि—" इति तु स्वरे विशेषार्थम् ।

'न च सा समासेऽस्ति' असें जें प्रकाशकारानीं म्हटलें आहे त्यावरून हें देखील निष्पन्न होतें कीं, त्याच्या मतें वाक्याचे ठिकाणीं देखील वृत्तिमत्व म्हणजे अर्थ बोधित करण्याची स्वतंत्र अभिधाशक्ति किंवा लक्षणाशक्ति, नसते. 'एकार्थीभावाम्युपगमात्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्यांतील 'एकार्थीभाव' या शब्दाचा 'एकोपस्थितिनियामिका समुदायशक्तिः' असाच अर्थ आहे. (सारांश समासांत व वाक्यांत एकत्र उपस्थित होणाऱ्या पदार्थ अर्थ परस्पराशीं अन्वित झाल्यानें जो एक विशिष्ट अर्थ समुदायशक्तीनें बोधित होतो त्यालाच एकार्थीभाव म्हणतात.) अशा रीतीनें समासाचे ठिकाणीं वृत्तिमत्व सिद्ध होतें (कारण दोन पदांचा समास झाला असता त्यांचा अर्थ परस्पराशीं अन्वित होऊन जो विशिष्ट अर्थाचा बोध होतो तो समासाचे ठिकाणीं असलेल्या समुदायशक्तीनेंच होतो हें स्पष्टपणें व्यक्त होतें. वाक्याचे ठिकाणीं जरी तसें स्पष्टपणें दिसून येत नाहीं तरी) वाक्याचे ठिकाणीं देखील समुदायशक्ति असतेच; कारण 'अर्थवदधातुरप्रत्ययः.' १.२.४५ या सूत्रावरील व इतर सूत्रावरील भाष्यांत असें म्हटलें आहे कीं, वाक्यांतील पदें विशेषणविशेष्यभावापन्न झाल्यानें समुदायशक्तीनें वाक्याच्या अर्थाचा बोध होतो. (उदाहरणार्थ 'रामो गृहं गच्छति' या वाक्यांतील पदांचे अर्थ परस्परान्वित होऊन 'रामकर्तृकगृहकर्मकगमनम्' असा जो त्या वाक्यावरून विशिष्ट अर्थाचा बोध होतो तो बोध करण्याची समुदायशक्ति वाक्यांत आहे. 'अर्थवदधातु' १.२.४५ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात—"पदार्थानामभिसम्बन्धस्योपलब्धिर्नर्वति वाक्ये··· ···इह—देवदत्त गामभ्याज शुक्लामिति वाक्ये—देवदत्त इत्युक्ते कर्ता निर्दिष्टः··· गामित्युक्ते कर्म निर्दिष्टम्··· अभ्याजेत्युक्ते

क्रिया निर्दिष्टा ... शुक्लामित्युक्ते गुणोनिर्दिष्टः -- इहेदानीं देवदत्त गामभ्याज शुक्लामित्युक्ते सर्वं निर्दिष्टम् । देवदत्त एव कर्ता नान्यः। गामेव कर्म नान्यत् । अभ्याजैव क्रिया नान्या । शुक्लामेव न कृष्णामिति । एषां पदानां सामान्ये वर्तमानानां यद्विशेषेऽवस्थानं स वाक्यार्थः ।) 'मीमांसकमतेऽपि लक्षणाऽस्त्येव' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, समासादि वृत्तीचे ठिकाणी व वाक्याचे ठिकाणी लक्षणा असते, म्हणजे तद्धित समासादि वृत्तीचा व तसेच वाक्याचा अर्थबोध लक्षणेनेंच होतो. ( सारांश मनोरमेंत दिलेल्या कारिकेतील 'वाक्य' या शब्दाचा 'समस्तासमस्तपदसमूह' या अर्थामध्यें प्रयोग केला आहे.) 'बहुपटव इत्याद्यसिद्धेः' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचे कारण हें की, नैयायिकांच्या मते जशी समासात अर्थबोध करण्याची शक्ति नसते तशी 'बहुपटव.' इत्यादि तद्धितविशिष्ट शब्दात देखील अर्थबोध करण्याची अभिधारूप किंवा लक्षणारूप शक्ति नसते, (व अशा रीतीनें अर्थवत्त्वाच्या अभावामुळें त्याला प्रातिपदिकसंज्ञा न होण्याची व त्याहून सुबुत्पत्ति न होण्याची आपत्ति येते ) 'पचतकीत्यादावति व्याप्तेः' असे जें दीक्षितानी मनोरमेंत म्हटले आहे ते अशा आशयानें म्हटले आहे की, जो शब्द तद्धितप्रत्ययादि किंवा तद्धितप्रत्ययान्त आहे तत्राव शब्दाला तद्धितविशिष्ट मानावे व ज्या शब्दस्वरूपात तद्धितप्रत्यय मध्यवर्ति आहे तशा शब्दाला तद्धितविशिष्ट मानू नये अशा प्रकारचा भेद करण्यास कोणतेंहि प्रमाण उपलब्ध नसल्यामुळें, जेथें तद्धितप्रत्यय मध्यवर्ती आहे तशा ('पचतकि' इत्यादि शब्दाला तद्धितविशिष्ट मानणें भाग पडेल व त्यामुळें) तशा शब्दाला प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति येईल. दुसरे असे कीं, प्रकृत सूत्रातील 'तद्धित' या शब्दानें तद्धितविशिष्टाचें ग्रहण होते असे मानले तर, 'बहुपटवस्तिष्ठन्ति' या वाक्याला देखील प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति येईल; (कारण प्रकृत सूत्रातील 'समास' या पदाचे ग्रहण नियमार्थ न मानल्यास, 'बहुपटवस्तिष्ठन्ति' हा असमस्त अर्थवान् पदसमुदाय

तद्धितविशिष्ट असल्यामुळे, त्याला प्रातिपदिकसंज्ञा होण्याची व 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू. ६५० या सूत्रानें अन्तर्वर्ति विभक्ति-प्रत्ययाचा लुक् होण्याची आपत्ति येईल ) 'किं चैवं कृद्ग्रहण-परिभाषया' या मनोरमेतील पक्तींतील 'एवम्' या पदाचा 'समासग्रहणस्य नियमार्थत्वाभावे,' म्हणजे प्रकृत सूत्रातील 'समास' या पदाचे ग्रहण नियमार्थक न मानता विध्यर्थक मानल्यास, असा अर्थ आहे. 'बहुपटवस्तिष्ठन्ति' हें वाक्य (नैयायिकाच्या मतें) अर्थवान् नसल्यामुळें (तें जरी तद्धितविशिष्ट आहे तरी) त्याला प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति येत नाही, म्हणजे अर्थवत्वा-भावामुळे, त्या मताचे निवारण होते, असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाही; कारण नैयायिकाचें मत बरोबर मानल्यास, पूर्वसूत्रातून प्रकृत सूत्रात 'अर्थवत्' या पदाची अनुवृत्ति होऊ शकत नाही. (नैयायिकाच्या मतें कृदन्त, तद्धितान्त, समास व वाक्य यांच्यामध्ये अभिधानशक्तीनें किंवा लक्षणेनें अर्थबोध करण्याची शक्ति नसल्यामुळें, ते त्यांच्या मतें अर्थवान् ठरत नाहीत, आणि प्रकृत सूत्रात 'कृत् = कृदन्त,' तद्धित = तद्धितान्त' व 'समास' यांचेंच ग्रहण केले असल्यामुळें व ते नैयायिकाच्या मतें अर्थवान् नसल्यामुळें, त्यांना 'अर्थवत्' हें विशेषण लागूच पडत नाही आणि त्यामुळें 'अर्थवत्' या पदाची प्रकृत सूत्रात अनुवृत्ति करणें विसंगत ठरतें. सारांश 'बहुपटवस्तिष्ठन्ति' हा पदसमुदाय तद्धितविशिष्ट असल्या-मुळें त्याला प्रकृत सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा होण्याची आपत्ति येते व पूर्व सूत्रातील 'अर्थवत्' या पदानें त्या आपत्तीचें न्यायमतानें निवारण होऊ शकत नाही.) 'तृतीया प्रभृतीन्यन्यतरस्याम्' सू. ७८८ हें समासविकल्पविधायक सूत्र स्वरांत फरक व्हावा याकरितां केलें आहे. ('मूलकेनोपदंशम्' या स्थली विकल्पेंकरून समास केल्यास, 'मूलकोपदंशम्' हा सामासिक शब्द 'समासस्य' सू. ३७२८ या सूत्रानें अन्तोदात्त होतो. समास न केल्यास 'मूलकेनोपदंशम्' या इतरं समुदायाला प्रातिपदिकसंज्ञा केल्यानें 'सुपो धातुप्रातिपदिकयोः'

या सूत्राने अन्तर्वर्ति विभक्तिप्रत्ययाचा लुक् होऊन 'मूलकोपदशम्' असेच जरी रूप होईल तरी हा समास नसल्यामुळें, 'समासस्य' हें सूत्र येथें प्रवृत्त होणार नाही व 'मूलकोपदशम्' या शब्दात दोन उदात्त स्वर राहतील अशा रीतीनें ते समासविकल्पविधायक सूत्र चरितार्थ होऊ शकत असल्यामुळें, 'मूलकेनोपदशम्' या कृदन्त समुदायाला प्रातिपदिकसंज्ञा केल्यास ते सूत्र निरर्थक ठरण्याची आपत्ति येते असे जे शंकाकाराचे म्हणणे आहे ते चूक ठरतें.)

शब्दरत्न–अभेदविवक्षायामिति । सादृश्यमूलाभेदविवक्षाया- मित्यर्थः । अनुकरणं च स्वसादृश्येनानुकार्यमुपस्थापयति, तयोप- स्थितस्य शाब्देऽन्वयप्रतियोगित्वं व्युत्पत्तिवैचित्र्यात् । एवं च वृत्यार्थबोधकत्वरूपार्थवत्वाभाव इति भावः । अत एव "भू सत्ता- याम्" इत्यादिनिर्देशा. सङ्गच्छन्ते तदाह–भू इति । अपदं न प्रयुञ्जीतेत्यस्यापरिनिष्ठितमित्यर्थः । अस्य चास्मादेव लिङ्गात्परि- निष्ठितत्वम् । भेदविवक्षायामिति । अर्थवत् शब्दोऽपि वृत्तिविषय एवैतत्पक्षे इति भाव. । अयं पक्षो "मतौ छः सूक्त" इति सूत्रे भाष्ये । अनयोश्च लक्ष्यानुरोधात् व्यवस्थेति दिक् ।

मनोरमेंतील 'अभेदविवक्षायाम्' या पदाचा 'सादृश्यमूला- भेद विवक्षायाम्' असा अर्थ आहे (अनुकरण व अनुकार्य हे जरी वास्तविक भिन्न आहेत तरी, त्या दोहोंचे स्वरूप अत्यन्त सदृश असल्यामुळें त्यांच्यामध्यें अभेद मानला जातो.) अनुकरण हें अनुकार्याच्या सारखें स्वरूपात असल्यामुळें, ते त्या स्वरूपसादृश्यामुळें अनुकार्याची उपस्थिति करून देते व अशा रीतीनें उपस्थित झालेल्या अनुकार्याचा वाक्यातील इतर पदाशी कार्यकारणभावरूपवैचित्र्यानें शाब्दिक अन्वय होतो. (अनुकरण दोन प्रकारचें असते, एक व्यक्त शब्दाचे अनुकरण, व दुसरे अव्यक्त ध्वनीचे अनुकरण. प्रथम स्थली अनुकरणाची अनुकार्याच्या विशिष्ट वर्णानुपूर्वीसारखीच वर्णानुपूर्वी असते व या अत्यन्त सादृश्यामुळें, अनुकरण अनुकार्याची उपस्थिति

करून देते व अशा रीतीने या दोहोमध्ये उपस्थाप्योपस्थापकरूप कार्यकारणसंबंध आहे. या कार्यकारणभावामुळेच अनुकार्याचा वाक्यात शाब्दिक अन्वय होतो. द्वितीय स्थली ज्या अव्यक्त ध्वनीचे अनुकरण केले जाते त्यात वर्णानुपूर्वी नसल्यामुळे व तशा स्थली अनुकरण व अनुकार्य यात विशिष्टवर्णानुपूर्वीरूप सादृश्य नसल्यामुळे, अनुकरण अनुकार्याची उपस्थिति करून देऊ शकत नाही. म्हणून द्वितीय प्रकारचे अनुकरण अर्थरहितच असते प्रथम स्थली मात्र अभेदानुकरणपक्षात अनुकरण अनुकार्याची उपस्थिति करून देण्यामध्येच खर्ची पडत असल्यामुळे, अनुकरण अर्थरहित ठरते व त्यामुळे त्याला प्रातिपदिकसंज्ञा होत नाही. परंतु भेदानुकरणपक्षात 'प्रकृतिवदनुकरणं भवति'–परि. ३६ या परिभाषान्वये अनुकरण देखील अनुकार्यासारखेच अर्थवान ठरत असल्यामुळे, त्याला पूर्व सूत्राने प्रातिपदिकसंज्ञा होऊन त्याहून सुबुत्पत्ति होते ) यावरून हे स्पष्ट होते की, अभेदानुकरणपक्षात अनुकरणाच ठिकाणी अभिधावृत्तीने किंवा लक्षणावृत्तीने अर्थबोध करून देण्याचे सामर्थ्य नसल्यामुळे, ते अर्थवान् ठरत नाही (आणि त्यामुळे त्याला प्रातिपदिकसंज्ञा होत नाही व त्याहून सुबुत्पत्ति होत नाही ) म्हणूनच, म्हणजे अभेदानुकरणपक्षात अनुकरणाला प्रातिपदिकसंज्ञा होत नसल्यामुळे व त्याहून सुबुत्पत्ति होत नसल्या-मुळेच, 'भू सत्तायाम्' इत्यादि निर्देश योग्य ठरतात आणि म्हणूनच 'भू सत्तायाम्' हे (अभेदानुकरणपक्षात अनुकरणाला प्रातिपदिकसंज्ञा होत नाही याचे दीक्षितानी मनोरमेत) उदाहरण दिले आहे 'अपद न प्रयुञ्जीत' असे जे वचन आहे त्याचा, म्हणजे त्यातील 'अपदम्' याचा 'अपरिनिष्ठितम्' म्हणजे अप्रयोगार्ह, असा अर्थ आहे पाणिनीने 'भू सत्तायाम्' इत्यादि निर्देश केले असल्यामुळे, त्या निर्देशावरूनच 'भू' इत्यादि अनुकरणाचे परिनिष्ठितत्व-प्रयोगार्हत्व–सिद्ध होते. (ज्याला प्रातिपदिकसंज्ञा आहे त्याहून सुबुत्पत्ति केल्याशिवाय त्याचा वाक्यात प्रयोग करता येऊ शकत

नाहीं. पण अभेदानुकरणपक्षात अनुकरण हें अर्थवान् नसल्यामुळें व अशा रीतीनें प्रातिपदिकसंज्ञक ठरत नसल्यामुळें, त्याहून सुबुत्पत्ति होऊ शकत नाहीं. त्यामुळें त्या पक्षात अनुकरणाचा अविभक्तिक प्रयोग वाक्यात करता येतो व त्याचें अविभक्तिक रूप हेंच त्याचें परिनिष्ठित-प्रयोगार्ह-रूप होय असें मानलें असता, 'अपदं न प्रयुञ्जीत' या वचनाचें कोणत्याहि रीतीनें उल्लंघन होत नाहीं.) भेदानुकरणपक्षात शब्द देखील अर्थाप्रमाणें वृत्तीचा-अभिधेचा-विषय होतात (जसा शब्दापासून अभिधावृत्तीनें त्याच्या अर्थाचा बोध होतो त्याचप्रमाणें भेदानुकरणपक्षात अनुकरण हें अनुकार्यरूप शब्दाचाच अभिधावृत्तीनें बोध करून देतें, म्हणजे ज्याचें अनुकरण केलें आहे तो अनुकार्य शब्दच अनुकरणानें बोधित होतो, व अशा रीतीनें भेदानुकरणपक्षात अनुकरण अर्थवान् ठरत असल्यामुळें, त्याला प्रातिपदिकसंज्ञा होऊन त्याहून सुबुत्पत्ति होते.) हा द्वितीय पक्ष 'मतौ छः सूक्तसाम्नोः' सू. ५-२-५९ या सूत्रावरील भाष्यात सांगितला आहे (या भाष्यात 'छप्रकरणेऽनेकपदादपि' हें वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचें व्याख्यान करिताना भाष्यकार म्हणतात—'छप्रकरणेऽनेकपदादपीति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात्—अस्यवामीयम्, कयाशुभीयम् । किं पुनः कारणं न सिध्यति ? । अप्रातिपदिकत्वात् ।' या भाष्याचा अर्थ हा आहे की, 'अस्यवामीयम्, कयाशुभीयम्' इत्यादि रूपें सिद्ध होण्याकरिता ''छ' प्रत्यय पदसमुदायाहून देखील व्हावा असें विधान केलें पाहिजे; कारण पदसमुदायाला प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकत नसल्यामुळें तथा समुदायाहून 'छ' हा तद्धित प्रत्यय होऊ शकणार नाहीं व वरील रूपें सिद्ध होऊ शकणार नाहीत. असें सांगून भाष्यकार नंतर 'सिद्धं तु प्रातिपदिकविज्ञानात्' असें उलट अर्थाचें वार्तिक पठित करितात व म्हणतात —'सिद्धमेतत् । कथम् ? । प्रातिपदिकविज्ञानात् । कथं प्रातिपदिकविज्ञानम् ? । स्वं रूपं शब्दस्याऽशब्दसंज्ञेति वचनात् । स्वं रूपं शब्दस्याऽशब्दसंज्ञा भवतीति । एवं

योऽसावाम्नाये अस्यवामशब्दः पठ्यते सोऽस्यपदार्थः । किं पुनरन्ये आम्नायशब्दा अन्य इमे ? ओमित्याह । कुत एतत् ? । आम्नायशब्दानामान्यभाव्य स्वरवर्णानुपूर्वदेशकालनियतत्वात् ।' या भाष्याचा कैयटानें 'यथा स्व रूपमिति वचनादग्नेर्ढमित्यत्राग्निशब्दस्वरूपमग्निशब्दस्य प्रत्यायकमेवमाम्नायपठितस्यास्यवामशब्दस्य च्छप्रत्ययप्रकृतिरस्यवामशब्दः प्रत्यायक इत्यर्थवत्त्वात्पदसमुदायरूपत्वाभावाच्च प्रातिपदिकत्वमित्यर्थः ।' असा थोडक्यात स्पष्ट अर्थ दिला आहे. मग अनुकार्य वैदिक शब्द व त्याचे अनुकरण करणारे शब्द याचें स्वरूप अत्यन्त सदृश असून देखील हे शब्द भिन्न मानले पाहिजेत काय असा प्रश्न केला असता, त्या प्रश्नाचे भाष्यकार 'होय' असे उत्तर देतात, व तसे उत्तर देण्याचे मुख्य कारण हे की, अनुकार्य व अनुकरण या दोहोंच्या अर्थामध्यें फरक असतो व उद्योतात सांगितल्याप्रमाणे तो फरक 'अनुकार्यस्य बाह्योऽर्थः, अनुकरणस्य तु अनुकार्यशब्दरूपमेवेत्यर्थभेदः' असा आहे आणि अनुकरण व अनुकार्य हे भिन्नार्थवाचक शब्द आहेत या सिद्धान्ताच्या दृढीकरणार्थ भाष्यकारानी 'आम्नायशब्दानामान्यभाव्यम्' हें वार्तिक पठित केले आहे. या भाष्यावरून भेदानुकरणपक्ष स्पष्टपणे सिद्ध होतो.) या दोन पक्षांतील कोणत्या पक्षाचा कोणत्या स्थली आश्रय करावा हे लक्ष्याच्या अनुरोधानें ठरविले पाहिजे. (जर अनुकरणाहून सुबुत्पत्ति केली असेल तर भेदानुकरणपक्षाचा आश्रय करून ती केली आहे असे मानले पाहिजे व सुबुत्पत्ति केली नसेल तर अभेदानुकरणपक्षाचा आश्रय करून ती केली नाहीं असें मानले पाहिजे आणि अशा रीतीनें वरील दोन पक्षांची इष्टरूपसिद्धयर्थ व्यवस्था लावली पाहिजे.)

मनोरमा– लिङ्गविशिष्टस्येति । लिङ्गबोधकप्रत्ययविशिष्टस्यापीत्यर्थः । परिभाषायाः प्रयोजनन्तु अयस्कुम्भी । "अतः कृकमि" इति सत्वम्, तद्धि कंसादिपूत्तरपदेषु विधीयते । किं च । कुमारीमाचष्टे कुमारयति । "णाविष्ठवद्" इति टिलोपः ।

एवं यामिनयन्त्यहानि इत्यत्र आचारे क्विबपि फलम् । ङ्याब्भ्या प्रागिति । तेन लोहिनिका आर्यका च सिद्ध्यति । तथा हि स्वार्थिकत्वेनान्तरङ्ग परश्च "लोहितान्मणौ" इति कन् ङीप बाधेत । ततो लोहितिकेत्येव स्यादिष्यते तूभयम् । ङीब्ग्रहणसामर्थ्यात् ङ्यन्तात्कनि रूपद्वय सिद्धम् "वर्णादनुदात्तात्" इत्यस्य वैकल्पिकत्वात् । आर्यशब्दात् "न सामिवचने" इत्यत्र ज्ञापयिष्यमाणोऽत्यन्तस्वार्थिकोऽपि कन् आब्ग्रहणसामर्थ्यात् पूर्वं न प्रवर्तते । तेन "उदीचामात. स्थाने यकपूर्वाया." इति इत्वविकल्प सिद्ध्यति ॥

('ङ्याप्प्रातिपदिकात्' सू १८२ सूत्रावरील कौमुदीत 'प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणम्'—परि ७२—ही जी परिभाषा दिली आहे त्या परिभाषेतील) 'लिङ्गविशिष्टस्य' या पदाचा लिङ्गबोधकप्रत्ययविशिष्टस्य,' म्हणजे लिङ्गाचा बोध करून देणाऱ्या प्रत्ययानें युक्त अशा शब्दाचे (ग्रहण होते), असा अर्थ आहे. या परिभाषेचे प्रयोजन हे आहे की, 'अयस्कुम्भी' या उदाहरणात (विसर्गापुढे सूत्रनिर्दिष्ट 'कुम्भ' हा शब्द नसून 'कुम्भी' हा स्त्रीप्रत्ययविशिष्ट शब्द आहे तरी) 'अत कृकमि' सू १६० या सूत्रानें विसर्गाचे सत्व व्हावे 'कस' इत्यादि शब्द उत्तर पद असता, त्या सूत्रानें विसर्गाचे सत्व होणे सांगितले आहे ('अत कृकमि' या सूत्रात 'कुम्भ' इत्यादि प्रातिपदिकविशेषाचे ग्रहण केले आहे व या परिभाषान्वयें त्या प्रातिपदिकानी 'कुम्भी' इत्यादि स्त्रीप्रत्ययविशिष्ट शब्दाचे देखील ग्रहण होते आणि त्यामुळें 'अयस्कुम्भी' या उदाहरणात 'अय ' यातील विसर्गापुढें 'कुम्भ' शब्द नसून 'कुम्भी' हा शब्द आहे तरी विसर्गाचे सत्व होते ) या परिभाषेचे दुसरे प्रयोजन हे आहे की, 'कुमारीमाचष्टे कुमारयति' या उदाहरणात 'णाविष्ठवद्' या वचनान्वयें टिलोप व्हावा ('प्रातिपदिकात् धात्वर्थे बहुलमिष्ठवच्च' या गणसूत्रानें प्रातिपदिकाहून 'णिच्' प्रत्यय होणे व तो प्रत्यय केला असता, 'इष्ठ' प्रत्यय पुढें असताना प्रातिपदिकाला जी कार्ये होणे सांगितली आहेत

तो कार्य होणे, याचे विधान केले आहे. या गणसूत्रात 'प्रातिपदिक' या सामान्यशब्दाचे ग्रहण केले आहे तरी, त्या शब्दानें वरील परिभाषान्वयें लिङ्गविशिष्टप्रातिपदिकाचे ग्रहण होऊन तशा लिङ्गविशिष्ट प्रातिपदिकाहून देखील 'तत्करोति तदाचष्टे' इत्यादि अर्थामध्ये णिच्प्रत्यय होतो, व तो प्रत्यय केल्यावर त्या लिङ्गविशिष्ट प्रातिपदिकाला, 'इष्ठ' प्रत्यय पुढें आला असता होणारी, कार्यें होतात. त्यामुळें 'कुमार' या प्रातिपदिकाहून जसा 'तत्करोति तदाचष्टे' या अर्थामध्यें णिच्प्रत्यय होतो त्याचप्रमाणे 'वयसि प्रथमे' सू. ४७८ या सूत्रानें 'कुमार' या प्रातिपदिकाहून 'ङीप्' प्रत्यय केला असता 'कुमारी' असा जो ङीबन्त शब्द होतो त्या शब्दाहून देखील वरील अर्थामध्यें णिच् प्रत्यय होतो. व तो प्रत्यय केला असता इष्ठवद्भावानें 'टेः' सू. १७८६ या सूत्रानें 'कुमारी' यातील 'टि' चा म्हणजे अन्त्य ईकाराचा, लोप होऊन 'कुमार्+णि+शप्+ति' अशी स्थिति झाली असता, शप्प्रत्ययाच्या निमित्तामुळें 'सार्वधातुकार्धधातुकयोः' सू. २१६८ या सूत्रानें 'णि = इ' चा 'ए' असा गुण होऊन व त्या 'ए' पुढें 'शप् = अ' हा अच् असल्यामुळें त्याचे जागी 'एचोऽयवायावः' सू. ६१ या सूत्रानें 'अय्' असा आदेश होऊन 'कुमारयति' असे इष्ट रूप सिद्ध होते.) याचप्रमाणे 'यामिनयन्ति अहानि' या स्थली ('यामिनी' या स्त्रीप्रत्ययविशिष्ट शब्दाहून) आचारार्थक क्विप् प्रत्यय होणे हे देखील वरील परिभाषेचे फल आहे. ('सर्वप्रातिपदिकेभ्यः क्विब्वा वक्तव्यः'–सू. २६६५ वरील वार्तिक–या वार्तिकानें प्रातिपदिकाहून आचारार्थक क्विप्-प्रत्यय होणे सांगितले आहे. या वार्तिकात 'प्रातिपदिक' या सामान्य शब्दाचे ग्रहण केले आहे तरी, वरील परिभाषान्वयें स्त्रीप्रत्ययविशिष्ट प्रातिपदिकाचे ग्रहण होते. म्हणून 'यामिन्' या नकारान्त प्रातिपदिकाहून 'ऋन्नेभ्यो ङीप्' सू. ३०६ या सूत्रानें 'ङीप्' प्रत्यय केला असता 'यामिनी' असे जें स्त्रीप्रत्ययविशिष्ट रूप होते त्याहून देखील आचारार्थक 'क्विप् = व्' प्रत्यय करता येतो, व त्या

प्रत्ययाचा जरी 'वेरपृक्तस्य' सू. ३७५ या सूत्रानें लोप होतो तरी 'यामिनी' हा प्रत्ययलक्षणानें क्विप् प्रत्ययान्त आहे असे मानता येते व त्यामुळें 'सनाद्यन्ता धातवः' सू. २३०४ या सूत्रानें त्याला धातुसंज्ञा होऊन त्याहून 'शप् = अ' व 'झि = अन्ति' हे प्रत्यय केल्यावर 'यामिनी + अ + अन्ति' अशी स्थिति झाली असता. पूर्वी सांगितल्याप्रमाणे 'शप्' प्रत्ययाच्या निमित्तामुळें 'यामिनी' यातील अन्त्य ईकाराचा गुण होऊन व अयादेश होऊन 'यामिनयन्ति' असे इष्ट रूप सिद्ध होते.) प्रकृत सूत्रावरील कौमुदीत 'ङ्याब्भ्या प्राङ् माभूत्' असे म्हटले असल्यामुळें, 'लोहिनिका, आर्यका' ही रूपें सिद्ध होतात. कौमुदीत जसे वर सांगितल्याप्रमाणे म्हटले आहे तसे न मानल्यास, 'लोहितान्मणौ,' सू. २०९८ या सूत्रानें होणारा स्वार्थिक 'कन्' प्रत्यय अन्तरङ्ग व तसच परसूत्रानें होणारा असल्यामुळें, तो 'ङीप्' प्रत्ययाचा बाध करील, म्हणजे 'ङीप्' प्रत्यय प्रथम न होऊ देता तो स्वार्थिक प्रत्ययच प्रथम होईल, व त्यामुळें 'लोहितिका' एवढें एकच रूप सिद्ध होईल. परंतु दोन्ही प्रकारचीं रूपें, म्हणजे 'लोहितिका, लोहिनिका' ही दोन्ही रूपें, सिद्ध होणे इष्ट आहे. प्रकृत सूत्रात 'ङीप्' प्रत्ययाचे ग्रहण केले असल्यामुळें, त्या ग्रहणाच्या सामर्थ्यानें ङ्यन्ताहून 'कन्' प्रत्यय होतो व वरील दोन्ही रूपें सिद्ध होतात; कारण 'वर्णादनुदात्तात्' सू. ४९६ या सूत्रानें होणारे कार्य वैकल्पिक आहे. ('लोहितान्मणौ' या सूत्रानें स्वार्थिक 'कन्' प्रत्यय होणें हे कार्य निर्निमित्तक आहे व वर्णवाचक शब्द तकारोपध आणि अनुदात्तान्त असता त्याहून विकल्पेंकरून 'ङीप्' प्रत्यय होणे व त्याबरोबरच उपधेतील तकाराचा नकार होणे हे निमित्तद्वयामुळें होणारे कार्य आहे. म्हणून स्वार्थिक 'कन्' प्रत्यय होणे हे निर्निमित्तक कार्य, निमित्तद्वयामुळें होणाऱ्या 'ङीप्' कार्याच्या मानानें, अन्तरङ्ग ठरते, व 'पूर्वपर' प. ३८ किंवा 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' – परि – ५० – या परिभाषान्वयें अन्तरङ्ग कार्याची प्रथम प्राप्ति होते. तसेच स्वार्थिक 'कन्' प्रत्यय होणे ह

परसूत्रानें होणारें कार्य असल्यामुळें, 'पूर्वात्पर बलवत्' या न्यायान्वयें त्याचीच प्रथम प्राप्ति होते. त्यामुळें स्वार्थे 'कन्' प्रत्यय प्रथम केला असता, 'लोहित + कन् = लोहितक' असें रूप झाल्यावर त्या शब्दात तकार उपधेंत राहून नसल्यामुळें, 'वर्णादनुदात्तात्' या सूत्रानें 'ङीप्' प्रत्यय होऊं शकत नाहीं व 'अजाद्यतष्टाप्' सू ४५४ या सूत्रानें त्या अदन्त शब्दाहून 'टाप् = आ' हा प्रत्यय होऊन आणि 'प्रत्ययस्थात्कात्पूर्वस्य' सू ४६३ या सूत्रानें प्रत्ययस्थ ककारापूर्वी असलेल्या अकाराचा इकार होऊन 'लोहितिका' असेंच रूप सिद्ध होऊं शकेल व 'लोहिनिका' हें पाक्षिक इष्ट—रूप सिद्ध होऊं शकणार नाहीं. परंतु प्रकृत सूत्रात 'ङी' व 'आप्' या प्रत्ययांचें ग्रहण, 'ङ्याबन्तात् तद्धितोत्पत्तिर्यथा स्यात् ङ्याबन्त्या प्राङ् माभूत्' या करिता, केलें असल्यामुळें, त्या प्रत्ययाच्या ग्रहण-सामर्थ्यानें 'लोहित' शब्दाहून 'ङीप्' प्रत्यय, बहिरङ्ग असून देखील, प्रथम होतो व तशा ङीबन्त शब्दाहून स्वार्थिक 'कन्' प्रत्यय होतो आणि 'वर्णादनुदात्तात्' या सूत्रानें होणारें कार्य वैकल्पिक असल्यामुळें, त्या सूत्रानें 'लोहित' शब्दाहून विकल्पेंकरून 'ङीप्' प्रत्यय केला असता, उपधेंतील तकाराचा नकार होऊन 'लोहिनी' असें रूप होतं व या ङीबन्त शब्दाहून 'लोहितान्मणौ' या सूत्रानें होणारा स्वार्थिक 'कन्' प्रत्यय अन्तरङ्ग असून देखील नंतर केला असता, 'लोहिनी + कन्' अशा स्थितीत 'केऽणः' सू ८३४ या सूत्रानें 'लोहिनी' यातील अन्त्य ईकार ह्रस्व होऊन 'लोहिनिक' असें रूप होतं व हा शब्द अदन्त असल्यामुळें, 'अजाद्यतष्टाप्' या सूत्रानें 'टाप् = आ' हा प्रत्यय होऊन 'लोहिनिका' असं रूप होतें 'ङीप्' प्रत्यय होणें वैकल्पिक असल्यामुळें तो न केल्यास, 'लोहित' या अदन्त शब्दाहून प्रकृतसूत्रातील 'आप' ग्रहणाच्या सामर्थ्यामुळें प्रथम 'टाप्' प्रत्यय होऊन व नंतर स्वार्थिक 'कन्' प्रत्यय होऊन 'लोहिता + कन्' अशी स्थिति झाली असता, 'केऽण' या सूत्रानें 'लोहिता' यातील आकाराचा अकार होऊन 'लोहितक' अशी

स्थिति झाल्यावर पुन्हा त्या अदन्त शब्दाहून 'टाप् = आ' प्रत्यय केला असता, 'प्रत्ययस्थात्कात्पूर्वस्य' या सूत्रानें त्या अकाराचा इकार होऊन 'लोहितिका' असें पाक्षिक इष्ट रूप देखील सिद्ध होते येथें हें लक्षात ठेवावें की, रक्तवर्णाच्या वाचक 'लोहित' या शब्दाच्या अन्ती 'त' असल्यामुळें, 'वर्णानां तणतिनितान्तानाम्' फिट्सू ३३ या सूत्रानें तो शब्द आद्युदात्त ठरतो व 'अनुदात्तं पदमेकवर्जम्' सू ३६५० या सूत्रानें त्यातील बाकीचे अच् अनुदात्त होत असल्यामुळें, तो अनुदात्तान्त ठरतो आणि तो तकारोपध असल्यामुळें, 'वर्णादनुदात्तात्' या सूत्रानें त्याला विकल्पेंकरून 'ङीप्' प्रत्ययाची प्राप्ति होते.) 'आर्य' शब्दाहून 'न सामिवचने' सू २०७७ या सूत्रानें प्राप्त होणारा अत्यन्त स्वार्थिक 'कन्' प्रत्यय देखील, 'ङ्याप्प्रातिपदिकात्' या सूत्रातील 'आप्' ग्रहणाच्या सामर्थ्यामुळें, पूर्वी होत नाही (व 'अजाद्यतष्टाप्' या सूत्रानें होणारा 'टाप् = आ' प्रत्ययच पूर्वी होतो.) त्यामुळें 'उदीचामातः, स्थाने यकपूर्वाया 'सू. ४६५ या सूत्रानें इत्वाचा विकल्प सिद्ध होतो (आणि 'आर्यिका' व 'आर्यका' अशी पाक्षिक रूपें सिद्ध होतात. 'अनत्यन्तगतौ क्तात्' सू २०७६ या सूत्रानें 'अनत्यन्तगति,' म्हणजे क्तान्तानें जी क्रिया दर्शविली जाते ती क्रिया ज्याचे ठिकाणी होते त्याच्या सकल अवयवाशी त्या क्रियेचा संबंध होत नाहीं, असा अर्थ गम्यमान असता, क्तान्ताहून 'कन्' प्रत्यय होणें सांगितलें आहे. 'सामि' किंवा 'अर्धम्' या अर्थाचे वाचक क्तान्तानें उपपद असल्यास, तशा क्तान्ताहून 'न सामिवचने' सू. २०७७ या सूत्रानें 'कन्' प्रत्यय होण्याचा निषेध केला आहे. पण 'सामि अर्धम्' हा शब्द क्तान्ताचे उपपद असल्यास, त्या उपपदसहित क्तान्त प्रवृत्तीहून ज्ञात होणारी क्रिया अवयवावयवसंबंधिनी नसून अवयवार्धाला व्यापणारी ती क्रिया आहे असें बाधित होत असल्यामुळें, पुन्हा तोच अर्थ सांगण्याकरिता, 'उक्तार्थानामप्रयोगः' या न्यायान्वयें, 'अनत्यन्तगति' या अर्थामध्यें 'कन्' प्रत्यय करण्याची कांहीं गरज

राहत नाही. म्हणून 'सामिच्छिन्नम्' इत्यादि स्थली वास्तविक 'कन्' प्रत्ययाची प्राप्तीच होत नसल्यामुळें व 'प्राप्तस्यैव निषेधः' हा न्याय असल्यामुळें, तें सूत्र व्यर्थ ठरू पाहते. तें सूत्र व्यर्थ न ठरावें याकरितां असें मानलें पाहिजे की, त्या सूत्रानें जो निषेध केला आहे तो 'अनत्यन्तगति' या अर्थामध्यें होणाऱ्या 'कन्' प्रत्ययाचा निषेध केला नसून अत्यन्त स्वार्थिक या अर्थामध्यें होणाऱ्या 'कन्' प्रत्ययाचा निषेध केला आहे, म्हणजे 'सामि' हें क्तान्ताचें उपपद असल्यास, तदा क्तान्ताहून अत्यन्त स्वार्थिक 'कन्' प्रत्यय होऊ शकत नाही असा निषेध करणारें ते सूत्र आहे. अशा रीतीनें तें निषेधक सूत्रच, 'प्राप्तस्यैव निषेध' या न्यायान्वयें, अत्यन्त स्वार्थिक 'कन्' प्रत्यय कोणत्याहि प्रातिपदिकाहून करता येऊं शकतो याचें ज्ञापक ठरते असा 'न सामिवचने इत्यत्र ज्ञापयिष्यमाणो ऽत्यन्त-स्वार्थिको ऽपि कन्' या मनोरमेंतील पक्तीचा भावार्थ आहे. त्या सूत्रावरील कौमुदीत दीक्षितांनी 'अनत्यन्तगतेरिह प्रकृत्यैवाभिधानात् पूर्वेण कन् न प्राप्त. । इदमेव निषेधसूत्रमत्यन्तस्वार्थिकमपि कन ज्ञापयति' असेंच म्हटलें आहे. भाष्यकारांनी तर 'सामिवचने प्रतिषेधानर्थक्य प्रकृत्यभिहितत्वात्' हें वार्तिक पठित करून त्या सूत्राचें प्रत्याख्यान केलें आहे व त्या भाष्यावरील वृत्तीत कैयटानें 'एव तर्हि न सामिवचने इति प्रतिषेधेन स्वार्थिकः कन् अस्तीति ज्ञाप्यते' असें म्हटलें आहे. काशिकेंत देखील तसेंच व्याख्यान केलें आहे व त्याचाच अनुवाद दीक्षितांनी कौमुदींत केला आहे. सारांश वरील निषेधक सूत्रानें ज्ञापित होणारा अत्यन्त स्वार्थिक 'कन्' प्रत्यय निर्निमित्तक असल्यामुळें अन्तरङ्ग असून, अदन्तत्वरूप निमित्तामुळें होणारा 'टाप्' प्रत्यय त्याच्या मानानें बहिरङ्ग आहे. म्हणून जरी अन्तरङ्गशास्त्राची प्रथम प्रवृत्ति झाली पाहिजे तरी, 'ङ्याप्प्रातिपदिकात्' या प्रकृत सूत्रांतील 'आप्' ग्रहणसामर्थ्यामुळें, 'आर्य' या अदन्त शब्दाहून 'टाप्=आ' प्रत्यय प्रथम होऊन 'आर्या' असें रूप झाल्यावर त्याहून नंतर 'कन्' प्रत्यय होतो व 'केऽण.' सू ८३४ या सूत्रानें 'आर्या'

यातील अन्त्य आकाराचा न्हस्व होऊन 'आर्यक' असें रूप झाले असता, या तद्धितान्त प्रातिपदिकाहून पुन्हा 'टाप्' प्रत्यय होऊन 'उदिचामातः स्थाने' या सूत्रानें, 'केऽणः' या सूत्रानें ज्या आकाराचे जागी अकार झाला आहे त्या अकाराचें, विकल्पें करून ह्रस्व होऊन 'आर्यका' व 'आर्यिका' अशी पाक्षिक रूपें सिद्ध होतात.

मनोरमाः—स्यादेतत् । एवं सति बहुगोमत्केति न सिद्ध्येत्, कपः प्रागुगिल्लक्षणङीप्प्रसङ्गादिति चेन्मैवम् । अकृत एव समासे ऽलौकिकप्रक्रियावाक्ये एव उत्तरपदस्यावयवीभूय समासान्तः प्रवर्तते इति वक्ष्यमाणत्वात् । स च विभक्तेः पुरस्तादित्येके । परस्तादिति पक्षे तु तद्धितान्तत्वात् सुब्लुकि, पुनः सुपि चाकृते समास इति सिद्धान्तः । तस्मादन्तरङ्गादपि तद्धितात्प्राङ् ङ्याप्पोः प्रवृत्त्यर्थं ङ्याप्ग्रहणमिति स्थितम् ।

पण 'ङीप्, आप्' हे स्त्रीप्रत्यय तद्धितप्रत्यय होण्यापूर्वी होतात असें मानल्यास 'बहुगोमत्का' या स्थली समासान्त 'कप्' प्रत्यय होण्यापूर्वी 'उगितश्च' सू. ४५५ या सूत्रानें पावलेला 'ङीप्' प्रत्यय प्रथम होण्याची आपत्ति येईल व त्यामुळें 'बहुगोमत्क' असें इष्टरूप सिद्ध होऊ शकणार नाही असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाही; कारण समास होण्यापूर्वीच, म्हणजे सामासिक शब्दस्वरूप तयार होण्यापूर्वीच, जें अलौकिक प्रक्रियावाक्य तयार केलें जात असतें तथा वाक्यातच उत्तरपदाचा अवयव होऊन समासान्त प्रत्यय प्रवृत्त होत असतो, म्हणजे उत्तरपदाच्या पुढें समासान्त प्रत्यय लागत असतो, असें पुढें सांगण्यात येईल. ('बहवः गोमन्तः यस्या सा बहुगोमत्का नगरी' या स्थलीं 'बहु जस् गोमत् जस्' अशा स्थितीतच या अलौकिक प्रक्रियावाक्यात, 'शेषाद्विभाषा' सू. ८९१ या सूत्रानें होणारा समासान्त 'कप्' प्रत्यय होतो व तो 'गोमत् जस्' या उत्तरपदापुढें होत असून त्याचा अवयव होतो व 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू. ६५० या सूत्रानें 'जस्' या दोन्ही अन्तर्वर्ति विभक्तिप्रत्ययांचा लुक् होऊन 'बहुगोमत्क' असें जें

सामासिक रूप तयार होतें तें अदन्त असल्यामुळें, त्याहून 'अजाद्य-तष्टाप्' सू. ४५४ या सूत्रानें स्त्रीत्वबोधक 'टाप्' प्रत्यय नंतर होतो. या विषयाचें अधिक विवेचन शब्दरत्नात केलें जाईल.) कित्येक वैयाकरणाचें असें म्हणणें आहे कीं, अन्तर्वर्ति विभक्तिप्रत्ययाच्या मागें समासान्त प्रत्यय होत असतो, म्हणजे 'बहु जस् गोमत् कप् जस्' अशा त्यांची मांडणी होते. अन्तर्वर्ति विभक्तिप्रत्ययाच्या पुढें समासान्त प्रत्यय होत असतो, म्हणजे 'बहु जस् गोमत् जस् कप्' अशा प्रकारें 'कप्' प्रत्यय होतो, हा पक्ष स्वीकारल्यास, हा कप्प्रत्ययान्त समुदाय तद्धितान्त होत असल्यामुळें (त्याला 'कृत्-द्धितसमासाश्च' या सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा होऊन 'सुपो धातु-प्रातिपदिकयोः' सू ६५० या सूत्रानें अन्तर्वर्ति) विभक्तिप्रत्ययाचा लुक् झाल्यावर पुन्हा त्याहून सुबुत्पत्ति होण्यापूर्वी समास होतो म हाच सिध्दान्त मानला आहे. (या पक्षतीचें विस्तृत विवरण शब्दरत्नात केलें जाईल.) सारांश तद्धित प्रत्यय होणें हें कार्य अन्तरङ्ग असलें तरी, 'ङी' व 'आप्' या प्रत्ययाची प्रथम प्रवृत्ति करून नंतर तद्धित प्रत्यय करावा याकरिता प्रकृत सूत्रात 'ङ्याप्' या पदाचें ग्रहण केलें आहे हें (वरील विवेचनावरून) सिद्ध होतें. (प्रकृत सूत्रावरील भाष्यात-सू. ४-१-१ येथील 'ङ्याप्' या पदाच्या ग्रहणाची अनेक प्रयोजनें सांगून व त्याचें प्रत्याख्यान करून अखेरीस भाष्यकार म्हणतात- 'तद्धितविधानार्थं तु ङ्याब्ग्रहणं कर्तव्यम्, ङ्याबन्तात्तद्धितोत्पत्तिर्यथा स्यात् ।')

मनोरमाः-यत्त्वाहुः-आब्ग्रहणं स्पष्टार्थमिति। तदनेन प्रत्युक्तम्। वस्तुतस्तु ङ्यापोर्ग्रहणं मास्तु। सुबन्तात्तद्धितोत्पत्तिरिति निष्कर्षः। गुरुः प्रागेव च ङ्यापौ प्रवर्तेते, स्वार्थादिप्रयुक्तकार्याणां बहिरङ्गत्व-स्वीकारादित्यवधेयम्।

प्रसादाकार म्हणतात कीं, प्रकृत सूत्रात 'आप्' या पदाचें ग्रहण केवळ सूत्रार्थ स्पष्ट होण्याकरिता केलें आहे. पण हें त्यांचें

म्हणणे वरील विवेचनावरून चूक ठरते (प्रकाशकाराच्या म्हणण्याचा भावार्थ हा आहे की, 'ङयाप्प्रातिपदिकात्' या अधिकारसूत्रात 'प्रातिपदिक' या शब्दाचें ग्रहण केले असल्यामुळें, त्या शब्दानेंच 'प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणम्' या परिभाषेनें 'आप्' या स्त्रीप्रत्ययविशिष्ट शब्दस्वरूपाचे ग्रहण होत असून देखील पुन्हा प्रकृत सूत्रात 'आप्' या पदाचं जें ग्रहण केले आहे त्याचे काही विशेष प्रयोजन नसून, आबन्त शब्द स्वरूपाचे देखील ग्रहण करता येते हा अर्थ स्पष्ट व्हावा एवढ्याचकरिता केले आहे 'लोहिनिका, लोहितिका' ही पाक्षिक रूपें सिद्ध होणे हे जसे 'ङीप्' ग्रहणाचे विशेष फल सागता येते तस 'आप्' ग्रहणाचे कोणतेहि विशेष फल सागता येत नाही; कारण तद्धितोत्पत्ति केल्यानतर देखील 'टाप्' प्रत्यय केला तरी रूपात काही फरक पडत नाही परतु दीक्षितानी वरील विवेचनात हे सिद्ध केले आहे की, तद्धितोत्पत्ति करण्यापूर्वी 'आप्' प्रत्यय न केल्यास 'आर्यका, आर्यिका' अशी पाक्षिक इष्ट रूपें सिद्ध न होता, 'आर्यका' एवढेंच रूप सिद्ध होईल म्हणून 'आप्' ग्रहण केवळ स्पष्टार्थ केले आहे हे प्रकाशकाराचे म्हणणें चूक ठरत असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे ) वास्तविक प्रकृत सूत्रात 'ङयाप्' या पदाच ग्रहण न केले तरी चालू शकते सुबन्ताहून तद्धितोत्पत्ति होत असते असा सिद्धात मानला आहे व सुबुत्पत्ति होण्यापूर्वीच 'ङी, व 'आप्' हे स्त्रीप्रत्यय होतात, कारण ज्या क्रमानें अर्थबोध होत असतो त्या क्रमानेच तो तो बोध करून देणारी कार्यें होत असतात असे मानले आहे हे लक्षात ठेवावें. (प्रकृत सूत्रावरील भाष्याच्या कैयटवृत्तींत 'स्वार्थमभिधाय शब्दो निरपेक्षो द्रव्यमाहसमवेतम् । समवेतस्य वचने लिङ्गं सङ्ख्या विभक्तिं च ।। अभिधाय तान् विशेषानपेक्षमाणश्च कृत्स्नमात्मानम् । प्रियकुत्सनादिषु तत प्रवर्ततऽसौ विभक्त्यन्त ।।' ही कारिका दिली आहे व या कारिकेवरून हें स्पष्ट होत की, जाति, व्यक्ति, लिङ्ग,

मस्या व कारक या क्रमानें शब्दाहून अर्थाचा बोध होतो. म्हणून सख्येचा किंवा कारकाचा बोध करून देणारा 'सुप्'प्रत्यय होण्यापूर्वीच लिङ्गबोधक प्रत्यय होतो. त्यामुळें 'ङी, आप्' हे स्त्रीत्वबोधक प्रत्यय केल्यानंतरच सुबुत्पत्ति होऊं शकते आणि त्यानंतर तद्धितोत्पत्ति होत असल्यामुळें, तद्धित प्रत्यय होण्यापूर्वी 'ङी, आप्' हे स्त्रीत्व-बोधक प्रत्यय केले पाहिजेत हे आपोआपच सिद्ध होत. म्हणून प्रकृत सूत्रात 'ङ्याप्' या पदाचे ग्रहण न केले तरी चालू शकतें असे दीक्षितांच्या म्हणण्याचे तात्पर्य आहे.)

शब्दरत्न— विशिष्टस्यापीत्यर्थ इति। प्रातिपदिकत्वतद्व्याप्य-धर्माणां लिङ्गप्रकृत्यर्थविशिष्टे अतिदेशार्थमिति भावः। स्पष्टं चेदं "बहुव्रीहेरूधस" इत्यत्र भाष्ये। इय च प्रातिपदिकसामा-न्यग्रहणे तद्विशेषग्रहणे च तद्व्यवनयन्नाह-अयस्कुम्भीति किं चेत्यादि च। उत्तरपदेऽपीति। अत्र च ङ्यन्तमुत्तरपदमिति भावः। टिलोप इति। इदमुपलक्षणं पुंवत्त्वस्य, खित्त्वस्य। सामान्यग्रहणेऽपि प्रवृत्तेरेवानया परिभाषया ङ्याब्ग्रहणवैयर्थ्यं भाष्ये शङ्कितम्। न च वृष्टा माला, वृष्टा गौरीति समुदायस्यानुपसर्जनस्त्रीप्रत्ययें तदादिनियमाभावात् ङ्याबन्तत्वेन ततः सुबुत्पत्त्यर्थं तदस्तु। लिङ्गवि-शिष्टपरिभाषया तु नात्र सिद्धिः। ङ्याब् रहितस्य वृष्टा माल इत्यादेः समुदायस्य प्रातिपदिकत्वाभावेन तदतिदेशाप्रवृत्तेः। एवं चाम् वृष्टा माला देवदत्तेत्यादावेकपदान्तरितत्वेनैकान्तरतापत्तिरिति वाच्यम्। एतद्भाष्यप्रामाण्येन, प्रातिपदिकसाहचर्येण च पूर्वपर्यायस्यार्थवि-भक्त्यन्तावयवकङ्याबन्तस्यैव ग्रहणेनादोषात्। प्रत्येकमपि पदस्यसत्त्वेनैकान्तरत्वाभावाच्च। उत्तरसङ्ख्यायाः पूर्वसख्याबाध-कत्वात्। नियमार्थं तु न। त्यङ्न्ते दोषापत्तेः। कुत्सायार्थकस्वा-र्थिकानां "कुत्सिते" इति सूत्रस्थभाष्योक्तरीत्या ङ्याबन्तादुत्पत्तेः सिद्धत्वादत्यन्तस्वार्थीकं फलमाह-तथाहीत्यादिना। स्वार्थोद्देश्येनात्यन्त स्वार्थिकत्वेन। परदेत्यम्युच्चय:। एवं च "लोहिता-ल्लिङ्गबाधनं वा" इति न वचनमर्थमिति भावः। विकल्प सिद्धयतीति।

अन्यथाऽऽर्यशब्दात्कनि समुदायोत्तरटापैव लिङ्गसम्बन्धबोधनसम्भवादेकाज्द्विवचनन्यायेन समुदायादेव टापि कन पूर्वं टाबभावे अत स्थानिकत्वाभावाद्विकल्पासिद्धिरिति भाव ।

'प्रातिपदिक' या शब्दानें लिङ्गबोधकप्रत्ययविशिष्ट शब्दाच ग्रहण होते असे जें 'प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणम्' या परिभाषेत सांगितल आहे त्याच कारण हें की, प्रातिपदिकाचे ठिकाणी असणारा प्रातिपदिकत्व धर्म व तसच प्रातिपदिकत्वव्याप्यधम, म्हणजे प्रातिपदिकाचेच ठिकाणीं असणारे इतर असाधारण धर्म, या सर्व धर्मांचा लिङ्गविशिष्ट त्या प्रातिपदिकाच ठिकाणी अतिदेश होता 'बहुव्रीहेरूधसो ङीष्' सू ४ १-२५ या सूत्रावरील भाष्यावरून हे स्पष्ट होत (त्या भाष्यात अशी शका केली आहे की, 'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रानें बहुव्रीहिसमास प्रातिपदिकसंज्ञक ठरत असल्यामुळें व प्रातिपदिकत्व हा सामान्य धर्म असून बहुव्रीहित्व हा त्याचा व्याप्य धर्म असल्यामुळें, 'कुण्डोधस्' या पुल्लिङ्ग बहुव्रीहिसमासाचे ठिकाणी असणारा प्रातिपदिकत्वव्याप्य बहुव्रीहित्व हा धर्म 'कुण्डोध्नी' या स्त्रीत्वबोधक ङीष् प्रत्ययविशिष्ट शब्दाचे ठिकाणी अतिदेशानें आरोपित करता येतो व हा स्त्रीप्रत्ययविशिष्ट शब्द नद्यन्त असल्यामुळें त्याहून 'नद्यृतश्च' सू ८३३ या सूत्रानें होणारा 'कप्' प्रत्यय का होऊ नये या शकेच समाधान 'नद्यन्ताना यो बहुव्रीहिरित्येव स, न चैप नद्यन्ताना बहुव्रीहि ' म्हणजे 'कुण्डोध्नी' या स्थली बहुव्रीहिसमासाचा अन्त्यावयव नदीसंज्ञक शब्द नसून असन्त 'ऊधस्' शब्द असल्यामुळें, या स्थली या सूत्रानें होणारा 'कप्' प्रत्यय होत नाही या भाष्यावरून हे स्पष्ट होत नाही का, प्रातिपदिकाचे ठिकाणी असणारा प्रातिपदिकत्व धर्म व त्याचप्रमाणें प्रातिपदिकत्वव्याप्य धर्म हे स्त्रीप्रत्ययविशिष्ट त्या प्रातिपदिकाच ठिकाणी 'प्रातिपदिकग्रहणे' या परिभाषा यें अतिदिष्ट—आरोपित—करता येतात या विषयाच विस्तृत विवेचन परिभाषेन्दुशेखराच्या मराठी भाषांतरांत पान ३५८–६० मध्यें केल आहे व ते वाचल्यास शब्दरत्नातील ही पक्ति

नीट ध्यानात येईल.) जेथें सूत्रात 'प्रातिपदिक' या सामान्य शब्दाचे किंवा प्रातिपदिकविशेषाचे ग्रहण केले आहे तसा दोन्ही ठिकाणी 'प्रातिपदिकग्रहणे'–परि. ७२–ही परिभाषा लागू पडते हे ध्वनित करण्याकरिता मनोरमेंत 'अयस्कुम्भी, कुमारीमाचष्टे कुमारयति' इत्यादि उदाहरणें दिली आहेत. ('ङ्याप्प्रातिपदिकात्,' 'प्रातिपदिकाद्धात्वर्थे बहुलमिष्ठवच्च,' 'सर्वप्रातिपदिकेभ्यः क्विब्वा वक्तव्यः' इत्यादि सूत्रात व वार्तिकात 'प्रातिपदिक' या सामान्य शब्दाचें ग्रहण केले आहे. 'अत.कृकमि' सू. १६० इत्यादि सूत्रात प्रातिपादिकविशेषाचें ग्रहण केले आहे. या दोन्ही स्थली वरील परिभाषा सारखीच लागू पडते व त्या परिभाषान्वयें प्रातिपादिकानें लिङ्गविशिष्ट प्रातिपादिकाचे ग्रहण होतें. हे मनोरमेच्या विवेचनावरून स्पष्ट होतें. म्हणून या पक्षांचें अधिक विवरण करण्याची गरज नाही.) 'तद्धितसादिपूत्तरपदेषु विधीयते' असें जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, 'अयस्कुम्भी' या उदाहरणात (सूत्रनिर्दिष्ट 'कुम्भ' हें उत्तर पद नसून ) ङीबन्त 'कुम्भी' हें उत्तर पद आहे. (अत.कृकमि' सू. १६० या सूत्रानें 'कुम्भ' इत्यादि शब्द समासात उत्तर पद असता अव्यय नसणाऱ्या पूर्व पदाच्या अन्त्य अकारापुढील विसर्गाचें सत्व होणें सांगितले आहे पण 'अयस्कुम्भी' या उदाहरणात 'कुम्भ' हे उत्तर पद नसून ङ्यन्त 'कुम्भी' हें उत्तर पद आहे. तरी पण 'प्रातिपदिकग्रहणे' ही परिभाषा असल्यामुळें, त्या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या प्रातिपदिकानीं स्त्रीत्वबोधकप्रत्ययविशिष्ट त्या प्रातिपदिपदिकाचें देखील ग्रहण होतें आणि त्यामुळें समासात 'कुम्भी' हें उत्तर पद असून देखील अनव्यय पूर्वपदातील अकारापुढील अन्त्य विसर्गाचें सत्व होतें. ) 'णाविष्ठवदिति टिलोपः' या मनोरमेंतील पक्तींत 'टिलोपः' हे जें पद आहे ते पुंवद्भावाचें व 'णिच्'चें उपलक्षण आहे म्हणजे स्त्रीप्रत्ययविशिष्ट प्रातिपदिकाहून लिङ्गविशिष्टपरिभाषान्वयें 'णिच्' प्रत्यय होतो व तो केल्यावर पुंवद्भाव होतो ( कारण 'प्रातिपदिकाद्धात्वर्थे बहुलमिष्ठवच्च' या गणसूत्राचा कौमुदीत

सांगितल्याप्रमाणें 'प्रातिपदिकात् धात्वर्थे णिच् स्यात्, इष्ठे यथा प्रातिपदिकस्य पुवद्भावरभावटिलोपविन्मतुब्लोपयणादिलोपप्रस्थस्फाद्यादेशभसंज्ञा. तद्वद् णावपि स्युः' असा अर्थ आहे, म्हणजे प्रातिपदिकाहून 'णिच्' प्रत्यय केला असता, 'इष्ठ'प्रत्यय पुढें असताना जी कार्यें पावतात ती सर्व कार्यें होतात असा त्या गणसूत्राचा अर्थ आहे त्यामुळे इष्ठवद्भावानें जसे टिलोपाचे ग्रहण होतें तसेच पुवद्भाव इत्यादि वर सांगितलेल्या इतर कार्यांचे देखील ग्रहण होते. ) जेथें सूत्रात 'प्रातिपदिक' या सामान्य शब्दाचे ग्रहण केले असेल तेथें देखील 'प्रातिपदिकग्रहणे' ही परिभाषा प्रवृत्त होत असल्यामुळेंच, प्रकृत सूत्रातील 'ङ्याप्' या पदाचे ग्रहण व्यर्थ ठरते अशी शंका या सूत्रावरील भाष्यात उपस्थित केली आहे. ( 'कुमारःश्रमणादिभिः' सू. ७५२ हें जे सूत्र लिङ्गविशिष्ट परिभाषेचे ज्ञापक मानलें आहे त्यात प्रातिपदिकविशेषाचें ग्रहण केले असल्यामुळें, जेथें सूत्रात प्रातिपदिकविशेषाचे ग्रहण केले असेल तशाच ठिकाणी ती परिभाषा उपस्थित होऊ शकते असा गैरसमज न व्हावा यांकरिता ही पंक्ति लिहिली आहे प्रकृत सूत्रात 'प्रातिपदिक' या सामान्य शब्दाचे ग्रहण केले असून देखील या सूत्रातील 'ङ्याप्' ग्रहण, वरील परिभाषा असल्यामुळें, व्यर्थ ठरते अशी प्रकृत सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी जी शंका उपस्थित केली आहे तीवरूनच हें स्पष्ट होतें की, जेथें सूत्रात 'प्रातिपदिक' या सामान्य शब्दाचे ग्रहण केलें आहे तशा ठिकाणी देखील ती परिभाषा उपस्थित होते. तसें न मानल्यास, ती शंका अनुपपन्न ठरण्याची आपत्ति येते. प्रकृत सूत्रावरील भाष्यात 'ङ्याब्ग्रहणमनर्थकम् प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणात्' हें वार्तिक पठित करून भाष्यकारानी प्रकृत सूत्रातील 'ङ्याप्' या पदाचे ग्रहण व्यर्थ ठरते असें म्हटलें आहे. भाष्यकार म्हणतात—"ङ्याब्ग्रहणमनर्थकम् । किं कारणम् ? । प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणात् । प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणं भवतीत्येषा परिभाषा कर्तव्या । कः पुनरत्र

विशेषः, एषा वा परिभाषा क्रियेत ङ्याब्ग्रहणं वा ? । अवश्यमेषा परिभाषा कर्तव्या । बह्वन्येतस्याः परिभाषायाः प्रयोजनानि ।' प्रकृत सूत्रावरील कौमुदीत देखील दीक्षितांनी 'प्रातिपदिकग्रहणे लिङ्ग-विशिष्टस्यापि ग्रहणमित्येव सिद्धे' या शब्दांनी वरील भाष्याचाच अनुवाद केला आहे. सारांश 'प्रातिपदिकग्रहणे' या परिभाषेनेंच स्त्रीत्वबोधकप्रत्ययविशिष्ट प्रातिपदिकाचें ग्रहण होऊं शकत असल्या-मुळें, तसें ग्रहण व्हावें याकरितां प्रकृत सूत्रांत 'ङ्याप्' हें पद असण्याची कांही गरज नाही आणि म्हणून प्रकृत सूत्रांतून तें पद गाळलें तरी चालूं शकतें. यावर शंकाकार अशी शंका करतो कीं, तें पद प्रकृत सूत्रांत असणें इष्ट आहे; कारण तें पद प्रकृत सूत्रांत असल्यास इतर फलाची सिद्धि होते. तें फल कोणतें हें शंकाकार पुढील पङ्क्तींत सांगतो.) 'दृष्टा माला, दृष्टा गौरी' या पदसमुदायाच्या अन्तीं असणाऱ्या 'माला, गौरी' या शब्दांमध्यें स्त्रीप्रत्यय प्रधान असल्यामुळें, म्हणजे वाक्याच्या अन्तीं असणारे हे स्त्रीप्रत्ययान्त शब्द प्रधान असल्यामुळें, येथें तदादिनियम लागू पडत नाहीं आणि म्हणून हे समुदाय ङ्यावन्त ठरत असल्यामुळें, या समुदायाहून सुबुत्पत्ति व्हावी याकरितां प्रकृत सूत्रांत 'ङ्याप्' या पदाचें ग्रहण कायम असूं द्यावें. 'प्रातिपदिकग्रहणे'—परि. ७२ या परिभाषेनें वरील दोन उदाहरणांत (सुबुत्पत्तिरूप) इष्टसिद्धि होऊं शकत नाहीं; कारण 'दृष्टा माल (दृष्टा गौर)' इत्यादि टाप्-ङीप्प्रत्ययरहित समुदायाला प्रातिपदिकसंज्ञा होत नसल्यामुळें, तशा समुदायाचे ठिकाणीं 'प्रातिपदिकग्रहणे' या अतिदेशशास्त्राची प्रवृत्ति होऊं शकत नाहीं. त्याचप्रमाणें 'आम् दृष्टा माला देवदत्त' इत्यादि वाक्यांत (वर सांगितल्याप्रमाणें 'दृष्टा माला' या समुदायाहून सुबुत्पत्ति केल्यानें तो पदद्वयसमुदाय एक अखंड पद होत असल्यामुळें व अशा रीतीनें 'आम्' व 'देवदत्त' हा आमन्त्रित शब्द या दोहोंमध्यें ) एकपदाचेंच व्यवधान आहे असें मानता येत असल्यामुळें, या स्थलीं 'आम एकान्तरमामन्त्रितमनन्तिके'

सू ३९६२ या निघातनिषेधक शास्त्राची प्रवृत्ति होते (परंतु शब्द-रत्नकार म्हणतात की, ही वरील शंका बरोबर नाही; कारण) प्रकृत सूत्रात 'प्रातिपदिक' या ज्या शब्दाचे ग्रहण केले आहे त्या शब्दाच्या साहचर्यामुळें आणि तसेच प्रकृत सूत्रावरील भाष्य प्रमाणभूत असल्यामुळें हे स्पष्ट होते की, 'ङ्याप्' या शब्दानें अशाच ङ्यन्त व आबन्त समुदायाचे ग्रहण होते की, ज्याचे अवयव स्वतंत्र रीतीनें भिन्न अर्थाचा बोध करणारे नसून विभक्त्यन्त देखील नाहीत, व असे मानले असता, कोणताहि दोष येत नाही. त्याचप्रमाणे ('आम् दृष्टा माला देवदत्त' या वाक्यातील 'दृष्टा' व 'माला' ही दोन्ही) स्वतंत्र पदें असल्यामुळें, या स्थली 'आम एकान्तरम्' या निषेधक सूत्राची प्रवृत्ति होऊ शकत नाही; कारण उत्तरसंख्या पूर्वसंख्येची बाधक असते. ('माल' या अदन्त प्रातिपदिकाहून 'अजाद्यतष्टाप्' सू. ४५४ या सूत्रानें 'टाप् = आ' प्रत्यय केला असता, 'माला' असे आबन्त रूप होते. तसेच 'गौर' या प्रातिपदिकाहून 'षिद्गौरादिभ्यश्च' सू ४९८ या सूत्रानें 'ङीप्' प्रत्यय केला असता, 'गौरी' असे ङ्यन्त रूप होते. 'दृष्टा माला' या पदसमुदायाच्या अन्ती 'माला' हा आबन्त शब्द असून, 'दृष्टा गौरी' या पदसमुदायाच्या अन्ती 'गौरी' हा ङ्यन्त शब्द आहे आणि हे दोन्ही स्त्रीप्रत्ययान्त शब्द वाक्यात प्रधान आहेत. म्हणून जरी 'माल' व 'गौर' या शब्दाहून स्त्रीप्रत्यय झाला असल्यामुळें प्रत्ययग्रहणपरिभाषान्वयें–प. २३–जरी ते शब्द तदादि-नियमानें स्त्रीप्रत्ययान्त ठरतात तरी, त्या परिभाषेची 'स्त्रीप्रत्यये चानुपसर्जने न' प २६ ही परिभाषा निषेधक परिभाषा असल्यामुळें व वरील दोन समुदायाच्या अन्ती स्त्रीप्रत्ययान्त शब्द प्रधान असल्यामुळें, या समुदायाना तदादिनियम लागू पडत नाहीं आणि म्हणून हे दोन्ही समुदाय स्त्रीप्रत्ययान्त ठरतात. अशा समुदायाहून सुबुत्पत्ति व्हावी याकरिता प्रकृत सूत्रात 'ङ्याप्' या पदाचे ग्रहण केले आहे व अशा रीतीनें ते ग्रहण चरितार्थ ठरते. 'प्राति-

पदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापिग्रहणमित्येव सिद्धे' असें जें प्रकृत सूत्रावरील कौमुदींत दीक्षितांनीं म्हटलें आहे तें या वरील दोन समुदायाना लागू पडत नाहीं; कारण 'प्रातिपदिकग्रहणे' या परिभाषान्वयें स्त्रीत्वबोधकप्रत्ययविशिष्ट शब्दाचे ठिकाणीं प्रातिपदिकत्वरूप धर्माचा अतिदेश करण्याकरिता स्त्रीप्रत्ययरहित त्या शब्दाचे ठिकाणीं प्रातिपदिकत्व धर्म असणें आवश्यक आहे; त्याचे अभावीं अतिदेश कसा होऊं शकणार ? 'दृष्टा माला, दृष्टा गौरी' या ङ्याबन्त समुदाच्या अन्तीं असणाऱ्या 'माला, गौरी' याचे 'ङी, आप्' हे स्त्रीप्रत्यय नाहीसे केले तर 'दृष्टा माल, दृष्टा गौर' असें त्या समुदायाचें स्वरूप होईल हे पदसमुदाय अनर्थक मानल्यास, याना प्रातिपदिकसंज्ञा होऊं शकत नाहीं, कारण 'अर्थवदधातुः' सू. १७८ या सूत्रात 'अर्थवत्' या पदाचें ग्रहण केलें आहे. हे समुदाय अर्थवान् मानले तरी, या समुदायातील पदें असमस्त असल्यामुळें, "अर्थवत्समुदायस्य चेत् प्रातिपदिकसंज्ञा तर्हि समासस्यैव' या नियमान्वयें त्याना प्रातिपदिकसंज्ञा होऊं शकत नाही. साराश 'दृष्टा माल, दृष्टा गौर' हे समुदाय प्रातिपदिकसंज्ञक ठरत नसल्यामुळें, 'दृष्टा माला, दृष्टा गौरी' या स्त्रीप्रत्ययान्त समुदायाचे ठिकाणीं 'प्रातिपदिकग्रहणे' या परिभान्वयें प्रातिपदिकत्व धर्म अतिदेशानें प्राप्त करून देता येणे शक्य नाहीं. म्हणून जरी हे समुदाय प्रातिपदिकसंज्ञक ठरत नाहीत तरी याहून देखील सुबुत्पत्ति व्हावी याकरिता प्रकृत सूत्रात 'ङ्याप्' या पदाचें ग्रहण केलें आहे व त्या पदाच्या ग्रहणसामर्थ्यानें ङ्यन्त व आबन्त समुदायाहून देखील, ते प्रातिपदिकसंज्ञक नसले तरी, सुबुत्पत्ति करता येते आणि अशा रीतीनें त्या पदाचे ग्रहण निष्प्रयोजनक ठरत नसून चरितार्थ ठरतें. दुसरें असें कीं, 'दृष्टा माला' या समुदायाहून एकवचनाचा औत्सर्गिक 'सु' प्रत्यय केला असता, जरी 'हल्ङ्याब्भ्य.' सू. २५२ या सूत्रानें त्या प्रत्ययाचा लोप होतो तरी प्रत्ययलक्षणानें तो सपूर्ण समुदाय एक अखड पद ठरतें आणि त्यामुळे 'आम् दृष्टा

माला देवदत्त' या वाक्यात 'आम्' व 'देवदत्त' हा आमन्त्रित-सवुद्धयन्त-शब्द या दोहोंमध्यें एकच पदाचे व्यवधान आहे असे मानता येत असल्यामुळें, 'आम एकान्तरम्' सू ३९६२ या निषेधक सूत्राची वरील वाक्यात प्रवृत्ति करता येते व त्यामुळें 'देवदत्त' हे पद अनुदात्त होत नाही आणि अशा रीतीनें हे एक ङ्याप्ग्रहणाचे विशेष फल सागता येते असे शकाकाराचे म्हणणे आहे हे खरे की, 'दृष्टा माला, दृष्टा गौरी' हे पदसमुदाय अर्थवान् असून समास नसल्यामुळें याना समासग्रहणकृतनियमान्वयें स्वतन्त्रपणे प्रातिपदिक-सज्ञा होऊ शकत नाही. पण यावर शकाकार असे म्हणू शकतो की, जरी हे समुदाय प्रातिपदिकसज्ञक ठरत नाहीत तरी प्रकृत सूत्रानें जशी प्रातिपदिकाहून सुबुत्पत्ति करता येते तशी ङ्यावन्त समुदाया-हून देखील सुबुत्पत्ति करता येत असल्यामुळें, वरील दोन समुदाया-हून सुबुत्पत्ति होण्यात काही अडचण येत नाही. वास्तविक वरील दोन समुदाय जरी वाक्यें आहेत व 'अर्थवतः समुदायस्य चेत् प्रातिपदिकसज्ञा तर्हि समासस्यैव' असा जरी नियम आहे तरी, 'स्त्रीप्रत्यये चानुपसर्जने न' ही परिभाषा असल्यामुळें, या परिभाषेच्या सामर्थ्यानें 'अस्त्रीप्रत्ययान्तपदसमुदायस्य चेत् प्रातिपदिकसज्ञा तर्हि समासस्यैव' अशा रीतीनें त्या नियमातून अस्त्रीप्रत्ययान्तसमुदाय वगळता येतो व त्यामुळें वरील दोन समुदायाना स्वतन्त्रपणे देखील प्रातिपदिकसज्ञा होण्यांत काही प्रत्यवाय येत नाही. समुदायाहून प्रत्यय झाला नसल्यामुळें, 'अप्रत्यय = अप्रत्ययान्तः' हा पर्युदास देखील आड येत नाही. साराश ते समुदाय प्रातिपदिकसज्ञक ठरले किंवा न ठरले तरी प्रकृत सूत्रान्वयें त्याहून सुबुत्पत्ति करता येतेच. वरील समुदायातील प्रत्येक शब्दाहून सख्याकारकबोधक 'सुप्' प्रत्ययाची उत्पत्ति पूर्वीच झाली आहे व त्यामुळें पुन्हा सुबुत्पत्ति करता येत नाही असे कोणी म्हटल्यास, त्यावर शकाकार असे उत्तर देऊ शकतो की, पूर्वी जी सुबुत्पत्ति झाली आहे ती समुदायातील अवयवाहून झाली आहे, समुदायाहून झाली नाही आणि म्हणून

संपूर्ण समुदायाहून सुबुत्पत्ति करण्यात कोणताहि प्रत्यवाय येत नाहीं. म्हणून वर दिलेल्या सर्व कारणामुळें प्रकृत सूत्रात 'ङ्याप्' या पदाचें ग्रहण कायम ठेवणें इष्ट आहे असा शंकाकाराच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात की, दृष्टा माला, दृष्टा गौरी' इत्यादि ङ्यावन्त पदसमुदायाहून सुबुत्पत्ति होणें इष्ट असतें तर प्रकृत सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी तसें अवश्य म्हटलें असतें व ङ्याब्ग्रहणाची तशा रीतीनें सार्थकता दाखविली असती. पण त्यानी तसें न म्हणता उलट 'ङ्याप्ग्रहणमनर्थकम्' असें स्पष्ट म्हटलें आहे. म्हणून शंकाकारानें केलेली शंका भाष्यविरुद्ध ठरत असल्यामुळें ती अग्राह्य ठरते. दुसरें असें की, प्रकृत सूत्रात 'ङ्याप्' या पदाबरोबर 'प्रातिपदिक' या पदाचें ग्रहण केलें असल्यामुळें त्या पदाच्या साहचर्याच्या सामर्थ्यानें हें सिद्ध होतें की, अर्थवान् पदसमुदायाला प्रातिपदिकसंज्ञा होण्याबद्दल जो नियम सांगितला आहे तशाच प्रकारचा नियम ङ्यावन्त अर्थवान् पदसमुदायाहून सुबुत्पत्ति करते-वेळीं देखील मानणें इष्ट व आवश्यक आहे, आणि तशा प्रकारचा नियम सिद्ध होण्याकरिता प्रकृत सूत्रातील 'ङ्याप्' या पदाचा 'पृथगर्थोपस्थापकविभक्त्यन्तानवयवकङ्यावन्तस्यैव' असा नियामक अर्थ मानला पाहिजे. शब्दरत्नातील या सामासिक पदाचा 'पृथगर्थो-पस्थापकाः विभक्त्यन्ताः न अवयवाः यस्य ङ्याबन्तसमुदायस्य' असा विग्रह आहे व ज्या ङ्याबन्त समुदायातील अवयव स्वतंत्र रीतीनें आपापल्या अर्थाचा बोध करीत नाहीत व विभक्तिप्रत्ययान्त नाहींत अशा ङ्याबन्त समुदायाहूनच सुबुत्पत्ति होऊ शकते असा त्या पदाचा अर्थ आहे. 'दृष्टा माला, दृष्टा गौरी' या दोन्ही समुदायातील अवयव आपापल्या अर्थाचा स्वतंत्रपणें बोध करितात व ते विभक्तिप्रत्ययान्त आहेत, कारण या स्थलीं त्या पदाचा समास झाला नसल्यामुळें तीं पदें एकार्थीभावापन्न व विशिष्टार्थबोधक झालीं नाहीत. म्हणून अशा ङ्यावन्त समुदायाहून

युवुत्पत्ति होऊ शकत नाही. त्यामुळें 'आम् दृष्टा माला देवदत्त' या वाक्यातील 'दृष्टा माला' ही आपापल्या अर्थाचा स्वतंत्रपणे बोध करणारी दोन विभक्त्यन्त पदें एक अखंड पद आहे असे मानता येत नाही आणि म्हणून या वाक्याचे ठिकाणी 'आम एकान्तरम्' हें निषेधक सूत्र प्रवृत्त होऊ शकत नाही. 'दोन' या अधिक संख्येमध्यें 'एक' ही कमी संख्या अन्तर्भूत असल्यामुळें व जेथें दोन पदांचे व्यवधान आहे तेथें एक पदाचे देखील व्यवधान आहेच असे मानता येऊ शकत असल्यामुळें, 'आम एकान्तरम्' हें सूत्र वरील वाक्यात का प्रवृत्त होऊ नये अशी कोणी शंका केल्यास, त्या शंकेवर शब्दरत्नकारानी 'उत्तरसङ्ख्यायाः पूर्वसङ्ख्याबाधकत्वात्' असें उत्तर दिले आहे व त्याच्या या म्हणण्याला 'छादेर्घे' सू. ६-४-९६ या सूत्रावरील भाष्य प्रमाण आहे. त्या भाष्यात भाष्यकार म्हणतात-'यत्र त्रिप्रभृतयः सन्ति द्वावपि तत्र स्तः, तत्राऽप्युपसर्गस्येत्येव सिद्धम्। न वा एष लोके सम्प्रत्ययः। न हि द्विपुत्र आनीयतामित्युक्ते त्रिपुत्र आनीयते।' या भाष्यावरून हे स्पष्ट होते की, उत्तरसंख्या 'दोन' ही 'एक' या पूर्वसंख्येची बाधक ठरते. म्हणून जेथें दोन पदांचे व्यवधान आहे तेथें एक पदाचेहि व्यवधान आहे असें मानता येत नसल्यामुळें, वरील वाक्याचे ठिकाणी 'आम एकान्तरम्' हा निषेध प्रवृत्त होऊ शकत नाही.) प्रकृत सूत्रातील 'ङ्याप्' या पदाचें ग्रहण नियमार्थ आहे, म्हणजे 'स्त्रीप्रत्ययान्ताच्चेत् प्रत्ययोत्पत्तिर्भवति तर्हि ङ्याबन्तादेव' असा नियम घालून देण्याकरिता तें ग्रहण केलें आहे, असें मानता येत नाही; कारण तसा नियम मानल्यास, स्त्रीत्वबोधक 'ति' व 'ऊङ्' या स्त्रीप्रत्ययान्त शब्दाहून प्रत्ययोत्पत्ति न होण्याची आपत्ति येते (व त्यामुळें 'युवतीः' असें सुबन्त रूप किंवा 'यौवतम्' असें तद्धित 'अन्' प्रत्ययान्त रूप सिद्ध होऊ शकणार नाही आणि 'युवतीः पश्य' इत्यादि भाष्यातील प्रयोग चूक ठरण्याची आपत्ति येईल. 'यूनस्तिः' सू. ५३१ या सूत्रानें 'युवन्' या प्रातिपदिकाहून स्त्रीत्वबोधक 'ति' प्रत्यय होणे

सागितले आहे व 'ऊङुतः' सू. ५२१ इत्यादि सूत्रानी स्त्रीत्वबोधक 'ऊङ्' प्रत्यय होण सागितले आहे या ऊङ्प्रकरणात पठित असलेल्या 'श्वशुरस्योकाराकारलोपश्च'—सू ५२३ वरील वार्तिक—या वार्तिकान्वयें 'श्वशुर' या प्रातिपदिकाचे 'श्वश्रू' असे ऊङ्प्रत्ययान्त स्त्रीलिङ्गाच रूप होत ङ्याप्ग्रहण नियमार्थ मानल्यास, 'श्वश्रू' इत्यादि सुबन्त रूपें सिद्ध होऊ शकणार नाहीत व 'श्वशुर श्वश्वा' सू ९३७ हा पाणिनीय निर्देश व तसेच 'युवतिका युवतीतरा' इत्यादि भाष्यात दिलेली उदाहरण अशुद्ध ठरण्याची आपत्ति येईल )
'कुत्सित' ५–३–७४ या सूत्रावरील भाष्यात सागितलेल्या रीतीनें 'कुत्सा' इत्यादि अर्थाचे द्योतक स्वार्थिक प्रत्यय ङ्याबन्ताहून होत असतात हे सिद्ध होत असल्यामुळें, ज अत्यन्त स्वार्थिक प्रत्यय आहेत, म्हणजे ज्या प्रत्ययापासून कोणत्याहि अर्थाचा बोध होत नाही असे प्रत्यय देखील, ('ङीप्' व 'आप्' हे स्त्रीप्रत्यय लावल्यानतरच व्हावे म्हणून प्रकृत सूत्रात 'ङ्याप' ग्रहण केले आहे हे म्हणण सिद्ध करण्याकरिता व तसे अत्यन्त स्वार्थिक प्रत्यय) नतर न केल्यानें काय फळ होतें हे कळावे याकरिता मनोरमत 'तथा हि इति कन् ङीप बाधेत' ही पक्ति लिहिली आहे या पक्तीतील 'स्वार्थीकत्वेन' या पदाचा 'अत्यन्तस्वार्थीकत्वेन' असा अर्थ आहे या पक्तीत 'परत्व' हा हेत्वाधिक्य दाखविण्याकरिता एक अधिक हेतु दिला आहे ('कुत्सिते' या सूत्रावरील भाष्यात 'स्वार्थमभिधाय शब्दो निरपेक्षो द्रव्यमाह समवेतम्। समवेतस्य च वचने लिङ्ग वचन विभक्ति च ॥ अभिधाय तान्विशेषानपेक्षमाणश्च कृत्स्नमात्मानम्। प्रियकुत्सनादिषु पुन प्रवर्ततेऽसौ विभक्त्यन्त ॥' या दोन कारिका पठित केल्या आहेत व या कारिकावरूनच हे स्पष्ट होते की, लिङ्गबोधक प्रत्यय केल्यानतरच 'कुत्सा' इत्यादि अर्थामध्ये होणारे स्वार्थिक तद्धित प्रत्यय करता येतात या स्वार्थिक प्रत्ययात व अत्यन्त स्वार्थिक प्रत्ययात हा फरक आहे की, प्रथम प्रकारच्या प्रत्ययाना अर्थ असतो, म्हणजे ते 'कुत्सा' इत्यादि अर्थाचे वाचक

असतात. पण दुसऱ्या प्रकारच्या प्रत्ययांना, म्हणजे अत्यन्त स्वार्थिक प्रत्ययांना, कोणताहि अर्थ नसतो. स्वार्थिक प्रत्यय जसे स्त्रीप्रत्यय केल्यानंतर होतात तसेच अत्यन्त स्वार्थिक प्रत्यय देखील स्त्रीप्रत्यय केल्यानंतरच होतात तसे न मानल्यास, 'लोहितिका' व 'आर्यका' अशीच रूपें सिद्ध होतील व 'लोहिनिका, आर्यिका' ही पाक्षिक इष्ट रूपें सिद्ध होऊं शकणार नाहीत असें दीक्षितांनी मनोरमेंत, अत्यन्त स्वार्थिक प्रत्यय प्रथम करून नंतर स्त्रीप्रत्यय केल्यास होणारें, फल सांगितलें आहे व याचें विवरण पूर्वी मनोरमेंत केलेंच आहे. अत्यन्त स्वार्थिक प्रत्यय अन्तरङ्ग व परशास्त्रानें होणारा प्रत्यय असल्यामुळें त्याची प्रथम प्राप्ति होते असें जें दीक्षितांनी मनोरमेंत म्हटलें आहे त्यांत तं कार्य प्रथम प्राप्त होण्याबद्दल अन्तरङ्गत्व व परत्व हे दोन हेतु दिले आहेत. परंतु अन्तरङ्गत्व एवढाच प्रबलतर हेतु दिल्यानें काम भागत असता, परत्व हा दुसरा अधिक हेतु देण्याची कांही गरज नव्हती, कारण 'परनित्यान्तरङ्गापवादाना-मुत्तरोत्तरं बलीयः' – परि ३८ – या परिभाषान्वयें परशास्त्रापेक्षां अन्तरङ्गशास्त्र बलवत्तर असतें. दुसरें असें की, जेथें युगपत् प्राप्त होणारीं दोन शास्त्रें तुल्यबळ असतात तशाच ठिकाणी 'विप्रतिषेधे परं कार्यम्' सू. १७० हें सूत्र प्रवृत्त होऊं शकतें आणि तशाच ठिकाणी परत्वरूप हेतु देणें योग्य ठरतें. पण जेथें युगपत् प्राप्त होणाऱ्या दोन शास्त्रांपैकी एक शास्त्र अन्तरङ्ग व दुसरें बहिरङ्ग आहे तेथें 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' प. ५० या परिभाषान्वयें अन्तरङ्ग शास्त्राच्या दृष्टीनें बहिरङ्गशास्त्र असिद्ध असल्यामुळें, तीं दोन शास्त्रें तुल्यबळ ठरत नाहींत व त्यामुळें तशा ठिकाणी 'विप्रतिषेधे परं कार्यम्' हें सूत्र प्रवृत्त होत नाहीं, आणि म्हणून तशा स्थलीं 'परश्च' असा अधिक हेतु देणें अयोग्य ठरत असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे प्रकृत सूत्रांत केलेल्या 'ङ्याप्' ग्रहणाच्या सामर्थ्यामुळें, अत्यन्त स्वार्थिक प्रत्यय होणें हें कार्य अन्तरङ्ग असून त्याच्या मानानें स्त्रीप्रत्यय होणें हें कार्य बहिरङ्ग आहे तरी,

बहिरङ्ग स्त्रीप्रत्यय प्रथम झाल्यानतर ते अन्तरङ्गकार्य होते हे मनोरमेत सागितलेच आहे.) 'ङी, आप्' हे स्त्रीप्रत्यय तद्धित प्रत्यय लागण्यापूर्वी होत असल्यामुळे, 'लोहितालिङ्गबाधन वा' हे वार्तिक पठित करण्याची काही गरज नाही असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. ('लोहितान्मणौ' ५. ४. ३० या सूत्रावरील भाष्यात वरील वार्तिक पठित केले आहे व या वार्तिकाचा अर्थ असा आहे की, 'लोहित' या शब्दाहून होणारा 'कन्' प्रत्यय विकल्पें करून स्त्रीप्रत्ययाचा बाध करितो, म्हणजे स्त्रीप्रत्यय होण्यापूर्वी किंवा स्त्रीप्रत्यय केल्यानतर तो 'कन्' प्रत्यय विकल्पेंकरून करता येतो. हे वार्तिक नसले तरी 'लोहितिका' हे रूप सिद्ध होऊ शकतेच पण 'लोहिनिका' हे पाक्षिक इष्ट रूप सिद्ध होऊ शकत नसल्यामुळे, ते रूप देखील सिद्ध व्हावे याकरिता वरील वार्तिक पठित केले आहे. परतु 'ङ्याबन्तात्तद्धितोत्पत्तिर्यथा स्यात् ङ्याब्भ्यां प्राङ् मा भूत्' याकरिता प्रकृत सूत्रात 'ङ्याप्' या पदाचें ग्रहण केले आहे असे मानले असता, वरील वार्तिक पठित करण्याची काही गरज राहत नाही व ते वार्तिक नसून देखील कौमुदीत सागितलेल्या सिद्धान्तान्वयें 'लोहितिका, लोहिनिका' ही दोन्ही रूपें सिद्ध होऊ शकतात हे मनोरमेंत सागितलेच आहे.) 'इत्वविकल्पः सिध्यति' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, तद्धितोत्पत्ति होण्यापूर्वी 'ङी, आप्' हे स्त्रीप्रत्यय करावें हा नियम न मानल्यानें व 'आर्य' या शब्दाहून प्रथम 'कन्' प्रत्यय करून नतर 'आर्यक' या समुदायाहून 'टाप्' प्रत्यय केल्यानेच स्त्रीत्वाचा बोध होऊ शकत असल्यामुळें, एकाज्द्विर्वचनन्यायानें 'आर्यक' या समुदायाहूनच 'टाप्' प्रत्यय करावा लागेल व अशा स्थितीत 'कन्' प्रत्ययापूर्वी 'टाप् = आ' नसल्यामुळें, आकाराचे जागी झालेला अकार मिळू शकणार नाही व त्यामुळें इत्वविकल्प होऊ शकणार नाही. ('एकाचो द्वे प्रथमस्य सू. २१७५ या सूत्रानें धातूंतील प्रथम एकाचाचे द्विर्वचन होणे सागितले आहे.

'निज्' या धातूत 'नि, इ, इज्, निज्' असे चार एकाच् आहेत हे पूर्वी सांगितलेच आहे या चार एकाच्पैकीं कोणत्या एकाच्चे द्वित्व करावे असा 'एकाचो द्वे प्रथमस्य' ६. १. १ या सूत्रावरील भाष्यात प्रश्न उपस्थित करून त्या प्रश्नाचे उत्तर देताना भाष्यकार असे म्हणतात की, 'निज्' हा एकाच् खेरीज करून बाकीच्या तीन एकाच्पैकी कोणत्याहि एकाच्चे द्वित्व केले तरी 'निज्' या एकाच् धातूतील काही असा भाग अवशिष्ट राहतो की ज्याचे द्वित्व होत नाही त्यामुळे द्विर्वचनशास्त्राची जी अशतः हानि होऊ पाहते ती न होता त्या शास्त्राची पूर्णपणे–पूर्णाशामर्थ्ये–सार्थकता व्हावी याकरिता 'निज्' या समुदायरूप एकाचातील 'नि, इ, इज्' या अवयवाचे द्विर्वचन न करिता 'निज्' या सपूर्ण एकाचाचे द्विर्वचन करणे योग्य आहे त्या भाष्यात भाष्यकार म्हणतात–'तत्समुदायैकाचो द्विर्वचन भविष्यति । कुत एतत् ? । शास्त्राहाने । एव हि शास्त्रमहीन भवति । ननु च समुदायैकाचोऽपि द्विर्वचने क्रियमाणेऽवयवैकाच शास्त्र हीयते । न हीयते । किं कारणम् ? । अवयवात्मकत्वा-त्समुदायस्य । अवयवात्मक समुदाय । अभ्यन्तरो हि समुदायेऽवयव । तद्यथा, वृक्ष प्रचलन् सहावयवै प्रचलति ।' हाच एकाज्द्विर्वचनन्याय होय हा न्याय प्रकृत स्थली प्रवृत्त केल्यास, 'आर्य' या शब्दाहून प्रथम अयत स्वार्थिक अन्तरङ्ग 'कन्' प्रत्यय करून नतर 'आर्यक' या समुदायाहून 'टाप्' प्रत्यय करणे योग्य ठरते, कारण तसे केल्याने प्रत्ययसहित सपूर्ण शब्दाच्या स्त्रीत्वाचा बोधक 'टाप्' प्रत्यय होऊ शकतो 'कन्' प्रत्यय करण्या-पूर्वी 'टाप्' केल्यास, तो कन्प्रत्ययविशिष्ट 'आर्य' शब्दाच्या स्त्रीत्वाचा बोधक होणार नाही म्हणून अन्तरङ्गत्वामुळे व तसेच एकाज्द्विर्वचन-न्यायान्वये 'कन्'प्रत्यय प्रथम करून नतर 'टाप्' प्रत्यय करणे हे याग्य ठरते तरी, ता प्रत्यय प्रथम केल्यास, 'आर्यका' एवढेच रूप सिद्ध होऊ शकते व 'आर्यिका' हे पाक्षिक इष्ट रूप होऊ शकत नाही; कारण 'उदीचामात स्थाने' मू ४६५ या सूत्राने आकाराचे जागी

झालेल्या अकाराचेच विकल्पेंकरून इत्व होऊ शकते. 'आर्य+कन्+टाप्=आर्यका' यातील यकारापुढें असलेला अकार हा आकाराचे जागी झालेला नसून मूळचाच अकार असल्यामुळें, त्याचे वरील सूत्रानें इत्व होऊ शकत नाही व त्यामुळें 'आर्यिका' असे रूप सिद्ध होऊ शकत नाही. तसे पाक्षिक इष्ट रूप सिद्ध होण्याकरिता 'इधाव-न्तात्तद्धितोत्पत्तिः' असा जो प्रकृत सूत्रावरील कौमुदीत नियम सांगितला आहे तो नियम मानणें आवश्यक आहे व तो नियम मानला असता, 'आर्य' शब्दाहून प्रथम 'टाप्' व नंतर 'कन्' हा तद्धित प्रत्यय केल्यावर 'आर्या+कन्' अशी स्थिति झाली असता, 'केऽणः' सू.८३४ या सूत्रानें 'आर्या' यातील अन्त्य आकाराचा अकार होतो व अशा रीतीनें आकारस्थानिक अकार उपलब्ध होत असल्यामुळें, त्या अकाराचे 'उदीचामातः स्थाने' या सूत्रानें वैकल्पिक इत्व होऊन 'आर्यका, आर्यिका' ही दोन्ही इष्ट रूपें सिद्ध होतात.)

शब्दरत्न– ङीप्प्रसङ्गादिति । अन्यपदार्थस्य स्त्रीत्वादिति भावः । अकृत एवेति । इद "गोस्त्रियोः" इति सूत्रे भाष्ये स्पष्टम् । समासान्ता इत्यत्र "तावत्पर्याप्ताच्छब्दम्" इति हि तत्र भाष्यम् । अलौकिके प्रक्रियावाक्ये एवेत्यस्य प्रवर्तेत इत्यनेनान्वयः । क्व प्रवर्तेते तत्राह–उत्तरपदस्येति । अनन्तरमिति शेषः । अवयवी-भूयेत्यस्य प्रक्रियावाक्यस्येत्यादिः । एतत्स्वरूपकथनम् । अवयवत्वे प्रमाणमाह–समासान्त इति । तच्छब्दवाच्यत्वादिति भाव. । समास-स्यैवायमन्तावयव इति । "अन्तः" इति सूत्रे भाष्ये स्पष्टम् । इत्येके इति । अत्रारुचिबीजं तु समासार्थवाक्यस्य अन्तः इति "गोस्त्रियोः" इति सूत्रस्थभाष्यस्य वाच्यार्थविरोधः । न हि सूत्ररहितं समासार्थं किन्तु तद्विशिष्टमेव । किं च ततः पूर्वं कपि तत. समाससंज्ञाया सुब्लुकि टापि बहुचर्मिकेत्यादावापः सुपः पर-त्वादित्वानापत्तिः । तत्रविभक्त्यन्तेऽन्यपदार्थबोधकत्वारोपेण स्त्रीत्वस्य तदन्तेऽसत्त्वात्सुब्लुकः पूर्वं कबन्ताट्टाबिति वक्तु-मशक्यमिति ।

'कपः प्रागुगिल्लक्षणङीप्प्रसङ्गात्' असे जें मनोरमेंतील शकाग्रन्थात म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, ('बहवो गोमन्तो यस्या सा बहुगोमत्का नगरी' या अन्यपदार्थ-प्रधान बहुव्रीहिसमासात 'नगरी' हा) स्त्रीवाचक शब्द अन्यपदार्थ आहे (त्यामुळें 'बहुगोमत्' या शब्दाहून 'उगितश्च' सू. ४५५ या सूत्रानें 'ङीप्' प्रत्यय प्रथम केल्यावर नतर समासान्त 'कप्' प्रत्यय केल्यानें, 'बहुगोमत्का' असे इष्ट रूप सिद्ध न होता, 'बहुगोमतीका' असे अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते. म्हणून 'ड्यावन्तात्तद्धितोत्पत्ति' हा कौमुदीत दिलेला नियम स्वीकारल्यास वर दर्शविलेली आपत्ति येत असल्यामुळें, तो नियम स्वीकारार्ह नाही असा शकाकाराच्या म्हणण्याचा भावार्थ आहे) 'अकृते एव समासेऽलौकिकप्रक्रियावाक्ये एव उत्तरपदस्यावयवीभूय समासान्तः प्रवर्तते' असे जें दीक्षितानी वरील शकेवर मनोरमेंत उत्तर दिले आहे तें 'गोस्त्रियोरुपसर्जनस्य' सू. १–२–४८ या सूत्रावरील भाष्यात स्पष्टपणे सागितले आहे त्या भाष्यात 'समासान्त' या स्थली 'तादर्थ्यात्ताच्छब्द्यम्', म्हणजे 'समासान्त' या पदातील 'समास' हा शब्द 'समासाकरिता कल्पिलेले अलौकिक प्रक्रियावाक्य' या अर्थामध्ये घातला आहे, असे म्हटले आहे (त्या भाष्यात भाष्यकारानी असा प्रश्न केला आहे की, 'बहुकुमारीक', बहुवृषलीक' इत्यादि उदाहरणात 'गोस्त्रियोरुपसर्जनस्य' सू. ६५६ या सूत्रानें प्रथम न्हस्वकार्य करावे की 'नद्यृतश्च' सू. ८३३ या सूत्रानें प्रथम समासान्त 'कप्' प्रत्यय करावा. 'कप्' प्रत्यय होण्याचे सूत्र परसूत्र असल्यामुळें, 'विप्रतिषेधे परं कार्यम्' सू १७५ या सूत्रान्वये 'कप्' प्रत्ययाची प्रथम प्राप्ति होते. पण 'गोस्त्रियो' या पूर्व सूत्रानें होणारे न्हस्वकार्य, समासापेक्ष 'कप्' प्रत्ययरूप कार्याच्या मानानें, अन्तरङ्ग आहे म्हणून तें अन्तरङ्ग न्हस्वकार्य प्रथम झाले पाहिजे. पण पुढें भाष्यकार म्हणतात की, समासान्त 'कप्' प्रत्यय करणे हे कार्य अन्तरङ्गतर

आहे, म्हणजे ऱ्हस्वकार्यापेक्षा देखील ते कार्य अधिक अन्तरङ्ग आहे. यावर अशी शका करण्यात येते की, समासान्त 'कप्' प्रत्यय होणे सागितले असल्यामुळें, समास केल्यानतरच 'कप्' प्रत्ययाची प्राप्ति होऊ शकते. म्हणून तो ऱ्हस्वकार्यापेक्षा अन्तरङ्ग कसा ठरू शकणार ? या शकेवर भाष्यकारानी 'ननु चाय कप् समासान्त इत्युच्यते' असा वरील शकेचा अनुवाद करून,' तादर्थ्यात्ताच्छब्द्यं भविष्यति । येषा पदाना समासो न तावत्तेषामन्यद्भवति कप तावत् प्रतीक्षते ।' असे म्हटले आहे. या भाष्याचा अर्थ हा आहे की, जरी 'कप्' हा प्रत्यय समासान्त होतो तरी, 'समासान्त' या पदातील 'समास' हा शब्द 'समासाकरिता कल्पिलेले अलौकिक प्रक्रियावाक्य' या अर्थामध्यें घातला आहे. म्हणून ज्या पदाचा समास करणे आहे त्या पदाना 'कप्' प्रत्यय होईपर्यंत दुसरें काही एक कार्य करता येत नाही. या भाष्यावरून हृ स्पष्ट होते की, समासान्त 'कप्' प्रत्यय होण्यापूर्वी स्त्रीप्रत्यय मुळीच करता येत नाही व समासान्त 'कप्' प्रत्यय प्रथम केल्यावर अङ्ग उगित् न राहता अदन्त होत असल्यामुळें, 'ङीप्' प्रत्ययाची प्राप्तीच होत नाही व 'टाप्' प्रत्यय होऊन 'बहुगोमत्का' असे इष्ट रूप सिद्ध होते व 'बहुगोमतीका' असे अनिष्ट रूप होण्याची आपत्ति टळते.) वर दिलेल्या मनोरमेच्या पक्तीतील 'अलौकिकप्रक्रियावाक्ये एव' या पदाचा 'प्रवर्तते' या पदाशी अन्वय होतो. समासान्त प्रत्यय कोठें प्रवृत्त होतो याचे उत्तर 'उत्तरपदस्य' या शब्दानें मनोरमेंत दिले आहे व या पदापुढें 'अनन्तरम्' हृ पद अध्याहृत आहे आणि 'अवयवीभूय' या पदापूर्वी 'प्रक्रियावाक्यस्य' हे पद अध्याहृत आहे (साराश मनोरमेंतील वरील पक्तीत वर सागितलेली पदें अध्याहृत केल्यानें 'अलौकिक-प्रक्रियावाक्ये एव उत्तरपदस्यानन्तर प्रक्रियावाक्यस्यावयवीभूय समासान्तः प्रवर्तते ' असे त्या पक्तीचे स्वरूप होते.) 'अवयवीभूय' असे जें मनोरमेंत म्हटले आहे ते तो समासान्त प्रत्यय कोणत्या स्वरूपानें होतो याचे कथन होय व त्याला समासान्त ही सज्ञा दिली

असल्यामुळें (आणि 'अन्त' हा शब्द अवयववाचक असल्यामुळें) तो समासान्त प्रत्यय अवयवरूपानें होतो याला ती सज्ञा प्रमाण आहे असे दीक्षित म्हणतात, कारण समासान्त प्रत्यय समासाचा चरमावयव होतो हे त्या शब्दाच्या अर्थावरूनच सिद्ध होतें असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे (जर समासान्त प्रत्यय समासाचा चरमावयव न व्हावा असे विवक्षित असतें तर पाणिनीनें 'समासान्त' अशी सज्ञा उपयोगात न आणता, त्या प्रत्ययाचें विधान करतेवेळी 'समासात्' असा शब्द वापरला असता.) समासान्त प्रत्यय समास होण्याकरिता कल्पिलेल्या अलौकिक प्रक्रिया-वाक्याचाच अन्तावयव होतो हे 'अन्तः' सू. ६-२-१४३ या स्वरविधायक सूत्रावरील भाष्यात स्पष्ट केले आहे. (त्या भाष्यात 'अन्तोदात्तत्व समासस्येति चेत् कप्युपसख्यानम्' हें वार्तिक पठित-करून भाष्यकार म्हणतात की, 'इदप्रथमका.' या उदाहरणात मकारापुढील अकार समासाचा अन्तावयव ठरत नसून 'कप्' प्रत्यय हा समासाचा अन्तावयव ठरत असल्यामुळें, मकारापुढील अकार उदात्त होणे इष्ट असून देखील तो उदात्त होणार नाही आणि म्हणून वरील वार्तिक मानणे आवश्यक आहे. 'इदप्रथमकाः' या उदाहरणात मकारापुढील अकारापुढें 'कप्' प्रत्यय असल्यामुळें, तो अकार वरील वार्तिकान्वयें उदात्त होतो. या भाष्यावरून हे स्पष्ट होत की, समासान्त प्रत्यय समासाचाच, म्हणजे समासाकरिता कल्पिलेल्या अलौकिक प्रक्रियावाक्याचाच अन्तावयव होतो व उत्तरपदाचा अवयव होत नाही. या भाष्यावरील उद्योतात 'समा-सान्ताः समासस्यैवान्तावयवा, न तूत्तरपदावयवा इति भावः। किं च समासान्ताना समासार्थेऽलौकिकप्रक्रियावाक्ये एव प्रवृत्तिः' असे स्पष्ट म्हटले आहे ) 'स च विभक्तेः पुरस्तादित्येके' या मनोरमेंतील पक्तीत 'इत्येके' असे जें अरुचिप्रदर्शक पद दीक्षितानी घातलें आहे त्याचें कारण हे की, 'गोस्त्रियोरुपसर्जनस्य' १. २. ४८ या सूत्रावरील भाष्यात समासान्त प्रत्यय समासाकरिता कल्पिलेल्या

अलौकिक प्रक्रियावाक्याचा अन्तावयव होतो असे जें सांगितले आहे त्याविरुद्ध तो पक्ष आहे. ( तें भाष्य पूर्वी दिलेच आहे व त्या भाष्यावरून हें स्पष्ट होतें की, समासान्त प्रत्यय समास होण्याकरिता कल्पिलेल्या अलौकिक प्रक्रियावाक्याचा अन्तावयव होत असतो. समासातील उत्तर पदापुढील विभक्तिप्रत्ययापूर्वी तो केल्यास, तो प्रक्रियावाक्याचा अन्तावयव होणार नाही हे उघड आहे.) 'सुप्' प्रत्ययरहित अलौकिकप्रक्रियावाक्य समास होण्यास उपयोगी पडणारे नसून 'सुप्' सहित अलौकिकप्रक्रियावाक्यच समास होण्यास उपयोगी पडणारे आहे. (कारण 'सुप् सुपा = सुबन्त सुबन्तेन सह समस्यते' या वचनान्वयेंच हें स्पष्ट होतें की, दोन सुबन्त पदांचाच समास होऊं शकतो. म्हणून समासान्त प्रत्यय समासातील सुप्प्रत्यय-सहित उत्तरपदानंतरच होऊं शकतो व त्या उत्तरपदापुढील विभक्तिप्रत्ययापूर्वी होऊं शकत नाही.) दुसरें असें की, समासातील उत्तरपदापुढील विभक्तिप्रत्ययापूर्वी 'कप्' प्रत्यय होतो असें मानलें व समाससंज्ञा होऊन अन्तर्वर्ति विभक्तिप्रत्ययाचा लुक् झाल्यावर 'टाप्' प्रत्यय होतो असें मानलें तर, 'बहुचर्मिका' इत्यादि उदाहरणांत 'टाप् = आ' हा प्रत्यय 'जस्' या विभक्तिप्रत्ययापुढें येईल व त्यामुळें ('प्रत्ययस्थात्कात्पूर्वस्य' सू ४६३ या सूत्रानें होणारे) ह्रस्व न होण्याची आपत्ति येईल ('बहूनि चर्माणि यस्या नगर्याम्' या अन्यपदार्थप्रधान बहुव्रीहिसमासाचें 'बहु जस् चर्मन् जस् कप्' असें अलौकिकप्रक्रियावाक्य न करिता, 'बहु जस् चर्मन् कप् जस्' असें अलौकिकप्रक्रियावाक्य केल्यास, म्हणजे समासान्त 'कप्' प्रत्यय समासातील 'चर्मन्' या उत्तरपदापुढील 'जस्' या विभक्तिप्रत्ययापुढें न लावता त्या प्रत्ययापूर्वी लावल्यास, त्या समुदायाला समाससंज्ञा झाल्यावर 'कृत्तद्धितसमासाश्च' सू. १७९ या सूत्रानें त्याला प्रातिपदिकसंज्ञा होऊन 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू. ६५० या सूत्रानें अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाचा लुक् केल्यानें 'बहु चर्मन् कप्' अशी स्थिति झाली असता, 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य'

सू. २३६ या सूत्रानें 'चर्मन्' या प्रातिपदिकसंज्ञक पदांतील अन्त्य-नकाराचा लोप झाल्यावर 'बहुचर्म' असे जें अदन्त सामासिक प्रातिपदिक होते त्याहून 'अजाद्यतष्टाप्' सू. ४५४ या सूत्रानें 'टाप्' प्रत्यय केला तर, तो 'टाप्' प्रत्यय लुक् झालेल्या 'जस्' या अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययानंतर आला आहे असे प्रत्ययलक्षणानें मानणें भाग पडेल व 'प्रत्ययस्थात्कात्पूर्वस्य' या सूत्रात 'असुपः = स आप् सुपः परो न चेत्' असा प्रतिषेध असल्यामुळें, तें सूत्र या स्थली प्रवृत्त होणार नाही व प्रत्ययरूप ककारापूर्वी असलेल्या अकाराचे इत्व होणार नाहीं आणि त्यामुळें 'बहुचर्मिका' असे इष्ट रूप सिद्ध होणार नाही. वरील उदाहरणात 'जस्' या अन्तर्वर्ति-विभक्तिप्रत्ययाचा लुक् झाला असल्यामुळें व 'न लुमताङ्गस्य' सू. २६३ हा निषेध असल्यामुळें, 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' सू. २६२हें सूत्र या उदाहरणात प्रवृत्त होऊ शकत नाही व त्यामुळें लुक् झालेल्या 'जस्' या विभक्तिप्रत्ययापुढें 'टाप्' आहे असे मानता येत नाही आणि म्हणून 'प्रत्ययस्थात्कात्पूर्वस्य' हें सूत्र या स्थली प्रवृत्त होऊ शकतें व 'बहुचर्मिका' असे इष्ट रूप सिद्ध होण्यात काही अडचण येत नाही अशी कोणी शंका केल्यास, ती शंका बरोबर नाही, कारण 'न लुमताङ्गस्य' हा निषेध अशाच ठिकाणी लागू पडतो की, जेथें लुक् झालेल्या प्रत्ययाच्या निमित्तामुळें त्या प्रत्ययाच्या अङ्गाला काही कार्य करणें आहे. प्रकृत स्थली लुक् झालेल्या 'जस्' प्रत्ययाच्या निमित्ता-मुळें त्याच्या अङ्गाला कोणतेंहि कार्य करणें नसून 'कप्' प्रत्ययाचे 'बहुचर्म' हें जें अङ्ग आहे त्याला कप्पूर्वकटाप्प्रत्ययनिमित्तक इत्व-कार्य करणें आहे. म्हणून येथें 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' हें सूत्र प्रवृत्त होऊ शकतें व त्यामुळें 'जस्' या विभक्तिप्रत्ययापुढें 'टाप्' आहे असें प्रत्ययलक्षणानें मानावें लागत असल्यामुळें आणि 'प्रत्यय-स्थात्कात्' या सूत्रात 'असुपः' हा निषेध असल्यामुळें, तें इत्व-विधायक सूत्र येथें प्रवृत्त होऊं शकत नाही व 'बहुचर्मिका' असे

इष्ट रूप सिद्ध होऊं शकत नाहीं. समासातील 'चर्मन्' या उत्तर-पदापुढील 'जस्' प्रत्ययापुढें 'कप्' प्रत्यय लावल्यासच, 'टाप्' प्रत्यय 'जस्' या सुप् प्रत्ययापुढें येत नसल्यामुळें, इत्व होऊन तसें इष्ट रूप सिद्ध होऊ शकते. म्हणून 'स च विभक्तेः पुरस्तात' या पक्षासबधानें दीक्षितानीं आपली अरुचि प्रदर्शित केली आहे व तो पक्ष स्वीकाराहं नाही असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.) 'बहुचर्मिका' या उदाहरणात विभक्त्यन्त समुदाय अन्य-पदार्थाचा बोधक असल्यामुळें त्याचे ठिकाणी स्त्रीत्वाचा आरोप केल्यानें त्याहून 'टाप्' हा स्त्रीत्वबोधक प्रत्यय करता येतो. पण कबन्त समुदाय अन्यपदार्थाचा बोधक नसल्यामुळें व अशा रीतीनें त्याचे ठिकाणी स्त्रीत्वाचा अभाव असल्यामुळें, 'जस्' प्रत्ययाचा लुक् होण्यापूर्वी कबन्त समुदायाहून 'टाप्' प्रत्यय करता येतो हे म्हणणे शक्य नाही. ('स च विभक्तेः पुरस्तात्' हा पक्ष मानणाऱ्या वैयाकरणाच्या मतें 'बहुचर्मिका' याचे 'बहु जस् चर्मन् कप् जस्' असे अलौकिकप्रक्रियावाक्य होतें हे वर सांगितलेच आहे. या संपूर्ण समुदायाहून 'टाप्' प्रत्यय केला असता, तो 'टाप्' प्रत्यय 'जस्' या विभक्तिप्रत्ययापुढें येत असल्यामुळें आणि म्हणून 'चर्म' यातील मकारापुढील अकाराचे, 'असुपः' या प्रतिषेधान्वयें, इत्व होऊ शकत नसल्यामुळें, ही आपत्ति टाळण्याकरिता ते वैयाकरण असे म्हणतात कीं, वरील अलौकिकप्रक्रियावाक्यात 'कप्' प्रत्ययानंतर व 'जस्' प्रत्ययापूर्वी 'टाप्' प्रत्यय करावा. तसे केल्यानें 'टाप्' हा 'कप्' प्रत्ययानंतर येत असून 'जस्' या विभक्तिप्रत्ययानंतर येत नसल्या-मुळें, 'असुपः' हा निषेध प्रवृत्त होत नाही व 'बहुचर्मिका' असे इष्ट रूप सिद्ध होऊ शकते. यावर शब्दरत्नकार असे उत्तर देतात कीं, 'बहु जस् चर्मन् कप् जस्' हा संपूर्ण जस्प्रत्ययान्त समुदाय 'नगरी' या अन्य पदार्थाचा बोधक असल्यामुळें, तथा समुदायाचे ठिकाणीच स्त्रीत्वाचा आरोप करता येतो व त्या संपूर्ण समुदायाहूनच 'जस्' प्रत्ययापुढें 'टाप्' प्रत्यय करता येतो. 'बहु जस् चर्मन्

कप्' हा कप्प्रत्ययान्त समुदाय—भाग—' नगरी ' या अन्यपदार्थाचा बोधक नसल्यामुळें, त्या समुदायाचे ठिकाणी स्त्रीत्वाचा आरोप करता येत नाही, आणि स्त्रीत्वबोधक समुदायाहूनच स्त्रीप्रत्यय करता येत असल्यामुळें, कप्प्रत्ययान्त समुदायाहून 'टाप्' प्रत्यय करता येऊ शकत नाही. जस्प्रत्ययान्त समुदायापुढें 'टाप्' प्रत्यय केल्यास, 'असुपः' हा निषेध प्रवृत्त होऊन इत्व न होण्याची आपत्ति कायम राहतेच. म्हणून प्रथमपक्षासबधानें, दीक्षितानी जी अरुचि प्रदर्शित केली आहे ती योग्य आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.)

शब्दरत्न—परस्तादिति पक्षे स्थितिः। न च विशिष्टस्य सुबन्तत्वाभावेन सुबन्तात्तद्धित इति सिद्धान्तविरोधः, तेषामतिरिक्तार्थाभावेन परिपूर्णम्पदमिति न्यायाविषयतया तस्य सिद्धान्तस्य समासान्तविषयेऽभावात्। एवं च समासान्तेषु "ङ्याप्प्रातिपदिकात्" इत्यस्यासम्बन्ध एव, तस्यामवस्थायां वाक्यस्य प्रातिपदिकत्वाभावादिति भावः। तद्धितान्तत्वादिति। प्रातिपदिकत्वेनेति शेषः। पुनः सुपि चाकृते इति। प्रत्ययलक्षणेन सुबन्तत्वात्समाससंज्ञा। कपस्तद्वाक्यावयवत्वेन तद्ग्रहणेन तदन्तस्य ग्रहणम्। सुपि च कृते इति क्वाचित्कः पाठः प्रामादिकः। यद्यपि तत्र पाठे अलौकिकविग्रहवाक्येऽपि अन्यपदार्थान्तर्भावेण एकार्थीभावारोपात् स्त्रीत्वसत्त्वेन पूर्वं टापि ततः सुपि, आपः सुपः परत्वाभावाद् बहुचर्मिकेत्यत्रेत्वसिद्धिरस्ति, तथापि तदुत्पत्तिपर्यन्त समाससंज्ञाया अप्रवृत्तौ मानाभावात्। न च सुबन्तत्वाभावः, अनेन सुपा समुदायस्य सुबन्तत्वेऽपि उत्तरपदमात्रस्य तत्त्वाभावात्। पूर्वपदस्य सुबन्तताया: प्रत्ययलक्षणेनैवोपपाद्यत्वात्। एवं च पूर्वं तत्करणे फलाभावः, बहिर्भूतसंख्याकारकसापेक्षसुपस्तस्यामवस्थायां तदनभिव्यक्त्याऽप्रवृत्तेश्च। वस्तुतस्तु तद्धितान्तत्वनिमित्तप्रातिपदिकसंज्ञासमकालमेव विरोधाभावेन तत्पूर्वभागस्य समाससंज्ञेति बोध्यम्। यौगपद्यासम्भव एव शास्त्राणां क्रमप्रवृत्त्यङ्गीकारादिति दिक्॥

'परस्तादितिपक्षे तु', म्हणजे अलौकिक प्रक्रियावाक्यातील संपूर्ण समुदायाहून 'जस्' या विभक्तिप्रत्ययापुढें समासान्त 'कप्' प्रत्यय करावा, असा जो मनोरमेंत सिद्धान्तपक्ष सांगितला आहे त्यावर अशी शंका करण्यात येते की, 'विशिष्ट', म्हणजे 'बहु जस् चर्मन् जस्' हें अलौकिक प्रक्रियावाक्य, सुबन्त नसल्यामुळें, (त्याहून 'कप्' हा समासान्त तद्धित प्रत्यय करणें हें) 'सुबन्तात्तद्धितोत्पत्ति.' या सिद्धान्ताविरुद्ध आहे (पण शब्दरत्नकार म्हणतात कीं) ही शंका बरोबर नाही, कारण समासान्त प्रत्यय हे प्रकृतीच्या अर्थाव्यतिरिक्त इतर कोणत्याहि अधिक विशिष्ट अर्थाचे बोधक नसल्यामुळें, म्हणजेच त्यांचे ठिकाणी स्वतन्त्रार्थबोधकता नसून केवळ प्रकृत्यर्थबोधकता मानली असल्यामुळें, 'परिपूर्णं पदमर्थान्तर-माकाङ्क्षते' हा न्याय तशा अत्यन्त स्वार्थिक समासान्त प्रत्ययांना लागू पडत नाही आणि त्यामुळें 'सुबन्तात्तद्धितोत्पत्ति.' हा न्याय तशा समासान्त प्रत्ययांच्या विषयांत प्रवृत्त करता येत नाहीं. ('बहु जस् चर्मन् जस' या अलौकिक प्रक्रियावाक्यांत जो अखेरीस 'जस्' प्रत्यय दिसतो तो समासातील चरमावयव जो 'चर्मन्' शब्द आहे त्याहून झालेला प्रत्यय असून समुदायाहून झालेला प्रत्यय नव्हे. म्हणून समुदाय सुबन्त नसल्यामुळें, त्याहून समासान्त तद्धित 'कप्' प्रत्यय करणें हें 'सुबन्तात्तद्धितोत्पत्तिः' या सिद्धान्ताविरुद्ध ठरतें. हा सिद्धान्त 'कुत्सिते' ५. ३. ७४ या सूत्रावरील भाष्यांत ज्या दोन कारिका पठित केल्या आहेत व ज्या या विवरणांत पूर्वी दिल्या आहेत त्यावरून सिद्ध होतो. त्या कारिकांचा भावार्थ हा आहे की, कोणताहि शब्द प्रथम जातीचा व तन्मध्येंच असणाऱ्या व्यक्तीचा बोध करतो. त्यानंतर लिङ्ग, वचन व कारक यांचा त्याहून क्रमानें बोध होत असल्यामुळें, तद्द्योतक प्रत्यय त्याहून त्याच क्रमानें केले जातात व त्यानंतर तो परिपूर्ण अर्थाचा वाचक होतो आणि असे परिपूर्णार्थक सुबन्ताद तद्धित प्रत्ययांच्या अर्थामध्यें अन्वित होण्याकरिता योग्य हा व तशा सुबन्त पदाहून

तद्धित प्रत्यय होत असतो.) साराश द्वितीय कारिकेत 'अभिधाय तान्विशेषानपेक्षमाणश्च कृत्स्नमात्मानम्। प्रियकुत्सनादिषु पुनः प्रवर्ततेऽसौ विभक्त्यन्तः ॥' असे म्हटले असल्यामुळें, त्यावरूनच 'परिपूर्णं पदमर्थान्तरमाकाङ्क्षते' व 'सुबन्तात्तद्धितोत्पत्तिः' हे सिद्धान्त निष्पन्न होतात. म्हणून शंकाकार म्हणतो की, वरील समुदाय सुबन्त नसल्यामुळें त्याहून समासान्त तद्धित 'कप्' प्रत्यय करता येत नाही या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, वरील दोन सिद्धान्त अशाच ठिकाणी लागू पडतात की, जेथें जो तद्धित प्रत्यय करणे आहे तो प्रकृतीहून भिन्न अशा विशिष्ट अर्थाचा बोधक आहे परंतु समासान्त तद्धित प्रत्यय असे आहेत की, ते कोणत्याहि अर्थाचे बोधक नाहीत व 'प्रत्याययति अर्थबोधं करोति इति प्रत्ययः' अशी अन्वर्थक प्रत्ययसंज्ञा पाणिनीनें केली असल्यामुळें, ते वास्तविक अर्थरहित असून देखील प्रकृतीच्या अर्थाचा बोध करणारे आहेत असे मानले आहे म्हणून ज्या प्रकृतीहून अत्यन्त स्वार्थिक तद्धित प्रत्यय होतो त्या प्रकृतीत तशा अत्यन्त स्वार्थिक प्रत्ययाचा अर्थ पूर्वीच असल्यामुळें, त्या प्रकृतीला तशा अत्यन्त स्वार्थिक तद्धित प्रत्ययाच्या अर्थाची आकांक्षा राहत नाही व त्यामुळें तशा प्रकृतीहून विभक्तिप्रत्यय उत्पन्न होण्यापूर्वीच, म्हणजे प्रकृति सुबन्त होण्यापूर्वीच, अत्यन्त स्वार्थिक समासान्त तद्धित प्रत्यय होऊं शकतो व अशा ठिकाणी वरील दोन्ही सिद्धान्त लागू पडत नाहीत.) म्हणून, म्हणजे समासान्त प्रत्ययाच्या विषयात वरील दोन्ही सिद्धान्त लागू पडत नसल्यामुळें, समासान्तप्रत्यय-विधायक सूत्रात 'ङ्याप्प्रातिपदिकात्' हे अधिकारसूत्र मुळीच संबद्ध–अनुवृत्त–होत नाही, कारण समासान्त प्रत्यय होतेवेळी अलौकिक प्रक्रियावाक्याचे ठिकाणी प्रातिपदिकसंज्ञेचा अभाव आहे असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे. ('बहु जस् गोमत् जस्' या अलौकिक प्रक्रियावाक्यातच समुदायाहून समासान्त तद्धित 'कप्' प्रत्यय होतो. तो समासान्त प्रत्यय होण्यापूर्वी त्या समुदायाला

समाससंज्ञा होत नाही व त्यामुळें त्याला 'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रानें होणारी प्रातिपदिकसंज्ञा होत नाही. समुदायाहून समासान्त तद्धित प्रत्यय होईपर्यंत समुदाय हा केवळ अर्थवान् पदाचा समुदाय ठरतो व 'समास' ग्रहणकृतनियमान्वयें त्याला प्रातिपदिकसंज्ञा होऊं शकत नाही. समासान्त तद्धित प्रत्यय झाल्यावरच समुदाय समाससंज्ञक व तसेच तद्धितान्त ठरतो आणि त्यामुळें त्याला प्रातिपदिकसंज्ञा होते. सारांश समासान्त प्रत्यय करतेवेळी ज्या समुदायाहून तो प्रत्यय करणे आहे तो समुदाय प्रातिपदिकसंज्ञक ठरत नसल्यामुळें, समासान्तप्रत्ययविधायक सूत्राचे ठिकाणी 'ङ्याप्प्रातिपदिकात्' हे अधिकारसूत्र अनुवृत्त होऊं शकत नाही.) 'तद्धितान्तत्वात् सुब्लुकि' या मनोरमेच्या पङ्क्तीतील 'तद्धितान्तत्वात्' या पदापुढें 'प्रातिपदिकत्वेन' हे पद अध्याहृत आहे. (सारांश 'बहु जस् गोमत् जस् कप्' हा समुदाय तद्धितान्त असल्यामुळें, त्याला 'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा होते आणि अशा रीतीनें तद्धितान्तत्वामुळें तो समुदाय प्रातिपदिकसंज्ञक ठरत असल्यामुळें, 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू. ६५० या सूत्रानें त्या समुदायातील अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाचा लुक् होतो.) 'पुनः सुपि चाकृते समासः' असे जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे की, (जरी अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाचा लुक् होतो तरी) प्रत्ययलक्षणानें ('बहु' व 'गोमत्' हे शब्द) सुबन्त ठरत असल्यामुळें (कप्प्रत्ययापूर्वी असणाऱ्या 'बहुगोमत्' या समुदायाला) समाससंज्ञा होते आणि ('बहु-जस् गोमत् जस् कप्' या) अलौकिक प्रक्रियावाक्यात 'कप्' हा प्रत्यय त्या वाक्याचा अवयव असल्यामुळें, समासग्रहणानें कप्प्रत्ययान्त समुदायाचें ग्रहण होतें, म्हणजे संपूर्ण कप्प्रत्ययान्त समुदायाला समाससंज्ञा होते. ('सुपि चाकृते' या ऐवजी) 'सुपि न कृते' असा मनोरमेच्या क्वचित् प्रतीत आढळणारा पाठ अशुद्ध आहे. तो पाठ मानल्यास जरी ('बहु जस् चर्मन् जस् कप्' या) अलौकिक

विग्रहवाक्यात देखील अन्य पदार्थाचा, म्हणजे अन्यपदार्थबोधक समुदायाचा, अन्तर्भाव असल्यामुळें, या समुदायाचे ठिकाणी एकार्थीभावाचा आरोप केल्यानें हा समुदाय स्त्रीत्वाचा बोधक होतो व त्यामुळें त्याहून प्रथम 'टाप्' प्रत्यय करून नंतर 'सु' हा प्रत्यय केला असता, या स्थली 'टाप्' हा सुप्प्रत्ययाच्या पुढें येत नसल्यामुळें 'बहुचर्मिका' या उदाहरणात इत्वाची सिद्धि होऊं शकते तरी, 'सु' हा विभक्तिप्रत्यय करीपर्यंत समाससंज्ञा होऊं शकत नाही असं मानण्यास काही प्रमाण नाही ('सुपि च अकृते' हा पाठ मानल्यानें) उत्तर पद सुबन्त ठरत नाही (हा दोष येतो असं जर 'सुपि च कृते' हा पाठ मानणाऱ्याचे म्हणणें असेल तर, त्याच्या पक्षात देखील) अखेरीस 'सु' प्रत्यय केल्यानें जरीं संपूर्ण समुदाय सुबन्त मानता येता तरी, उत्तर पद हं सुबन्त ठरू शकत नाही पूर्व पदाला तर प्रत्ययलक्षणानेंच सुबन्त मानावे लागते. (पण त्याच्या पक्षात जसें पूर्व पद प्रत्ययलक्षणानें सुबन्त मानता येतें तसें उत्तर पद प्रत्ययलक्षणानें सुबन्त मानता येत नसल्यामुळें, त्या उत्तरपदाचे ठिकाणी सुबन्तत्व आणण्याकरिता) समाससंज्ञा करण्यापूर्वी समुदायाहून 'सु' हा विभक्तिप्रत्यय केल्यानें काहीच फल निष्पन्न होत नाहीं, म्हणजे उत्तरपद काहीं सुबन्त होत नाही. दुसरे असें की, समाससंज्ञा होण्यापूर्वीं अन्यपदार्थाची संख्या व कारक याचा बोध होत नसल्यामुळें, जोपर्यंत समाससंज्ञा होऊन अन्यपदार्थाचा बोध होत नाही तोपर्यंत तद्गत अन्यपदार्थाची संख्या व कारक बोधित करणारा समासापेक्ष 'सु' हा विभक्तिप्रत्यय करता येत नाही. वास्तविक ('बहु जस् चर्मन जस् कप्' हा समुदाय तद्धितप्रत्ययान्त असल्यामुळें) जेव्हां त्या समुदायाला तद्धितान्तत्वामुळें प्रातिपदिकसंज्ञा होतें त्याचवेळी 'कप्' प्रत्ययापूर्वी असलेल्या भागाला कोणताहि विरोध येत नसल्यामुळें, समाससंज्ञा होते, म्हणजे या दोन संज्ञा एकेचवेळीं होण्यात कोणताहि विरोध येत नाही, हें जाणावें. जेथें अनेक सूत्रांनी प्राप्त होणारीं भिन्न कार्यें एकेचवेळीं होणें संभवत नाहीं

त्याच ठिकाणी तीं कार्ये क्रमानें करावीं असा सिद्धान्त मानला आहे. ('सुपि च अकृते' हा पाठ न मानता 'सुपि च कृते समास इति सिद्धान्तः' हा पाठ मानणाऱ्या वैयाकरणाचें असें म्हणणें आहे कीं, 'बहु जस् चर्मन् जस् कप्' या कप्प्रत्ययान्त समुदायाहून 'सु' हा विभक्तिप्रत्यय केल्यानंतरच त्या समुदायाला समाससंज्ञा होऊ शकते; कारण समाससंज्ञा होण्याकरितां ज्या दोन पदांचा समास करणें आहे तीं दोन्ही पदें, म्हणजे पूर्वपद व उत्तरपद हीं दोन्ही, सुबन्त असलीं पाहिजेत. कप्प्रत्ययान्त समुदाय तद्धितप्रत्ययान्त असल्यामुळें 'कृत्तद्धितसमासाश्च' सू. १७९ या सूत्रानें त्याला प्रातिपदिकसंज्ञा होऊन 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू. ६५० या सूत्रानें त्या समुदायांतील दोन्ही 'जस्' या अन्तर्वर्तिविभक्ति-प्रत्ययाचा लुक् झाला असता, जरी प्रत्ययलक्षणानें पूर्वपद सुबन्त मानतां येत तरी, 'उत्तरपदत्वे चापदादिविधौ प्रतिषेधः'–सू. ६४२ वरील वार्तिक–हें प्रतिषेधक वार्तिक असल्यामुळें, उत्तरपद सुबन्त मानतेवेळीं 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' सू. २६२ हें सूत्र प्रयुक्त करतां येत नाहीं. त्यामुळें उत्तरपद सुबन्त ठरत नाहीं व 'सुबन्त सुबन्तेन समस्यते' हा नियम असल्यामुळें आणि वर सांगितल्या-प्रमाणें प्रथम ह्यवलीं पूर्व पद सुबन्त ठरत असून उत्तरपद सुबन्त ठरत नस-

त्याहून सख्याकारकनिमित्तापेक्ष बहिरङ्ग 'सु' हा विभक्तिप्रत्यय करण्यापूर्वी, त्याहून स्त्रीत्वबोधक अन्तरङ्ग 'टाप्' प्रत्यय करता येतोच व तो 'टाप्' प्रत्यय विभक्तिप्रत्ययापुढें येत नसून 'कप्' या तद्धितप्रत्ययापुढे येत असल्यामुळें, 'प्रत्ययस्थात्कात्पूर्वस्य' सू. ४६३ या सूत्राने ककारापूर्वी असलेल्या अकाराचे, म्हणजे 'चर्म' यातील अन्त्य अकाराचे, ह्रस्व होण्यात काही अडचण येत नाही असे 'सुपि च कृते' हा पाठ समर्थन करणाऱ्या वैयाकरणाच्या म्हणण्याचें तात्पर्य आहे. यावर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, असा पाठ मानल्यानें देखील जरी 'बहुचर्मिका' असे इष्ट रूप सिद्ध होऊ शकते तरी, अलौकिक विग्रहवाक्यातील कप्प्रत्ययान्त समुदायाला समाससंज्ञा प्राप्त करून देण्याकरिता समुदायाहून 'सु' हा विभक्तिप्रत्यय करण्याची काहींच गरज नाही. तो विभक्तिप्रत्यय समुदायाहून करण्यापूर्वी देखील अलौकिकविग्रहवाक्यावस्थेतच कप्प्रत्ययान्त समुदायाला समाससंज्ञा होण्यात काही अडचण येत नाही, कारण तो कप्प्रत्ययान्त समुदाय 'नगरी' या अन्यपदार्थाचा बोधक असल्यामुळें त्याचे ठिकाणी एकार्थीभावाचा आरोप केल्यानें स्त्रीत्वबोधकता येते व त्यामुळें त्याहून स्त्रीत्वबोधक 'टाप्' प्रत्यय करता येतो. पण कप्प्रत्ययान्त समुदाय तद्धितान्त असल्यामुळें त्याला प्रातिपदिकसंज्ञा होऊन जेव्हा दोन्ही 'जस्' या अन्तर्वर्तिविभक्ति-प्रत्ययाचा लुक् होतो तेव्हा 'बहु' व 'चर्मन्' या दोन्ही पदापुढें विभक्तिप्रत्यय राहत नसल्यामुळें व 'सुबन्त सुबन्तेनसह समस्यते' असा नियम असल्यामुळें, त्या दोन पदाचा समास कसा व्हावा अशी जी शंका करण्यात येते तीवर हें उत्तर आहे की, दोन्ही पदें प्रत्ययलक्षणानें सुबन्त मानता येऊ शकतात. यावर पूर्वपक्षी असे म्हणता की, जरी पूर्वपद प्रत्ययलक्षणानें सुबन्त मानता येते तरी 'उत्तरपदत्वे चापदादिविधौ' या प्रतिषेधक वार्तिकान्वयें उत्तरपद सुबन्त मानता येत नाही आणि म्हणूनच उत्तरपद सुबन्त व्हावें व समुदायाला समाससंज्ञा व्हावी याकरिता त्या समासाहून 'सु'

प्रत्यय करणें आवश्यक आहे. पण पूर्वपक्षीच्या या म्हणण्यात काहीच अर्थ नाही; कारण 'सु' प्रत्यय जो असेरीस केला जातो तो समुदायाहून केला जात असून उत्तरपदाहून केला जात नसल्यामुळें, या प्रत्ययाच्या योगानें 'चर्मन्' हे पद कसे सुबन्त ठरणार? म्हणून 'सु' प्रत्यय केल्यावर देखील उत्तर पद सुबन्त ठरत नसल्यामुळें, समुदायाला समाससंज्ञा न होण्याची आपत्ति जशीची तशीच कायम राहते. आणखी असे की, समुदायाला बहुव्रीहिसमाससंज्ञा होऊन तो समुदाय 'नगरी' या अन्यपदार्थाचा बोधक होत नाही तोपर्यंत संख्या व कारक याचा बोध करणारा 'सु' प्रत्यय त्या समुदायाहून करता येणे कसे शक्य आहे? वास्तविक 'उत्तरपदत्वे चापदादिविधौ' हा प्रतिषेध अशाच ठिकाणीं लागू पडतो कीं, जेथें प्रत्ययलक्षणानें उत्तरपदाला पदसंज्ञा करून तन्निमित्तक काही कार्य त्या पदाला करणे आहे. प्रकृत स्थली तसे काहीं करणे नसल्यामुळें, उत्तर पदाला पदसंज्ञा करतेवेळीं वरील प्रतिषेधक वार्तिक मुळीच लागू पडत नाही. दुसरें असें की, ज्यावेळी कप्प्रत्ययान्त समुदायाला तद्धितान्तत्वामुळें प्रातिपदिकसंज्ञा होते त्याचवेळी अलौकिकविग्रहवाक्यावस्थेतच त्या समुदायातील कप्प्रत्ययापूर्वी असलेल्या भागाला समाससंज्ञा देखील होते. या स्थितीत पूर्वपद व उत्तरपद विभक्तिप्रत्ययान्त असल्यामुळें सुबन्त ठरतात व त्यामुळें त्या भागाला समाससंज्ञा होण्यात काही प्रत्यवाय येत नाहीं. सारांश समाससंज्ञा होण्याकरितां समुदायाहून सुबुत्पत्ति करण्याची मुळींच आवश्यकता नसल्यामुळें, 'सुपि च कृते समास इति सिद्धान्तः' हा पाठ अशुद्ध ठरतो हे उघड आहे.)

शब्दरत्नः—प्रत्याहुरिति । लोपहृपन्तु लोहिनिकेत्यर्थमिति तद्भावः । अनेनेति । आर्थकत्वस्य साधनेनेत्यर्थः ।

सुबन्तात्तद्धितोत्पत्तौ, प्रागेव टाबापोः प्रवृत्तौ च बीजमाह— स्वार्थादिति । स्वार्थद्रव्यलिङ्गसंख्याकारकेष्वित्यर्थः । स्वार्थः । प्रवृत्तिनिमित्तम् । विशिष्टबुद्धौ विशेषणज्ञानस्य कारणत्वात्पूर्वं तत्या-

दिज्ञानं, ततो धर्मित्वेन प्रधानत्वाल्लिङ्गादिभिरप्याकाङ्क्षितत्वात्तदाश्रयज्ञानं,—ततः स्वमात्रापेक्षत्वाल्लिङ्गस्य ज्ञानं, ततो विजातीयक्रियाकारकापेक्षया सजातीयपदार्थापेक्षसंख्यायाः प्रथममुपस्थित्या तज्ज्ञान, ततः कारकरूपविभक्त्यर्थाकाङ्क्षा, तन्निवृत्तौ हि बहिर्भूतकुत्सादियोग इति "कुत्सिते" इति सूत्रे भाष्ये स्पष्टम् । एवं च ज्ञानक्रमानुरोधेनैव तत्तत्प्रयुक्तकार्यप्रवृत्तेरौचित्येन क्रमिकत्वं स्पष्टमेव । यद्यपि लोकानां बोधो न क्रमेण, तथाऽपि शास्त्रप्रक्रियायां शास्त्रकृत्कल्पितोऽयं क्रमः । अर्थवदुद्देशेन प्रातिपदिकत्वविधानात् प्रातिपदिकोद्देशेन लिङ्गादौ ङीबादिविधानादिति बोध्यम् । अत एव "घकालतनेषु—" इति चरितार्थम् । स्पष्टं चेदम्—"अचःपरस्मिन्" इत्यत्र भाष्यकैयटयोः । एवं चैतन्न्यायसिद्धार्थानुवाद एव इचाप्ग्रहणम् । अत्यन्तस्वार्थिकानारम्भ्य तस्यनिवृत्तेरुक्तन्यायविषयाभावाच्च समासान्तेषु न दोषः । अत्यन्तस्वार्थिके कन्यायिकेत्येव, यद्यभिधानमस्ति । लोहिनिकेत्येतत्सिद्ध्यर्थं च "लोहितात्लिङ्गबाधन वा" इति कार्यमेवेति भावः । स्पष्टं चेदं सूत्रशेषे भाष्ये इत्यन्यत्र विस्तरः ।

'आब्ग्रहण स्पष्टार्थम्' असे जें प्रकाशकारानी म्हटले आहे (व 'इचाब्ग्रहण स्पष्टार्थम्' असे म्हटले नाही) त्याचे कारण हे की, त्या सूत्रातील 'ङी' या प्रत्ययाचे ग्रहण 'लोहिनिका' हे रूप सिद्ध व्हावे यावरिता चरितार्थ ठरते (पण आब्ग्रहणाचे तसे कोणतेहि विशेष प्रयोजन सागता येत नाही. ) 'तदनेन प्रत्युक्तम्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्यातील 'अनेन' या पदाचा 'आर्यकेत्यस्य साधनेन,' म्हणजे 'आर्यका' या रूपाची सिद्धि होण्याकरिता प्रकृत सूत्रातील आब्ग्रहण देखील सप्रयोजनक व चरितार्थ ठरत असल्यामुळें, असा अर्थ आहे. ( या विषयाचे विस्तृत विवरण पूर्वी मनोरमेंत केलेच आहे. ) सुबन्ताहून तद्धितोत्पत्ति होत असते व त्यापूर्वीच 'ङी' व 'आप्' हे स्त्रीप्रत्यय होत असतात याचे कारण 'स्वार्थादिप्रयुक्तकार्याणां क्रमिकत्वस्वीकारात्' असे मनोरमेंत दिले आहे. या पङ्क्तींतील 'स्वार्थादि' या शब्दाचा 'स्वार्थ, द्रव्य, लिङ्ग,

सख्या, कारक' असा अर्थ आहे. 'स्वार्थ' या शब्दाचा 'प्रवृत्तिनिमित्त' असा अर्थ आहे. (ज्याच्यामुळे शब्दाचा भापेत विशिष्ट अर्थ द्योतित करण्याकरिता प्रयोग केला जातो ते त्याचे प्रवृत्तिनिमित्त होय. 'ऋलृक्' या शिवसूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी 'चतुष्टयी शब्दाना प्रवृत्ति । जातिशब्दा गुणशब्दा क्रियाशब्दा यदृच्छाशब्दा - श्चतुर्था.' असे प्रथम सागून पुढे "त्रयी च शब्दाना प्रवृत्ति । जातिशब्दा गुणशब्दा. क्रियाशब्दा इति । न सन्ति यदृच्छाशब्दा ।" असा सिद्धान्त सागितला आहे साराश या भाष्यान्वये जाति गुण व क्रिया ही तीन प्रवृत्तिनिमित्तें होत 'नागृहीतविशेषणा विशेष्ये वुद्धिरुत्पद्यते' या न्यायान्वयें) विशिष्टाचे ज्ञान होण्याकरिता विशेषणाचे ज्ञान होणे आवश्यक असल्यामुळें, प्रथम जाति इत्यादि- काचे म्हणजे जाति, गुण, क्रिया याचे, ज्ञान होत त्यानतर विशिष्ट व्यक्तीचे ज्ञान होते, कारण व्यक्तीचे ठिकाणी धर्म राहत असल्या- मुळें, व्यक्ति ही (लिङ्ग, सख्या, कारक याच्या मानानें) प्रधान ठरते आणि लिङ्ग, सख्या, कारक याचे ज्ञान होण्याकरिता ते ज्या व्यक्तीच्या आश्रयानें राहतात त्या व्यक्तीच्या ज्ञानाची अपेक्षा असते. व्यक्तिज्ञान झाल्यानतर लिङ्गाचे ज्ञान होते ते लिङ्गज्ञान होण्या- करिता तेवढा एक व्यक्तीचीच अपेक्षा असते (सख्या व कारक याचे ज्ञान होण्याकरिता जशी व्यक्त्यन्तराची अपेक्षा असते तशी लिङ्गज्ञान होण्याकरिता व्यक्त्यन्तराची अपेक्षा नसते) त्यानतर सख्येचे ज्ञान होते, कारण सख्येचे ज्ञान होण्याकरिता सजातीय इतर व्यक्तीचीच अपेक्षा असल्यामुळें व जशी कारकास विजातीय क्रियेची अपेक्षा असते तशी सख्येला राहत नसल्यामुळें, सख्येची प्रथम उपस्थिति होऊन तिचे प्रथम ज्ञान होत त्यानतर व्यक्ति क्रियेमध्यें कोणत्या प्रकारें अन्वित आहे हृ जाणण्याची, म्हणजेच कारकरूप विभक्तीच्या अर्थाचे ज्ञान होण्याची, आकाक्षा उत्पन्न होते (व त्या कारकाचा बोधक विभक्तिप्रत्यय लावल्यानें) ती आकाक्षा निवृत्त झाल्यावर प्रकृतीच्या अर्थामध्यें अन्तर्भूत नसणारा,

म्हणजेच प्रकृतीच्या अर्थाहून बहिर्भूत असणारा, कुत्सा इत्यादि अर्थ ज्ञात होण्याकरिता त्या प्रकृतीहून त्या त्या विशिष्ट कुत्सादि अर्थाचे बोधक प्रत्यय केले जातात असें 'कुत्सिते' ५–३–७४ या सूत्रावरील भाष्यात सांगितले आहे. (या भाष्यात पठित केलेल्या दोन कारिका पूर्वी दिल्याच आहेत व त्या कारिकांचे विवरण देखील केलेच आहे.) अशा रीतीनें शब्दाहून लिङ्गादिकांचा बोध होण्याचा जो क्रम वर सांगितला आहे त्या क्रमाला अनुसरूनच व्याकरणशास्त्रात सांगितलेली कार्यें प्रवृत्त होणें उचित असल्यामुळें, कार्यांचे क्रमिकत्व स्पष्ट होतेच, म्हणजे सङ्ख्या व कारक यांचे ज्ञान होण्यापूर्वी लिङ्गाचे ज्ञान होत असल्यामुळें लिङ्गबोधक 'ङी' व 'आप्' प्रत्यय प्रथम लावल्यानंतर सङ्ख्याकारकबोधक विभक्तिप्रत्यय लावता येतात व त्यानंतर तशा सुबन्ताहून तद्धितोत्पत्ति करता येते. जरी लोकांना वर सांगितलेल्या क्रमानें शब्दाहून लिङ्गादिकांचा क्रमिक बोध होत नसतो (व 'अजाः ग्रामं गच्छन्ति' हे वाक्य ऐकल्याबरोबर त्यांना जाति, व्यक्ति, लिङ्ग, सङ्ख्या, कारक या सर्वांचा युगपत बोध होतो ) तरी, व्याकरण-शास्त्रात सांगितलेली प्रक्रिया करतेवेळीं शास्त्रकार–सूत्रकार आचार्य पाणिनी–यांनी ती प्रक्रिया कोणत्या क्रमानें करावी हे बोधित कर-ण्याच्या हेतूनें वरील क्रम मानला आहे. अर्थवान् शब्दाला उद्देशून प्रातिपदिकसंज्ञा होण्याचे विधान केलें असल्यामुळें व प्रातिपदिकाला उद्देशून लिङ्गादिकांचा बोध होण्याकरिता, त्याहून 'ङीप्' इत्यादि प्रत्यय होण्याचे विधान केले असल्यामुळें, तसा कार्यक्रम सिद्ध होतो हे जाणावें म्हणूनच, म्हणजे असा कार्यक्रम असल्यामुळें व त्यावरून 'सुबन्तात्तद्धितोत्पत्तिः' हा सिद्धान्त ज्ञापित होत असल्यामुळेंच, 'घकालतनेषु कालनाम्नः.' सू.९७५ हे सूत्र चरितार्थ ठरतें. (काल-वाचक शब्दापुढें 'तरप्, तमप्' हे तद्धित प्रत्यय व तसेंच 'काल' किंवा 'तन' हे शब्द आल्यास, त्या कालवाचक शब्दापुढील सप्तमीच्या विभक्तिप्रत्ययाचा विकल्पेंकरून लुक् होतो असा त्या सूत्राचा अर्थ आहे. त्यावरून हे स्पष्ट होतें की, विभक्त्यन्ताहून 'तरप्, तमप्'

हे तद्धित प्रत्यय होतात आणि अशा रीतीनें त्या सूत्रावरून 'सुबन्तात्तद्धितोत्पत्तिः' हा सिद्धान्त ज्ञापित होतो.) 'अचः परस्मिन्पूर्वविधौ' सू. १–१–५७ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी व त्या भाष्याच्या वृत्तीत कैयटानें वरील क्रम स्पष्टपणें सांगितला आहे. (त्या भाष्यात भाष्यकार म्हणतात– प्रत्यक्षवर्ती लोको लक्ष्यते । तद्यथा । पुरुषोऽयं प्रातरुत्थाय यान्यस्य प्रतिशरीरं कार्याणि तानि तावत्करोति, ततः सुहृदां, ततः सम्बन्धिनाम् । प्रातिपदिकं चाप्युपदिष्टं सामान्यभूतेऽर्थे वर्तते । सामान्ये वर्तमानस्य व्यक्तिरुपजायते । व्यक्तस्य सतो लिङ्गसङ्ख्याभ्यामन्वितस्य बाह्येनार्थेन योगो भवति । यथैव चानुपूर्व्यार्थानां प्रादुर्भावस्तथैव शब्दानामपि तद्वत्कार्यैरपि भवितव्यम् ।' या भाष्याचा अर्थ हा आहे की, जो आपणास अधिक जवळचा आहे त्याचे कार्य आधी करावे अशी मनुष्यमात्राची कार्य करण्याची पद्धत आहे. उदाहरणार्थ मनुष्य हा सकाळी उठल्यावर जी त्याच्या स्वतःच्या शरीराची कार्ये आहेत ती तो प्रथम करतो, नंतर मित्राची व त्यानंतर इतर सबधिलोकाची तो कार्ये करतो. तसेच प्रातिपदिक उच्चारलें असता ते ऐकल्याबरोबर त्यापासून प्रथम सामान्य अर्थाचा बोध होतो. त्यानंतर त्या सामान्य अर्थानें युक्त असणारी अशी व्यक्ति मनात येते; त्यानंतर त्या व्यक्तीचा लिङ्ग आणि सख्या याच्याशी असलेला संबंध मनात आल्यावर त्या व्यक्तीचा बाह्य अर्थाशी संबंध होतो. ज्या क्रमानें हे अर्थ मनात येतात त्याच क्रमानें त्या त्या अर्थांचे बोधक कार्ये होणे योग्य आहे. या भाष्यावर कैयटानें पुढें लिहिल्याप्रमाणे टीका केली आहे– 'नित्येऽपि शब्दार्थसम्बन्धे अक्रमव्यक्तिप्रतिपादने उपायभावेनाश्रयणमपि क्रम प्रकल्प्यापदर्थ चाधिरोपितसम्बन्धव्यवस्थापनात् । तत्र नानुगृहीतविशेषणा विशेष्ये बुद्धिरुत्पद्यत इत्यादौ सामान्यमभिधीयते । तदनन्तरमनुरक्तद्रव्यं प्रतीति । लिङ्गसङ्ख्यासमन्वितं चाथवा द्रव्यमिति तत्पूर्वमभिधानमुच्यम् । ततः सङ्ख्यापेक्षया लिङ्गं समानमिति तदभिधीयते । व्यक्तिद्रव्याद्धि वस्त्वन्तरापेक्षोपजायते । एकत्वसङ्ख्यापि वस्त्वन्तरापेक्षद्वित्वादिव्य-

वच्छेद करोतीति वहिरङ्गा । साऽपि सजातीयपदार्थापेक्षत्वादन्तरङ्गा ! कर्मादीनि तु विजातीयक्रियापेक्षणाद्बहिरङ्गाणीति न्यायप्राप्तक्रम. ।' या वरील भाष्यात व कैयटवृत्तीत जें प्रतिपादन केले आहे त्याचाच अनुवाद शब्दरत्नातील वरील पक्तीत केला आहे ) अशा रीतीने वरील न्यायाने सिद्ध होणाऱ्या अर्थाचेच अनुवाद करणारे प्रकृत सूत्रात केलेले 'ङ्याप्' ग्रहण आहे, म्हणजे वरील भाष्यात जो कार्यक्रम सांगितला आहे त्या क्रमाने कार्य केल्यास लिङ्गबोधक प्रत्यय लावल्यानतरच विभक्तिप्रत्यय व त्यानतर तद्धितप्रत्यय लावता येत असल्यामुळें 'ङ्याप्प्रातिपदिकात्' या सूत्रात केलेले 'ङ्याप्' ग्रहण वर सांगितलेल्या क्रमाचाच अनुवाद करणारें आहे हे स्पष्ट होते (साराश प्रकृत सूत्रात 'ङ्याप्' ग्रहण केले नसते तरी, भाष्यात सांगितलेल्या क्रमान्वये स्त्रीत्वबोधक प्रत्यय प्रथम केल्यानतरच सुबुत्पत्ति होऊन नतर तद्धितोत्पत्ति करता आली असती, आणि म्हणून प्रकृत सूत्रातील ङ्याप्ग्रहण अनावश्यक ठरते. ) अत्यन्त स्वार्थिक प्रत्ययाचा जेथून अष्टाध्यायीत प्रारभ केला आहे तेथून प्रकृत सूत्रातील 'ङ्याप्' या पदाची निवृत्ति होत असल्यामुळें, म्हणजे त्या सूत्राचे ठिकाणी 'ङ्याप्' हे पद अनुवृत्त होत नसल्यामुळें, व ते अत्यन्त स्वार्थिक प्रत्यय वरील न्यायाचा विषय होत नसल्यामुळें, ('ङी' व 'आप्' हे स्त्रीत्वबोधक प्रत्यय होण्यापूर्वीच अत्यन्त स्वार्थिक तद्धित ) समासान्त प्रत्यय होण्यात काही दोष– प्रत्यवाय – येत नाही (कारण ते प्रत्यय पूर्वी सांगितल्याप्रमाणे प्रकृतीहून भिन्न अशा स्वतंत्र अर्थाचे बोधक नसून केवळ प्रकृतीचाच अर्थ सांगणारे असल्यामुळे, ते अन्तरङ्गतर अत्यन्त स्वार्थिक प्रत्यय प्रथम केल्यानतरच लिङ्गबोधक प्रत्यय करता येऊ शकतात आणि म्हणूनच ज्या सूत्रात समासान्त प्रत्यय होण्याचे विधान केले आहे त्या सूत्रात प्रकृत सूत्रातील 'ङ्याप्' या पदाची अनुवृत्ति करता येत नाही आणि ते प्रत्यय भाष्यात जो कार्यक्रम सांगितला आहे त्याचा विषय होत नाहीत, म्हणजे ते तद्धित प्रत्यय

असून देखील लिङ्गबोधक प्रत्यय लागण्यापूर्वीच होतात. येथें हें लक्षात ठेवावें की, 'ङ्याप्प्रातिपदिकात्' हें अधिकारसूत्र चतुर्थाध्यायाच्या प्रारंभी पठित असून तो अधिकार पञ्चमाध्यायाच्या अखेरपर्यंत चालू आहे. 'समासान्ताः' हें पाचव्या अध्यायाच्या चतुर्थ पादातील ६८ वें सूत्र असून हा अधिकार देखील येथून पञ्चमाध्यायाच्या अखेरपर्यंत चालू आहे.) जर 'आर्य' शब्दाचा 'कन्' व 'टाप्' प्रत्यययुक्त 'आर्यिका' असा भाषेंत कोठें प्रयोग आढळत असेल तर, 'आर्य' शब्दाहून प्रथम अत्यन्तस्वार्थिक 'कन्' प्रत्यय केला असता (नंतर 'टाप्' प्रत्यय केल्यानें) 'आर्यिका' असेंच रूप होऊं शकतें ('आर्यका' असें पाक्षिक रूप होऊंच शकत नाही; कारण 'आर्य' शब्दाहून स्त्रीत्वबोधक 'टाप्' प्रत्यय होण्यापूर्वी प्रथम अत्यन्तस्वार्थिक 'कन्' प्रत्यय करणें भाग आहे व तो प्रत्यय प्रथम केल्यानंतर 'टाप्' प्रत्यय केल्यास, ककारापुढील अकार आकाराचे जागीं झालेला नसल्यामुळें, 'उदीचामातः स्थाने' सू. ४६५ या सूत्रानें त्या अकाराचें विकल्पेंकरून इत्व होऊं शकत नाही व 'प्रत्ययस्थात्कात्पूर्वस्य' सू. ४६३ या सूत्रानें त्या अकारचें नित्य इत्व होऊन 'आर्यिका' एवढेंच रूप सिद्ध होऊं शकतें.) 'लोहिनिका' हें पाक्षिक रूप सिद्ध होण्याकरितां 'लोहितालिङ्गबाधनं वा' हें वार्तिक मानणें आवश्यक आहे असा भाष्याचा भावार्थ आहे. प्रकृत सूत्रावरील भाष्याच्या अखेरीस हें स्पष्टपणें सांगितलें आहे व या विषयाचें इतर ग्रन्थांत विस्तृत विवेचन केलें आहे. (प्रकृत सूत्रावरील भाष्यांत 'तद्धितविधानार्थं तु ङ्याब्ग्रहणं कर्तव्यम्, ङ्याबन्तात्तद्धितोत्पत्तिर्यथा स्यात्' असें सांगून भाष्यकार पुढें म्हणतात की, तसें मानल्यास, 'समासान्तेषु दोषो भवति'. यावर स्त्रीप्रत्यय देखील स्वार्थिक प्रत्यय आहेत अशी शंका केली असता, भाष्यकार अखेरीस म्हणतात– 'समासान्ता अपि स्वार्थिकाः। उभयोः स्वार्थिकयोः परत्वात्समासान्ता भविष्यन्ति·· कथं लोहिनिकेति वक्ष्यत्येतत् लोहितालिङ्गबाधनं वेति ।' या भाष्याचें व्याख्यान

करिताना कैयटानें 'लोहिनिकेति' हे प्रतीक घेऊन असे म्हटले आहे की, 'न हि लोहिनशब्द प्रातिपदिकमस्तीति प्रश्न ' व पुढें 'वक्ष्यत्येतदिति' हे प्रतीक घेऊन 'अवश्यवक्तव्यता दर्शयति। क्रियमाणेऽपिङ्याब्ग्रहणे लोहितान्मणौ, वर्णे चानित्ये, रक्ते इति प्रतिपदविधानाद्बलीयस्त्वात् स्त्रीप्रत्यय बाधित्वा कन्नेव स्यात्' असे म्हटले आहे या कैयटवृत्तीतील प्रतिपदविधानात्' यावर टीका करिताना उद्योतकारानी 'अनवकाशत्वे सत्येव तस्य बाधकत्व-प्रयोजकत्वात् चिन्त्यमिदम् । परत्वादिति वक्तुमुचितम्' असे म्हटले आहे साराश प्रतिपदविधानामुळें म्हणा किंवा परत्वामुळें म्हणा, 'लोहित' या शब्दाहून प्रथम स्वार्थिक 'कन्' प्रत्यय केला असता 'लोहितक' असे जे अदन्त रूप सिद्ध होते ते तकारोपध नसून ककारोपध असल्यामुळें, 'वर्णादनुदात्तात्' सू ४९६ हे सूत्र प्रवृत्त होऊ शकत नाही व 'अजाद्यतष्टाप्' सू ४५४ या सूत्रानें 'टाप्' प्रत्यय केल्यावर 'प्रत्ययस्थात्कात्पूर्वस्य' या सूत्रानें ककारापूर्वी असलेल्या अकाराचे इत्व होऊन 'लोहितिका एवढेंच रूप सिद्ध होऊ शकते म्हणून 'लोहिनिका' हे पाक्षिक इष्ट रूप सिद्ध होण्याकरिता 'लोहितात्लिङ्गबाधन वा' हे वार्तिक मानणे आवश्यक आहे त्या वार्तिकान्वये अनुदात्त तकारोपध वर्णवाचक 'लोहित' या शब्दाहून प्रथम 'वर्णादनुदात्तात' सू ४९६ या सूत्रानें 'ङीप्' हा स्त्रीप्रत्यय व त्यावरोबरच तकाराचा नकार करून 'लोहिनी' हे रूप सिद्ध झाल्यावर त्याहून नतर स्वार्थ 'कन्' प्रत्यय केला असता, 'केऽण' सू ८३४ या सूत्रानें 'लोहिनी'

सर्वधानें प्रकृत सूत्रावरील शब्देन्दुशेखरात 'एवं च स्त्रीप्रत्ययेषु, अत्यन्तस्वार्थिकानारभ्य तद्धितेषु च ङ्याब्ग्रहणासम्बन्धो, व्याख्यानात्। अत एव लोहिनिकेत्येतत्सिद्धये लोहितात्लिङ्गबाधनं वेति चरितार्थम्। अत्यन्तस्वार्थिकाना सुबुत्पत्तेः पूर्वमुत्पत्तिरिति सर्वस्य द्वे इति सूत्रे भाष्ये स्पष्टम्, कैयटे च' असे म्हटले आहे.)

मनोरमा—सुङस्योरिति। सोरुकारो "अर्वणस्त्रसौ" इत्यत्र विशेषणार्थः। असोत्युक्ते ह्यसकारादावित्यर्थः स्यात्। तथा च "वाजमर्वत्सु पय उस्त्रियासु" इति न सिध्येत्। ङसेरिकारो "युष्मदस्मद्भ्यां ङसोऽश्" इत्यत्र अस्य ग्रहणं मा भूदिति। यदि तु "एकवचनस्य च" इत्यत्र "पञ्चम्या" इत्यनुवृत्तेः परिशेषादन्यस्य ङसोऽत्र ग्रहणं भविष्यतीत्युच्यते, तर्हि "टाङसिङसाम्" इत्येतदर्थः। जश्शसोर्जकारशकारौ "जसः शी" "तस्माच्छसो नः" इत्यनयोर्विषयविभागार्थौ। अन्यतरस्य निरनुबन्धकत्वमेवास्तु इति चेन्न, जसो जकाराभावे औ इत्यस्याप् स्यात्। ततश्च प्रत्ययस्य वकारान्ततापि सम्भाव्येत। एवं शसः शकाराभावे औटो ङित्वं सम्भाव्येत। असोऽसन्देहार्थं तत्करणौचित्यात्। औटष्टकारः सुडिति प्रत्याहारार्थः। टाटकारस्तु "टाङसि–" इति विशेषणार्थः। ङेप्रभृतीना ङकारो "घेर्ङिति" इति विशेषणार्थः। पकारस्तु प्रत्याहारार्थः। एवं च सर्वेषा सफलत्वेऽपि सञ्ज्ञार्था इति प्राचो ग्रन्थाऽसङ्गत एव। सम्यग् ज्ञानं सञ्ज्ञा तदर्थाः विशेषणार्था इति यावत्। इति भङ्क्त्वा व्याख्यानेऽपि क्लिष्टत्वमेवेत्युपेक्षितम्।

('स्वौजस्' सू. १८३ या सूत्रावरील कौमुदींत 'सुङस्योरुकारेकारौ जशटङपाश्चेतः' असे जें दीक्षितानीं म्हटले आहे त्याचे ते येथें विवरण करितात) प्रथमेच्या एकवचनाच्या 'सु' प्रत्ययात जो उकार घातला आहे तो 'अर्वणस्त्रसौ' सू. ३६४ या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'असौ' यातील 'सु' चं विशेषण व्हावा, म्हणजे त्या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'सु' नें प्रथमेच्या एकवचनाच्या 'सु = स्' या प्रत्ययाचें ग्रहण व्हावें, यासरिता घातला आहे.

त्या सूत्रात ('असौ' असे न म्हणता) 'असि' असे म्हटलें असते तर, म्हणजे 'सु' या अनल्चे ग्रहण न करिता 'स्' या अल्चे ग्रहण केलें असते तर, ('यस्मिन्विधिस्तदादावल्ग्रहणे'-परि ३३–या परिभाषान्वयें) 'असि' या पदाचा 'असकारादौ प्रत्यये परे सति' असा अर्थ झाला असता व त्यामुळें 'वाजमर्वत्सु पय उस्रियासु' या श्रुतीतील 'अर्वत्सु' हें रूप सिद्ध होऊं शकलें नसते (प्रथमेच्या एकवचनाचा 'सु' प्रत्यय पुढें नसल्यास 'अर्वन्' यातील अन्त्य नकाराचे जागी तकार होणें हें 'अर्वणस्तृ' या वरील सूत्रात सागितलें आहे प्रथमेच्या एकवचनाच्या 'स्' या प्रत्ययाला उकारानुबन्ध न लावता 'सौजस्' असा प्रकृत सूत्राचा पाठ केला असता तर, 'अर्वणस्त्रसि' असे वरील सूत्र पठित करावें लागलें असत व त्या सूत्रातील 'असि' या पदाचा 'यस्मिन्विधि' या परिभाषान्वयें असा अर्थ झाला असता की, 'अर्वन्' शब्दापुढें सकारानें सुरु होणारा प्रत्यय न आल्यास, 'अर्वन्' यातील नकाराचे जागी तकार होतो आणि तसा अर्थ झाल्यानें 'अर्वन्+सुप्' या स्थलीं 'अर्वन्' शब्दापुढें सकारानें सुरु होणारा सप्तमीच्या बहुवचनाचा 'सुप्' हा प्रत्यय असल्यामुळें, नकाराचे जागी तकार न होण्याची आपत्ति आली असती व 'अर्वत्सु' असे श्रुतीत पठित असलेलें इष्ट रूप सिद्ध होऊं शकलें नसत ही आपत्ति टाळण्याकरिता प्रकृत सूत्रात प्रथमेच्या एकवचनाचा प्रत्यय 'स्' असा न उच्चारता 'सु' असा उकारानुबन्धसहित उच्चारला आहे) 'ङसि' या पञ्चमीच्या एकवचनाच्या प्रत्ययात जो इकार घातला आहे तो अशाकरिता की, 'युष्मदस्मद्भ्या ङसोऽश्' सू ३९९ या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'ङस्' या शब्दानें 'ङसि' चे ग्रहण न व्हावें. (साराश पञ्चमीच्या व षष्ठीच्या एकवचनाचे प्रत्यय 'ङसि' व 'ङस्' असे अनुक्रमें भिन्न रूपानें पठित न करिता ते दोन्ही प्रत्यय 'ङस्' या एकाच तन्त्रानें पठित केले असते तर, पाणिनीय सूत्रातील 'ङस्' या शब्दाच्या ग्रहणानें त्या दोन्ही प्रत्ययांचे ग्रहण झालें

असते व 'ङसि, ङस्' हे प्रत्यय पुढें असतांना जी भिन्न कार्ये होणे सांगितली आहेत व त्या प्रत्ययाचे जागी कित्येक ठिकाणी जे भिन्न आदेश होणे सांगितले आहेत ते करता येऊं शकले नसते.) 'पञ्चम्या अत्' सू. ३९७ या पूर्व सूत्रातून 'पञ्चम्याः' या पदाची 'एकवचनस्य च' सू ३९६ या उत्तर सूत्रात अनुवृत्ति होत असल्यामुळें, 'युष्मदस्मद्भ्या ङसोऽश्' सू. ३९९ या सूत्राने 'ङस्' चे जागी होणारा 'अश्' हा आदेश अवशिष्ट राहिलेल्या षष्ठीच्या एकवचनाच्या 'ङस्' प्रत्ययाचे जागीच (दोन्ही प्रत्यय 'ङस्' असेच पठित केले असते तरी) होऊ शकला असता असें कोणी म्हटल्यास, 'टाङसिङसामिनात्स्याः' सू. २०१ या सूत्राकरिता पञ्चमीच्या एकवचनाचा प्रत्यय 'ङसि' असा उच्चारला आहे, म्हणजे त्या सूत्रानें 'ङसि' व 'ङस्' याचे जागी जे भिन्न भिन्न आदेश होणे सांगितले आहेत ते करता यावे याकरिता दोन्ही प्रत्यय 'ङस्' अशा एकाच रूपानें पठिन न करिता भिन्न रूपानें पठित केले आहेत, असें समजावे. 'जस्' या प्रथमेच्या बहुवचनाच्या प्रत्ययास व 'शस्' या द्वितीयेच्या बहुवचनाच्या प्रत्ययास जे अनुक्रमें जकार व शकार हे अनुबन्ध लावले आहेत ते अशाकरिता की, 'जसः शी' सू. २१४ व 'तस्माच्छसो नः पुंसि' सू १९६ या दोन सूत्रात सांगितलेल्या विषयाचा विभाग करता यावा, म्हणजे या दोन सूत्रानी 'जस्' व 'शस्' याचे जागी जे भिन्न आदेश होणे सांगितले आहेत ते करता यावे. (ते दोन्ही प्रत्यय जर एकाच रीतीनें पठित केले असते तर तसें करता येऊ शकले नसते.) या वरील दोन प्रत्ययापैकी एक प्रत्यय अनुबन्धरहित पठित केला असता तर चालू शकले असते (व 'निरनुबन्धकग्रहणे न सानुबन्धकस्य'—परि. ८२—ही परिभाषा असल्यामुळें, निरनुबन्धक प्रत्ययानें सानुबन्धक प्रत्ययाचे ग्रहण झालेच नसते) असें कोणी म्हटल्यास, ते म्हणणे बरोबर नाही; कारण (या दोन प्रत्ययापैकी प्रथमेच्या बहुवचनाचा 'जस्' हा प्रत्यय

सानुबन्धक पठित न करिता 'अस्' असा अनुबन्धरहित पठित केला असता तर) जकाराचे अभावी ('सु औ जस्' या ऐवजी 'सु औ अस्' अशी स्थिति झाली असता) 'औ' चे जागी ('एचोऽयवायावः' सू. ६१ या सूत्रानें) 'आव्' असा आदेश झाला असता व त्यामुळें प्रथमेच्या द्विवचनाचा प्रत्यय वकारान्त 'आव्' आहे असा देखील संदेह उत्पन्न होण्याचा प्रसंग आला असता. त्याचप्रमाणे (द्वितीयेच्या बहुवचनाचा प्रत्यय 'शस्' असा सानुबन्धक पठित न करिता 'अस्' असा निरनुबन्धक पठित केला असता तर) शकाराच्या अभावामुळें द्वितीयेच्या द्विवचनाचा 'औट्' हा प्रत्यय डित् आहे असा संदेह उत्पन्न होण्याची आपत्ति आली असती, (कारण 'औट् + अस्' अशा स्थितीत 'झलां जशोऽन्ते' सू. ८४ या सूत्रानें 'औट्' यातील टकाराचे जागी डकार होऊन 'औडस्' असे सन्धियुक्त रूप झालें असते व त्यामुळें 'औड्' असा द्वितीयेच्या द्विवचनाचा डित् प्रत्यय आहे की काय असा संदेह उत्पन्न झाला असता व तो प्रत्यय डित् मानल्यानें 'अभस्यापि टेर्लोपो डिति' या वचनान्वयें त्याच्या प्रकृतीच्या 'टि' चा लोप होण्याची आपत्ति आली असती.) म्हणून वर दर्शविलेले दोन्ही प्रकारचे संदेह उत्पन्न न व्हावे याकरिता 'जस्' व 'शस्' हे जे दोन्ही प्रत्यय भिन्न अनुबन्ध लावून सानुबन्धक पठित केले आहेत तसेंच करणें उचित ठरतें. द्वितीयेच्या द्विवचनाच्या प्रत्ययाला टकार हा जो अनुबन्ध लावला आहे तो अशाकरितां की, 'सुट्' हा प्रत्याहार साधता यावा. (प्रथमेच्या एकवचनाचा 'सु' हा जो प्रत्यय प्रकृत सूत्राच्या आरंभीं पठित आहे त्याला 'औट्' यातील टकार हा इत्संज्ञक वर्ण जोडला असता 'सुट्' असा जो प्रत्याहार सिद्ध होतो त्यानें 'आदिरन्त्येन सहेता' सू. २ या सूत्रान्वयें पहिल्या पांच प्रत्ययांचे, म्हणजे सर्वनामस्थान प्रत्ययांचे, ग्रहण होतें व 'सुडनपुंसकस्य' सू. २२९ या सूत्रांत पाणिनीनें त्या प्रत्याहाराचा उपयोग केला आहे.) तृतीयेच्या एकवचनाच्या प्रत्ययाला टकारानुबन्ध जोडून तो प्रत्यय 'टा' असा जो पठित केला

आहे त्याचे प्रयोजन हे आहे की, 'टाङसिङसाम्' सू २०१ या सूत्रातील 'टा'ने त्याच ग्रहण व्हावे 'ङे' इत्यादि चार प्रत्ययाना, म्हणजे 'ङे, ङसि, ङस्, ङि' या चार प्रत्ययाना ङकारानुबन्ध जोडून त प्रत्यय जे ङित् पठित केले आहत त्याच प्रयोजन ह आह की, 'घेर्ङिति' सू २४५ या सूत्रातील ङिति' या पदानें त्या चारहि प्रत्ययाच ग्रहण व्हाव 'सुप्' या स्थली सप्तमीच्या बहुवचनाच्या 'सु' प्रत्ययाला पकार हा जो अनुबन्ध लावला आह त्याचे (प्रयोजन ह नाही की, पित्त्वामुळें तो अनुदात्तौ सुप्पितौ सू ३७०९ या सूत्रानें अनुदात्त व्हावा, कारण तो सुप्त्वामुळें त्या सूत्रानें अनुदात्त आहेच पककारानुबन्धाचे वास्तविक ) प्रयोजन ह आह की, ( प्रातिपदिकाहून होणाऱ्या सर्व विभक्तिप्रत्ययाचा ) 'सुप्' असा प्रत्याहार ('आदिरन्त्येन सहेता या सूत्राच्या सहायानें) साधता यावा (व या प्रत्याहाराचा उपयोग पाणिनीनें सुप ' सू १८५, 'सुपि च' सू १०२ 'ओ सुपि' सू २८१ इत्यादि अनक सूत्रात केला आह ) अशा रीतीनें प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेल्या विभक्ति-प्रत्ययाना लावलेले सर्व अनुबन्ध सफल–सहेतुक किंवा सप्रयोजनक ठरत असून देखील त अनुबन्ध सज्ञार्थ आहत, म्हणजे त्याना इत्सज्ञा व्हावी याकरिता ते लावल आहत, अस जें प्रक्रियाकौमुदीकारानी म्हटले आहे त म्हणणें असङ्गत–चूक–ठरत, व प्रक्रियाकौमुदीकारानी 'सज्ञाया ' हा जा शब्द वापरला आह त्याच 'सम्यग्ज्ञान सज्ञा तदर्था विशेषणार्था इति यावत्' अस जें त्या शब्दाचे तुकडे पाडून ( प्रकाशकारानी ) जरी व्याख्यान केल आहे तरी त व्याख्यान क्लिष्ट असल्यामुळें, म्हणज 'सज्ञाया ' या शब्दातून तसा अर्थ सहज रीतीनें निघू शकत नसल्यामुळें, त्या व्याख्यानाची उपेक्षा केली आहे (प्रकृत सूत्रावरील प्रक्रियाकौमुदीत 'सुङस्योरुकारेकारौ ञकाराटपार्श्वेतसज्ञाया ' अस म्हटल आह व दीक्षितानीं देखील प्रकृत सूत्रावरील कौमुदीत अशाच तऱ्हेची पक्ति लिहिली आह फरक एवढाच की, दीक्षितानी इत्सज्ञार्था ' या

ऐवजी 'इत.' हा शब्द वापरला आहे 'इत्संज्ञा अर्थः प्रयोजन येषा ते' असा 'इत्संज्ञार्था' या पदाचा विग्रह आहे व त्याचा अर्थ हा आहे की, अनुबन्धाना इत्संज्ञा व्हावी याकरिता ते वरील प्रत्ययाना लावले आहेत या शब्दावर दीक्षिताचा कटाक्ष आहे त्याच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, अनुबन्ध इत्संज्ञक ठरतातच व त्याना इत्संज्ञा व्हावी हे वास्तविक त्याचे प्रयोजन नसून मनोरमेंत जी प्रयोजनें सांगितली आहेत ती ते अनुबन्ध लावण्याची प्रयोजनें आहेत, आणि दीक्षितानी जी प्रयोजनें मनोरमेंत दिली आहेत तशीच प्रयोजनें प्रसादकारानी देखील प्रक्रियाकौमुदीवरील टीकेंत सांगितली आहेत प्रकाशकारानी 'संज्ञार्था' या पदाचा 'सम्यग् ज्ञान प्रयोजन येषाम्' असा क्लिष्ट विग्रह करून प्रक्रियाकौमुदी-काराच्या व्याख्यानाचे कसे तरी समर्थन केले आहे. पण दीक्षित म्हणतात कीं, प्रकाशकारानी केलेली ही क्लिष्ट टीका उपेक्षार्ह आहे.)

शब्दरत्न-पञ्चम्याइत्यनुवृत्तेरिति । तृतीयाव्यावृत्तये इति भावः । टाङसीति । तत्रेकारानुच्चारणे इष्टस्य यथासङ्ख्यस्याना-पत्तिरिति भावः । ङित्त्वमिति । ततश्च टिलोपः स्यादिति भावः । विशेषणार्थं इति । तत्फलन्तु "सुपो सुलुक्" इति सूत्रेणाकारादेशे इनादेशाभावः । घेर्ङितीति । न च घेः सुपि गुण इत्येवास्तु "जसि च" इति नियमात् नाङिति प्रवृत्तिरिति वाच्यम्, पतय इत्यर्थं "जसि च" इत्यस्यावश्यकत्वात् ॥

'एकवचनस्य च इत्यत्र पञ्चम्या इत्यनुवृत्तेः' असे जें मनो-रमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे की, ('एकवचनस्य च' सू ३९६ या सूत्रात 'पञ्चम्या अत्' या पूर्व सूत्रातून 'पञ्चम्या' या पदाची जी अनुवृत्ति केली आहे तिचे प्रयोजन हें आहे की, त्या योगानें) तृतीयेची व्यावृत्ति व्हावी. 'टाङसिङसाम्' सू २०१ या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'इति' या प्रत्ययात इकार उच्चारला नसता तर इष्ट यथासङ्-

स्थन्याय लागू न पडण्याची आपत्ति आली असती. ('ङसि' व 'ङस्' हे दोन्ही प्रत्यय 'ङस्' असेच उच्चारले असते तर 'ङस्'नें पञ्चमीच्या व षष्ठीच्या एकवचनाच्या प्रत्ययाचे ग्रहण झाले असते व त्यामुळें 'टाङसोरिनात्स्याः' असे सूत्र करावे लागले असते आणि तस सूत्र केले असते तर उद्देश्याची संख्या दोन व विधेयाची संख्या तीन झाली असती व त्यामुळें 'यथासङ्ख्यमनुदेशः समानाम्' सू. १२८ हें सूत्र प्रवृत्त करता आले नसते आणि 'ङसि'चे जागी 'आत्' असा आदेश करता आला नसता. त्याचप्रमाणें 'ङसिङ्यो: स्मात्स्मिनौ' सू. २१६ या सूत्रांत देखील 'ङसि' चे जागी 'ङस्' असे उच्चारण करावे लागले असते व त्या 'ङस्'नें षष्ठीच्या एकवचनाच्या प्रत्ययाचे देखील ग्रहण झाले असते व त्याचेहि जागी 'स्मात्' हा आदेश होण्याची आपत्ति आली असती.) 'औटो ङित्व सम्भाव्येत' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, 'औट्' प्रत्यय ङित् मानल्यास, (तो प्रत्यय पुढें आला असता, 'अभस्यापि टेर्लोपो ङिति' या वचनान्वयें अङ्गाच्या) 'टि' चा लोप होण्याची आपत्ति येईल. (त्यामुळें 'शरद्+औ' या स्थलीं 'शरदौ' असे द्वितीयेच्या द्विवचनाचे इष्ट रूप न होता, 'अद्' या 'टि' चा लोप होऊन 'शरौ' असे अनिष्ट रूप होईल.) 'टाटकारस्तु टाङसि इति विशेषणार्थः' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचे फल हें आहे की, 'सुपां सुलुक्' सू. ३५६१ या सूत्रानें (वैदिक प्रयोगात विभक्तिप्रत्ययाचे जागी) जो 'आ' असा आदेश होतो त्याचे जागी ('टाङसि' या सूत्रानें होणारा) 'इन' आदेश होत नाही. (वेदात 'सुप्' विभक्तिप्रत्ययाचे जागी केव्हा केव्हा 'आ' असा आदेश केला जातो. उदाहरणार्थ श्रुतीत 'उभौ यन्तारौ' असे न म्हणता 'उभा यन्तारौ' असे म्हटले आहे. तसेच 'सुरथौ रथीतमौ' असे न म्हणता श्रुतीत 'सुरथा रथीतमा' असा प्रयोग केला आहे. जर तृतीयेच्या एकवचनाचा प्रत्यय 'टा' असा पठित न करिता 'आ' असा पठित केला असता तर, 'सुपां सुलुक्' या

सूत्रानें होणाऱ्या 'आ'चे जागी देखील 'इन' आदेश होण्याची आपत्ति आली असती ) 'घेर्ङिति' सू. २४५ या सूत्राऐवजी 'घे. (सुपि गुण )' असे सूत्र पठित करावे व 'जसि च' सू. ५४१ हे सूत्र नियमार्थ मानल्यानें 'घेः' हे सूत्र ङिद्भिन्न प्रत्यय पुढें आला असता प्रवृत्त होऊ शकणार नाही असे कोणी म्हटल्यास, ते म्हणणें बरोबर नाही, कारण 'पतय' हे रूप सिद्ध होण्याकरिता 'जसि च' हे सूत्र (नियामक न मानता विधायक मानणे) आवश्यक आहे (शकाकाराची शका अशी आहे की, 'घेर्ङिति' असे सूत्र न करिता 'घ' एवढेंच जरी सूत्र केले तरी, त्या सूत्रात 'सुपि च' या पूर्व सूत्रातून 'सुपि' या पदाची व तसेच 'ह्रस्वस्य गुण' या पूर्व सूत्रातून 'गुणः' या पदाची अनुवृत्ति होत असल्यामुळें 'घे सुपि गुणः' या अर्थाचें वाचक 'घे' हें सूत्र होईल आणि 'जसि च' हे सूत्र नियमार्थक मानले व 'ङिद्भिन्ने प्रत्यये परे गुणश्चेत् जसि एव' असे नियमाचे स्वरूप न मानता, टीकाकारानी सांगितल्याप्रमाणें, 'अनुनासिकवर्णाघटितगुणावेकवचनेतरस्मिन् सुपि गुणश्चेद जसि एव,' म्हणजे ज्या प्रत्ययामध्यें अनुनासिकवर्ण नाही व जो 'अ,ए' किंवा 'ओ' या गुणसज्ञक वर्णानें सुरू होणारा 'सुप्' प्रत्यय असून एकवचनाचा प्रत्यय आहे तसा प्रत्यय खेरीज करून इतर विभक्ति-प्रत्यय घिसज्ञक अङ्गापुढें आल्यास त्या अङ्गाच्या अन्त्य वर्णाला जर गुण होणे असेल तर तो गुण 'जस्' प्रत्यय पुढें असतानाच व्हावा, असे नियमाचे स्वरूप मानले तर, एकवचनाचे 'ङे, ङसि, ङस्, ङि' हे जे चार प्रत्यय ङित् केले आहेत ते ङित् करण्याची काही गरज राहत नाही व या चार ङित् पठित केलेल्या प्रत्ययापैकी 'ङे, ङसि, ङस् = ए, अस्, अस्' हे तीन एकवचनाचे प्रत्यय 'ए' व 'अ' या गुणसज्ञक वर्णांनी सुरू होणारे असून त्यात अनुनासिक वर्ण नसल्यामुळें, ते प्रत्यय घिसज्ञक अङ्गापुढें आले असता, गुण होऊन इष्ट रूपें सिद्ध होतीलच. हे खरे की, वरील

नियम मानल्यानें सप्तमीच्या एकवचनाचा 'ङि=इ' हा प्रत्यय गुणसंज्ञक वर्णानें सुरू होणारा नसल्यामुळें, तो प्रत्यय घिसंज्ञक अङ्गापुढें आला असता, अङ्गाच्या अन्त्य वर्णाला गुण होणार नाही. पण ती इष्टापत्तीच आहे, कारण 'अच्च घेः' सू २४७ हे गुणाचे बाधक सूत्र असल्यामुळें सप्तमीच्या एकवचनाचा प्रत्यय घिसंज्ञक अङ्गापुढें आला असता, त्या अङ्गाच्या अन्त्य वर्णाला गुण न होता इष्ट रूप सिद्ध होते. उदाहरणार्थ 'हरि + ङि' या स्थळी 'हरि' या घिसंज्ञक अङ्गातील अन्त्य वर्णाचे जागी 'अच्च घेः' या सूत्रानें अकार व ङिप्रत्ययाचे जागी 'औ' असा आदेश केल्यानें 'हर+औ' अशी स्थिति होऊन 'वृद्धिरेचि' सू. ७२ या सूत्रानें वृद्धिरूप एकादेश केला असता, 'हरौ' असे इष्ट रूप सिद्ध होण्यात काही अडचण येत नाही वरील नियमात 'अनुनासिकवर्णाघटित' हे पद घातले असल्यामुळें, 'अम्' हा द्वितीयेच्या एकवचनाचा प्रत्यय जरी 'अ' या गुणसंज्ञक वर्णानें सुरू होणारा प्रत्यय आहे तरी तो प्रत्यय 'म्' या अनुनासिक वर्णानें युक्त असल्यामुळें, वरील नियमान्वयें त्याची व्यावृत्ति होते. तसेच वरील नियमात 'एकवचन' हा शब्द घातला असल्यामुळें, द्वितीयेच्या बहुवचनाचा 'शस् = अस्' प्रत्यय व त्याचप्रमाणे षष्ठी व सप्तमी यांच्या द्विवचनाचें 'ओस्' हे प्रत्यय जरी गुणसंज्ञक वर्णानें सुरू होणारे प्रत्यय आहेत तरी त्याची व्यावृत्ति होते. तसेच वरील नियमात 'गुणादि' हा शब्द घातला असल्यामुळें, जे 'टा' इत्यादि अजादि प्रत्यय गुणसंज्ञक वर्णानें सुरु होत नाहीत किंवा जे हलादि प्रत्यय आहेत त्याचीहि व्यावृत्ति होते. साराश वरील नियम मानल्यास कोणताहि 'सुप्' प्रत्यय ङित् करण्याची आवश्यकता राहत नाही असे शंकाकाराचे म्हणणे आहे. ही शंका करिताना शंकाकार असे गृहीत धरून चालतो की, 'जसि च' हे गुणविधायक सूत्र घिसंज्ञक प्रकृतीलाच लागू पडणारे सूत्र आहे. या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, 'जसि च' हे सूत्र घिसंज्ञक प्रकृतीलाच लागू पडणारे सूत्र नसून,

ज्या ऱ्हस्वान्त प्रकृति घिसंज्ञक नाहीत त्याना देखील लागू पडणारे ते सूत्र आहे उदाहरणार्थ 'पतिः समासे एव' सू. २५७ या सूत्रान्वयें 'पति' हा शब्द समासाच्या अन्ती असला तरच त्याला घिसंज्ञा होते व केवळ 'पति' शब्दाला घिसंज्ञा होत नाही. त्यामुळें 'घेः' असे 'घेर्ङिति' या सूत्राऐवजी सूत्र केले व 'जसि च' हे त्याचे नियामक सूत्र मानले तर, 'पति + जस्' या स्थली 'पति' हा शब्द घिसंज्ञक नसल्यामुळें, त्यातील अन्त्य इकाराला गुण होणार नाही आणि 'पतय' असे इष्ट रूप सिद्ध होऊ शकणार नाही म्हणून ते रूप सिद्ध होण्याकरिता 'जसि च' हे स्वतंत्र विधायक सूत्र मानणे आवश्यक आहे; आणि ते सूत्र नियामक न मानता विधायक मानले असता, शंकाकारानें त्या सूत्रातून जो नियम काढला आहे तो निघू च शकत नाही सारांश पाणिनीनें चार प्रत्ययाना जे ङित् केले आहे ते अगदी योग्य आहे व ते ङित् केले असल्यामुळें, 'घेर्ङिति' या सूत्रातील 'ङिति' या पदानें त्याचे ग्रहण होऊन इष्ट रूपें सिद्ध होतात आणि शंकाकारानें केलेली शंका अयोग्य ठरते.)

मनोरमा–'सुपः' ॥ तिङस्त्रीणि त्रीणि" इति सूत्रात् त्रीणि त्रीणि इति पदं "ताम्येकवचन–" इत्यादि सूत्रं च सम्पूर्णमनुवर्तत इति व्याचष्टे । सुपस्त्रीणि त्रीणीत्यादिना । एकश इति । एकैकमित्यर्थः । "संख्यैकवचनाच्च" इति वीप्सायां प्रथमान्तात् शस् । यत्तु प्राचा एकैकश इत्युक्तम्, तदयुक्तम्, शसैव वीप्साया उक्तत्वेन द्विर्वचनायोगात्, येन नाप्राप्तिन्यायेन द्विर्वचनापवादः शस् इति सिद्धान्तात् ।

यत्त्वाहुः "सर्वस्य द्वे" इत्यत्र एकैकशो ददातीति भाष्यप्रयोगात् "ताम्येक" इति सूत्रे एकश इति सूत्रकारनिर्देशाच्चोभयं साध्विति, तन्न, उदाहृतभाष्यस्यान्यविषयत्वात् । "यत्र तद्धितेनानुक्ता वीप्सा भवति तत्र द्विर्वचनं" इत्युपक्रम्य हि "तद्यथा एकैकशो ददाति" इति भाष्ये उदाहृतम् । व्याख्यातं च कैयटेन अल्पार्थोऽप्येकशब्दोऽस्ति तस्य वीप्सायां द्विर्वचने "बह्वल्पार्थात्–" इति शस्प्रत्यय इति । न चैषोऽर्थः प्रकृते सम्भवतीत्यास्तां तावत् ।

'सुप' सू १८५ या सूत्रात 'तिङस्त्रीणि त्रीणि' सू २१६० या पूर्व सूत्रातून 'त्रीणि त्रीणि' या पदाची अनुवृत्ति होते आणि त्याचप्रमाणें 'तान्येकवचनद्विवचनबहुवचनान्येकश' सू २१६१ या संपूर्ण पूर्व सूत्राची अनुवृत्ति होते त्यामुळें कौमुदीत 'सुप' या प्रकृत सूत्राचें 'सुपस्त्रीणि त्रीणि वचनान्येकश एकवचनद्विवचनबहुवचनसंज्ञानि स्यु' असे व्याख्यान केलें आहे ( तान्येकवचन' सू २१६१ या सूत्रातील) 'एकश' या पदाचा 'एकैकम्' असा अर्थ आहे 'एकश' या स्थली 'सङ्ख्यैकवचनाच्च वीप्सायाम्' सू २११० या सूत्रानें 'वीप्सा' या अर्थामध्यें 'एक' या शब्दाच्या प्रथमहून तद्धित शस्‌प्रत्यय झाला आहे. ('एक सु शस्' हा समुदाय तद्धितान्त असल्यामुळें, 'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रानें त्याला प्रातिपदिकसंज्ञा होऊन व 'सुपो धातुप्रातिपदिकयो' सू ६५० या सूत्रानें 'सु' या अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाचा लुक् होऊन 'एकश' हें रूप सिद्ध झालें आहे व 'तद्धितश्चासर्वविभक्ति' सू ४४८ या सूत्रात 'शस्प्रभृतय प्राक् समासान्तेभ्य' असे जें परिगणन केलें आहे त्या परिगणनान्वयें 'एकश' हा शस्प्रत्ययान्त शब्द अव्ययसंज्ञक ठरतो ) प्रक्रियाकौमुदिकारानी ('सुप' या प्रकृत सूत्राचें 'सुपस्त्रीणि त्रीणि पदान्येकैकश एकवचनद्विवचनबहुवचनसंज्ञानि स्यु.' असे व्याख्यान करितांना) 'एकैकश' या पदाचा जो प्रयोग केला आहे तो चूक आहे, कारण 'शस्' या प्रत्ययानेंच 'वीप्सा' या अर्थाचा बोध होत असल्यामुळें (पुन्हा तोच अर्थ सांगण्याकरिता 'नित्यवीप्सयो' सू. २१४० या सूत्रानें 'एक' या शब्दाचें) द्विर्वचन करता येऊं शकत नाहीं 'येन नाप्राप्ते'-परि. ५८-या परिभाषान्वयें वीप्सार्थक 'शस्'प्रत्यय द्विर्वचनाचा अपवाद-बाधक-ठरतो असा सिद्धान्त मानला आहे ( नित्यवीप्सयो' या सूत्रानें जर वीप्सा गम्यमान असता सर्वत्र द्विर्वचन केलें तर, 'सङ्ख्यैकवचनाच्च वीप्सायाम्' सू २११० हें सूत्र प्रवृत्त होण्यास कोणतेंहि स्थल मिळणार नाहीं व अशा रीतीनें तें सूत्र अनवकाश ठरण्याची

आपत्ति येत असल्यामुळें, ते सूत्र अनवकाशत्वामुळेंच, 'येन नाप्राप्ते' या न्यायान्वयें 'नित्यवीप्सयोः' या सूत्राचे बाधक ठरते. त्यामुळें 'सङ्ख्यैकवचनाच्च' या सूत्रानें 'एक' या सङ्ख्यावाचक शब्दाहून वीप्सार्थक 'शस्' प्रत्यय केला असता, पुन्हा तोच वीप्सारूप अर्थ सांगण्याकरिता 'एक' या शब्दाचे द्विर्वचन करता येत नाही; कारण 'उक्तार्थानामप्रयोगः' हा न्याय प्रसिद्ध आहे. म्हणून द्विर्वचन करता येते किंवा द्विर्वचन न केल्यास 'शस्' प्रत्यय करता येतो शस् प्रत्यय व द्विर्वचन हे दोन्ही एकेचवेळी करता येत नाहीत त्यामुळें 'एकैकश' हे रूप सिद्ध होऊ शकत नाही व 'एकश' किंवा 'एकैकम्' असेच रूप सिद्ध होऊ शकते असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे 'एकैकम्' हे रूप 'एक बहुव्रीहिवत्' सू. २१८४ या सूत्रानें सिद्ध होते ) प्रकाशकाराचे असे म्हणणे आहे की, 'सर्वस्य द्वे' सू ८-१-१ या सूत्रावरील भाष्यात 'एकैकशो ददाति' असा भाष्यकारांनी प्रयोग केला असल्यामुळें व 'तान्येकवचन' सू २१६१ या सूत्रात पाणिनीनें 'एकशः' असा निर्देश केला असल्यामुळें, 'एकैकशः' व 'एकशः' ही दोन्ही रूपें साधु ठरतात. पण हे त्यांचे म्हणणे बरोबर नाही, कारण त्यांनी ज्या भाष्यातील प्रयोगाचे वर उदाहरण दिले आहे ते भाष्य भिन्न विषयासंबधाचे भाष्य आहे. त्या भाष्यात 'यत्र तद्धितेनानुक्ता वीप्सा भवति तत्र द्विर्वचनम्' असा उपक्रम करून 'तद्यथा एकैकशो ददाति' असे भाष्यात उदाहरण दिले आहे व त्या भाष्याचे व्याख्यान करिताना कैयटानें असे म्हटले आहे की, 'एक' हा शब्द 'अल्प' या अर्थाचा देखील वाचक आहे व त्या अल्पार्थवाचक 'एक' या शब्दाचे ('नित्यवीप्सयो' या सूत्रानें) 'वीप्सा' हा अर्थ द्योतित करण्याकरिता द्विर्वचन केल्यावर नंतर 'बह्वल्पार्थात् शस् कारकादन्यतरस्याम्' सू. २१०९ या सूत्रानें (द्विर्वचन करून सिद्ध झालेल्या 'एकैक' या शब्दाहून स्वार्थे) 'शस्' प्रत्यय केला आहे. प्रकृत स्थली 'एकैकश' या शब्दाचा जसा अर्थ–'अल्प' हा अर्थ–हाच

संभवत नाही. या विषयासंबंधानें एवढें पुरे. ('सर्वस्य द्वे' या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी 'तद्धितेनोक्तत्वाद्वीप्साया द्विर्वचन न भविष्यति । तद्धितः खल्वपि वीप्सायामिष्यते । यत्र च तद्धितेनाऽनुक्ता वीप्सा भवति तत्र द्विर्वचनम् । तद्यथा–एकैकशो ददातीति ।' असे म्हटले आहे व या भाष्याचे व्याख्यान करिताना कैयटानें 'तद्धितस्य स्वार्थिकत्वादभिव्यक्तिरेवोक्तिरत्रमेया । एकैकश इति । केचिदाहु:–अल्पार्थोऽप्येकशब्दोऽस्ति, तस्य वीप्सायां द्विर्वचने कृते बह्वल्पार्थादिति शस्प्रत्ययः ।' असे म्हटले आहे आणि या वरील भाष्याचा भावार्थ सागताना उद्योतकारानी 'तस्मादयमत्र भाष्यार्थः–सङ्ख्यैकवचनाच्चेत्यत्र चस्य वीप्सायामित्यनेन सम्बन्धाद्वीप्साया स्वार्थे च शसित्यर्थः । तत्र स्वार्थिकोऽभिधानस्वाभाव्यादेव शब्दात्कृतद्विर्वचनैकशब्दाच्च । तेन नातिप्रसङ्गः । एवं चैकशब्दप्रकृतिकशसः स्वार्थिकत्वस्यापि सत्त्वेन न ततो नियमेन वीप्सोक्तिरिति, तत्र वीप्साद्योतनाभावपक्षे द्विर्वचने कृते ततः स्वार्थिकशसिति । अत्र चेद भाष्यमेव मानम् ।' असे म्हटले आहे कैयटानें वरील भाष्याचे व्याख्यान करिताना 'एक' हा शब्द अल्पार्थक देखील आहे असें जें म्हटले आहे ते कैयटाचे मत नसून इतराचें मत आहे व कैयटानें 'केचिदाहु:' ही अरुचिप्रदर्शक पदें वापरली असल्यामुळें, कैयटाला तो अर्थ मान्य नाही हे दिसून येते व उद्योतात सांगितल्याप्रमाणे त्याचें कारण हे की, 'अत्राऽरुचिबीज तु तस्याऽल्पार्थत्वे न मानम्.' उद्योतकाराच्या वरील म्हणण्याचा भावार्थ हा आहे की, 'सङ्ख्यैकवचनाच्च' या सूत्रातील 'च' या शब्दानें, जसा त्या सूत्रांत सांगितल्याप्रमाणे वीप्सार्थक 'शस्' प्रत्यय होतो तसाच, स्वार्थे 'शस्' प्रत्यय देखील होतो. तो स्वार्थे 'शस्' प्रत्यय जसा 'एक' या सख्यावाचक शब्दाहून होतो तसाच त्या 'एक' शब्दाचे 'नित्यवीप्सयोः' या सूत्रानें 'एकैक' असें द्विर्वचन केल्यावर तशा 'एकैक' शब्दाहून देखील होऊ शकतो. अशा रीतीनें 'एकैकशः' या स्थली 'शस्' हा प्रत्यय वीप्सार्थक

न मानता स्वार्थिक मानल्यानें, 'एकैकश:' हा प्रयोग साधु ठरतो. परंतु 'शस्' हा प्रत्यय स्वार्थिक न होता वीप्सार्थकच होतो असे दीक्षिताचे म्हणणे दिसते आणि म्हणून ते म्हणतात की, एकदा वीप्सार्थद्योतक द्विर्वचन करून 'एकैक' हा शब्द सिद्ध केल्यावर पुन्हा त्याहून वीप्सार्थकद्योतक 'शस्' प्रत्यय करणे हे 'उक्तार्थानामप्रयोग' या न्यायाविरुद्ध आहे या विषयाचे अधिक विवरण शब्दरत्नात केले जाईल )

शब्दरत्न– तान्येकेति । तत्रानुवृत्ततानीत्यस्य लक्ष्यव्याकरणान्तरोक्तप्रथमादिसञ्ज्ञानीत्यर्थ. ।

वीप्सायां द्विर्वचने इति । शसः कारकाद्विधानेन, मङ्गलामङ्गलरूपार्थापेक्षणेन च बहिरङ्गतया द्विर्वचने कृते शस् इति भावः । यद्यपि क्वचिदुक्तार्थानामपि प्रयोगो भवति, तथाऽपि यत्र तद्धितेनानुक्ता वीप्सा भवति तत्र द्विर्वचनम् । यथैकैकशो ददातीत्यादिभाष्योक्त्या, अल्पार्थैकैकशब्दाद्वीप्सायां द्विर्वचनने "बह्वल्पार्थात्–" इति शसिति कैयटोक्त्या च प्रकृते तद्वक्तुमशक्यम् । न चैव 'स्रपिसहस्रमेकां कपिलामेकैकशः सहस्रकृत्वो दत्त्वा तया ते सर्वे सहस्रदक्षिणा सम्पन्नाः" इति "अइउण्" सूत्रस्यभाष्ये एकैकश इति प्रयोगासङ्गतिरिति वाच्यम् । एकेति प्राधानार्थकसम्बोधनसत्वेनैकश इत्यस्य प्रत्येकमित्यर्थकत्वेनादोषात् । एतद्भाष्यप्रामाण्येन स्वार्थिकद्विर्वचनकल्पनापेक्षया मदुक्तस्यैव न्याय्यत्वात् । किं च नाम भाष्यप्रयोगः, किं तु सौण्यप्युत्तरा सख्या पूर्वा सख्या बाधते इत्यत्र श्रौतो वा स्मार्तो वाऽऽप्य व्यवहारो दृष्टान्तत्वेनोक्तो भगवतेति तत्र च्छान्दसत्वान्न दोषः । "एकैकशः पितृसमुक्तान्" इत्यादिवर्दितदिक् ।

'तान्येकवचन' सू. २१६१ हें जें सूत्र प्रकृत सूत्रांत अनुवृत्त होतें त्यातील 'तानि' या पदाचा, ज्याना (पाणिनिकालपूर्व) इतर व्याकरणग्रन्थात 'प्रथमा, द्वितीया' इत्यादि सांगितलेल्या

मता प्राप्त झाल्या आहेत अशी त्रिकें, असा अर्थ आहे. 'सर्वस्य द्वे' ८-१-१ या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तींत कैयटानें 'तस्य वीप्सायां द्विर्वचने बह्वल्पार्थात् इति शस् प्रत्ययः', म्हणजे 'वीप्सा' या अर्थामध्यें 'एक' या शब्दाचें प्रथम द्विर्वचन होऊन नंतर 'बह्वल्पार्थात्' सू. २१०९ या सूत्रानें 'शस्' प्रत्यय होतो, असें जें म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, ('बह्वल्पार्थात् शस् कारकात्' सू. २१०९ या सूत्रानें होणारा) 'शस्' प्रत्यय हा कारकविभक्तीहून होण्याचें विधान केलें असल्यामुळें, म्हणजे त्याला कारकाची अपेक्षा असल्यामुळें, आणि तसेंच ('बह्वल्पार्थान्मङ्गलामङ्गलवचनम्'—सू २१०९ वरील वार्तिक-या वार्तिकान्वयें) त्या 'शस्' प्रत्ययाला 'मङ्गल, अमङ्गल' या बाह्य अर्थाची अपेक्षा असल्यामुळें (आणि 'सङ्ख्यैकवचनाच्च' सू. २११० या सूत्रानें होणाऱ्या द्विर्वचनाला केवळ सङ्ख्येची अपेक्षा असल्यामुळें, अल्पनिमित्तक द्विर्वचनाच्या मानानें बहुनिमित्तक) 'शस्' प्रत्यय बहिरङ्ग ठरतो व त्यामुळें द्विर्वचन प्रथम केल्यानंतर 'शस्'प्रत्यय होतो. जरी क्वचित् स्थली–'द्वौ्यतिलुनीतें' इत्यादि स्थलीं–उक्ताप्रयोगांचा देखील पुन्हा प्रयोग होता तरी, जेथें तद्धित प्रत्ययानें वीप्सेचा बोध केला नाही तशाच स्थलो, उदाहरणार्थ 'एकैकशः ददाति' इत्यादि स्थली, द्विर्वचन करतां येत असें भाष्यकारांनी म्हटलें असल्यामुळें व तसेच अल्पार्थवाचक 'एक' या शब्दाचें 'वीप्सा' या अर्थामध्यें प्रथम द्विर्वचन केल्यावर नंतर 'बह्वल्पार्थात्' या सूत्रानें 'शस्'प्रत्यय केला जातो असें 'कैयटानें' म्हटलें असल्यामुळें, (प्रक्रियाकौमुदीत जो प्रकृत सूत्रावरील वृत्तींत 'एकैकशः' या पदाचा प्रयोग केला आहे त्या ) प्रकृत प्रयोगामधानें ( 'एकैकशो ददाति' या भाष्यांतील प्रयोगामधानें जें कैयटानें म्हटलें आहे) तसें म्हणतां येणें शक्य नाहीं; (कारण प्रक्रियाकौमुदीकारांनी 'एकैकशः' या प्रकृत स्थलो 'एक' या शब्दाचा 'अल्प' या अर्थामध्यें उपयोग केला नसून एकत्वरूप सङ्ख्या या अर्थामध्यें उपयोग

केला आहे. म्हणून 'बह्वल्पार्थात्' हे सूत्र प्रकृत स्थली लागू पडत नसल्यामुळें, त्या सूत्रानें होणारा 'शस्'प्रत्यय प्रकृत स्थली करता येत नाही, कारण प्रकृत स्थली 'वीप्सा' या अर्थामध्ये द्विर्वचन केले असल्यामुळें, तोच अर्थ पुन्हा बोधित करण्याकरिता, 'उक्तार्थानामप्रयोग.' या न्यायान्वयें, 'शस्'प्रत्यय करता येत नाही. हे खरें की, 'व्यतिलुनीते' या उदाहरणात 'व्यति' या उपसर्गसमुदायानें कर्मव्यतिहाररूप अर्थ द्योतित केला असून देखील पुन्हा तोच अर्थ द्योतित करण्याकरिता 'कर्तरि कर्मव्यतिहारे' सू. २६८० या सूत्रानें आत्मनेपदिप्रत्यय केला आहे व अशा रीतीनें 'उक्तार्थानामप्रयोग:' हा न्याय 'व्यतिलुनीते' या उदाहरणात व्यभिचरित झाला असल्यामुळें तो न्याय नित्य आहे असें मानता येत नाही तरी पण 'यत्र च तद्धितेनाऽनुक्ता वीप्सा भवति तत्र द्विर्वचनम्' असें 'सर्वस्य द्वे' या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारांनी स्पष्ट म्हटले असल्यामुळें, त्या न्यायाचा व्यभिचार प्रकृत स्थली करता येत नाही म्हणून जेथें 'एक' या शब्दाहून वीप्सार्थक 'शस्' प्रत्यय केला नसेल तेथेंच द्विर्वचन करता येते व जेथें वीप्सार्थक 'शस्' प्रत्यय केला असेल तेथें द्विर्वचन करता येत नाही, व त्या स्थली 'एकश.' असाच प्रयोग होऊ शकतो. जेथें वीप्सार्थक द्विर्वचन केलें असेल तेथे वीप्सार्थक 'शस्' प्रत्यय पुन्हा करता येत नसल्यामुळें, तशा स्थली 'एकैकश:' असा प्रयोग न होता एकैकम्' असाच प्रयोग होऊ शकतो ) पण वरील म्हणणें बरोबर मानल्यास, 'अइउण्' या शिवसूत्रावरील भाष्यात 'ऋषिसहस्रमेका कपिलामेकैकश. सहस्रकृत्वो दत्त्वा तया ते सर्वे सहस्रदक्षिणा: सम्पन्ना:' असें जें म्हटलें आहे त्यातील 'एकैकश: हा प्रयोग चूक ठरण्याची आपत्ति येते असें कोणी म्हटल्यास, ते म्हणणें बरोबर नाही; कारण 'एकैकश.' या प्रयोगातील 'एक' हे पद सख्या या प्रधान अर्थाच्या वाचक 'एक' या शब्दाचें संबोधन असून 'एकश: ' हे भिन्न पद आहे व त्या पदाचा 'प्रत्येकम्' असा अर्थ आहे (आणि अशा

रीतीनें 'एकैकशः' हे एक पद नसून दोन भिन्न पदाचे सन्धियुक्त रूप आहे व या स्थली 'एक' या शब्दाचे द्विर्वचन न करिता त्या 'एक' शब्दाहून वीप्सार्थक 'शस्' प्रत्यय केला आहे) असे मानल्यानें काहीं दोष येत नाही. ('त्यदादीना सम्बोधन नास्ति' हे वचन असल्यामुळें व 'एक' हा शब्द त्यदादिगणात पठित असल्यामुळें, त्याचे सबुद्धीचे रूप होऊ शकत नाहीं असे कोणी म्हटल्यास, त्यावर उत्तर हे आहे की 'हे स' असा 'तद्' या सर्वनामाच्या सबुद्धीचा पुल्लिङ्गात केलेला प्रयोग भाष्यात आढळत असल्यामुळें, वरील नियम सार्वत्रिक मानता येत नाही आणि त्यामुळें 'हे एक' असे 'एक' या शब्दाचे सबुद्धीचे रूप होऊ शकते.) 'स्वार्थे' या अर्थामध्यें प्रथम द्विर्वचन करून नतर 'वीप्सा' या अर्थामध्यें 'शस्' प्रत्यय केल्यानें ('उक्तार्थानामप्रयोगः' हा न्याय बाधित न होता) वरील भाष्यात केलेला 'एकैकश.' हा प्रयोग, हे भाष्य प्रमाणभूत असल्यामुळें, शुद्ध ठरतो असे कोणी म्हटल्यास, त्याला उत्तर हे आहे की, 'स्वार्थे' या अर्थामध्यें द्विर्वचन करता येते अशी कल्पना करण्यापेक्षा ('एकैकशः' या शब्दाची 'एक एकश' अशीं दोन भिन्न पदें पाडून वर) जें आम्ही व्याख्यान केले आहे तेच मानणे अधिक योग्य-न्याय्य-ठरते; (कारण स्वार्थिक 'स्वार्थे' या अर्थामध्यें द्विर्वचन करणं कोठेंहि व्याकरणशास्त्रात सागितले नसून 'वीप्सा' इत्यादि अर्थामध्येंच द्विर्वचन होणे सांगितले आहे. म्हणून शकाकाराची शका अयोग्य ठरते त्याचप्रमाणे 'एकैकशः' या स्थली प्रथम वीप्सार्थक द्विर्वचन करून नतर 'स्वार्थे' या अर्थामध्यें तद्धित 'शस्' प्रत्यय केला आहे असे देखील मानता येत नाही, कारण अत्यन्तस्वार्थिक 'शस्' प्रत्यय होतो असे मानल्यास, तो अन्तरङ्ग ठरून प्रथम होईल व तसा शस् प्रत्ययान्त शब्दाचे नतर द्विर्वचन केल्यास 'एकैकशः' असे रूप न होता, वेगळेंच अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येईल. पण 'एकैकशः' याची वर सागितल्या-

प्रमाणे 'एक, एकश' अशी भिन्न पदें पाडल्यास कोणताहि दोष येत नसल्यामुळें, त्याच मार्गाचे अवलंबन करणे योग्य आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.) दुसरे असे की, वरील भाष्यात आढळणारा प्रयोग भाष्यकारानीं स्वतः केलेला प्रयोग नसून, उत्तर सख्या अप्रधान असली तरी देखील ती पूर्व सख्येचा बाध करते हा न्याय सिद्ध करण्याकरिता भाष्यकारानी दृष्टान्तरूपानें श्रौत किंवा स्मार्त व्यवहाराचे उदाहरण दिले आहे व तो वैदिक प्रयोग असल्यामुळें, (दृष्टानुविधि छन्दसि' या वचनान्वयें) 'एकैकशः पितृसयुक्तान्' इत्यादि वैदिक प्रयोगाप्रमाणे, दोषरहित मानता येतो. (परतु जरी वेदात जसा प्रयोग आढळतो तसा प्रयोग शुद्ध मानणे भाग आहे तरी 'एकैकश' हा प्रयोग भाषेत मात्र शुद्ध मानता येत नाही. 'अइउण्' या शिवसूत्रातील वरील भाष्याचा उद्योतकारानीं जो आशय दिला आहे तो अवश्य वाचावा तो बराच लाब असल्यामुळें व या विषया-सबधानें उद्योतकाराचे म्हणणे पूर्वी एकदा सागितले असल्यामुळें, येथे ता विस्तारभयास्तव देता येत नाही )

मनोरमा– राम इति । सञ्ज्ञाशब्दोऽयमव्युत्पन्न इति पक्षे ऽर्थवत्सूत्रेण प्रातिपदिकसञ्ज्ञा । "करणाधिकरणयोश्च" इत्यधिकारे घापवादेन "हलश्च" इति घञा रमन्तेऽस्मिन्निति व्युत्पादने तु "कृत्तद्धित–" इति सूत्रेणेति विवेकः ।

('बहुषु बहुवचनम्' सू १८७ या सूत्रावरील कौमुदीत 'राम.' असे जें 'राम' या प्रातिपदिकाचे प्रथमेच्या एकवचनाचे रूप दिले आहे त्यात) 'राम' हा शब्द सज्ञेचा–नावाचा–वाचक असून अव्युत्पन्न आहे, म्हणजे कोणत्याहि धातूहून 'कृत्' प्रत्यय होऊन सिद्ध झालेला शब्द नाहीं, असा पक्ष मानल्यास, या पक्षात 'राम' या शब्दाला 'अर्थवद-धातुरप्रत्यय ' सू १७८ या सूत्रानें प्रातिपदिकसज्ञा होते. परतु 'करणाधिकरणयोश्च' या अधिकारात पठित असलेल्या व 'पुसि

सञ्ज्ञायां घ प्रायेण' सू ३२९६ या घप्रत्ययविधायक सूत्राचे अपवादक असलेल्या 'हलश्च' सू ३३०० या सूत्रानें 'रम्' या धातूहून 'अधिकरणे' या अर्थामध्यें 'घञ्' प्रत्यय होऊन 'रमन्ते अस्मिन' अशा व्युत्पत्तीनें 'राम' हा शब्द सिद्ध झाला आहे असे मानल्यास या पक्षांत 'राम' या कृदन्त व्युत्पन्न प्रातिपदिकाला 'कृत्तद्धितसमासाश्च' सू १७९ या सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा होते अशा या दोन पक्षांत–अव्युत्पत्तिपक्ष व व्युत्पत्तिपक्ष या दोन पक्षांत–फरक आहे (कित्येकांचे असे म्हणणे आहे कीं, "मयङ्कु धरभा राम सृमरो गवय शश । इत्यादयो मृगेन्द्राद्या गवाद्या पशुजातय ॥" या अमरकोशांतील श्लोकान्वयें जेव्हा 'राम' या शब्दाचा पशुविशेष या अर्थामध्यें प्रयोग केला जातो तेव्हां त्या अर्थांत रूढ असलेल्या त्या 'राम' शब्दाला 'अर्थवदधातु' या सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा होते व जेव्हां 'प्रभु रामचन्द्र' या अर्थात त्या शब्दाचा प्रयोग केला जातो तेव्हां 'रमन्ते योगिन अस्मिन' या व्युत्पत्तीचा आश्रय केल्यानें त्या कृदन्त यौगिक शब्दाला 'कृत्तद्धित' या सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा होते, आणि अशा रीतीनें या दोन पक्षांत 'राम' या शब्दाच्या अर्थामध्यें फरक होतो )

शब्दरत्न–रमन्तेऽस्मिन्निति । योगिन इति ॥

'रमन्तेऽस्मिन्' या मनोरमेंतील वाक्यांत 'योगिन' हे पद अध्याहृत आहे म्हणजे 'रमन्ते योगिन अस्मिन्' असा 'राम' या शब्दाची व्युत्पत्ति आहे (यावरून शब्दरत्नकार हे ध्वनित करितात कीं, दीक्षितांनी 'राम' या शब्दाची जी व्युत्पत्ति दिली आहे ती 'रमन्ते योगिनोऽनन्ते सत्यानन्द चिदात्मनि । इति रामपदेनासौ परं ब्रह्माभिधीयते ॥' या अगस्त्यसंहितेंतील श्लोकांत सांगितल्याप्रमाणें दिली आहे )

मनोरमा–"सरूपाणामेकशेष एकविभक्तौ" ॥ एकविभक्तौ-यानीति विभक्ति साम्ये उपलक्षणं न त्वेकशेषे निमित्तम् । एव

चानैमित्तिकत्वेनान्तरङ्गोऽयमेकशेषः सुबुत्पत्तेः प्रागेव प्रवर्त्तते। यद्येतन्नारभ्येत तर्हि प्रत्येकं विभक्तिः स्यात्, द्वन्द्वश्च प्रवर्तेत। आरब्धे त्वेकशेषेऽनेकसुबन्तविरहाद् द्वन्द्वस्याप्राप्तिरेव फलिता भवतीति भावः। सरूपाण्येवेति। एतच्चोत्तरसूत्रस्थैवकारस्येहानुकर्षणाल्लभ्यते तेन मातृशब्दयोर्जननीधान्यपरिच्छेत्तृवाचिनोर्नैकशेषः। मातृभ्यामित्यत्र सारूप्येऽपि औजसादिषु वैरूप्यात्। एक एवेति। एतच्च सहविवक्षायामेव प्रवर्तते। इतरेतरयोगद्वन्द्वस्य विषय इति यावत्। यत्र ह्यनेकस्यार्थस्य मिलितस्यैतरान्वयः स तथाभूतोऽस्य विषयः। इदं च "इदितो नुम् धातोः" इति लिङ्गाल्लभ्यते न्यायाच्च। तथाहि—यः शिष्यते स लुप्यमानार्थाभिधायीति स्थिते श्रूयमाणैकशब्दोपस्थित सर्वमविशेषादेकरूपेणान्वेतुमर्हति। यद्वा पूर्वसूत्राद् "द्वन्द्वे" इत्यनुवर्त्य द्वन्द्वे प्रसक्ते सतीति व्याख्येयम्।

('सरूपाणामेकशेष एकविभक्तौ' सू. १८८ या सूत्रावरील कौमुदीत 'एकविभक्तौ यानि सरूपाण्येव दृष्टानि तेषामेक एव शिष्यते असे जें म्हटले आहे त्या पक्तीतील 'एकविभक्तौ' या पदातील) 'विभक्ति' हा शब्द सारूप्याचे उपलक्षण आहे, म्हणजे कोणत्या प्रकारचे सारूप्य असताना एकशेष होतो हे द्योतित करण्याकरिता घातला आहे, एकशेष होण्याकरिता विभक्तिप्रत्यय पुढें असणे या निमित्ताची आवश्यकता आहे हे द्योतित करण्याकरिता तो शब्द घातला नाही सारांश हा एकशेष निर्निमित्तक असल्यामुळें अन्तरङ्ग ठरतो व सुबुत्पत्ति होण्यापूर्वीच याची प्रवृत्ती होते. जर प्रकृत सूत्र आरंभिलें नसतें तर, ज्या शब्दाचा एकशेष करणें आहे त्यातील प्रत्येक शब्दाहून सुबुत्पत्ति होण्याची व द्वन्द्वसमास होण्याची आपत्ति आली असती. परंतु एकशेषाचें प्रकृत सूत्र आरंभिलें असल्यामुळें व (जेथें एकशेषाची प्राप्ति होते तेथें) अनेक सुबन्त पदें राहत नसल्यामुळें, तशा स्थली द्वन्द्वाची प्राप्तीच होत नाहीं हें फलित–सिद्ध–होतें असा भावार्थ आहे. (प्रकृत सूत्रात समान रूप

शब्दाचा एकशेष होणे सांगितले आहे. ज्या शब्दाचा एकशेष करणे आहे ते समानरूप आहेत हे कसे ठरवावे याकरिता प्रकृत सूत्रात 'एकविभक्तौ' हें पद घातले आहे व या पदातील 'एक' या पदाचा 'सर्व' असा अर्थ आहे. सारांश ज्या शब्दांची रूपें सर्व विभक्तींत सारखीं होतात ते शब्द समानरूप होत. प्रकृत सूत्रातील 'एकविभक्तौ' हा शब्द निमित्तसप्तमी नसून, म्हणजे 'एकविभक्तौ परतः' असा त्याचा अर्थ नसून, तें पद वास्तविक प्रकृतसूत्रनिर्दिष्ट 'सरूपाणाम्' या पदाशीं अन्वित होतें आणि समान-रूपता कशी ठरवावी याचें ते दर्शक आहे. एकशेष होण्याकरिता विभक्तिप्रत्यय पुढें असण्याची मुळीच आवश्यकता नाहीं. द्वन्द्वाच्या मानानें एकशेष अन्तरङ्ग ठरतो असें जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचें कारण हें की, एकशेष कोणत्याहि पुढें असणाऱ्या निमित्तामुळें होणारा नसून, म्हणजे विभक्तिनिरपेक्ष असून, द्वन्द्व विभक्ति-सापेक्ष आहे आणि म्हणूनच अन्तरङ्ग एकशेष बहिरङ्ग द्वन्द्वाचा बाध करतो.) कौमुदींतील वरील पक्तींत 'सरूपाण्येव' यामध्यें 'एव' हें जें पद घातले आहे तें ('वृद्धो यूना तल्लक्षण-श्चेदेव विशेषः.' या) उत्तर सूत्रातून अनुकृष्ट केलें आहे. त्यामुळें, म्हणजे प्रकृत सूत्रात 'एव' या पदाचें अनुकर्षण होत असल्यामुळें, 'जननी' या अर्थाचा वाचक 'मातृ' शब्द व 'परिच्छेत्ता'—मापणारा-या अर्थाचा वाचक 'मातृ' शब्द या दोन शब्दांचा एकशेष होऊ शकत नाहीं, कारण 'भ्याम्' इत्यादि विभक्तिप्रत्यय लावले असता, जरी त्या दोन शब्दांची रूपें सारखीं होतात तरी 'औ, जस्' इत्यादि विभक्तिप्रत्यय लावले असता त्यांचीं रूपें भिन्न प्रकारचीं होतात. (जननीवाचक 'मातृ' शब्दाचीं 'मातरौ, मातरः' इत्यादि रूपें होत असून, परिच्छेतृवाचक 'मातृ' शब्दाचीं 'मातारौ, मातारः' इत्यादि रूपें होतात. सारांश या दोन शब्दांचीं सर्व विभक्तींत सारखीं रूपें होत नसल्यामुळें, त्यांचा एकशेष होऊं शकत नाहीं.) 'एक एव शिष्यते' हें विधान करणारे प्रकृत एकशेष-

विधायक सूत्र जेथें सहविवक्षा आहे तशाच ठिकाणी प्रवृत्त होते, म्हणजे जो इतरेतरयोग द्वन्द्वाचा विषय आहे तेथेच या सूत्राची प्रवृत्ति होते. जेथें अनेक अर्थ एकत्र मिलित होऊन वाक्यातील इतर पदाशी सारख्या रीतीनें अन्वित होतात तशा प्रकारची स्थिति असणे हा प्रकृत सूत्राचा विषय आहे, म्हणजे अशी स्थिति असल्यासच प्रकृत सूत्र प्रवृत्त होते (परस्परसापेक्ष शब्दाचा वाक्यातील इतर पदाशीं सारख्याच रीतीनें अन्वय होत असणे याला सहविवक्षा म्हणतात. एकशेष हा इतरेतर योगद्वन्द्वाचा अपवादक असल्यामुळे, इतरेतर-योग द्वन्द्व करतेवेळी जशी सहविवक्षेची आवश्यकता असते तशीच एकशेष करिताना देखील तिची आवश्यकता असते. साराश जेथे अनेक शब्दाचे अर्थ एकीभूत होऊन वाक्यातील इतर पदाच्या अर्थाशी सारख्याच रीतीनें अन्वित होतात तशाच ठिकाणी एकशेष करता येतो 'चार्थे द्वन्द्व.' सू ९०१ या सूत्रावरील कौमुदीत 'मिलितानामन्वये इतरेतरयोग.' असें म्हटले आहे व याचा बालमनोरमेंत 'परस्परापेक्षिताना समुदितानामेकस्मिन्-क्रियापदेऽन्वयो यत्र तत्रेतरेतरयोग.' असा अर्थ दिला आहे आणि हीच सहविवक्षा होय सहविवक्षा असतानाच एकशेष होतो याला) 'इदितो नुम् धातो.' सू. २२६२ या सूत्रातील 'इदितः' हा निर्देश व तसेच न्याय देखील प्रमाण आहे. ('इदितः' या पदात दोन 'इत्' शब्द आहेत व ते दोन शब्द समानरूप असून त्याच्यापुढे कोणताहि विभक्तिप्रत्यय आला असता, त्याचीं रूपें सारखीच होतात. तरी पण त्या दोन शब्दाचे ठिकाणी पाणिनीनें प्रकृत सूत्र प्रवृत्त करून एकशेष केला नाही त्याचे कारण हे, की, हे दोन 'इत्' शब्द वाक्यातील इतर पदाशी सारख्या रीतीनें अन्वित नाहीत. 'इदित्' यातील प्रथम 'इत्' हा शब्द द्वितीय 'इत्' शब्दात अन्वित असून द्वितीय 'इत्' शब्द 'धातोः' या अन्य पदार्थामध्यें अन्वित आहे, व त्या पदाचा 'इत् ह्रस्व इकारः, इत् इत्संज्ञकः यस्य' असा विग्रह असून 'ह्रस्वइकारेत्संज्ञकेदन्तधातोः' असा अर्थ आहे.

नार्थवत्त्वात् । न चार्थवत्त्वेऽपि समासग्रहणस्य नियमार्थत्वान्नैवमिति-वाच्यम् । यत्र समुदाये पूर्वो भाग पद तद्विषयको नियम इत्युक्तत्वात, बहुपटव इत्याद्यनुरोधेन नियमस्य सजातीयविषयताया औचित्याच्च । तथा चैकाज्द्विर्वचनन्यायेन समुदायप्रातिपदिकादेव द्विर्वचनाद्युत्पत्ति । तावताप्यवयवार्थाना सङ्ख्यान्वयेनानुग्रहसम्भवात् । नन्वेव रामकृष्णावित्यादिष्वपि द्वन्द्व विनैव समुदायाद्विभक्तिस्यादिति चेन्नैवम् । द्वन्द्वविधावनेक सुबन्तमित्यस्यानुवृत्त्या एकाज्द्विवचनन्यायस्य बाधादितिदिक् ।

'द्वन्द्व' या अनुवृत्त पदाचा 'द्वन्द्वे कृते सति' असा अर्थ करावा असे कोणी म्हटल्यास, ते म्हणणे बरोबर नाही. कारण तसा अर्थ केल्यास 'पन्थानौ, पन्थान' इत्यादि स्थली समासान्त प्रत्यय होण्याची व तसेच 'करौ, करा' इत्यादि स्थली एकवद्भाव होण्याची आपत्ति येईल त्याचप्रमाणे 'सर्वे, सर्वेषाम्' इत्यादि स्थला 'द्वन्द्व च' सू २२८ व 'विभाषा जसि' सू २२५ ही सूत्रे प्रवृत्त होण्याची आपत्ति येईल ('द्वन्द्वे' या अनुवृत्त पदाचा 'द्वन्द्वे प्रसक्ते सति', म्हणजे द्वन्द्वाची प्राप्ति झाली असता, असा अर्थ न करिता 'द्वन्द्व कृते सति' असा अर्थ केल्यास कोणत्या आपत्ति येतील हे दीक्षितानी प्रकृत पक्तीत सागितल आहे 'पन्थाश्च पन्थाश्च पन्थानौ किंवा 'पन्थाश्च पन्थाश्च पन्थाश्च पन्थान' असा द्वन्द्वसमास केल्यास 'पथिन्' हा शब्द द्वन्द्वसमासाच्या अन्ती येत असल्यामुळे 'ऋक्पूरब्धू पथामानक्षे' सू ९४० या सूत्राने समासान्त 'अ' प्रत्यय होईल व 'नस्तद्धिते' सू ६७९ या सूत्राने 'पथिन्' यातील 'टि' चा लोप होऊन 'पथौ पथा' असो अनिष्ट रूपें होण्याची आपत्ति येईल तसच 'कर' हा प्राण्यङ्गवाचक शब्द असल्यामुळें 'करश्च करश्च' किंवा 'करश्च करश्च करश्च' असा द्वन्द्वसमास केल्याने 'करौ, करा' असा इष्ट रूपें न होता, 'द्वन्द्वश्च प्राणितूर्यसेनाङ्गानाम्' सू ९०६ या सूत्रानें समाहारद्वन्द्व होऊन एकवद्भाव होण्याची, म्हणजे एकवचनाचा प्रयोग

होण्याची, व 'स नपुसकम्' सू. ८२१ या सूत्रानें नपुसक-लिङ्गात प्रयोग होण्याची आपत्ति येईल आणि 'करौ, करा:' या ऐवजी 'करम्' असे अनिष्ट रूप होईल. त्याचप्रमाणे 'सर्वे' या स्थली द्वन्द्वसमास केल्यास 'विभाषा जसि' सू. २२५ या सूत्रानें, 'जस्' प्रत्यय पुढें असल्यामुळें, विकल्पेंकरून 'सर्व' या शब्दाला सर्वनामसंज्ञा होऊन 'सर्वा:' असें पाक्षिक अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येईल, आणि तसेच 'सर्वेषाम्' या स्थली द्वन्द्वसमास केल्यानें 'द्वन्द्वे च' सू. २२४ या सूत्रानें सर्वनामसंज्ञेचा निषेध होऊन 'सर्वे-षाम्' असें इष्ट रूप सिद्ध न होता, 'सर्वाणाम्' असें अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येईल म्हणून 'द्वन्द्वे कृते एकशेष' असा अर्थ केल्यानें वर दर्शविलेल्या आपत्ति येत असल्यामुळें, तसा अर्थ करणे अयोग्य आहे व 'द्वन्द्वे प्रसक्ते सति द्वन्द्वं बाधित्वा एकशेषो भवति' असाच अर्थ करणे उचित आहे असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे.) प्रक्रियाकौमुदीकारांनी (प्रकृत सूत्राचें अवतरण देताना) 'राम राम औ इति स्थिते' असें जें म्हटलें आहे व (तसेच प्रकृत सूत्राचे व्याख्यान करिताना 'सरूपाणां मध्ये एक एव शिष्यते नेतरे) एक-विभक्तौ परत.' असें जें पुढें म्हटलें आहे त्यासबधानें असें म्हणता येऊ शकते की, जशी 'राम राम' या समुदायातील प्रत्येक अवयवाला प्रातिपदिकसंज्ञा आहे त्याचप्रमाणे दोन 'राम' शब्द मिळून झालेला समुदाय अर्थवान् असल्यामुळें त्या समुदायाला देखील प्राति-पदिकसंज्ञा होऊ शकते. 'राम राम' हा समुदाय अर्थवान् असून देखील, 'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रातील 'समास' या पदाचें ग्रहण नियमार्थ असल्यामुळे, म्हणजे 'अर्थवत समुदायस्य चेत् प्राति-पदिकसंज्ञा भवति तर्हि समासस्यैव' असा नियम असल्यामुळें, 'राम राम' या असमस्त समुदायाला प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकत नाही असे कोणी म्हटल्यास, ते म्हणणे बरोबर नाही, कारण जेथें अर्थवान् समु-दायातील पूर्व भाग पद आहे तशाच ठिकाणी तो नियम लागू पडतो हे पूर्वी सांगितले आहे (व 'राम राम' या समुदायातील 'राम' हा

पूर्वभाग पदसंज्ञक नसल्यामुळें, त्या समुदायाला वरील नियम लागू पडत नाहीं ) दुसरें असें की, 'बहुपटवः = बहु पटु जस्' इत्यादि समुदायांना प्रातिपदिकसंज्ञा होण्याकरितां वरील 'समास'ग्रहणकृत नियम सजातीयविषयकच मानणें उचित आहे, म्हणजे ज्याप्रमाणें समासातील पूर्व भाग पद असतो त्याचप्रमाणें ज्या अर्थवान् समुदायांत पूर्व भाग पद असेल तशाच सजातीय अर्थवान् समुदायाला तो नियम लागू पडतो व तशा समुदायालाच प्रातिपदिकसंज्ञा होत नाहीं हें मानणें उचित आहे त्याचप्रमाणें एकाज्द्विर्वचनन्यायानें (जेवढ्या अधिक समुदायाचें ग्रहण होऊं शकत असेल तवढ्याचें ग्रहण करणें इष्ट असल्यामुळें, 'राम राम' या समुदायाला प्रातिपदिकसंज्ञा करून त्या ) समुदायरूप प्रातिपदिकाहूनच द्विवचनादि विभक्तिप्रत्यय करणें योग्य आहे, कारण तसें केल्यानें देखील, विभक्तिप्रत्ययाचा संख्यारूप अर्थ समुदायातील प्रत्येक अवयवाच्या अर्थाशीं अन्वित होऊं शकतो पण असें मानलें तर 'रामकृष्णौ' इत्यादि स्थलीं देखील द्वन्द्व न करितांच 'रामकृष्ण' या समुदायाहून सुबुत्पत्ति करतां येईल असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं कारण 'चार्थे द्वन्द्वः' सू ९०१ या द्वन्द्वविधायक सूत्रांत ('सुबामन्त्रिते' या पूर्व सूत्रांतून) 'सुप् = सुबन्तम्' या पदाची व ('अनेकमन्यपदार्थे' या पूर्व सूत्रांतून) 'अनेकम्' या पदाची अनुवृत्ति होत असल्यामुळें, या स्थलीं एकाज्द्विर्वचनन्याय बाधित होतो ( एकाज्द्विर्वचनन्याय पूर्वी सांगितलाच आहे. 'निज्' धातूंत जरी 'नि, इ, इज्, निज्' असे चार एकाच् आहेत तरी, पहिल्या तीन एकाचांचें द्विर्वचन केल्यानें धातूतील कांहीं भाग असा राहून जातो कीं, ज्याचें द्विर्वचन केलें गेलें नाहीं ती आपत्ति टाळण्याकरितां 'निज्' या सर्वांत मोठ्या एकाचाचें द्विर्वचन केलें जातें व त्याचें द्विर्वचन केलें असतां, बाकीचे तीन एकाच् त्याच्या पोटांत अन्तर्भूत असल्यामुळें, त्यांचें देखील द्विर्वचन होऊन जातेंच. हा

न्याय 'राम राम' या स्थली लावल्यास, जशी या समुदायातील, प्रत्येक 'राम' शब्दाला प्रातिपदिकसंज्ञा आहे तशीच त्या दोन अर्थवान् शब्दाच्या 'राम राम' या अर्थवान् समुदायाला देखील प्रातिपदिकसंज्ञा असल्यामुळें, प्रत्येक 'राम' शब्दाहून 'सु' प्रत्यय न करिता समुदायाहून 'औ' प्रत्यय करणें योग्य आहे, हा व 'औ' प्रत्यय दोन्ही रामाची मिळून एकदर दोन ही जो संख्या आहे त्या संख्येचा बाध करीलच. म्हणून एकाज्द्विर्वचनन्यायान्वयें समुदायाहून सुबुत्पत्ति केल्यावर नतर एकशेष करणेंच योग्य आहे पण अशा स्थली एकाज्द्विर्वचन-न्यायाचा आश्रय केल्यास, 'राम' व 'कृष्ण' याचा द्वन्द्व करते-वेळीं 'राम' व 'कृष्ण' या प्रत्येक अवयवाहून सुबुत्पत्ति करून जसा द्वन्द्व केला जातो तसें न करिता, 'रामकृष्ण' या अर्थवान् समुदायरूप प्रातिपदिकाहून, द्वन्द्व न करिता देखील, एकदम 'औ' प्रत्यय केल्यानें काम भागू शकेल व अशा रीतीनें द्वन्द्वविधायक सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येईल असें कोणी म्हटल्यास, त्यावर उत्तर हें आहे कीं, 'राम व कृष्ण हे दोघे मिळून' असा अर्थ सिद्ध होण्याकरिता इतरेतरयोगद्वन्द्व करणें आवश्यक आहे, व दोन किंवा अधिक सुबन्ताचाच द्वन्द्व होऊ शकत असल्यामुळें, द्वन्द्वसमास करते-वेळीं प्रत्येक अवयवाहून सुबुत्पत्ति करणें भाग आहे व समुदायाहून एकदम सुबुत्पत्ति करता येत नाही. अशा रीतीनें द्वन्द्वसमास करतेवेळी एकाज्द्विर्वचनन्यायाची प्रवृत्ति होऊ शकत नाही व त्यामुळें द्वन्द्वसमास करतेवेळीं 'रामसु कृष्णसु' अशी स्थिति झाली असता, 'सुपो धातुप्रातिपदिकयो' सू ६५० या सूत्रानें अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाचा लुक् होऊन 'रामकृष्ण' असें जे सामासिक रूप होतें त्याला 'कृत्तद्धित' या सूत्रानें प्रातिपदिक-संज्ञा होऊन त्याहून 'ङ्याप्प्रातिपदिकात्' सू १८२ या अधिकारसूत्रानें सुबुत्पत्ति करता येते, म्हणजे द्विवचनाचा प्रत्यय करता येतो.)

मनोरमा – इत्थमुक्तिसम्भवे सत्यपि समुदायादेकविभक्तौ परत इति पक्षः किमयमुपेक्षित इति चेत् । शृणु । अस्मिन्पक्षे मातृमातारौ इत्यादावप्येकशेषः स्यात् । नन्वेकविभक्तावित्यावर्त्य एवकारं चानुकृष्य, एकविभक्तौ यानि सरूपाण्येवेति व्याख्येयामिति चेन्न । आवृत्तौ मानाभावात् । विभक्तेरेकशेषस्य विशेषणत्वे फलाभावाच्च, न च पयः पयो जरयतीत्याविव्यावृत्तिः फलम् । सहविवक्षायामित्यस्यावश्यकत्वात्, अन्यथा पयः पयो नयतीत्यत्र गौणमुख्यकर्मणोरेकशेषापत्तेः । देवदेव इत्यादावतिप्रसङ्गाच्च । प्रत्युत आवृत्त्या उभयविशेषणत्वे भिक्षाणां समूहो भैक्षमिति न सिद्ध्येत् । तथा हि – भिक्षा ३ अ इति स्थिते ऽन्तरङ्गानपि विधीन् बहिरङ्ग इति लुकि कृते विभक्तिपरत्वाभावादेकशेषो न स्यात्, लुप्ते प्रत्ययलक्षणाभावात् । किं च रामावित्यादौ परत्वाद्नित्यत्वाच्च " वृद्धिरेचि " इत्येकादेशे कृते विभक्तिपरत्वाभावादेकशेषो न स्यात् । उभयत आश्रयणेऽन्तादिवद्भावाभावादिति दिक् ।

मग प्रक्रियाकौमुदीकारानीं ('राम राम औ इति स्थिते' व 'एकविभक्तौ परत.' असे) जे म्हटले आहे त्याचे, वर सांगितल्याप्रमाणे, युक्तीनें समर्थन करता येणे संभवत असून देखील, 'समुदायादेकविभक्तौ परतः' हा जो त्याचा पक्ष आहे त्याची उपेक्षा का केली, म्हणजे त्याचा तो पक्ष का स्वीकारला नाही, असा प्रश्न केल्यास, त्याचे उत्तर श्रवण करा. त्याच्या पक्षामध्यें 'मातृ मातारौ' इत्यादि स्थली देखील एकशेष होण्याची आपत्ति येते (कारण 'मातृ मातृ औ' या स्थली 'मातृ मातृ' हे दोन्ही शब्द समानरूप असून त्याच्या पुढें 'औ' हा एकच विभक्तिप्रत्यय असल्यामुळें, 'एकविभक्तौ परत' या पक्षामध्यें येथे एकशेष होण्याची आपत्ति येते परतु कौमुदीत 'एकविभक्तौ' या पदाचा 'एकविभक्तौ' यानि सरूपाण्येव दृष्टानि' असा जो अर्थ केला आहे तो अर्थ स्वीकारल्यास व त्या पदाचा 'एकविभक्तौ परतः' असा अर्थ न केल्यास, वरील आपत्ति टळते, कारण जननीवाचक 'मातृ' शब्द व

परिच्छेत्तृवाचक 'मातृ' शब्द या दोन शब्दांची, पूर्वी सांगितल्या-प्रमाणे, सर्व विभक्तींत सारखीं रूपें होत नाहीत.) पण प्रकृत सूत्रांतील 'एकविभक्तौ' हें पद दोनदा उच्चारून व ('वृद्धो यूना' या उत्तर सूत्रांतून) 'एव' या पदाचें अनुकर्षण करून प्रकृत सूत्राचा 'एकविभक्तौ यानि सरूपाण्येव तेषामेक एव शिष्यते, एकविभक्तौ परतः' असा अर्थ करावा (व तसें केल्यानें वर दर्शविलेली आपत्ति सहज टाळतां येते) असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाही, कारण 'एकविभक्तौ' या पदाची द्विरावृत्ति करण्यास कांहींच प्रमाण नाही. दुसरें असें कीं, 'विभक्ति' हें एकशेषाचें विशेषण-निमित्त-मानल्यानें, म्हणजे 'एकविभक्तौ' हें पद निमित्तकोटींत देखील प्रविष्ट करून 'एकविभक्तौ परतः एकशेषः' असा अर्थ केल्यानें, कोणतेंहि विशेष फल निष्पन्न होत नाही. 'एकविभक्तौ' या पदाचा 'एकविभक्तौ परतः' असा अर्थ केल्यानें 'पय पयो जरयति' (पाणी दुधास पचवितें) इत्यादि उदाहरणांत एकशेषाची व्यावृत्ति होणें हें फल आहे असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाही; कारण एकशेष होण्यास सहविवक्षेची आवश्यकता आहे, म्हणजे ज्यांचा एकशेष करणें आहे त्यांचा वाक्यांतील इतर पदांशी सारख्याच रीतीनें अन्वय असणें आवश्यक आहे (व 'पय पयो जरयति' या उदाहरणांत 'पयः' या दोन पदांपैकीं प्रथम 'पयस् सुपयः' हें प्रथमान्त पद 'जरयति' या क्रियेशीं कर्तृरूपानें अन्वित असून द्वितीय 'पयः अम् पयः' हें द्वितीयान्त पद त्या क्रियेंत कर्मरूपानें अन्वित असल्यामुळें व अशा रीतीनें येथें सहविवक्षा नसल्यामुळें, या उदाहरणांत एकशेषाची प्राप्तीच होत नाही. म्हणून प्रकृत सूत्रांतील 'एकविभक्तौ' या पदाची द्विरावृत्ति करून एकदां त्या पदाचा 'एकविभक्तौ परतः' असा अर्थ केल्यानें वरील उदाहरणांत एकशेष होण्याची आपत्ति टळते हें म्हणणें चूक ठरतें हें उघड आहे.) जेथें सहविवक्षा असते तथाच स्थली एकशेष होतो

हा नियम न मानल्यास, 'पय पयो नयति' या उदाहरणात गौण कर्म व प्रधान कर्म याचा एकशेष होण्याची आपत्ति येते व त्याचप्रमाणे 'देवदेव' इत्यादि स्थली अतिव्याप्ति रूप दोष येऊ पाहतो ('पय पयो नयति' या उदाहरणातील 'नी' धातु द्विकर्मक आहे व प्रथम 'पय' हे पद 'नयति' या द्विकर्मकक्रियेंत गौणकर्मरूपानं अन्वित असून द्वितीय 'पय' हें पद प्रधानकर्मरूपानें अन्वित आहे, व अशा रीतीनें ही दोन्ही पदें एकाच प्रकारानें 'नयति' या क्रियेंत अन्वित नसल्यामुळ, म्हणजेच येथें सहविवक्षा नसल्यामुळें, या स्थली एकशेप होत नाही 'पय पयो नयति' याचा 'पयसि पयो नयति, म्हणजे दुधात पाणी घालतो, असा अर्थ आहे व 'नी' धातु द्विकर्मक असल्यामुळें, 'पयसि' चे 'पय' असे द्वितीयेचे रूप होऊन ते गौणकर्म झाले आहे तसेच 'देवाना देव देवदेव' या उदाहरणात जरी दोन 'देव' शब्द असे आहेत की, त्याचीं सर्व विभक्तीत सारखी रूपें होतात व 'देव आम् देव सु सु = देव देव सु' या स्थली अन्तवर्ति विभक्तिप्रत्ययाचा 'सुपो धातुप्रातिपदिकयो सू ६५० या सूत्रानें लुक् केल्यावर 'देव देव' या दोन 'देव' शब्दाच्या समुदायापुढें 'सु' प्रत्यय आहे तरी 'प्रथम 'देव' शब्द द्वितीय 'देव' शब्दात अन्वित असून द्वितीय 'देव' शब्द वाक्यातील क्रियेत कर्तृरूपानें अन्वित असल्यामुळें व अशा रीतीनें येथें सहविवक्षा नसल्यामुळें, एकशेप होत नाही ) उलट असे की, 'एकविभक्तौ' या पदाची द्विरावृत्ति करून (एक पद निमित्तकोटीत व दुसरे पद उद्देश्यकोटीत प्रविष्ट केल्यास, म्हणजे) तें पद उद्देश्य व निमित्त या दोहोचेहि विशेषण मानल्यास, 'भिक्षाणा समूहो भैक्षम्' हे रूप सिद्ध होऊ शकणार नाही, कारण 'भिक्षा भिक्षा भिक्षा आम् अण्' अशी स्थिति झाली असता, 'अन्तरङ्गानपि विधीन् बहिरङ्गो लुग्बाधते'—परि ५२–या परिभाषान्वयें 'आम्' या अन्तवर्तिविभक्तिप्रत्ययाचा प्रथम लुक् केल्यानें, 'भिक्षा भिक्षा भिक्षा' या समुदायापुढें विभक्तिप्रत्यय राहत नसल्यामुळें, एकशेष

न होण्याची आपत्ति येते; कारण ज्या 'आम्' प्रत्ययाचा लुक् झाला आहे त्याचे ठिकाणी प्रत्ययलक्षण करता येत नाही, म्हणजे तो 'आम्' प्रत्यय प्रत्ययलक्षणानें विद्यमान आहे असें मानता येत नाही. ('भिक्षाणां समूहो भैक्षम्' या स्थलीं 'भिक्षादिभ्योऽण्' सू. १२४४ या सूत्रानें 'तस्य समूहः' या अर्थामध्यें 'अण्' प्रत्यय झाला आहे. 'भिक्षा भिक्षा भिक्षा आम् अण्' हा समुदाय तद्धित 'अण्' प्रत्ययान्त असल्यामुळें, 'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रानें त्याला प्रातिपदिकसंज्ञा होऊन 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू ६५० या सूत्रानें 'आम्' या अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाचा लुक् पावतो. पण 'आम्' प्रत्ययाच्या पलीकडे असणाऱ्या 'अण्' प्रत्ययामुळें झालेल्या प्रातिपदिकसंज्ञेमुळें होणारा तो लुक् असल्यामुळें व एकशेष हा पूर्वी असलेल्या 'आम्' प्रत्ययाच्या निमित्तामुळें होणारा असल्यामुळें, 'पूर्वोपस्थितनिमित्तकमन्तरङ्गम्, परोपस्थितनिमित्तकं बहिरङ्गम्' या न्यायान्वयें, एकशेष हा वास्तविक लुक्च्या मानानें अन्तरङ्ग ठरतो व 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' –परि. ५०–या परिभाषान्वयें एकशेष प्रथम झाला पाहिजे व नंतर 'आम्' प्रत्ययाचा लुक् झाला पाहिजे, व तसें केल्यास, समुदायापुढें 'आम्' प्रत्यय येत असल्यामुळें, एकशेष होण्यात कांहीं अडचण येत नाही. परंतु 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' या परिभाषेची 'अन्तरङ्गानपि विधीन् बहिरङ्गो लुग्बाधते' ही अपवादक परिभाषा आहे. त्यामुळें, एकशेष अन्तरङ्ग असून देखील तो प्रथम न होतां बहिरङ्ग लुक् प्रथम होतो व अशा रीतीनें समुदायापुढें 'आम्' प्रत्यय राहून नसल्यामुळें, 'एकविभक्तौ परत.' हा पक्ष मानल्यास, या उदाहरणात एकशेष न होण्याची आपत्ति येते. ज्या 'आम्' प्रत्ययाचा लुक् झाला आहे तो प्रत्ययलक्षणानें विद्यमान आहे असें मानता येत नाही; कारण 'न लुमताङ्गस्य' सू. २६३ हें प्रत्ययलक्षणाचें निषेधक सूत्र आहे व या स्थली अङ्गाला एकशेषरूप कार्य करणें असल्यामुळें, प्रत्ययलक्षण मानता येत नाही. सारांश 'एक- .

विभक्तौ परतः' हा पक्ष मानल्यास 'भिक्षा अण्' असा एकशेष होऊं शकत नाही व त्यामुळें 'भैक्षम्' हे इष्ट रूप सिद्ध होऊ शकत नाही. म्हणून तो पक्ष स्वीकारता येत नाही.) दुसरे असे की, 'रामौ' इत्यादि स्थली परत्वामुळें व नित्यत्वामुळें 'वृद्धिरेचि' सू. ७२ या सूत्रानें वृद्धिरूप एकादेश प्रथम केल्यावर विभक्तिप्रत्यय पुढें राहत नसल्यामुळें, एकशेष न होण्याची आपत्ति येते. एकादेशाचे ठिकाणी एकेच वेळी पूर्वान्तवद्भाव व परादिवद्भाव करता येत नाही ('राम राम औ' या स्थितीत प्रकृत सूत्रानें एकशेषाची प्राप्ति आहे व तसेच 'वृद्धिरेचि' या सूत्रानें वृद्धिरूप एकदेशाची प्राप्ति आहे. 'वृद्धिरेचि' हे सूत्र प्रकृत सूत्राच्या मानानें परसून असल्यामुळें, 'विप्रतिषेधे परं कार्यम्' सू. १७५ या सूत्रान्वयें, वृद्धिरूप एकादेशाची प्रथम प्रवृत्ति झाली पाहिजे. दुसरे असे की, वृद्धिरूप एकादेशकार्य जसे पर आहे तसे नित्य देखील आहे; कारण एकशेष प्रथम केला किंवा मागून केला तरी दोन्ही स्थितीत या कार्याची प्राप्ति आहेच. पण वृद्धिरूप एकादेश प्रथम केल्यास 'औ' हा विभक्तिप्रत्यय एकादेशानें नाहीसा होत असल्यामुळें व अशा रीतीनें 'राम राम' या समुदायापुढें विभक्तिप्रत्यय राहत नसल्यामुळें, एकशेषाची प्राप्ति होत नाही. म्हणून एकशेष अनित्य ठरून 'कृताकृतप्रसङ्गि नित्यम्' या वचनान्वयें वृद्धिरूप एकादेश नित्य ठरतो. त्यामुळें देखील त्या कार्याची प्रथम प्रवृत्ति करणें भाग आहे. व ते कार्य प्रथम केल्यास नुकतेच वर सांगितल्याप्रमाणे समुदायापुढें विभक्तिप्रत्यय राहत नसल्यामुळें, 'एकविभक्तौ परतः' हा पक्ष मानल्यास, एकशेष न होण्याची व 'रामौ' हे इष्ट रूप सिद्ध न होण्याची आपत्ति येते. यावर अशी शंका करण्यात येते की, 'राम राम औ' या स्थली 'राम राम' या समुदायातील अन्त्य 'अ' व त्यापुढें असणारा 'औ' हा विभक्तिप्रत्यय या दोहोंचे जागी झालेला 'औ' हा वृद्धिरूप एकादेश 'अन्तादिवच्च' सू. ७५ या सूत्रान्वयें परादिवद्भावानें 'औ' प्रत्ययच आहे असे मानता येत व त्यामुळें,

'एकविभक्तौ परत:' या पक्षात देखील, एकशेष होण्यात काही अडचण येत नाही. पण परादिवद्भावानें 'औ' हा वृद्धिरूप एकादेश प्रत्ययच आहे असे मानले तर, 'राम राम' या समुदायातील द्वितीय शब्द 'राम' अदन्त न राहता 'राम्' असा मकारान्त होईल, व अशा रीतीनें समुदायातील दोन्ही शब्द समानरूप राहणार नाहीत आणि त्यामुळें एकशेष होऊ शकणार नाही. यावर पुन्हा असे म्हणण्यात येते कीं, 'औ' हा वृद्धिरूप एकादेश पूर्वान्तवद्भावानें समुदायातील अन्त्य वर्ण 'अ' च आहे व परादिवद्भावानें ता एकादेश 'औ' प्रत्ययच आहे असे मानले असता, 'राम राम' या सरूप शब्द-समुदायापुढें 'औ' हा विभक्तिप्रत्यय आहे असे म्हणता येते व त्यामुळें एकशेष होऊ शकतो. पण हे म्हणणे बरोबर नाही, कारण 'उभयत आश्रयणे नान्तादिवत्' या भाष्यसिद्धान्तान्वयें, एकादेशाचे ठिकाणी एकेचवेळीं पूर्वान्तवद्भाव व परादिवद्भाव करता येत नाही म्हणून 'एकविभक्तौ परत' हा पक्ष स्वीकारार्ह नाही असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे सारांश दीक्षिताच्या मत 'राम राम' अशा स्थितीतच, विभक्तिप्रत्यय उत्पन्न होण्यापूर्वीच, एकशेष होतो व प्रकृत सूत्रानें एकशेष होऊन 'राम' असे रूप सिद्ध झाल्यावर त्याहून द्विवचनाचा 'औ' हा प्रत्यय उत्पन्न होतो. म्हणून प्रक्रियाकौमुदी-कारांनी 'सरूपाणा मध्ये एक एव शिष्यते नतरे एकविभक्तौ परत ' असे प्रकृत सूत्राचे जें व्याख्यान केले आहे ते योग्य नसून कौमुदीत या सूत्राचे जें व्याख्यान केले आहे तेच योग्य आहे असे दीक्षिताचे म्हणणे आहे व त्याचे असेंहि म्हणणे आहे कीं, 'एकविभक्तौ' या प्रकृत सूत्रातील पदाची द्विरावृत्ति करून आणि ते पद एकदा उद्देश्य-कोटीत व पुन्हा निमित्तकोटीत प्रविष्ट करून प्रकृत सूत्राचा अर्थ केल्यानें व 'राम राम औ इति स्थिते' असे व्याख्यान केल्याने वर सांगितल्याप्रमाणे आपत्ति उत्पन्न होत असल्यामुळें, तसे देखील करणे योग्य नाही व ते पद दोनदा न उच्चारता त्या पदाचा 'सरूपाणाम्' या पदाशीं अन्वय करून कौमुदींत जसा अर्थ केला आहे

तसाच अर्थ करणे इष्ट आहे आणि तसे केल्यानें कोणतीहि आपत्ति येत नाही.)

मनोरमा—यत्तु प्राचा व्याख्यात्रा पक्षान्तरमुपन्यस्तं सविभक्तिकानामेकशेष इति । तन्न । निवर्तमानाना विभक्त्या सहैव निवृत्तावपि शिष्यमाणे एकवचनश्रवणप्रसङ्गात् ।

अथोच्यते युगपदधिकरणवचनतायां द्विवचनबहुवचनान्तानामेकशेषः । द्वन्द्वोऽप्येवम् । तथा हि—अजहत्स्वार्थायां वृत्तौ एकैकमनेकार्थाभिधायि परस्परसमभिव्याहारात् । तथा च अलौकिके द्वन्द्वैकशेषयोः प्रक्रियावाक्ये द्विवचनबहुवचनयोरेव प्रवेशाद् विभक्त्यन्तानामेकशेष इति पक्षो निर्बाध एवेति । तदपि न । जहत्स्वार्थायां वृत्तौ तदयोगात् । पक्षान्तरेऽपि प्रथमप्रवृत्तस्यैकवचनस्य त्यागायोगात् ॥ अन्यथा षष्ठीतत्पुरुषाद्युच्छेदापत्तेः । तत्रापि पूर्वपदस्य उत्तरपदार्थे उपसर्जनेन षष्ठ्याद्ययोगात् । तथा च भाष्यम् "सेयं युगपदधिकरणवचनता दुःखा च दुरुपपादा च" इति ।

प्रकृत सूत्रावरील प्रक्रियाकौमुदीवर टीका करिताना प्रसादकारानी 'सविभक्तिकानामेकशेष' असे जें पक्षान्तर सांगितले आहे ते बरोबर नाही, म्हणजे तो पक्ष देखील स्वीकारार्ह नाही; कारण जे निवृत्त—नाहीसे—होतात ते आपापल्या पुढील विभक्तिप्रत्ययासह नाहीसे झाले तरी जो अवशिष्ट राहतो तो आपल्या पुढील विभक्तिप्रत्ययासह कायम राहील व त्यामुळें त्याच्या पुढील एकवचनाच्या विभक्तिप्रत्ययाचें श्रवण होण्याची आपत्ति येते. (प्रकृत सूत्रावरील प्रक्रियाकौमुदीचे व्याख्यान करिताना प्रसादकार म्हणतात—'एकस्यां विभक्तौ परतो यानि सरूपाणि प्रातिपदिकानि दृष्टानि तेषां मध्ये एक एव सरूप. (शिष्यते), नेतरे सरूपा इत्यर्थः । अनुत्पन्नायामेव विभक्तौ एकशेष । कृते एकशेषे विभक्त्युत्पत्तिः ।' अशा रीतीनें दीक्षिताच्या मताप्रमाणेंच असणारा प्रथम पक्ष सांगून नंतर प्रसादकार पक्षान्तर सांगताना म्हणतात—'अथवा सविभक्तिकानामेकशेषः ।

कथम् । विभज्यते अनेन प्रातिपदिकार्थः इति विभक्तिः कारकम् । परशब्द इष्टवाची । एकस्मिन् कारके परत्र इष्टे विवक्षिते यानि सरूपाणि तेषां मध्ये एक एव शिष्यते नेतर इति । कारकहि विवक्षितत्वात्स्वनिमित्ता विभक्ति जनयतीति सविभक्तिकानामेकशेष । सहविवक्षायां चायमेकशेषो नान्यथा ।' दीक्षितानी आतापर्यंत 'एकविभक्तौ परतः' या प्रथम पक्षाचे खण्डन करून प्रसादकारानी जो 'सविभक्तिकानामेकशेषः' हा द्वितीय पक्ष उपन्यस्त केला आहे त्याचे ते आता खण्डन करतात. ते म्हणतात की, हा द्वितीय पक्ष मानल्यास 'राम राम' या समुदायातील प्रत्येक 'राम' शब्दाहून 'सु' हा एकवचनाचा विभक्तिप्रत्यय केला असता, 'राम सु राम सु' अशी स्थिति होईल व या समुदायातील प्रथम 'राम सु' हा निवृत्त झाल्यावर द्वितीय 'राम सु' हा विभक्तिप्रत्ययासह अवशिष्ट राहील व त्या सुबन्ताहून 'औ' हा विभक्तिप्रत्यय उत्पन्न होऊ शकणार नाही व 'रामौ' असे इष्ट रूप सिद्ध होऊं शकणार नाही म्हणून हा द्वितीय पक्ष देखील स्वीकारार्ह नाही. ) आता येथें प्रसादकारातर्फे असे म्हणण्यात येते की, जेथें एकेच वेळी ( एकाच पदानें ) अनेक व्यक्तीचा बोध होत असतो तशा स्थली ( दोन व्यक्तीचा बोध होत असल्यास ) द्विवचनान्त पदाचा, व ( दोनपेक्षां अधिक व्यक्तीचा बोध होत असल्यास ) बहुवचनान्त पदाचा एकशेष केला जातो. इतरेतरयोगद्वन्द्वसमासात देखील असेच केलं जात असते. उदाहरणार्थ अजहत्स्वार्थावृत्तिपक्षात, प्रत्येक शब्द इतर शब्दासह एकत्र उच्चारला असल्यामुळे, अनेक अर्थांचा बोध करतो, म्हणजे स्वार्थाचा व त्याचप्रमाणें समुदायार्थाचा तो बोध करतो. म्हणून इतरेतर योगद्वन्द्व व एकशेष याचे अलौकिक प्रक्रियावाक्य तयार करिताना (समुदायातील प्रत्येक अवयवापुढें) द्विवचनाचा किंवा बहुवचनाचाच प्रत्यय करावा लागत असल्यामुळें, विभक्त्यन्तानामेकशेषः' हा पक्ष निर्दोष ठरतोच. ('चार्थे द्वन्द्वः' २-२-२९ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी 'युगपदधिकरणवचनता' या

पक्षाचा उल्लेख केला आहे व त्या माप्याच्या वृत्तीत कैयटानें 'युगपदधिकरणवचनता' या पदाचा 'युगपदेकेन शब्देन अभिकरणमभिधेय द्वन्द्ववाच्य समुदायरूप यदोच्यते तदा द्वन्द्वः' असा अर्थ दिला आहे या पक्षात इतरेतरयोगद्वन्द्वसमासघटक प्रत्येक पद समुदायाच्या अर्थाचा बोध करीत असते असे मानले जाते. उदाहरणार्थ 'घटश्च पटश्च घटपटौ' या इतरेतरयोगद्वन्द्वसमासात 'घट' या प्रथम अवयवाचा 'घटपट' असा समुदायरूप अर्थ होत असून, 'पट' या द्वितीय अवयवाचा देखील तोच अर्थ होतो. अशा रीतीनें समुदायातील अनेक शब्दांपैकी प्रत्येक शब्दाला इतर शब्दाच्या सान्निध्यामुळें समुदायातील सर्व शब्दाच्या अर्थाचे प्रतिपादन करता येणे यालाच युगपदधिकरणवचनता' अशी संज्ञा आहे. या पक्षाचा आश्रय केल्यास, 'घटपटौ' या स्थली 'घट' व 'पट' हे दोन्ही समासघटक शब्द एक घटव्यक्ति व तसेच एक पटव्यक्ति या दोन व्यक्तींचे वाचक ठरत असल्यामुळें, त्या समासाचे अलौकिक प्रक्रियावाक्य तयार करतेवेळी घट व पट या प्रत्येक शब्दाहून द्विवचनाचा प्रत्यय करणे उचित आहे. त्याचप्रमाणे ज्या पदाचा एकशेष करणे आहे त्यातून अवशिष्ट राहणाऱ्या एका पदाने ज्या सख्येचा बोध होणे इष्ट आहे त्या सख्येचो, एकशेष करण्यापूर्वी देखील, बोधक ती पदें आहेत असे या पक्षात मानता येत असल्यामुळें, एकशेषवृत्तीतील प्रत्येक घटक पदाहून अलौकिक प्रक्रियावाक्यात त्या इष्ट सख्येचा बोधक प्रत्यय करणे उचित आहे. या विषयासबधाने रत्नप्रभेंत 'येषा पदानामेकशेषः चिकीर्षितस्तानि सर्वाणि पदानि एकशेषानन्तरम् यत्सङ्ख्याकार्यबोधकत्वमेकेनाभीष्टमेकशेषात्प्रागपि तावत्सङ्ख्याकार्यबोधकानि । तथा च तेभ्यो द्विवचनबहुवचनान्येव स्युरिति भावः ।' असे म्हटले आहे. 'रामश्च रामश्च रामौ' या स्थली दोन रामव्यक्तीचा बोध करणे आहे व 'रामराम' या समुदायातील प्रत्येक 'राम' शब्द दोन व्यक्तीचा बोधक ठरत असल्यामुळें, 'राम सु राम सु' असे अलौकिक प्रक्रिया-

वाक्य न करिता 'राम औ राम औ' असे अलौकिक प्रक्रियावाक्य तयार केले पाहिजे. तसे केल्यानें, प्रथम 'राम औ' नाहीसा होऊन द्वितीय 'राम औ' अवशिष्ट राहत असल्यामुळें 'रामौ' असे इष्ट रूप सिद्ध होण्यात काही अडचण येत नाही. तसेच 'रामश्च रामश्च रामश्च रामा.' या स्थली दोनपेक्षा अधिक रामव्यक्तीचा बोध करणे असल्यामुळें, समुदायातील प्रत्येक घटकाहून बहुवचनाचा 'जस्=अस्' प्रत्यय केला असता, जो अवशिष्ट राहतो तो 'राम अस्' या स्वरूपाचा असल्यामुळें, 'रामाः' असे इष्ट रूप सहज सिद्ध होऊ शकते. अजहत्स्वार्थावृत्तिपक्षात समासातील व एकशेषवृत्तीतील प्रत्येक अवयव स्वार्थाचा व तसेच समुदायाच्या अर्थाचा बाधक होत असल्यामुळे, वरील पक्ष दोषरहित ठरतो असे शकाकाराचे म्हणणे आहे. या शकेवर दीक्षित असे उत्तर देतात की,) हे म्हणणे देखील बरोबर नाही, कारण जहत्स्वार्थावृत्तिपक्षात द्विवचनबहुवचनाचा प्रत्यय करता येऊ शकत नाही. (जहत्स्वार्थावृत्तिपक्षात समुदायातील प्रत्येक अवयव आपापल्या अर्थाचा परित्याग करीत असल्यामुळे व समुदाय हाच विशिष्ट समुदायशक्तीनें अर्थबोधक ठरत असल्यामुळे आणि अशा रीतीनें समुदायातील प्रत्येक अवयव अखेरीस अर्थरहित ठरत असल्यामुळें त्याला, अर्थवत्तेच्या अभावामुळें प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकत नाही व त्यामुळे त्याहून सुबुत्पत्ति होऊ शकत नाही. म्हणून या जहत्स्वावृत्तिपक्षात 'विभक्त्यन्तानामेकशेषः' हे म्हणणें मुळीच संभवत नाही. ) पक्षान्तर मानले तरी, म्हणजे अजहत्स्वार्थावृत्तिपक्ष मानला तरी, त्या पक्षात प्रथम झालेल्या एकवचनाच्या प्रत्ययाचा त्याग करता येत नाही, म्हणजे तो प्रत्यय नाहींसा करता येऊ शकत नाही. *( अजहत्स्वार्थावृत्तिपक्षात अलौकिक प्रक्रियावाक्यातील* प्रत्येक अवयव आपल्या अर्थाचा परित्याग न करिता प्रथम आपल्या अर्थाचा बोध करून नंतर पुढें स्वार्थसमवेत समुदायातील इतर अवयवाच्या अर्थाचा बोधक होत असल्यामुळें, त्याच्या स्वत:च्या

सख्यारूप अर्थाला अनुरूप असा विभक्तिप्रत्यय प्रथम केल्यानतरच समुदायाच्या सख्यारूप अर्थाचा बोधक विभक्तिप्रत्यय पुढे करता येतो त्यामुळे दोन रामव्यक्तीचा बोध करणे झाल्यास, प्रथम 'राम सु राम सु' असा प्रत्येक अवयवाहून एकवचनाचा विभक्तिप्रत्यय केल्यानतरच समुदायातील प्रत्येक अवयवाहून समुदायाच्या सख्येचा वाचक 'औ' हा द्विवचनाचा विभक्तिप्रत्यय करता येतो तस केल्यास, 'राम सु औ', राम सु औ' अशी स्थिति झाल्यावर एकशेष केला असता 'राम सु औ' असा जो एक भाग अवशिष्ट राहता त्याचे 'रामौ' असे इष्ट रूप सिद्ध करता येणे शक्य नाही; कारण 'राम' व 'औ' या दोहोमध्ये 'सु' प्रत्यय आहे व त्या 'सु' प्रत्ययाचा लोप कोणत्याहि पाणिनीय सूत्रान्वये करता येणे शक्य नाही व त्यामुळे 'वृद्धिरेचि' हे सूत्र प्रवृत्त होऊ शकत नाही समुदायातील प्रत्येक शब्द समास किंवा एकशेष केल्यावर अखेरीस ज्या समुदायार्थाचा वाचक होतो त्याच अर्थाचा वाचक तो शब्द समास किंवा एकशेष करण्यापूर्वी देखील असतो असे मानल्यास ) षष्ठीतत्पुरुष इत्यादि समासाचा उच्छेद होण्याची, म्हणजे ते समास व्यर्थ ठरण्याची व न होण्याची आपत्ति येईल, कारण तशा तत्पुरुषसमासात देखील पूर्व पदाचा अर्थ उत्तर पदाच्या अर्थामध्ये मिसळून अर्थबोध करीत असल्यामुळे, (' उक्तार्थानामप्रयोग.' या न्यायान्वये) पूर्व पदाहून षष्ठी इत्यादि विभक्तीचे प्रत्यय करता येऊ शकणार नाहीत. ('राज्ञ. पुरुष राजपुरुषः' या स्थली 'राजन्' हे पूर्वपद 'राजसबधी' या अर्थाने 'पुरुष' या उत्तर पदाच्या अर्थामध्ये अन्वित होत असल्यामुळे व अशा रीतीने ते पूर्वपद षष्ठीचा जो अर्थ सबध तो, वरील पक्ष मानला असता, पूर्वीपासूनच सागत आहे असे मानावे लागत असल्यामुळे, 'उक्तार्थानामप्रयोगः' या न्यायान्वये 'राजन्' या पूर्व पदाहून, पुन्हा तोच सबधरूप अर्थ बोधित करण्याकरिता, षष्ठीविभक्तीचा 'ङस्' प्रत्यय करता येऊ शकत नाही व त्यामुळे षष्ठीतत्पुरुष न होण्याची आपत्ति येते. 'राजसम्बन्धी पुरुषः' अशा

रीतीनें 'राजन्' या पूर्व पदाचा 'पुरुष' या उत्तर पदाच्या अर्था-मध्यें समास करण्यापूर्वीच सामानाधिकरण्यानें अन्वय होतो असे वरील पक्षान्वयें मानल्यास, सामानाधिकरण्य दर्शविण्याला अनुकूल-योग्य–असा 'सु' प्रत्यय 'राजन्' शब्दाहून करावा लागेल व तसें केल्यास, षष्ठीतत्पुरुषसमास न होता कर्मधारयसमास होण्याची आपत्ति येईल. ही आपत्ति टाळण्याकरिता, हें मानणें आवश्यक आहे की, समुदायाच्या प्रत्येक शब्दाहून त्याच्या स्वतःच्या अर्थाला अनुकूल असाच विभक्तिप्रत्यय करता येतो व समास होण्यापूर्वी समुदायाच्या सस्याकारकरूप अर्थाचा वाचक विभक्तिप्रत्यय समुदायातील प्रत्येक अवयवाहून करता येत नाहीं. असें मानलें असता, 'राजपुरुषः' या स्थलीं 'राजन् सु पुरुष सु' असें अलौकिक प्रक्रियावाक्य न होता 'राजन् ङस् पुरुष सु' असें अलौकिक प्रक्रियावाक्य तयार होऊन षष्ठीतत्पुरुषसमास होण्यात काहीं अडचण येत नाही त्याच-प्रमाणें 'रामश्च रामश्च रामौ' या एकशेषवृत्तीतील प्रत्येक 'राम' हा अवयव मूळचा एक व्यक्तीचा वाचक असल्यामुळें, त्याहून 'औ' प्रत्यय करता येत नाही व 'सु' प्रत्ययच करता येतो आणि तसें केल्यास, 'राम सु राम सु' अशी स्थिति झाली असता, 'राम सु' हा जो एक भाग अवशिष्ट राहतो त्याचें 'रामौ' असें इष्ट रूप होऊं शकत नाहीं. सारांश युगपदधिकरणवचनतापक्षाचा आश्रय करून 'विभक्त्यन्तानामेकशेषः' या पक्षाचा पुरस्कार करणें अयोग्य ठरतें. युगपदधिकरणवचनतापक्ष मानल्यास अनेक अडचणी व आपत्ति उत्पन्न होत असल्यामुळेंच, भाष्यकारांनी 'चार्थे द्वन्द्वः' सू. २. २. २९ या सूत्रावरील भाष्यात त्या पक्षाचा उहापोह करून अखेरीस 'सेयं युगपदधिकरणवचनता दुःखा च दुरुपपादा च,' म्हणजे युगपदधिकरणवचनतापक्ष अत्यन्त क्लिष्ट व मनास केव्हांहि न पटणारा आणि प्रमाणांनी सिद्ध न करता येऊं शकणारा पक्ष आहे, असें भाष्यांत म्हटलें आहे.

मनोरमा–यद्यपि व्याचख्युः–व्यक्तिपक्षे यावद्व्यक्ति तत्तच्छब्दप्रयोगे प्राप्ते एकस्यैव प्रयोगो यथा स्यादिति सूत्रम् ।

आकृतिपक्षे तु एकेनैवाकृत्यविनाभूतानेकव्यक्तिलाभादनर्थकमिति । तन्न । व्यक्तिपक्षेऽपि "न ब्राह्मणं हन्यात्" इत्यत्र ब्राह्मणशब्देनैकेनापि अनेकस्य तन्त्रेण सुवचत्वात् । अन्यथा जातिपक्षेऽपि "वासेन सम्यक्क्षमयोश्च तस्मिन्" इत्यादिनानार्थानुरोधेन सूत्रं विना ऽनिर्वाहात् । तस्माज्जातिव्यक्तिपक्षयोरुभयोरपि तंत्रेण प्रयोगानिर्वाहेऽपि सर्वत्र तन्त्रेणैव बोधनीयमिति नियामकाभावात्पाक्षिको द्वन्द्वः सूत्रं विना दुर्वारः । घटोऽयं घटोऽयमिति नानाशब्दप्रयोगदर्शनात्, तद्वद्घटघटाविति द्वन्द्वस्य न्यायप्राप्तत्वात् । न चैवमपि घटकलशाविति द्वन्द्वापत्तिः । "विरूपाणामपि समानार्थानाम्" इति वार्तिकात्, रूप्यते बोध्यते इति व्युत्पत्त्या रूपशब्दस्य अर्थपरत्वमाश्रित्य वार्तिकार्थस्यापि सूत्रेणैव क्रोडीकाराच्च । तस्माद्घटघटौ घटकलशावित्यादिपाक्षिकानिष्टवारणाय पक्षद्वये ऽपि सूत्रमावश्यकमित्यवधेयम् ।

प्रकाशकार असे व्याख्यान करितात की, व्यक्तिपक्ष मानल्यास, म्हणजे शब्द हा जातीचा बोधक नसून केवळ व्यक्तीचा बोधक आहे हा पक्ष मानल्यास, (वाक्यप्रयोग करतेवेळी जितक्या व्यक्तींचा बोध करणे अभिप्रेत असेल तितक्या सर्व व्यक्तींपैकी) प्रत्येक व्यक्तीकरिता एक एक शब्दाचा प्रयोग करण्याचा प्रसंग आला असता, त्या सर्व व्यक्तींकरिता एकाच शब्दाचा प्रयोग करता यावा याकरिता प्रकृत सूत्र आरंभिले आहे पण जातिपक्ष मानल्यास, म्हणजे शब्द हा व्यक्तीचा बोधक नसून जातीचा बोधक आहे हा पक्ष मानल्यास, जाति ही व्यक्तीशिवाय राहू शकत नसल्यामुळे, एक शब्द उच्चारला तरी जातीत अन्तर्भूत असलेल्या अनेक व्यक्तींचा बोध होत असल्यामुळें, जातिपक्षात प्रकृत सूत्र व्यर्थ ठरते. पण हे त्यांचे म्हणणे देखील बरोबर नाही; कारण व्यक्तिपक्ष मानला तरी, 'न ब्राह्मणं हन्यात्' या वाक्यातील एकवचनात उच्चारलेल्या 'ब्राह्मण' या शब्दानें देखील अनेक ब्राह्मणव्यक्तींचा तन्त्रानें सहज बोध होऊ शकतो ('सकृदुच्चरितस्यानेकार्थबोधपरकत्वम् = एकोच्चारणेनान-

कार्यबाधनम् ' अशी व्याकरणशास्त्रांत ' तन्त्र ' या शब्दाची व्याख्या आहे. हें तन्त्र या शास्त्रांत दोन प्रकारचें मानलें आहे (१) अर्थ-तन्त्र, व (२) शब्दतन्त्र. जेथें शब्दाचा एकच अर्थ असून तो शब्द उच्चारला असता, प्रवृत्तिनिमित्त एकच असल्यामुळें, अनेक व्यक्तींचा बोध होतो त्याला अर्थतन्त्र म्हणतात. उदाहरणार्थ ' घटा ' किंवा ' ब्राह्मणा ' हा शब्द उच्चारला असता, अनेक घटांचा किंवा ब्राह्मणांचा अनुक्रमें बोध होतो. जेथें एकाच शब्दाचे अनेक अर्थ असून तो शब्द उच्चारला असतां, त्याच्या अनेक अर्थांचा बोध होतो त्याला शब्दतन्त्र म्हणतात. उदाहरणार्थ ' अक्ष ' हा शब्द बेहडा, द्यूत खेळण्याचे फासे, आस्कूड इत्यादि अनेक अर्थांचा वाचक असल्यामुळें, ' अक्षा ' असा प्रयोग केल्यास त्या सर्व अर्थांचा बोध होतो. सारांश जेथें एकच प्रवृत्तिनिमित्त असतें तेथें अर्थतन्त्र व जेथें भिन्न भिन्न प्रवृत्तिनिमित्तें असतात तेथें शब्दतन्त्र असा या दोन प्रकारच्या तन्त्रांत फरक आहे ) तन्त्र न मानल्यास, जातिपक्षांत देखील ' वासन सम्यक् क्षमयोश्च तस्मिन् ' इत्यादि स्थलीं जेथें अनेकार्थवाचक शब्दाचा प्रयोग आढळतो तेथें प्रकृत सूत्र मानल्या-शिवाय तशा प्रयोगाची उपपत्ति लावतां येऊं शकत नाहीं. (' वासन सम्यक् क्षमयोश्च तस्मिन् ' या वाक्यांत ' क्षमा ' हा शब्द द्व्यर्थी असून त्या शब्दाचे शान्ति व पृथ्वी हे दोन अर्थ आहेत व ' त्याने ठिकाणी शान्ति व पृथ्वी या दोहोंचाहि उत्तम रीतीनें निवास असल्यामुळें ' असा त्या वाक्याचा अर्थ आहे. येथें जातिपक्ष मानला तरी, प्रकृत सूत्र असल्यानेंच ' क्षमा च क्षमा च क्षमे तयोः क्षमयोः ' या रूपनयाची उपपत्ति लागते. येथ

र्थस्य बहूनां शब्दानां प्रसङ्ग एव नास्ति। तत् किमेकशेषारम्भेण। व्यक्तिपक्षेऽप्यनेकार्थाभिधानसामर्थ्यं व्याद्यिवदभ्युपेयम्। उच्यते। जातिपक्षेप्यक्षा इत्यादावनेकशब्दत्वं स्यात्। न हि बिभीतकदेवनशकटाक्षेष्वनुस्यूतं किञ्चित् सामान्यमस्ति। व्यक्तिपक्षेऽपि वृक्षश्च-वृक्षश्चेति वाक्येऽनेकशब्ददर्शनाद् विरूपेषु द्वन्द्वदर्शनादनेकेषामर्थानामेकेन शब्देनाभिधानमशक्यमिति यावन्तस्तेऽर्थास्तावतां शब्दानां प्रयोगं प्राप्नोति। इष्यते चैकशब्दत्वम्। तस्मादेकशेष आरभ्यते'। या वरील उताऱ्यावरून हे स्पष्ट होते की, जातिपक्षात देखील प्रकृत सूत्र असणं आवश्यक आहे असेच दीक्षितांच्या मतासारखेंच प्रसादकाराचें मत आहे पण या विरुद्ध प्रकाशकाराचे असे मत आहे की, जातिपक्ष मानल्यास प्रकृत सूत्र असण्याची काही आवश्यकता नाही, व हे त्याचे मत खोडून काढण्याकरिताच दीक्षितांनी 'वासेन सम्यक् क्षमयोश्च तस्मिन्' हे उदाहरण दिले आहे ) म्हणून जातिपक्ष मानला किंवा व्यक्तिपक्ष मानला तरी त्या दोन्ही पक्षात एकशेषाच्या प्रयोगाचे तन्त्राच्या योगाने समर्थन करता येते तरी, सर्वत्र तन्त्रानेंच बोध करावा असे नियामक शास्त्र नसल्यामुळे, प्रकृत सूत्र नसल्यास, विकल्पानें द्वन्द्व होण्याची आपत्ति टाळता येणें अशक्य आहे ('अक्षा' किंवा 'घटा' असा प्रयोग जसा तन्त्रानें करता येतो त्याचप्रमाणें वाक्यप्रयोग न करिता विकल्पेंकरून सामासिक शब्दाचा प्रयोग केल्यास, 'अक्षाक्षाक्षा घटघटघटा' अशी इतरेतरयोगद्वन्द्वसमासाची अनिष्ट रूपें होण्याची आपत्ति येईल अशा स्थली इतरेतरयोगद्वन्द्व न होता एकशेषच व्हावा याकरिता प्रकृत सूत्र मुद्दाम आरंभिले आहे ) 'घटोय घटोयम्' इत्यादि अनेकशब्दयुक्त प्रयोग जसे भाषेत आढळतात त्याचप्रमाणे 'घटघटौ' असा इतरेतरयोगद्वन्द्वाचा प्रयोग देखील न्यायत प्राप्त होतो, म्हणजे वाक्याचा प्रयोग न करिता विकल्पेंकरून सामासिक शब्दाचा प्रयोग करणे झाल्यास, तसा अनिष्ट प्रयोग होण्याची आपत्ति येते (व तसा अनिष्ट प्रयोग न व्हावा याकरिताच प्रकृत सूत्र आरंभिले आहे.) समानरूप

शब्दाचाच एकशेष होऊं शकतो असे मानल्यास, 'घटकलशौ' असा इतरेतरयोगद्वन्द्वसमास होण्याची आपत्ति येते असे कोणी म्हटल्यास, ते म्हणणे बरोबर नाही; कारण 'विरूपाणामपि समानार्थानाम्', म्हणजे शब्दाचीं रूपें जरी भिन्न असली तरी त्यांचा अर्थ एकच असल्यास एकशेष होतो, असे वार्तिक आहे (व त्यामुळें 'घटकलशौ' असें सामासिक रूप न होता 'घटौ' किंवा 'कलशौ' असें एकशेषाचें रूप होतें. प्रकृत सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनी 'एकार्थानामपि विरूपाणाम्' असें वार्तिक पठित करुन त्या वार्तिकाचे व्याख्यान करिताना 'एकार्थानामपि विरूपाणामेकशेषो वक्तव्यः । वक्रदण्डश्च कुटिलदण्डश्च वक्रदण्डौ कुटिलदण्डाविति वा' असें म्हटलें आहे.) दुसरें असें की, प्रकृत सूत्रांतील 'सरूपाणाम्' या पदांत जो 'रूप' शब्द आहे त्याची 'रूप्यते बोध्यते इति रूपम्' अशी व्युत्पत्ति करून तो शब्द 'अर्थ' याचाहि वाचक आहे असे मानल्यास, म्हणजे 'सरूपाणाम्' या पदाचा 'समानरूपाणाम्' एवढाच अर्थ न करिता 'समानार्थानाम्' असा देखील अर्थ केल्यास, वरील वार्तिकानें सांगितलेला अर्थ प्रकृत सूत्रांतूनच निघू शकतो (व त्यामुळें वरील वार्तिक मानण्याची कांही आवश्यकता राहून नाही.) म्हणून 'घटघटौ, घटकलशौ' इत्यादि पाक्षिक अनिष्ट रूपें न व्हावीं, याकरिता जातिपक्ष व व्यक्तिपक्ष या दोन्ही पक्षांत देखील प्रकृत सूत्र असणें आवश्यक आहे हें जाणावें.

मनोरमा—एवं स्थिते सूत्रवैयर्थ्यमेव हृदि निधाय यदिह व्याचख्युः—नानेनैकशेषो विधीयते इत्यादि । यच्च समुदायादेकस्मा विभक्ताविति पक्षं प्रत्याहयाय पुनराहुः । राम राम औ इति स्थिते इति । अलौकिकमेतत्प्रक्रियावाक्यमूह्यते न तु लौकिकम् । अलौकिके च विभक्त्यंकादेशादिकार्यं न प्रवर्तते । प्रयुक्तानामेवान्वाख्यानादित्यादि । तत्सर्वं सन्दर्भविरुद्धं न्यायविरुद्धं च । प्रयुक्तानेव ह्यन्वाख्यातुमलौकिकमुत्प्रेक्ष्यते । शास्त्रीयकार्यं च सर्वमलौकिकेष्वेव प्रवर्तते न तु परिनिष्ठिते । "प्रथमयोः पूर्वसवर्णः" इत्यादीना

**प्रवृत्ति विना परिनिष्ठितरूपालाभात् । परिनिष्ठितें तत्प्रवृत्तेर्दुरुपपादत्वाच्चेत्यास्तान्तावत् ।**

अशा रीतीने जातिपक्षात व व्यक्तिपक्षात प्रकृत सूत्र आवश्यक ठरत असून देखील, हे सूत्र निरर्थक आहे हा आशय मनात धरून प्रकाशकारांनी असें व्याख्यान केले आहे की, प्रकृत सूत्र एकशेषाचे विधान करणारे सूत्र नव्हे (व जे न्यायत प्राप्त आहे त्याचाच केवळ अनुवाद करणारे हे सूत्र आहे ) यानतर 'समुदायादेकस्या]विभक्तौ परत ' या पक्षाचे प्रत्याख्यान करून पुन्हा प्रकाशकार 'राम राम औ इति स्थिते' असे म्हणतात, म्हणजे ज्या पक्षाचे त्यानी प्रत्याख्यान केले आहे तोच पक्ष स्वीकारून त्याचे व्याख्यान करितात, व पुढे ते असें म्हणतात की, 'राम राम औ' अशा प्रकारचें अलौकिक प्रक्रियावाक्य (एकशेष कर्तव्य असता) कल्पिले जाते, लौकिक विग्रहवाक्य कल्पिलें जात नाही अलौकिक प्रक्रियावाक्यात विभक्तिप्रत्ययाचे जागी एकादेश इत्यादि कार्यें करता येऊ शकत नाहीत, कारण लौकिक प्रयोगात जी रूपे आढळतात त्यांचेच अन्वाख्यान केले जाते पण हे त्याचे सर्व म्हणणे सदर्भविरुद्ध व न्यायविरुद्ध आहे लौकिक प्रयोगात आढळणाऱ्या रूपाचे अन्वाख्यान करण्याकरिताच अलौकिक प्रक्रियावाक्य कल्पावे लागते, म्हणजे सिद्धपदाची शकले पाडून प्रकृतिप्रत्ययविभाग करावा लागतो, व ज्या ज्या शास्त्रीय कार्याची प्राप्ति होते ती सर्व कार्यें अलौकिक प्रक्रियावाक्यातच करावी लागत असतात परिनिष्ठित शब्दस्वरूपात त्या कार्याची प्राप्तीच होत नाही 'प्रथमयोः पूर्वसवर्ण' सू. १६४ इत्यादि सूत्राची प्रवृत्ति केल्याशिवाय परिनिष्ठित रूपाची सिद्धि होऊ शकत नाही परिनिष्ठित रूपाचे ठिकाणी त्या कार्याची प्रवृत्ति होते हे म्हणणे कोणत्याहि प्रमाणानें सिद्ध करता येऊ शकत नाही. या विषयासबधानें एवढें म्हणणे पुरे (प्रकाशकाराचे असें म्हणणे आहे की, 'सकृदुच्चरित शब्द सकृदेवार्थं गमयति' या वचनान्वयें प्रत्येक शब्द एकच अर्थ बोधित करू शकत असल्यामुळें, जितके अर्थ

बोधित करणें अनिप्रेत आहे तितक्या शब्दाचा उपयोग करणें आवश्यक आहे हा पक्ष मानल्यास, दोन रामव्यक्तींचा बोध कर्तव्य असता, 'राम' हा शब्द दोनदा उच्चारणें भाग आहे व प्रकृत सूत्रानें एकशेष करून दोन 'राम' शब्दांतून एक शब्द नाहीसा केला व बाकीचा एक शब्द कायम ठेवला तर जो एक 'राम' शब्द अवशिष्ट राहतो त्यांत वरील वचनान्वयें एकच रामव्यक्तीचा बोध करून देण्याची शक्ति असल्यामुळें, एकशेष केला तरी, अनिप्रेत असलेल्या दोन रामव्यक्तींचा बोध न होता एकच रामव्यक्तीचा बोध होणार प्रकृत सूत्राच्या मानण्यानें, एकशेष करून अवशिष्ट राहिलेला शब्द, जितक्या व्यक्तींचा बोध करणें अनिप्रेत आहे तितक्या व्यक्तींचा बोध त्याहून इष्ट वचनाचा, म्हणजे द्विवचनाचा किंवा बहुवचनाचा, प्रत्यय केल्यानें, करू शकतो असें कोणी म्हटल्यास, त्यावर प्रकाशकाराकडून असें उत्तर देण्यात येतें की, जर शब्दांत एक व्यक्तीपेक्षा अधिक व्यक्तींचा बोध करण्याची शक्तीच नाही तर ती शक्ति, प्रकृत सूत्रासारखीं कितीहि वचनें केली तरी, त्या शब्दात उत्पन्न करता येणें शक्य नाही. म्हणून एकशेष केल्यानें इष्ट हेतु सिद्ध होऊं शकत नसल्यामुळें एकशेष करून फायदा काय ? जर एक शब्द उच्चारला असता अनेक अर्थांची उपस्थिति होणें हा पक्ष मानला तर, अनेक व्यक्तींचा बोध करण्याकरिता एक शब्द अनेकदा उच्चारण्याची गरज पडत नाही व त्यामुळें एकशेषाची प्राप्तीच होत नाही. म्हणून एकशेषाचें प्रकृत सूत्र व्यर्थ ठरतें. त्यामुळें प्रकृत सूत्र विधायक सूत्र नसून जें न्यायप्राप्त आहे, म्हणजे एकच शब्द उच्चारल्यानें अनेक व्यक्तींचा, योग्य विभक्तिप्रत्यय लावला असता, जो बोध करून देता येतो, त्याचा केवळ अनुवाद करणार प्रकृत सूत्र आहे असेंच मानलें पाहिजे असा प्रकाशकाराच्या म्हण-ण्याचा आशय आहे. हा त्याचा आशय भावप्रकाश टीकेंत सुंदर रीतीनें व्यक्त केला आहे. भावप्रकाशकार म्हणतात. 'यद्येकैवार्थ

निवेशिन' शब्दास्तत्कथमितरनिवृत्तौ शिष्यमाणादेकस्मात्तद्‌द्वयादि-प्रतीति ?। किं चैकस्यानेकार्थत्वं सूत्रतः स्वभावतो वा ? नाद्य:. न हि स्वतोऽसती शक्तिर्वचनशतेनाप्युत्पादयितुं शक्या । अन्त्ये त्वेकस्यैवानेकार्थोपस्थानसमर्थत्वान्नानेकप्रयोगप्रसङ्ग इति किमेकशेषारम्भेण।' मग जर प्रकाशकाराच्या मते प्रकृत सूत्र अनावश्यक आहे तर 'राम राम औ इति स्थिते' अशा रीतीनें व्याख्यान करण्याची त्याना काय गरज होती ? तरा तन्हेचे व्याख्यान करण्यास प्रवृत्त होणें हे एक प्रकारे प्रकृत सूत्राची आवश्यकता कबूल करण्यासारखेंच होय 'समुदायादेकस्या विभक्तौ परत' या पक्षाचे समर्थन करण्याकरिता तसे म्हटले आहे असे जर त्याचे म्हणणे असेल तर, त्या पक्षाचे तर त्यानी पूर्वी प्रत्याख्यान केलें आहे. म्हणून असे मानावे लागेल की, प्रथम प्रत्याख्यान करून पुढें त्याच पक्षाचा ते स्वीकार करितात व त्या पक्षाचे समर्थन करण्याकरिता व्याख्यान करितात. अशा रीतीने त्याच्या कृतीत पूर्वापर विरोध येत असल्यामुळें, त्याचे म्हणणे सन्दर्भविरुद्ध ठरते असे दीक्षिताचे म्हणणे आहे. तसेच प्रकाशकाराचे म्हणणे न्यायविरुद्ध ठरते असें जे दीक्षितानी म्हटलें आहे त्याचे हे कारण आहे की, 'अलौकिके च विभक्त्येकादेशादिकार्यं न प्रवर्तते' असे प्रकाशकारानी आपल्या टीकेत म्हटले आहे 'रामश्च रामश्च रामौ' याचे 'राम राम औ' असे अलौकिक प्रक्रियावाक्य ते तयार करितात असे प्रक्रियावाक्य तयार केल्यास, पूर्वी सांगितल्याप्रमाणे परत्वामुळे व नित्यत्वामुळे 'वृद्धिरेचि' सू. ७२ या सूत्राने जें वृद्धिरूप एकादेशकार्य प्रथम प्राप्त होते ते प्रथम केले असता, 'रामरामौ' अशी स्थिति झाल्यावर समुदायापुढे विभक्तिप्रत्यय राहत नसल्यामुळें, 'समुदायादेकस्या विभक्तौ परत' हा पक्ष मानल्यास, एकशेष होऊ शकत नाही व 'रामौ' असे इष्ट रूप सिद्ध होऊ शकत नाही यावर प्रकाशकारातर्फे असे म्हणण्यात येते की, अलौकिक प्रक्रियावाक्यात विभक्त्येकादेशादि कार्ये होत नाहीत

व परिनिष्ठित रूपाचे ठिकाणी, म्हणजे 'राम राम औ' या स्थली एकशेष केल्यावर 'राम औ' अशी स्थिति झाली असता, वृद्धिरूप एकादेशकार्य केले जाते मग जर असे आहे तर अलौकिक प्रक्रिया-वाक्य तरी कशाकरिता तयार केले जाते ? वास्तविक परिनिष्ठित—लौकिक प्रयोगार्ह — रूपाच्या सिद्धीकरिताच अलौकिक प्रक्रियावाक्य तयार केले जात असते व जी जी शास्त्रीय कार्ये प्राप्त होतात ती सर्व त्या प्रक्रियावाक्यातच केली जातात व ती सर्व कार्ये त्या प्रक्रियावाक्यात केल्याशिवाय लौकिक प्रयोगार्ह रूप सिद्ध होणे कसे शक्य आहे ? परिनिष्ठित रूपाचे ठिकाणी ती कार्ये करावी असे म्हटल्याने, जी कार्ये प्राप्त होतात ती सर्व केल्याशिवाय रूपाचे ठिकाणी परिनिष्ठितत्व—प्रयोगार्हत्व—येणार कसे ? म्हणून अलौकिक प्रक्रियावाक्यातच, जी जी कार्ये प्राप्त आहेत ती सर्व कार्ये करून इष्ट रूपाची सिद्धि केली पाहिजे, कारण इष्ट रूप कसे सिद्ध होते हे प्रदर्शित करण्याकरिताच ते वाक्य प्रकृतिप्रत्ययविभाग करून तयार केले जात असते. तेव्हा वर मानिल्याप्रमाणे प्रकाशकाराचे म्हणणे सन्दर्भविरुद्ध व तसेच न्यायविरुद्ध ठरत असल्यामुळे त्याज्य ठरते असा दीक्षितांचा म्हणण्याचा आशय आहे )

शब्दरत्न — इति भाव इति । एतावतैव द्वन्द्वापवाद एकशेष इति व्यवहार इति भावः । एतेनैकशेषारम्भफलमपि निरूपितं द्वन्द्वनिवृत्तिरूपम् । उत्तरसूत्रस्यस्येति । "वृद्धो यूना—" इतीत्यर्थः । अनुपर्णादिति । अनुपश्चात्कर्णाद्वाकर्णादित्यर्थः । क्वचिदपकर्णादित्यपि पाठः । नैकशेष इति । न्यायादत्रापीत्यर्थः । न्यामि स्त्रीपुंसयोस्तान्यामित्यनुप्रयोगस्य समत्वात् । एतेनानुप्रयोगविरोधादत्र नैकशेष इत्यपास्तम् । "पुमान्स्त्रिया" इत्येकशेषोऽपि न । तत्राप्येकविभक्तौ सरूपाण्येवेत्यनुवृत्ते । अतएव "प्रातिपदिकैकशेषे मातृमात्रोः प्रतिषेधो वक्तव्य" इति वार्तिककृतोक्तम् । ननु वार्तिके प्रातिपदिकैकशेष इत्ययुक्तम् । विभक्त्यन्तानामेकशेषेऽपि जननीमातृधान्यमात्रर्थके मातृभ्यां देहि मातृभ्यां

चेत्यत्र प्रतिषेध आवश्यक । नच तत्पक्षे इष्टापत्तिः । " किमुच्यते प्रातिपदिकानामेकशेष इति न पुनर्यस्यापि विभक्त्यन्तानामेकशेषस्ते-नापि प्रतिषेधो वक्तव्यस्तस्यापि ह्येतानि क्वचिद्विभक्त्यन्तानि सरूपाणि मातृभ्या चेति । अथ मतमेतद्विभक्त्यन्तानां साद्रूप्ये भवितव्यमेकशेषेण " इति भाष्योक्तेरिति वाच्यम् । सूत्रव्याख्यान-पक्षभेदेनैकलक्ष्यस्य साधुत्वासाधुत्वयोरनौचित्यात् । अत एवाथ मतमेतदिति प्रतीकमुपादायाभ्युपगमवादेन स्वेतदुच्यते इति कैयटादि-भिर्व्याख्यातमिति चेन्न । ईदृशविरुद्धमभ्युपेत्यैव वार्तिके तदुक्ते ! अतएव तदुत्तरमेव च कृत्वा चोद्यते,' इत्युक्त भाष्ये । अस्य प्रातिपदिकानामेकशेष इत्यादीति शेष । अनेनचास्य पूर्वपक्षवार्तिकत्व स्फुटमेवोक्तम् । तत्र मातृग्रहण विभक्तौ विरूपाणामुपलक्षणम् । अथ पूर्वपक्ष प्रातिपदिकैकशेषस्य "एकविभक्तौ" इति पदाभावे ए-षोपपत्ति मत्वा कृत । तदभावे हि यानि सरूपाणि तेषामेकशेष एवेत्यर्थ एव प्राप्नोति । प्रयोगमात्रावच्छेदेन साद्रूप्यस्य हरिणहरित प्रकृतिकहरिणीशब्दादौ तद्धिते वैरूप्येणासम्भवात्प्रयोगसामानाधि-करण्येनैव साद्रूप्यस्य ग्राह्यतया तस्यात्रापि सत्वात्प्राप्तस्य स निषेध ।' अत एवाग्रे विभक्ते साद्रूप्ये उपलक्षणत्वमाश्रित्य तत्पक्षस्थापनेन तत्खण्डन कृतमित्येवकारापकर्षो भाष्ये ध्वनित । ॥ विना तावन-मात्रेण तत्खण्डनायोगात् । एतेन "एकविभक्तौ" इत्यास्यैव विभक्तौ सरूपाणामेव विभक्तौ विवक्षितायामेकशेष इत्यर्थ यस्या विभक्ता-वेकशेषस्तस्या (१) विभक्तौ सरूपाणामित्यर्थस्य प्रत्यासत्त्या लाभेन भ्यामादावेकशेषो नौजसादाविति वार्तिक व्यर्थमिति तदाशय इत्यपा स्तम् । वार्तिकमते भ्यामादावपि तदभावस्य प्राप्तत्वाच्चेति दिक् ॥

'द्वन्द्वस्याप्राप्तिरेव फलिता भवतीति भाव ' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्यावरूनच एकशेष हा द्वन्द्वाचा अपवाद आहे हा व्यव-हार सिद्ध होतो व त्या पक्षीत एकशेषाचे प्रकृत सूत्र आरभिण्याचे, द्वन्द्वाची निवृत्ति होणें, हे फल देखील सांगितले आहे ( साराश सुबुत्पत्ति होण्यापूर्वी एकशेषाची प्राप्ति होत असून त्यावेळी द्वन्द्वाची

प्राप्तीच होत नसल्यामुळें, एकशेष केल्यावर जो एक शब्द अवशिष्ट राहतो त्याहून सुबुत्पत्ति केल्यानें एकच सुबन्त पद राहत असून, द्वन्द्वसमास कर्तव्य असता अनेक सुबन्त पदें असणें आवश्यक असल्यामुळें, एकशेष केल्यानतर द्वन्द्वाची प्राप्तीच होत नाही व अशा रीतीनें एकशेष द्वन्द्वाचा बाधक ठरतो. 'उत्तरसूत्रस्यैवकारस्येहानुकर्षणात्' या मनोरमेच्या पङ्क्तीतील 'उत्तरसूत्र' या पदानें 'वृद्धो यूना' या उत्तर सूत्राचे ग्रहण होतें मनोरमेंत 'अनुकर्षणात्' हें जे पद वापरलें आहे. त्याचा 'अनु पश्चात्, कर्षणात् आकर्षणात' असा अर्थ आहे. (जरी 'अनुकर्षण' हा शब्द 'अनुवृत्ति' या अर्थात रूढ आहे तरी त्या शब्दाचा दीक्षितानी त्या रूढ अर्थानं प्रयोग न करिता 'जें पुढें आहें त्याला मागें ओढून आणणें' या यौगिक अर्थामध्यें प्रयोग केला आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.) मनोरमेच्या काही प्रतीत ('अनुकर्षणा'त् याच्या ऐवजी ) 'अपकर्षणात्' असा देखील पाठ आढळतो ( पण या दोन्ही पाठाचा अर्थ एकच आहे.) 'तेन मातृशब्दयोर्जननीवाचिपरिच्छेत्तृवाचिनोर्नैकशेष' असें जे मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा अर्थ हा आहे की, 'भ्याम्' इत्यादि विभक्ति प्रत्यय पुढें असता (जरी दोन्ही 'मातृ' शब्दाचीं रूपें एकसारखीच होतात तरी अशा समान रूपाचा ) देखील एकशेष होत नाही. (याचे कारण हेंच की, त्या दोन शब्दाचीं सर्व विभक्तीत सारखीं रूपें होत नाहीत, व विभक्तीत भिन्न रूपें होतात हे पूर्वी मनोरमेत सांगितलेंच आहे.) 'भ्याम् हा प्रत्यय पुढें असता स्त्रीलिङ्ग (जननीवाचक ) 'मातृ' शब्दाचें व पुल्लिङ्ग ( परिच्छेत्तृवाचक ) 'मातृ' शब्दाचें जें रूप होतें त्या दोन्ही रूपाचे ठिकाणी 'ताभ्याम्' या शब्दाचा सारखाच अनुप्रयोग होतो, म्हणजे 'ताभ्याम्' या पदानें त्या दोन्ही रूपाचा परामर्श करता येऊं शकतो. (म्हणून या 'भ्याम्' प्रत्ययान्त दोन शब्दाचा एकशेष होण्याची जी आपत्ति येत होती ती टळावी याकरिताच 'वृद्धो यूना' या उत्तर सूत्रातून प्रकृत सूत्रात 'एव' या पदाचें अनुकर्षण केलें आहे. त्यामुळें

एकविभक्तौ यानि सरूपाण्येव = एकस्यामपि विभक्तौ यानि विरूपाणि न भवन्ति तेषामेकशेषो भवति ' असा प्रकृत सूत्राचा अर्थ होतो व वरील दोन 'मातृ' पदाची 'औ जस्' इत्यादि प्रत्यय लावले असता जी रूपें होतात ती सारख्या प्रकारची होत नसून भिन्न प्रकारची होत असल्यामुळे, 'मातृभ्याम्' ही पुल्लिङ्गाची व स्त्रीलिङ्गाची रूपें जरी सारखीच आहेत व त्या दोहोंचा पुल्लिङ्गात व स्त्रीलिङ्गात सारख्याच होणाऱ्या 'ताभ्याम्' या सर्वनामपदानें परामर्श होऊ शकतो तरी त्याचा एकशेष होऊ शकत नाही.)
'भ्यामि स्त्रीपुंसयोस्ताभ्यामित्यनुप्रयोगस्य समत्वात्' असें जें नुकतेच वर म्हटले आहे तशी वास्तविक वस्तुस्थिति असल्यामुळें, अनुप्रयोगाच्या विरोधामुळे दोन 'मातृ' शब्दाच्या समान रूपाच्या विषयात देखील एकशेष होत नाही असे जें एकशेष न होण्याचें कित्येकानी कारण दिले आहे ते चूक ठरते. ( परिच्छेतृवाचक पुल्लिङ्गी 'मातृ' शब्दाची व जननीवाचक स्त्रीलिङ्गी 'मातृ' शब्दाची पहिल्या दोन विभक्तीत द्विवचनबहुवचनाची भिन्न रूपें होत असल्यामुळें, त्या दोन विभक्तीच्या रूपात एकशेष होऊच शकत नाही तृतीयादि विभक्तीची द्विवचनबहुवचनाची रूपें जरी सारखीच होतात तरी, स्त्रीलिङ्गाच्या व पुल्लिङ्गाच्या रूपाचा परामर्श करते-वेळी भिन्न सर्वनामरूपाचा अनुप्रयोग करावा लागत असल्यामुळें व सर्वनामाच्या एकाच रूपाने दोहोंचा परामर्श होऊ शकत नसल्यामुळें, म्हणजे स्त्रीलिङ्गाच्या रूपाचा परामर्श करतेवेळी 'ताभि., ताभ्याः, तासाम्, तासु' या सर्वनामरूपाचा अनुप्रयोग करावा लागत असून पुल्लिङ्गाच्या रूपाचा परामर्श करतेवेळी 'तैः, तेभ्याः, तेषाम्, तेषु' असा भिन्न अनुप्रयोग करावा लागत असल्यामुळें व अशा रीतीनें कोणताहि सारख्याच सर्वनामरूपाचा, परामर्श करण्याकरिता, अनुप्रयोग करता येत नसल्यामुळें, समान रूपाच्या विषयात देखील एकशेष होत नाही असें कित्येकाचे म्हणणे आहे. यावर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, समान रूपाच्या विषयात एकशेष न होण्याचें जें वर

कारण दिले आहे ते जरी बहुवचनाच्या रूपाना लागू पडते तरी ते द्विवचनाच्या रूपाना लागू पडत नाही; कारण सर्वनामाची तृतीयादि विभक्तीत द्विवचनाची पुल्लिङ्गाची व स्त्रीलिङ्गाची रूपें सारखीच होत असल्यामुळें, तशा रूपानी दोन वरील 'मातृ' शब्दाचा एकशेष करून तृतीयादि विभक्तीत होणाऱ्या द्विवचनाच्या रूपाच्या एकाच सर्वनामरूपानें परामर्श करता येतो म्हणून तशा समान रूपाच्या विषयात देखील जो एकशेष होत नाही त्याचे वर जें कारण दिले आहे ते वास्तविक कारण नसून खरे कारण हें आहे की, वरील दोन्ही 'मातृ' शब्दाची प्रत्येक विभक्तीत सारखी रूपें होत नाहीत व हा जो सिद्धान्त निष्पन्न होतो तो प्रकृत सूत्रात उत्तर सूत्रातून 'एव' या पदाचे अपकर्षण होत असल्यामुळेंच निष्पन्न होतो.) 'पुमान् स्त्रिया' सू. ९३३ या सूत्रानें देखील ('मातृमातारौ' या स्थली किंवा दोन 'मातृ' शब्दाच्या समान रूपाचा) एकशेष होऊ शकत नाही, कारण त्या सूत्रात देखील प्रकृत सूत्रातून 'एकविभक्तौ सरूपाण्येव' या पदाची अनुवृत्ति होते आणि तशी 'एव' या पदासह अनुवृत्ति होत असल्यामुळेंच, वार्तिककारानें 'प्रातिपदिकैकशेषे मातृमात्रोः प्रतिषेधो वक्तव्यः' हें वार्तिक पठित केले आहे ('पुमान् स्त्रिया' या सूत्रात प्रकृत सूत्रातून 'एकविभक्तौ सरूपाणामेव' या पदाची अनुवृत्ति होत असल्यामुळें, त्या सूत्राच्या दृष्टीने केवळ स्त्रीप्रत्यया-मुळे होणारे वैरूप्यसह्य ठरत असून इतर कोणत्याहि निमित्तामुळें होणारे वैरूप्य सह्य ठरत नाही आणि पुल्लिङ्गी व स्त्रीलिङ्गी 'मातृ' शब्दाची सर्व विभक्तीत समान रूपें होत नसल्यामुळें, त्या दोन शब्दाच्या समान रूपाचा जसा प्रकृत सूत्रानें एकशेष होत नाही तसाच 'पुमान् स्त्रिया या सूत्रानें देखील एकशेष होत नाही. 'पुमान् स्त्रिया' या सूत्रात जर 'एकविभक्तौ सरूपाणामेव' या पदाचा अनुवृत्ति न मानली तर, त्या सूत्रानें पुल्लिङ्गी व

स्त्रीलिङ्गी 'मातृ' शब्दाच्या समान रूपाचा एकशेष होईल व प्रकृत सूत्राने पावलेल्या त्या दोन शब्दाच्या समान रूपाच्या एकशेषाचे निवारण करण्याकरिता मुद्दाम केलेले वरील वार्तिक व्यर्थ ठरण्याची आपत्ति येईल. आता या वरील वार्तिकासबधानें शकाकार अशी शका करतो की,) वरील वार्तिकात 'प्रातिपदिकैकशेषे' हें जें पद घातले आहे तें अयोग्य आहे, म्हणजे तें पद घालावयास नको होत, कारण 'विभक्त्यन्तानामेकशेष' अशा पक्ष मानल्यास देखील, जननीवाचक 'मातृ' शब्दाचे व धान्य मापणारा या अर्थाच्या वाचक 'मातृ' शब्दाचे 'मातृभ्याम्' असे जे (चतुर्थीच्या द्विवचनाचे) समान रूप 'मातृभ्या देहि मातृभ्या च' या वाक्य-प्रयोगात आढळत त्या दोन रूपाच्या एकशेषाचा देखील प्रतिषेध सागणे आवश्यक आहे (साराश 'प्रातिपदिकानामेकशेष' या पक्षात जशी वरील वार्तिकाची आवश्यकता आहे तशीच 'विभक्त्यन्तानामेकशेष' या पक्षात देखील त्या वार्तिकाची सारखीच आवश्यकता आहे. म्हणून 'मातृमातो प्रतिषेध सरूपत्वात्' एवढेंच वार्तिक करावयास हवे होतें व तसे वार्तिक केलें असतें तर तें दोन्ही पक्षात सारखेंच लागू पडले असते व दोन्ही पक्षात एकशेष होण्याची आपत्ति टाळता आली असती असे शकाकाराचे म्हणणे आहे. या शकाकाराच्या शकेवर अशी प्रतिशका करण्यात येते की) 'मातृभ्याम्' या दोन समानरूप पदाचा एकशेष होणे ही 'विभक्त्यन्तानामेकशेष' हा पक्ष मानल्यास इष्टापत्तीच आहे, कारण वरील वार्तिकाचे व्याख्यान करिताना भाष्यकारानी असा प्रश्न केला आहे की, 'प्रातिपदिकनामेकशेष' या पक्षाला लागू पडणारेच वरील प्रतिषेधक वार्तिक का केले आहे व 'विभक्त्यन्तानामेकशेष' या पक्षाला देखील लागू पडणारे तसे प्रतिषेधक वार्तिक का केलें नाही. त्या द्वितीय पक्षात देखील भिन्न भिन्न अर्थाच्या दोन 'मातृ' शब्दाचा एकशेष होत नाही असा प्रतिषेध केला पाहिजे, कारण या दोन भिन्न 'मातृ' शब्दाची काही विभक्त्यन्त रूपे समान आहेत. उदाहरणार्थ

'मातृभ्याच मातृभ्याच.' 'विभक्त्यन्तानामेकशेषः' या पक्षात वरील दोन भिन्न 'मातृ' शब्दाच्या समान रूपाचा एकशेष होणे इष्टच आहे असे जर मत असेल तर वरील वार्तिक योग्य ठरते. (असे भाष्यात म्हटले असल्यामुळे, समानरूप विभक्त्यन्त शब्दाचा एकशेष होणे इष्ट आहे हे स्पष्ट होते. या प्रतिज्ञेवर शकाकार असे उत्तर देतो की, हे म्हणणे बरोबर नाही, कारण) एकाच सूत्राचे दोन भिन्न रीतीनें व्याख्यान करणे व एका व्याख्यानपक्षात एखादें रूप साधु ठरविणे व द्वितीयव्याख्यानपक्षात तेंच रूप असाधु ठरविणे हे अयोग्य आहे. (सारांश 'प्रातिपदिकानामेकशेषः' हा पक्ष मानला तर दोन भिन्न 'मातृ' शब्दाच्या 'मातृभ्याम्' या दोन समान रूपाचा वरील वार्तिकान्वयें एकशेष होऊ शकत नाही पण विभक्त्यन्तानामेकशेषः.' हा पक्ष मानला तर त्याच उदाहरणात एकशेष होऊ शकतो. अशा रीतीने एकच रूप एका पक्षात साधु व दुसऱ्या पक्षात असाधु ठरण्याची आपत्ति येत असल्यामुळें वरील वार्तिकात 'प्रातिपदिकैकशेषे' हे पद न घालता 'मातृमात्रोः प्रतिषेधो वक्तव्य' एवढेच वार्तिक करावयास पाहिजे होते तसे वार्तिक पठित केले असते तर त दोन्ही पक्षात सारखेच लागू पडले असते व कोणत्याहि पक्षात एकशेष होण्याची आपत्ति सहज टाळता येऊ शकली असती असा शकाकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. आता हे खरे की, 'अथ मतमेतद्विभक्त्यन्तानां सारूप्ये भवितव्यमेकशेषेण' असे वरील भाष्यात म्हटले आहे व त्यावरून असें दिसून येण्याचा संभव आहे की, 'मातृभ्याम्' या दोन समानरूप पदाचा एकशेष भाष्यकाराच्या मतें होणें इष्ट आहे व होऊ शकतो पण शकाकार त्यावर असें उत्तर देतो की, एखाद्या सूत्राची दोन भिन्न व्याख्यानें करून एकाच रूपाला एका पक्षात साधु व दुसऱ्या पक्षात असाधु ठरविणें अयोग्य असल्यामुळेंच ) 'अथ मतमेतद्' हे प्रतीक घेऊन कैयटादिकानी असें व्याख्यान केले आहे की, 'विभक्त्यन्तानां सारूप्ये भवितव्यमेकशेषेण'

हे जें भाष्यकारानी म्हटले आहे ते केवळ अभ्युपगमवादरूप आहे, म्हणजे प्रतिपक्षाचे म्हणणें खरे आहे हे तेवढ्यापुरते गृहीत घेऊन म्हटले आहे. ( प्रकृत सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात 'यदि पुनः प्रातिपदिकानामेकशेष उच्येत, किं कृतं भवति ? वचनलोपः परिहृतो भवति।' या भाष्याचा अर्थ असा आहे की, प्रत्येक शब्दाहून विभक्ती-प्रत्यय करण्यापूर्वीच प्रातिपदिकाचा एकशेष होतो असा पक्ष मानल्यास, विभक्तीप्रत्ययाचा लोप होण्याचे विधान करण्याची काही गरज राहत नाही कैयटाने या भाष्याचे 'यदि पुनः' हे प्रतिक घेऊन 'एक विभक्ताविति न क्रियते, ह्रस्वो नपुंसके इत्यतः प्रातिपदिकग्रहणमनुवर्त्यानुत्पन्नायामेव विभक्तौ सरूपाणां प्रातिपदिकानामेकशेषः क्रियते।' असे म्हटले आहे. या कैयटाच्या म्हणण्याचा भावार्थ हा आहे की, प्रकृत सूत्रातून 'एकविभक्तौ' हे पद गाळले व 'ह्रस्वो नपुंसके प्रातिपदिकस्य' या पूर्व सूत्रातून 'प्रातिपदिकस्य' या पदाची अनुवृत्ति करून त्या पदाचा बहुवचनात विपरिणाम केला तर, 'सरूपाणां प्रातिपदिकानामेकशेषः' असे प्रकृत सूत्र होईल व सूत्रार्थ असा होईल की, समानरूप प्रातिपदिकाहून विभक्तिप्रत्यय उत्पन्न होण्यापूर्वीच प्रातिपदिकावस्थेमध्येच त्याचा एकशेष होतो. पण 'सरूपाणां प्रातिपदिकानामेकशेषः' असा वर सांगितल्याप्रमाणें प्रकृत सूत्राचा अर्थ केला तर, 'प्रातिपदिकानामेकशेषेमातृमात्रोः प्रतिषेध सरूपत्वात्' हे वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचे व्याख्यान करिताना भाष्यकार म्हणतात—'प्रातिपदिकानामेकशेषे मातृमात्रोः प्रतिषेधो वक्तव्यः। माता च जनयित्री मातारौ च धान्यस्य मातृमातारः। किं कारणम् ? सरूपत्वात्। सरूपाणि ह्येतानि प्रातिपदिकानि।' या भाष्याचा भावार्थ हा आहे की, विभक्तिप्रत्यय उत्पन्न होण्यापूर्वीच प्रातिपदिकाचा एकशेष होतो असा पक्ष स्वीकारल्यास, भिन्नभिन्न अर्थाच्या दोन 'मातृ' शब्दाचा एकशेष होत नाही असा निषेध करावा लागेल कारण दोन्ही अर्थाचे, म्हणजे जननी व मोजणारा या अर्थाचे, 'मातृ'

शब्द अगदी सारखे आहेत आणि जरी जननी या अर्थाच्या वाचक 'मातृ' शब्दाचें 'मातरौ' असे प्रथमेचे द्विवचन होतें व मोजणारा या अर्थाच्या *'मातृ'* शब्दाचें *'मातारौ'* असे प्रथमेचे द्विवचन होतें तरी, विभक्तिप्रत्ययान्त रूपामध्यें हा फरक असून दोन्ही प्रातिपदिकें सारखीं असल्यामुळें तसा दोन प्रातिपदिकांचीं कित्येक विभक्तींत भिन्न रूपें होत असून देखील 'प्रातिपदिकानामेकशेषः' या पक्षात त्यांचा एकशेष होण्याची आपत्ति येते व ती आपत्ति टाळण्याकरिता वरील वार्तिक पठित करणें आवश्यक आहे. यापुढील भाष्य 'किमु-च्यते प्रातिपदिकानामेकशेषे ...... एवं च कृत्वा चोद्यते' हे शब्द-रत्नात दिलेच आहे व त्याच्या बऱ्याच भागाचा अर्थ देखील दिलाच आहे. या शब्दरत्नात दिलेल्या भाष्यातील *'अथ मतमेतद्'* हे प्रतीक घेऊन कैयटानें *'अभ्युपगमवादेन स्थितदुक्तं विभक्त्यन्तानां सारूप्ये* इति। प्रातिपदिकावस्थायां सर्वदा सारूप्यात्सर्वत्रैकशेष· स्यात्, विभक्त्यन्तानां तु सरूपाणामेकशेषे यत्रैव तृतीयादौ विभक्तौ सारूप्यं तत्रैवैकशेषो, न प्रथमाद्वितीययोरित्ययं·।' असे म्हटलें आहे. साराश शकाकार असे म्हणतो की, भाष्यकाराच्या शब्दरत्नात दिलेल्या भाष्याचा असा आशय समजू नये की, 'विभक्त्यन्ता-नामेकशेषः' या पक्षात दोन 'मातृ' शब्दाच्या 'मातृभ्यां मातृभ्याम्' या समानरूप विभक्त्यन्ताचा एकशेष होणें इष्ट आहे. वास्तविक भाष्यकाराच्या म्हणण्याचा गूढ भावार्थ हाच आहे की, दोन 'मातृ' शब्दांचीं सर्व विभक्तींत सारखी रूपें होत नसल्यामुळें, 'मातृभ्याम्' या दोन पदांचा एकशेष होणें केव्हाहि इष्ट नाही. म्हणून वरील वार्तिक 'प्रातिपदिकानामेकशेषः' व 'विभक्त्यन्तानामेकशेषः' या दोन्ही पक्षांना सारखेंच लागू पडावें याकरिता त्या वार्तिकात 'प्रातिपदिकैकशेषे' हे पद घालावयास नको होतें असा शंका-काराच्या म्हणण्याचा आशय आहे- 'ननु वार्तिके प्रातिपदिकैकशेषे इत्ययुक्तम्' येथपासून 'कैयटादिभिर्व्याख्यातम्' येथपर्यंत शकाग्रन्थ आहे, व या शकाग्रन्थातील 'तत्पक्षे इष्टापत्तिः' येथून 'इति

भाष्योक्तेः ' येथपर्यंत भाग प्रतिशकारूप ग्रन्थ आहे. आता शका-कारानें शकाग्रन्यात जें वर म्हटले आहे त्यावर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की,) शकाकाराचे वरील म्हणणे बरोबर नाही, कारण दोन पक्षामध्यें असा विरोध येतो, म्हणजे एक पक्षात जें रूप साधु ठरते त दुसऱ्या पक्षात असाधु ठरण्याची आपत्ति येते, हे वार्तिककाराला माहीत असून देखील वार्तिककारानें वरील वार्तिक पठित केले आहे आणि म्हणूनच, म्हणजे दोन भिन्न 'मातृ' शब्दाच्या समानरूप विभक्त्यन्त पदाचा एकशेप होऊ शकतो असें तेवढयापुरते गृहीत धरून वार्तिककारानें वरील वार्तिक पठित केले असल्यामुळेंच, 'अथ मतमेतद्विभक्त्यन्ताना सारूप्ये भवितव्यमेकशेपेण' याच्या पुढें भाष्यकारानी 'एव च कृत्वा चोद्यते' असें भाष्यात म्हटले आहे 'एव च कृत्वा चोद्यते' या पदापूर्वी 'प्रातिपदिकानामे-कशेपे ' इत्यादि पदें अध्याध्याहृत आहेत, म्हणजे 'अथ मतमेद्विभक्त्य-न्ताना सारूप्ये भवितव्यमेकशेपेणेति प्रातिपदिकानामेवैकशेपे दोषो भवति । एव च कृत्वा चोद्यत ' अशी भाष्यपक्ति पठित आहे (या भाष्यपक्तीचा अर्थ हा आहे की, 'मातृभ्याम्' इत्यादि समानरूप विभक्त्यन्ताचा एकशेप होणे इष्टच आहे असें जर मत असेल, तर 'प्रातिपदिकानामेकशेप ' या पक्षात असमान रूपाच्या विषयात देखील एकशेप होण्याची आपत्ति येत असल्यामुळें, तो पक्ष दूपित ठरतो व असे गृहित धरूनच वार्तिककारानें त्या पक्षास 'मातृमात्रो प्रतिपेध ' हा प्रतिपेध सागितला आहे ) 'एव च कृत्वा चोद्यते' असें भाष्यात म्हटले असल्यामुळें त्यावरूनच हे स्पष्ट होतें की, वरील वार्तिक (सिद्धान्तपक्षाचे वार्तिक नसून) पूर्वपक्षरूपानें पठित केलेले वार्तिक आहे त्या वार्तिकात जें 'मातृ' शब्दाचे ग्रहण केलेआहे ते ग्रहण ज्या प्रातिपदिकाची प्रत्येक विभक्तीत समान रूपें होत नाहीत त्याच उपलक्षण आहे, म्हणजे वार्तिकातील 'मातृ' शब्दानें केवळ दोन 'मातृ' शब्दाचेच ग्रहण होत नसून ज्या समानरूप प्रातिपदिकाची सर्व विभक्तीत सारखी रूपें होत नाहीत त्याचे देखील ग्रहण होते

(यानकर्ता या अर्थाचा वाचक तृजन्त पुल्लिङ्ग 'यातृ' शब्द व देवरपत्नी या अर्थाचा बोधक स्त्रीलिङ्ग 'यातृ' शब्द इत्यादि समानरूप प्रातिपदिकांचे देखील वार्तिकस्थ 'मातृ' शब्दानें ग्रहण होतें; कारण दोन 'यातृ' शब्द–प्रातिपदिकें–जरी समानरूप आहेत तरी त्यांची सर्व विभक्तींत समान रूपें न होता कांहीं विभक्तींत भिन्न रूपें होतात. तसेंच ज्याप्रमाणें 'मातृ' हा शब्द ज्या समानरूप प्रातिपदिकांची सर्व विभक्तींत सारखी रूपें होत नाहींत त्यांचे उपलक्षण आहे त्याचप्रमाणें 'प्रातिपदिकैकशेषे' हें वार्तिकस्थ पद देखील 'विभक्त्यन्तानामेकशेष' या पक्षाचें देखील उपलक्षण आहे, म्हणजे दोन्ही पक्षांत 'मातृमात्रोः प्रतिषेध' हा प्रतिषेध लागू पडतो, हें मानणें योग्य आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा गूढ आशय आहे ) वरील वार्तिकांत जो पूर्वपक्ष केला आहे तो, प्रकृत सूत्रांत 'एकविभक्तौ' हें पद नसलें तरच, 'प्रातिपदिकानामेक-शेषः' या पक्षांत उपपन्न ठरूं शकतो असें मानून केला आहे प्रकृत सूत्रांत 'एकविभक्तौ' हें पद नसल्यास, जीं समानरूप प्रातिपदिकें आहेत (त्यांचीं कांहीं विभक्तींत भिन्न रूपें होत असली तरी) त्यांचा एकशेष होतोच असाच प्रकृत सूत्रांतून अर्थ निष्पन्न होऊं पाहतो. (प्रकृत सूत्रांत 'एकविभक्तौ' हें पद असल्यास, वरील वार्तिक असण्याची कांही गरज नाहीं. पण तें पद प्रकृत सूत्रांतून गाळलें तर वरील वार्तिक पठित करणें आवश्यक आहे असा वार्तिककाराच्या म्हणण्याचा आशय आहे सारांश प्रकृत सूत्रांत 'एकविभक्तौ' हें पद असणें आवश्यक आहे हें सिद्ध करण्याच्या हेतूनें वार्तिककारानें वरील वार्तिक पूर्वपक्षरूपानें आरंभिलें आहे व तें पद गाळल्यास कोणत्या अडचणी येतील व त्या अडचणी दूर करण्याकरिता कोणते उपाय योजावे लागतील हें त्या वार्तिकांत संक्षिप्तरूपानें सांगितलें आहे.) 'हरित' व 'हरिण' या दोन्हीं प्रातिपदिकांचे स्त्रीलिङ्गाचें जरी 'हरिणी' असेंच समान रूप होतें तरी त्या दोन 'हरिणी' शब्दांहून तद्धित प्रत्यय केला असता (पुंवद्भाव होत असल्यामुळें)

त्याची भिन्न भिन्न रूपें होतात आणि त्यामुळें यच्चावत् सर्व प्रयोगात त्या दोन शब्दाची समान रूपें राहू शकणे असंभवनीय आहे म्हणून जेथें प्रयोगात दोन समानरूप प्रातिपदिकाची काही विभक्त्यन्त समान रूपें सामानाधिकरण्यानें आढळतात तशाच सारूप्याचे (प्रकृत सूत्रातील 'सरूपाणाम्' या पदानें) ग्रहण होते, आणि तशा प्रकारचें सादृश्य दोन भिन्न 'मातृ' शब्दाच्या 'मातृभ्याम्' या समान रूपाचा जेथें सामानाधिकरण्यानें प्रयोग केला आहे तेथें आढळत असल्यामुळें, तशा ठिकाणी जी एकशेषाची प्राप्ति होते तिचा प्रतिषेध करण्याकरिता (प्रकृत सूत्रात 'एकविभक्तौ' हे पद नसल्यास) वरील निषेधक वार्तिक असणे आवश्यक आहे ('हरित' हा वर्णवाचक शब्द तकारोपध असून 'वर्णाना तणतिनितान्तानाम्' फिट् सू ३३ या सूत्रान्वयें आद्युदात्त, म्हणजेच अनुदात्तान्त, आहे त्यामुळें 'वर्णादनुदात्तात्' सू ४९६ या सूत्रानें त्याहून विकल्पेंकरून 'ङीप्' प्रत्यय होतो व तो प्रत्यय केला असता, तकाराचे जागी नकारादेश होऊन 'हरित' या अदन्त शब्दाची 'हरिता हरिणी' अशी स्त्रीलिङ्गाची पाक्षिक रूपें होतात 'हरिण' या जातिवाचक शब्दाचे देखील 'जातेरस्त्रीविषयात्' सू ५१८ या सूत्रानें 'ङीप्' प्रत्यय होऊन 'हरिणी' असेच स्त्रीलिङ्गाच रूप होते जरी 'हरित' व 'हरिण' ही दोन समानरूप प्रातिपदिके नाहीत तरी त्या दोही प्रातिपदिकाची स्त्रीलिङ्गाची रूपें सारखीच होतात, म्हणजे 'हरिणी' अशीच होतात म्हणून समानरूप प्रातिपदिकाचा एकशेष होतो हा पक्ष मानल्यास, 'हरित' व 'हरिण' या दोन विरूप प्रातिपदिकाहून सिद्ध झालेल्या स्त्रीलिङ्गी समानरूप भिन्नार्थक दोन 'हरिणी' शब्दाचा एकशेष न होण्याची आपत्ति येते हे दोन 'हरिणी' शब्द असे आहेत की, याची सर्व विभक्तीत समानरूपें होतात, पण हे दोन्ही शब्द स्त्रीप्रत्ययान्त असल्यामुळें, 'अर्थवदधातुरप्रत्ययः प्रातिपदिकम्' सू १७८ या सूत्रातील 'अप्रत्यय' या निषेधान्वयें त्याना प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकत नाही व ज्या दोन प्रातिपदिकाहून

तशा स्त्रीप्रत्ययान्त समान रूपाचा विभक्तिप्रत्यय उत्पन्न होण्यापूर्वी एकशेष होण्यात काहीं अडचण येत नाही. या भाष्यावरून हे देखील सिद्ध होत की, लौकिक प्रयोगामध्यें जो सारखेपणा पहावयाचा तो प्रातिपदिकात पहावयाचा नसून केवळ विभक्त्यन्त रूपामध्येंच पहावयाचा असतो विभक्त्यन्त रूपामध्यें सारखेपणा असला तर प्रकृत सूत्र लागू पडते प्रातिपदिकाची जी तद्धितान्त वगैरे रूपें होतात त्या रूपातहि सारखेपणा असला पाहिजे याची काही गरज नाही उदाहरणार्थ 'हरित' शब्दाचे व तसच 'हरिण' शब्दाचे 'हरिणी' असे जे स्त्रीलिङ्गाचे रूप होते त्या रूपाची विभक्तिप्रत्ययान्त रूपें समान असतात, पण तद्धितान्त रूपें, 'तसिलादिष्वाकृत्वसुच' सू ८३६ हे पुंवद्भावाचे सूत्र असल्यामुळें, भिन्न प्रकारची होतात. तद्धित 'रूपप्' प्रत्यय लावल्यास 'हरितरूपा, हरिणरूपा' अशी भिन्न रूपें होतात, तद्धित 'अण्' प्रत्यय लावल्यास 'हारित, हारिण' अशी भिन रूपें होतात पण अशी जरी तद्धितान्त भिन्न रूपें होतात तरी दोन स्त्रीप्रत्ययान्त 'हरिणी' शब्दाची विभक्त्यन्त रूपें समान होत असल्यामुळें व त्याचेच ठिकाणी सादृश्य पाहणें आवश्यक असल्यामुळें, प्रकृत सूत्रानें त्या दोन 'हरिणी' शब्दाचा एकशेष होण्यात कोणतीहि अडचण येत नाही प्रकृत सूत्रात 'एकविभक्तौ' हे पद असल्यामुळें व ते पद 'सरूपाणाम्' या पदाशी अन्वित होत असून उत्तर सूत्रातून 'एव' या पदाचे अनुकर्षण होत असल्यामुळें, 'एकविभक्तौ सरूपाणामेव प्रातिपदिकानामेकशेष' असा प्रकृत सूत्राचा अर्थ निष्पन्न होतो पण प्रकृत सूत्रातून 'एकविभक्तौ' हे पद गाळल्यास, प्रातिपदिकैकशेषपक्षात 'हरितहरिण–' हें वार्तिक पठित करावे लागेल असा जो वार्तिककारानें दोष दिला होता त्याचे 'न वा पदस्यार्थे प्रयोगात्' हे वार्तिक पठित करून भाष्यकारानी निराकरण केले आहे या वरील भाष्याच्या आधारावरच 'प्रयोगमात्रावच्छेदेन सारूप्यस्य असम्भवात् प्रयोगसामानाधिकरण्येनैव सारूप्यस्य ग्राह्यता' असे शब्दरत्नात म्हटले आहे वास्त-

विक पाहिले असता, 'प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणम्'- परि. ७२ ही परिभाषा असल्यामुळे, या परिभाषेच्या आधारावरच भाष्यकारांना 'हरिणहरिण' या वार्तिकाचे प्रत्याख्यान करता आले असते. त्यांनी तशा रीतीनें त्या वार्तिकाचे प्रत्याख्यान न करिता, 'न वा पदस्यार्थे प्रयोगात्' हे वार्तिक पठित करून त्या पूर्व वार्तिकाचें प्रत्याख्यान केले आहे ही गोष्ट वेगळी. सारांश प्रकृत सूत्रातून 'एकविभक्तौ' हे पद गाळल्यास व प्रातिपदिकानामेकशेषः' हा पक्ष मानल्यास, दोन 'मातृ' शब्दाचा एकशेष न व्हावा याकरिता 'मातृमात्रोः प्रतिषेधः' हे वार्तिक पठित करणें आवश्यक ठरतें; कारण ही दोन प्रातिपदिके जरी समानरूप आहेत तरी त्याची सर्व विभक्तींत सारखी रूपें होत नाहीत हे पूर्वी सांगितलेच आहे.) प्रकृत सूत्रातून 'एकविभक्तौ' हें पद गाळले तरच प्रातिपदिकानामेकशेषे मातृमात्रोः प्रतिषेधः सरूपत्वात्' हें पूर्वपक्षाचे वार्तिक उपपन्न ठरत असल्यामुळें, भाष्यकारांनी प्रकृत सूत्रावरील पुढील भाष्यात प्रकृत सूत्रात 'एकविभक्तौ' हे जें पद आहे त्यातील 'विभक्ति' हा शब्द सारूप्याचे उपलक्षण आहे, म्हणजे तो शब्द सारूप्य या अर्थाचा वास्तविक वाचक आहे, असे मानून व 'प्रातिपदिकानामेकशेषः' हा पक्ष सिद्धान्तरूपानें स्थापित करून 'मातृमात्रोः प्रतिषेध.' या वार्तिकाचे खण्डन केले आहे आणि अशा रीतीनें प्रकृत सूत्रात 'एव' या पदाचे अनुकर्षण होणे हें भाष्यकारांनी ध्वनित केलें आहे. उत्तर सूत्रातून 'एव' या पदाचे अपकर्षण केल्याशिवाय, प्रकृत सूत्रातील 'विभक्ति' हा शब्द सारूप्याचे उपलक्षण आहे एवढेंच मानल्यानें, मातृमात्रो प्रतिषेधः' या वार्तिकाचे खण्डन करता येऊं शकले नसतें. (प्रकृत सूत्रावरील ज्या भाष्याचा वरील शब्दरत्नात उल्लेख केला आहे त्या भाष्यात भाष्यकार म्हणतात- 'अथानेन प्रक्षेणार्थः स्यात् प्रातिपदिकानामेकशेष इति । बाढमर्थः । किं वक्तव्यमेतत् ? । न हि । कथमनुच्यमानं गस्यते ? । एनेनैवाभिहितं सूत्रेण सरूपाणामेकशेष एकविभक्ताविति । कथम्? । विभक्तिः

सारूप्येणाश्रीयते । अनैमित्तिक एकशेष. । एकविभक्तौ यानि सरूपाणि तेषामेकशेषो भवति । क्व ? । यत्र वा तत्र वेति । ' या भाष्याचा अर्थ असा आहे की, प्रातिपदिकाचा एकशेष होतो या पक्षाचा काही उपयोग आहे काय ? बराच उपयोग आहे. तर मग प्रातिपदिकाचा एकशेष होतो असे वचन पठित केले पाहिजे की काय ? तसे वचन करावयास नको पण सूत्रामध्ये तसें स्पष्टपणे सांगितलें नसल्यामुळे तसा अर्थ कसा ज्ञात होऊ शकणार ? ' सरूपाणामेकशेष एकविभक्तौ ' या सूत्रानेच हा पक्ष ज्ञात होतो. या सूत्रात ' विभक्ति ' या शब्दानें सारूप्याचा आश्रय केला जातो, म्हणजे सारूप्य कोठें पाहिले पाहिजे याकरिता प्रकृत सूत्रात ' विभक्तौ ' हें पद उच्चारले आहे एकशेष हा अनिमित्तकच आहे, म्हणजे ' विभक्तौ ' हे एकशेषाचें निमित्त या रूपाने उच्चारले नाही. म्हणून सूत्रार्थ असा होतो की, लौकिक प्रयोगामध्ये ज्या प्रातिपदिकाचे रूप प्रत्येक विभक्तीत सारखें होतें त्या प्रातिपदिकाचा एकशेष होतो तो केव्हा होतो असे विचारल्यास, तो वाटेल तेव्हा होतो, म्हणजे विभक्तिप्रत्यय पुढें असणे या निमित्ताची त्याला गरज नसून तशी समानरूप प्रातिपदिके उच्चार-ल्याबरोबर त्याचा एकशेष प्राप्त होतो. या भाष्यात भाष्यकारानी प्रकृत सूत्रातील ' विभक्तौ ' हे पद सारूप्याचें उपलक्षण आहे असे सांगून त्या पदाची आवश्यकता दाखविली आहे आणि त्या पदाच्या सामर्थ्याने, ज्या प्रातिपदिकाची सर्व विभक्तीत सारखी रूपें होतात त्याचा एकशेष होतो, असा प्रकृत सूत्राचा अर्थ होत असल्यामुळें, दोन ' मातृ ' शब्दाचा एकशेष होऊ शकत नाही हें आपोआपच सिद्ध होते, आणि म्हणून ' मातृमात्रोः प्रतिषेध ' हे वचन वरील वार्तिकात असण्याची काही गरज नाही असे भाष्यकाराचे म्हणणे आहे शब्दरत्नकार म्हणतात की, या भाष्यावरून हें ध्वनित होतें की, भाष्यकारानी प्रकृत सूत्रात उत्तर सूत्रातून ' एव ' या पदाचे अनुकर्षण केले आहे. शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, प्रकृत

सूत्रात 'एव' या पदाचे अनुकर्षण न केल्यास सूत्रार्थ असा होईल की, ज्या विभक्तीत सारखी रूपें होतात त्याचा एकशेष होतो व ज्या विभक्तीत सारखी रूपें होत नाहीत त्याचा एकशेष होत नाही, आणि तसा अर्थ झाल्यास, दोन 'मातृभ्याम्' या पदाचा एकशेष होण्याची आपत्ति येते व ती आपत्ति टाळण्याकरिता वरील वार्तिक असणे आवश्यक ठरते. पण प्रकृत सूत्रात 'एव' या पदाचे अपकर्षण केल्याने प्रकृत सूत्राचा, ज्या प्रातिपदिकाची सर्व विभक्तीत समानरूपें होतात त्याचाच एकशेष होतो असा अर्थ होत असल्यामुळे, त्या अर्थान्वयेच 'मातृभ्याम्' या पदाचा एकशेष होऊ शकत नाही व वरील वार्तिक पठित करण्याची काही गरज राहत नाही. या विषयासंबधाने प्रकृत सूत्रावरील उद्योतात 'वस्तुतस्तु विभक्तित्वावच्छेदेन सारूप्यविवक्षणान्न मातृमात्रादौ दोष इति बोध्यम् । एकशब्दस्वारस्येनैवकारापकर्षणेन सर्वस्यामपि विभक्तौ यानि विरूपाणि नैत्यर्थादिति दिक् । एकग्रहणफलं तु चिन्त्यमेव - यत्रापि विभक्ति सारूप्येणाश्रीयते इत्येवोक्त नत्वेकविभक्तिरिती ।' असे म्हटले आहे) प्रकृत सूत्रातील 'एकविभक्तौ' हे पद दोनदा उच्चारून व एकदा उच्चारलेल्या त्या पदाचा ('सरूपाणाम्' या पदाशी अन्वय केल्याने) 'एकविभक्तौ सरूपाणाम्' असा अर्थ करून व दुसऱ्याने उच्चारलेल्या त्या पदाचा 'एकविभक्तौ विवक्षितायाम्' असा अर्थ करून, म्हणजे 'एकविभक्तौ' हे पद एकदा उद्देश्यकोटीत व पुन्हा निमित्तकोटीत प्रविष्ट करून, कित्येक वैयाकरण असे म्हणतात की, प्रकृत सूत्राचा असा अर्थ निष्पन्न होतो की, जे विभक्तिप्रत्यय लावले असता समान रूपें होतात ते विभक्तिप्रत्यय पुढे असताना प्रातिपदिकाचा एकशेष होतो आणि असा अर्थ करून पुढे ते असे म्हणतात की, 'भ्याम्' इत्यादि विभक्तिप्रत्यय पुढे असताना दोन 'मातृ' शब्दाची जी समान विभक्त्यन्त रूपें होतात तशा स्थली एकशेष होतो, पण 'औ, जस्' इत्यादि विभक्तिप्रत्यय लावले असता दोन 'मातृ' शब्दाची भिन्न रूपें होत असल्यामुळें

तशा स्थली एकशेष होत नाही, आणि असा प्रकृत सूत्राचा अर्थ होत असल्यामुळें 'मातृमात्रो.' प्रतिषेध' हे वार्तिक असण्याची काही गरज नाही असा ('राम राम औ इति स्थिते-' असें म्हणणाऱ्या) प्रकाशकाराचा आशय आहे पण हे त्या वैयाकरणाचे म्हणणे, वर जसें प्रकृत सूत्राचें वरील प्रमाणभूत भाष्याच्या आधारे व्याख्यान केले आहे त्या व्याख्यानान्वयें, चूक ठरतें; कारण वार्तिककाराच्या मते 'भ्याम्' इत्यादि विभक्तप्रत्यय पुढें असताना देखील एकशेष होऊ शकत नाही (वर जें प्रकृत सूत्राचें व्याख्यान केले आहे त्या व्याख्यानान्वयें ज्या प्रातिपदिकाची सर्व विभक्तींत समान रूपें होतात त्याचाच प्रातिपदिकावस्थेंत विभक्तिप्रत्यय उत्पन्न होण्यापूर्वी एकशेष होत असल्यामुळें, व 'एकविभक्तौ' या पदाची द्विरावृत्ति करण्यास कोणतेंहि प्रमाण नसल्यामुळें, वरील वैयाकरणाचे म्हणणे चूक ठरते हे अगदी उघड आहे)

शब्दरत्न—एतच्चेति । एकशेषविधायक चेत्यर्थः । ध्वनित चैव पृथक् सर्वथा विभक्तिपराणामेकशेष इति पक्षे विभक्त्यन्तानामेकशेष इति पक्षे च, "द्वन्द्वप्रतिषेधो वक्तव्य" इत्याशङ्क्य "अनवकाश एकशेषो द्वन्द्व बाधिष्यते" इति ग्रन्थेन भाष्ये । इतरेतरेती "एकवच्चास्याऽन्यतरस्याम्" इत्यनेनैकशेषविषयपदाना समाहारे व्युत्सिबोधनादिति भाव• । इतरान्वय इति । एकरूपेणैकरूपावच्छिन्न इतरत्रान्वय इत्यर्थः । इदित इति । अत्र ह्यभेदेन परस्परान्वयाद्भेदघटितसाहित्यनिमित्तैकशेषाप्रवृत्तिरिति भाव• । ऐकरूप्येणैवेति । पुष्पवन्तपद इवेति भाव । द्वन्द्वे प्रसक्ते इति । विभक्त्युत्पत्तौ सत्यां तत्प्रसक्तिर्बोद्धचा ।

'एतच्च सहविवक्षायामेव प्रवर्तते' या मनोरमेंतील पक्तीतील 'एतच्च' या पदाचा 'एकशेषविधायक च' असा अर्थ आहे ('सरूपाणामेकशेष' या सूत्रात 'एकशेष' असा पुल्लिङ्गात निर्देश असल्यामुळें, दीक्षितानी 'स च सहविवक्षायामेव' असं

वास्तविक म्हणावयास पाहिजे होते. परतु त्यानी 'एतद्' असा नपुसकलिङ्गात सर्वनामरूपाचा निर्देश केला असल्यामुळें, शब्दरत्नकारानी त्या पदाचा 'प्रकृत एकशेषविधायकसूत्र' असा अर्थ केला आहे ) 'पृथक् सर्वेषा विभक्तिपराणामेकशेष' हा पक्ष मानला किंवा 'विभक्त्यन्तानामेकशेष' हा पक्ष मानला तर 'द्वन्द्वप्रतिषेधो वक्तव्यः' असे वचन पठित करावे लागेल अशी प्रकृत सूत्रावरील भाष्यात शका उपस्थित करून 'अनवकाश एकशेष द्वन्द्व बाधिष्यते' अशा रीतीनें भाष्यकारानी त्या शकेचे निवारण केले असल्यामुळें, त्यावरून हे ध्वनित होते का, जेथें सहविवक्षा असते तेथेंच प्रकृत एकशेषविधायक सूत्राची प्रवृत्ति होते ( प्रकृत सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात- 'द्वन्द्वस्य च प्रतिषेधो वक्तव्य । वृक्षश्च वृक्षश्च वृक्षौ । वृक्षश्च वृक्षश्च वृक्षश्च वृक्षा इति । चार्थे द्वन्द्व इति द्वन्द्व प्राप्नोति । नैष दोष । अनवकाश एकशेषो द्वन्द्व बाधिष्यते । ' भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, जेथें जेथे एकशेषाचे प्रकृत सूत्र प्रवृत्त होऊ पाहते तेथें तेथें 'चार्थे द्वन्द्व' या द्वन्द्वविधायक सूत्राची अवश्यप्राप्ति असल्यामुळें, प्रकृत सूत्राला प्रवृत्त होण्यास कोणतेहि उदाहरण मिळत नाही व ते अनवकाश ठरू पाहत, आणि अनवकाशत्वामुळेंच 'येन नाप्राप्ते'–परि ५८–या न्यायान्वयें ते द्वन्द्वविधायक सूत्राचा बाध करून स्वत प्रवृत्त होते जेथें सहविवक्षा आहे तेथेंच इतरेतरयोगद्वन्द्व होत असल्यामुळें व ज्या स्थितीत सामान्य शास्त्राची प्रवृत्ति होत असते तशाच स्थितीत विशेषशास्त्र प्रवृत्त होत असल्यामुळें, सहविवक्षा असल्यासच इतरेतरयोगद्वन्द्वाचे बाधक प्रकृत एकशेषविधायक सूत्र प्रवृत्त होऊ शकते हे आपोआपच सिद्ध होते प्रकृत सूत्रावरील पुढील भाष्यात तर भाष्यकाराना 'सहविवक्षायामेकशेष' असे स्पष्ट सागून पुढें असे म्हटले आहे की, 'यदप्युच्यते द्वन्द्वप्रतिषेधश्च वक्तव्य इति । नैष दोष अनवकाश एकशेषो द्वन्द्व बाधिष्यते । ' जेथें सहविवक्षा आहे तेथें इतरेतरयोगद्वन्द्व होतो व जेथें

सहविवक्षा नाही तेथें एकशेष होतो असे, मानल्यास दोहोंचे विषय भिन्न ठरतील व त्यामुळें 'अनवकाश एकशेषो द्वन्द्वं बाधिष्यते' हें भाष्यवचन असङ्गत ठरण्याची आपत्ति येईल. म्हणून हें मानणें आवश्यक आहे की, इतरेतरयोगद्वन्द्वाप्रमाणे एकशेष देखील सह-विवक्षा असल्यासच होऊ शकतो. 'सहविवक्षापदार्थस्तु विशेष्य-विशेषणभावानापन्नानेकस्य युगपदेकपदार्थसम्बन्धबोधनेच्छा' अशी सहविवक्षा या शब्दाची भैरवीत व्याख्या दिली आहे.) 'इतरेतर-योगद्वन्द्वस्य विषय इति यावत्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे की, 'एकवच्चास्यान्यतरस्याम्' हीं पदें 'नपुंसकमनपुंसकेन' सू. ९३५ या एकशेषविधायक सूत्रांत घातली असल्यामुळें, त्यावरून हें ज्ञापित होतें की, जी पदें एकशेषाचा विषय आहेत त्यांचा समाहारद्वन्द्व होऊं शकत नाही. (इतरेतर-योगद्वन्द्वाचें रूप नेहमी द्विवचनान्त किंवा बहुवचनान्त होत असतें. पण समाहार—समूह—हा एकत्वसंख्याविशिष्ट असल्यामुळें, समाहारद्वन्द्वाचें नेहमी एकवचनान्तच रूप होत असतें. इतरेतर-योगद्वन्द्वाच्या विषयांत जसा एकशेष होतो तसा समाहाराच्या विषयांत, म्हणजे समाहार विवक्षित असतांना, देखील तो होतो असें मानल्यास, 'शुक्लः पटः, शुक्ला शाटी, शुक्लं वस्त्रम्' या स्थलीं 'शुक्ल, शुक्ला, शुक्लम्' या नपुंसकानपुंसकाचा एकशेष समाहार विवक्षित असतां, एकवचनांत होईलच व इतरेतरयोगद्वन्द्व विवक्षित असतां बहुवचनांत होईलच, म्हणजे एकवचनाचें व तसेंच बहुवचनाचें 'तदिदं शुक्लम् तानीमानि शुक्लानि' अशीं दोन्ही प्रकारचीं रूपें आपोआपच सिद्ध होऊं शकतील. मग 'नपुंसकमनपुंसकेन' या एकशेषविधायक सूत्रांत 'एकवच्चास्यान्यतरस्याम्' म्हणजे 'विकल्पेन एकवद्भवति' हीं पदें घालण्याची काय गरज होती ? असें असून देखील त्या सूत्रांत तीं घातलीं असल्यामुळें त्यावरूनच हें स्पष्ट होतें की, समाहाराच्या विषयांत एकशेष होत नाही. त्यामुळें नपुंसक व अनपुंसक शब्दांचा

एकशेष केला असता नित्य द्विवचनान्त किंवा बहुवचनान्त रूपच होऊ शकतें व एकवचनान्त रूप होऊ शकत नाही. तसे एकवचनान्त रूप देखील विकल्पेंकरून व्हावें याकरिता त्या सूत्रात ती पदें मुद्दाम घातली आहेत व अशा रीतीनें ती पदें समाहारद्वन्द्वाच्या विषयात एकशेष होत नाही याचें ज्ञापक ठरतात ) 'अनेकार्थस्य मिलितस्य इतरान्वय' या मनोरमेच्या पङ्क्तीचा 'एकरूपेण एकरूपावच्छिन्ने इतरत्र अन्वय.', म्हणजे जेथे अनेक पदाच्या अर्थाचा एकात्र प्रकारानें एकच अवच्छेदक धर्मयुक्त अन्य पदार्थांत मिळून अन्वय होतो तसेच स्थल एकशेषाचा विषय ठरत, असा अर्थ आहे (याचा भावार्थ हाच आहे की, जेथें सहविवक्षा आहे तेथें ज्याप्रमाणे इतरेतरयोगद्वन्द्व होतो त्याचप्रमाणे जेथें सहविवक्षा आहे तेथेंच एकशेष होतो. सहविवक्षा कशास म्हणतात हें वर सांगितलच आहे. 'वृक्षौ छिन्धि' या उदाहरणात 'वृक्षश्च वृक्षश्च' हे दोन्ही शब्द एकत्र मिळून छेदनक्रियेंत एकच रूपानें, म्हणजे कर्मकारकरूपानें, अन्वित असल्यामुळें, या स्थली सहविवक्षा आहे व त्यामुळें येथें एकशेष झाला आहे ) 'इदितो नुम्धातो.' सू. २२६२ या सूत्रातील 'इदित' या पदात 'इत्' व 'इत्' अशी जी दोन पदें आहेत त्याचा परस्पराशी अभेदान्वय असल्यामुळें व जेथें समुदायगतव्यक्तीचा परस्पर भेद स्पष्ट असून त्या सर्व व्यक्ति एकत्र मिळून एकाच क्रियेंत एकाच प्रकारे अन्वित होतात तशाच स्थली एकशेष होऊ शकत असल्यामुळें, 'इदित' यात असलेल्या दोन 'इत्' पदाचा एकशेष झाला नाही असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे ('इदित' यात असणारी दोन 'इत्' पदें परस्पराशी अभेदान्वयानें अन्वित आहेत असें जें वर शब्दरत्नात म्हटलें आहे त्याचें कारण 'चक्षिङ्धातो नुम्वारणाय इत् चासौ इत् च इति कर्मधारयसमासस्वीकारेणेत्संज्ञकेदन्तधातोर्नुम् भवतीत्यर्थस्य तत्रावश्यकतयाऽभेदान्वय इति भाव' असे सरलेत दिले आहे. जेथें अभेदान्वय असतो तेथें एकशेष होऊ शकत नाही उदाहरणार्थ

'हरिरेव हरिः, राम एव रामः' अशा स्थली एकशेषाची प्राप्तीच होत नाही. जेथें समुदायान्तर्गत व्यक्तीमध्यें परस्परभेद स्पष्ट आहे व त्या सर्व व्यक्ति मिळून एकाच रूपानें वाक्यातील इतर पदाशी अन्वित होतात तशाच ठिकाणी एकशेष होतो. याचे 'वृक्षौ छिन्धि' हे उदाहरण वर दिलेच आहे. या उदाहरणात वृक्षरूप समुदायामध्यें ज्या दोन वृक्षव्यक्ति आहेत त्या परस्परभिन्न असून एकाच छेदन क्रियेमध्यें मिळून कर्मरूपानें अन्वित होत असल्यामुळें त्याचा एकशेष होतो.) 'ऐक्यरूप्येणान्वेतुमर्हति' या मनोरमेच्या पङ्क्तीतील 'ऐक्यरूपेण' या पदाचा पुष्पवन्तपदे इव' असा भावार्थ आहे, म्हणजे ज्याप्रमाणे 'पुष्पवन्तौ.' हा द्विवचनान्त सकृदुच्चरित शब्द सूर्य व चन्द्र या दोहोंचा मिळून बोधक होतो त्याचप्रमाणे एकशेष केला असता जो अवशिष्ट राहतो तो स्वत.चा व लुप्त झालेल्या पदाचा मिळून बोधक होतो. ('एकयोक्त्या पुष्पवन्तौ दिवाकरनिशाकरौ' असा अमरकोशात पाठ आहे. या श्लोकाचा अर्थ असा आहे की, 'पुष्पवान्' या शब्दानें सूर्याचा किंवा चन्द्राचा बोध होत नसून 'पुष्पवन्तौ' या द्विवचनान्त पदानें सूर्य व चन्द्र या दोहोंचा मिळून बोध होतो, आणि म्हणूनच 'प्रत्येक पुष्पवान् इति न प्रयोक्तव्यमिति भावः' असे अमरावरील रामाश्रमीटीकेत म्हटले आहे 'पुष्पवान् च पुष्पवान् च पुष्पवन्तौ' या स्थली एक 'पुष्पवान्' शब्द नाहीसा होऊन जो एक 'पुष्पवान्' शब्द अवशिष्ट राहतो तो जसा सूर्य व चन्द्र या दोहोंचा मिळून बोधक होतो त्याचप्रमाणें एकशेष केला असता जो अवशिष्ट राहतो तो स्वतःचा व लुप्त झालेल्याचा मिळून बोध करितो असा दीक्षितांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे असें शब्दरत्नकार म्हणतात. ) 'द्वन्द्वे प्रसक्ते सति' असें जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, ज्याचा एकशेष करणें आहे त्याहून विभक्तिप्रत्यय केला असतां इतरेतरयोग-द्वन्द्वाची जेथें प्राप्ति होते (तेथें अनेक सुबन्तांचा इतरेतरयोगद्वन्द्व होतो. 'राम सु राम सु राम सु' या स्थली तीन्ही 'राम' शब्दाहून

सुबुत्पत्ति केली असता 'चार्थे द्वन्द्व ' सू ९०१ या सूत्रानें इतरेतरयोग-द्वन्द्वाची प्राप्ति आहे. पण अशा स्थली अनवकाश एकशेष इततेतर-योगद्वन्द्वाचा बाध करून सुबुत्पत्ति होण्यापूर्वीच स्वत प्रवृत्त होतो व तो प्रवृत्त झाल्या वेळी सुबन्ताचा अभाव असल्यामुळें, इतरेतरयोग-द्वन्द्वाची वास्तविक प्राप्तीच होत नाही सुबुत्पत्ति केल्यावरच त्याची प्राप्ती होते )

शब्दरत्न —एकवद्भावापत्तेरिति । एव चेतरेतरयोगविषया-भावेनैकशेषानापत्तिरिति भाव । इत्यनयोरिति । "जस शी" इत्यत्र "वा" इति वक्तव्ये "विभाषा जसि" इति वृद्भूताव-यवभेदविवक्षया बहुवचने, एकशेषद्वन्द्वयोरभावास्तत्र विकल्पवारणा योत्तरार्थं चेति भाव । सजातीयेति । स्वातन्त्र्येण प्रयोगार्हत्वेन साजात्येऽपि न दोष । एतत्पूर्वभागस्य विभक्त्युत्पत्तिमनपेक्ष्य स्वात-न्त्र्येण प्रयोगानर्हत्वात् । अनुग्रहसम्भवादिति । अत एव न प्रत्येक तदुत्पत्ति । बाधादिति । अन्यथा द्वन्द्वोच्छेदो मलोपाद्यसिद्धिश्चेति भाव । यानिसरूपाण्येवेति । तेषामेकविभक्तौ परत एकशेष इति शेष । मानाभावादिति । भाष्येऽनुक्तत्वादिति भाव । किंचावृत्तौ प्रत्यासत्तिन्यायेन यस्या विभक्तावेकशेषस्तस्या विभक्तौ यानि सरूपाण्येव तेषामित्यर्थापत्त्या भ्यामादावेकशेषापत्ति । "प्रातिप-दिकैकशेषे मातृमात्रो प्रतिषेधो वक्तव्य" इति वार्तिकेन भ्यामा-दावपि तदभावस्यैवेष्टत्वानुमानात् । फलमिति । समुदायादेकविभ-क्तेरभावाद्विभक्तेर्लुकालुप्तत्वाच्चेति भाव ।

'करौ करा इत्यादी एकवद्भावापत्त ' असं जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचे कारण हे आहे का, ( 'कर सु कर सु' या स्थली 'द्वन्द्वश्च प्राणितूर्यसेनाङ्गानाम्' सू ९०६ या नियामक सूत्रानें इतरेतरयोगद्वन्द्वाचा बाध होऊन समाहारद्वन्द्वाची प्राप्ति होत अस-ल्यामुळें व एकशेष हा इतरेतर योगद्वन्द्वाचा बाधक असून समाहार-द्वन्द्वाचा बाधक नसल्यामुळें आणि ) 'करौ करा ' इत्यादि इतरेत-

रयोगद्वन्द्वाचे विषय नसल्यामुळे अशा ठिकाणी एकशेष न होण्याची आपत्ती येते ( व एकशेष न करिता समाहारद्वन्द्व केल्यास 'करकरम्' असे अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते ) 'सर्वे सर्वेषामित्यादौ द्वन्द्वे च, विभाषा जसि इत्यनयोरापत्ते ' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, 'जस शी' सू २१४ या सूत्रात 'वा' हे पद न घालता 'विभाषा जसि' सू २२५ असे जें पृथक् सूत्र केले आहे त्याचे कारण हे की, (समुदायवाचक 'सर्वे' या शब्दानें अनेक समुदायाचा बोध करणे नसून एकच समुदायाचा बोध करणे असल्यास जरी त्या शब्दाहून बहुवचनाच्या प्रत्ययाची प्राप्ति होत नाही तरी, 'सर्व' या समुदायात अन्तर्गत असलेल्या) व्यक्तीतील भेद प्रगट व्हावा अशी विवक्षा असताना, म्हणजे समुदायगत व्यक्तींची बहुत्वसंख्या सांगण्याची विवक्षा असताना, जेथें बहुवचन केले जाते तशा स्थलीं समुदाय अनेक नसून एकच असल्यामुळें इतरेतरयोगद्वन्द्वाची व एकशेषाची प्राप्ति होत नसल्यामुळें, तशा लक्ष्यापुढील 'जस्' प्रत्ययाचे जागी विकल्पेंकरून 'शी' आदेश न व्हावा याकरिता 'जस शी' या सूत्रात 'वा' या पदाचे ग्रहण केले नाही व 'विभाषा जसि' हे जें पृथक् सूत्र केले आहे त्याचा उद्देश हा की, (जेथें सर्वनामसंज्ञक पदाचा इतर पदाशी इतरेतरयोगद्वन्द्व होऊन सर्वनामसंज्ञक पद समासाच्या अन्ती असते तेथें तशा सामासिक पदाहून झालेल्या 'जस्' प्रत्ययाचे जागी विकल्पेंकरून 'शी' आदेश व्हावा व 'प्रथमचरम' सू २२६ इत्यादि) उत्तर सूत्रात त्या सूत्राची अनुवृत्ति व्हावी (प्रकृत सूत्रात अनुवृत्त केलेल्या 'द्वन्द्व' या पदाचा 'द्वन्द्वे प्रसक्ते सति' असा अर्थ न करिता 'द्वन्द्वे कृते सति' असा अर्थ केल्यास 'विभाषा जसि' या सूत्रान्वयें 'सर्वे' व 'सर्वा' अशी पाक्षिक रूपें होण्याची जी मनोरमेंत आपत्ति दिली आहे त्यावर शंकाकार असे म्हणतो की, वास्तविक ती आपत्ति येत नाही 'जस शी वा' असे जर पाणिनीनें सूत्र केले असते तर सर्व अदन्त सर्वनामाची 'जस्' प्रत्ययाची दोन पाक्षिक

रूपें झाली असती व 'विभाषा जसि' हे पृथक् सूत्र करण्याची काहीच गरज नव्हती. कारण 'जसः शी वा' असे एकच सूत्र केल्यानें सर्व काम भागू शकले असते. पण तसे न करितां 'जसः शी' व 'विभाषा जसि' अशीं जीं दोन पृथक् सूत्रें पाणिनीनें केली आहेत त्यावरून हे ज्ञापित होतें की, इतरेतरयोगद्वन्द्व करून एकशेष केल्यावर कोणतेंहि द्वन्द्वसमासनिमित्तक कार्य करता येत नाहीं व 'हलि सर्वेषाम्' सू. १७१ यातील 'सर्वेषाम्' हा निर्देश याचें ज्ञापक आहे. 'सर्वेषाम्' या स्थली 'सर्व ङस्, सर्व ङस् याचा सर्व ङ्स' द्वन्द्व करून एकशेष केल्यावर 'द्वन्द्वे च' सू. २२४ या सूत्रानें सर्वनामसंज्ञानिषेधाची प्राप्ति होते. अशा स्थली द्वन्द्व करून एकशेष केल्यावर द्वन्द्वसंज्ञानिमित्तक सर्वनामसंज्ञानिषेध होतो असें मानल्यास, 'सर्वाणाम्' असे रूप होण्याची आपत्ति येते पण पाणिनीनें तसा सौत्रनिर्देश न करितां 'सर्वेषाम्' असा सौत्रनिर्देश केला असल्यामुळें त्यावरून हे स्पष्ट होतें की, द्वन्द्व करून एकशेष केला असता द्वन्द्वनिमित्तक कोणतेंहि समासकार्य नंतर करता येत नाहीं. त्यामुळें 'सर्व सु सर्व सु सर्व सु' याचा द्वन्द्व करून एकशेष केल्यावर 'सर्व जस्' अशी स्थिति झाली असता, 'विभाषा जसि' या सूत्रानें द्वन्द्वसंज्ञानिमित्तक जें वैकल्पिक 'जस्' स्थानिक 'शी' भावरूप कार्य प्राप्त होतें ते करता येत नाहीं आणि त्यामुळें 'सर्वाः' असे पाक्षिक रूप होण्याची आपत्ति टळते व 'जसः शी' सू. २१४ या सूत्रानें 'सर्वे' असेंच रूप होतें सारांश 'द्वन्द्वे प्रसक्ते सति' असा पक्ष न मानता 'द्वन्द्वे कृते सति' असा पक्ष मानला तरी, दीक्षितांनीं मनोरमेंत ज्या आपत्ति दिल्या आहेत त्या येत नाहीत असें प्रकाशमतानुयायी शंकाकारानें म्हणणें आहे. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात की, 'सर्व' हा शब्द समुदायाचा वाचक असल्यामुळें जेथें अनेक समुदायाची विवक्षा आहे तशा स्थली एकशेष केला असता द्विवचनाचा किंवा बहुवचनाचा प्रत्यय जसा प्राप्त होतो त्याचप्रमाणें जेथें समुदायाच्या एकत्वाची विवक्षा असून

समुदायावयवगत बहुत्वसंख्येची विवक्षा आहे तशा स्थली देखील 'सर्व' या शब्दाहून बहुवचनाचा 'जस्' प्रत्यय करता येतो. पण या द्वितीय स्थली समुदायाच्या एकत्वाचीच विवक्षा असल्यामुळें 'सर्व सु सर्व सु सर्व सु' अशी स्थिति न होता 'सर्व जस्' अशीच एकदम स्थिति होते. अशा स्थितीत द्वन्द्वाची किंवा एकशेषाची प्राप्तीच होत नाही व त्यामुळें द्वन्द्वसमासाच्या निमित्तामुळें प्राप्त होणाऱ्या 'विभाषा जसि' या सूत्राची आपोआपच प्राप्ति होत नाही. 'जसः शी वा' असे 'जसः शी' या सूत्राऐवजी सूत्र केलें असतें तर, वरील उदाहरणात 'सर्वाः' असें अनिष्ट रूप होण्याची आपत्ति आली असती. ती आपत्ति न यावी व 'प्रथमचरम' इत्यादि उत्तर सूत्रात 'विभाषा जसि' या सूत्राची अनुवृत्ति व्हावी याकरिता 'विभाषा जसि' हे पृथक् सूत्र केलें आहे, व हे सूत्र केवळ द्वन्द्वाच्या विषयात प्रवृत्त होणारें असल्यामुळें आणि वर सांगितल्याप्रमाणे 'सर्व जस्' या स्थली द्वन्द्वाची प्राप्ति होत नसल्यामुळें, तें सूत्र त्या उदाहरणात प्रवृत्त होत नाही. 'द्वन्द्वे इतें सति' असा पक्ष मानला व समुदायाच्या बहुत्वसंख्येची विवक्षा आहे असें मानून द्वन्द्व व नंतर एकशेष केला तर मात्र 'विभाषा जसि' हे सूत्र प्रवृत्त होण्याची व 'सर्वाः' असें पाक्षिक अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते. द्वन्द्व करून एकशेष केल्यावर द्वन्द्व-समासनिमित्तक कार्यें करता येत नाहीत व 'हलि सर्वेषाम्' या सूत्रातील 'सर्वेषाम्' हा निर्देश त्याचें ज्ञापक आहे असें जें शब्दकाराचें म्हणणें आहे त्यावर उत्तर हे आहे कीं, 'सर्वेषाम्' या स्थलीं उद्भूतावयवसमूहवाचक 'सर्व' या शब्दाहून द्वन्द्व व एकशेष यांची प्राप्ति होत नसल्यामुळें ते दोन्ही न होता, एकदम 'आम्' प्रत्यय झाला आहे असें मानल्यानें त्या निर्देशाची उपपत्ति लागत असल्यामुळें, तो निर्देश शब्दकारानें केलेल्या अपूर्व कल्पनेचें ज्ञापक आहे हें मानणें अत्यन्त क्लिष्ट व गौरवयुक्त आहे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा

आशय आहे. या विषयासंबधानें मंरवीत 'यच्चोक्त सुट् चोवतार्थ-ज्ञापक इति तदपि न, तेन निर्देशेन द्वन्द्वे प्रसक्ते सतीति व्याख्यानमेव ज्ञाप्यताम् । अपूर्वस्य ज्ञापकसिद्धस्य वचनस्य कल्पनापेक्षया ज्ञाप्यार्थस्य अस्मत्सम्मतव्याख्यानेन सिद्धौलाघवात्, उद्भूतावयवभेदसमूहात्मक सर्वशब्दादामि सुट प्रवृत्त्या तस्य निर्देशस्योपपन्नत्वाच्च' असे म्हटले आहे.) 'नियमस्य सजातीय विषयतायां औचित्याच्च' इत्यादि जें मनोरमेंत म्हटले आहे त्या ऐवजीं 'स्वातन्त्र्येण प्रयोगार्हत्वेन साजात्ये,' म्हणजे जेथें पूर्वभाग असा आहे की, ज्याचा भार्षेत स्वतंत्र रीतीनें प्रयोग होऊ शकतो तशाच ठिकाणी 'समास' ग्रहणकृतनियमान्वये समुदायास प्रातिपदिकसंज्ञा होत नाही, असे जरी म्हटले तरी काहीं दोष येत नाही, कारण 'राम राम' या समुदायातील पूर्व भाग जो 'राम' आहे त्याहून विभक्तिप्रत्यय उत्पन्न झाल्याशिवाय ता भार्षेत प्रयोगार्ह नाही, (कारण 'न केवला प्रकृतिः प्रयुज्यते नापि केवल प्रत्ययः' असे भाष्यात ठिकठिकाणी सांगितले आहे. म्हणून 'राम राम औ' या स्थली 'राम राम' या अर्थवान् समुदायाला प्रातिपदिकसंज्ञा करतेवेळी 'समास' ग्रहणकृतनियम आड न येण्याचे 'यत्र समुदाये पूर्वो भाग पद तद्विषयको नियम' असे जें मनोरमेंत कारण दिले आहे त्या ऐवजी शब्दरत्नातील प्रकृत पद्धतीत 'स्वातन्त्र्येण प्रयोगार्हत्वेन साजात्ये' हे जें कारण दिले आहे व ज्याचे वर विवरण केले आहे ते दिले तरी चालू शकते असे शब्दरत्नकाराचे म्हणणे आहे) 'तावताप्यवयवार्थाना सङ्ख्यान्वयेनानुग्रहसम्भवात्' असे मनोरमेंत म्हटले असल्यामुळें, म्हणजे 'राम राम औ' या स्थली 'राम राम' या समुदायाच्या अन्ती 'औ' हा जो सङ्ख्याबोधक विभक्तिप्रत्यय आहे तो समुदायातील प्रत्येक अवयवाच्या अर्थाशी अन्वित होऊ शकतो असे म्हटले असल्यामुळें, समुदायातील प्रत्येक अवयवाहून सुबुत्पत्ति होत नाहीं. (या विषयाचे विवरण मनोरमेंत केलेच आहे) 'एकाद्विर्वचनन्यायस्य बाधात्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे ते बरोबर

न मानल्यास, सर्वत्र द्वन्द्वसमास न होण्याची व नलोप इत्यादि कार्यें न होण्याची आपत्ति येईल. ('चार्थे द्वन्द्वः' सू. ९०१ या द्वन्द्व-विधायक सूत्रात 'सुबामन्त्रिते' या पूर्व सूत्रातून 'सुप् = सुबन्तम्' या पदाची व तसेच 'अनेकमन्यपदार्थे' या पूर्व सूत्रातून 'अनेकम्' या पदाची अनुवृत्ति होत असल्यामुळें, 'अनेकं सुबन्तं चार्थे वर्तमानं वा समस्यते' असा कौमुदीत त्या सूत्राचा अर्थ दिला आहे. या अर्थान्वयें द्वन्द्वसमास होण्यास अनेक सुबन्तांची अपेक्षा असते. द्वन्द्व-समासातील अवयवाहून सुबुत्पत्ति होत नाही व समुदायाहूनच सुबुत्पत्ति होते असें मानले तर, समुदायातील अवयव सुबन्त ठरत नसल्यामुळें, कोठेहि द्वन्द्वसमास होऊ शकणार नाही. तसेच 'दण्डी च खड्गी च दण्डिखड्गिनौ' या स्थली 'दण्डिन्' व 'खड्गिन् या द्वन्द्वसमासातील अवयवाहून सुबुत्पत्ति न करिता समुदायाहून सुबु-त्पत्ति करून 'दण्डिन् खड्गिन् औ' असे अलौकिक प्रक्रियावाक्य केल्यास, 'दण्डिन्' या प्रातिपदिकाहून सुबुत्पत्ति केली नसल्यामुळें ते पदसंज्ञक ठरणार नाही व त्यामुळें 'नलोपः प्रातिपदिकान्तस्य सू. २३६ या सूत्रानें होणारा नकारलोप न होण्याची आपत्ति येईल व 'दण्डिखड्गिनौ' असे इष्ट रूप सिद्ध होऊ शकणार नाही. शब्दरत्नात 'नलोपाद्यसिद्धि' असे जें म्हटले आहे त्यातील 'आदि' या शब्दानें पदान्तत्वनिमित्तक कुत्वादि कार्यांचे ग्रहण होते)

'एकविभक्तौ यानि सरूपाण्येवेति व्याख्येयम्' या मनोरमेतील शाकाग्रन्थाच्या पक्तीतील 'यानिसरूपाण्येव' या पदापुढें 'तेषामेक-विभक्तौ परत एकशेषः' ही पदें अध्याहृत आहेत (या पक्तीचे विवरण मनोरमेत केलेच आहे) 'आवृत्तौ मानाभावात्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचे कारण हे कीं, प्रकृत सूत्रातील 'एकविभक्तौ' या पदाची द्विरावृत्ति करावी असे भाष्यात कोठेंहि सांगितले नाही दुसरे असे की 'एकविभक्तौ' या पदाची द्विरावृत्ति केल्यास, प्रत्यासत्तिन्यायानें प्रकृत सूत्राचा असा अर्थ होण्याची आपत्ति येईल की, जो विभक्तिप्रत्यय पुढें असता एकशेष करणें

देतात की,) 'पयः पय' या समुदायापुढें कोणताहि विभक्तिप्रत्यय नाही व त्या समुदायातील प्रत्येक अवयवापुढें असलेल्या विभक्तिप्रत्ययाचा लुक् झाला आहे. ('पय पयो जरयति' या स्थली 'पय, पयः' या दोन भिन्न पदापुढें अनुक्रमें असणाऱ्या 'सु' व 'अम्' या विभक्तिप्रत्ययाचा 'स्वमोर्नपुंसकात्' सू- ३१९ या सूत्रानें लुक् झाला असल्यामुळें 'ही' दोन्ही रूपें समानस्वरूप होतात व 'ही' दोन प्रातिपदिकें अशी आहेत की, ज्याची सर्व विभक्तीत समान रूपें होतात म्हणून 'एकविभक्तौ परत' असे जें व्याख्यान केलें आहे ते न मानल्यास, या ठिकाणी एकशेष होण्याची आपत्ति येते. परतु ते व्याख्यान बरोबर मानल्यानेंच 'पयःपय' या समुदायापुढें कोणताहि विभक्तिप्रत्यय नसल्यामुळें, ती आपत्ति टळते, आणि हेच 'एकविभक्तौ' या पदाची द्विरावृत्ति करण्याचे फल आहे असे त्या वैयाकरणाचे म्हणणे आहे यावर मनोरमेंत असे उत्तर दिले आहे की, एकविभक्तौ' या पदाची द्विरावृत्ति न करिता जेथे सहविवक्षा आहे तेथेच एकशेष होतो हा पक्ष मानल्यास, वरील उदाहरणात सहविवक्षा नसल्यामुळें, एकशेष होऊच शकत नाही त्या उदाहरणात सहविवक्षा कशी नाही हे मनोरमेंत पूर्वी सांगितलेंच आहे)

शब्दरत्न—सहविवक्षायामिति । सा च समुदायस्यैकार्यनिरूपितैककारकावेश एव भवतीति भावः । गौणमुख्यकर्मणोरिति । उभयोरपि कर्मत्वेन तत्र समुदायादेकविभक्तेः कर्तुं शक्यत्वेन विभक्तिपदेन व्यावर्त्यासम्भवेन सहविक्षायामित्यावश्यकमिति भावः । नन्वत्रापि लुकि विभक्तिपरत्वाभाव इत्यरुचेराह—देवदेव इति । असहविवक्षायामप्येकशेषतत्पुरुषादिविषयेऽपि तदापत्तिरिति भावः । तत्रापि समुदायादेकविभक्तेः सत्वात् । नन्वनेकबोधकर्कभिक्षाशब्दादपि भैक्षसिद्धिरस्तीत्यत आह—तथा हीत्यादि । एकशेषारम्भे एकशेष विना तादृशस्य ज्ञानासम्भव इति भावः । विभक्तिपरत्वाभावादिति । परत्वान्नित्यत्वाच्चादिवृद्धौ साम्याभावाच्चेत्यपि बोध्यम् । अविरवि

कन्यायेन समाधानं तु लक्ष्यैकचक्षुष्कैर्बुद्ध्येयम् । न च समर्थग्रहणेन परिनिष्ठितप्रातिपदिकात्तद्धितोत्पत्तेः पूर्वमेकशेषे पश्चात्तद्धित इति वाच्यम् । प्रातिपदिकाधिकारात्सिद्धतत्समर्थं कृतवर्णानुपूर्वीकमिति भाष्यात्प्रातिपदिकसम्बन्धिवर्णमात्राश्रयतत्सम्बन्धिवर्णनिमित्तकार्येण परिनिष्ठितत्वस्यैवाश्रयणात् । अतएव "अश्विमानम् इति सङ्गच्छते । अन्यथा प्रकृत्यन्ते दीर्घश्रवणं स्यात् ।

( आता सहविवक्षा आहे हें केव्हा मानता येते हें शब्दरत्नकार पुढील पक्तींत सांगतात. ) जेथें समुदायाचा–समुदायातील सर्व व्यक्तींचा वाक्यांतील क्रियेशी एकाच कारकरूपानें अन्वय असतो तेथें सहविवक्षा आहे असें मानता येते. ( उदाहरणार्थ 'धवखदिरौ छिन्धि' यातील 'धवखदिर' या समुदायाचा छेदनक्रियेशी एकाच कारकरूपानें, म्हणजे कर्मत्वरूपानें, अन्वय असल्यामुळें येथें सहविवक्षा आहे हें सिद्ध होतें. पण 'पयःपयो जरयति' या स्थली 'पयःपयः' हा समुदाय 'जरयति' या क्रियेशी एकाच कारकरूपानें अन्वित नसून प्रथम 'पयः' हें प्रथमान्त पद कर्तृरूपानें व द्वितीय द्वितियान्त 'पयः' हें पद कर्मरूपानें अन्वित असल्यामुळें, येथें सहविवक्षा नाहीं हें स्पष्ट होतें. व त्यामुळें एकशेष होऊ शकत नाही.' ) 'गौणमुख्यकर्मणो.एकशेषापत्तेः' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे की, 'पय पयो नयति' या उदाहरणात 'पयः' पयः' हीं दोन्ही ( द्वितीयान्त ) पदें कर्म असल्यामुळें 'पय-पयः' या-समुदायापुढें एकाच विभक्तीचा, म्हणजे द्वितीया विभक्तीचा प्रत्यय लावणें शक्य आहे व त्यामुळें 'एकविभक्तौ परतः' हा पक्ष मानला तरी देखील या स्थली एकशेषाची व्यावृत्ति होऊ शकत नाही. ( व एकशेप होण्याची आपत्ति येते. ती आपत्ति टाळण्यासाठी ) एकशेप होण्याकरिता सहविवक्षा असावी लागते हें मानणें आवश्यक आहे ( 'पयः पयो नयति' या उदाहरणात दोन्ही 'पयः' हीं पदें द्वितीयान्त असल्यामुळें 'पयस् पयस् औ' असा द्विवचनप्रत्ययपरक

समुदाय मानल्यास येथें एकशेष होण्याची आपत्ति येते परंतु येथें सहविवक्षा नसल्यामुळें ती आपत्ति टळते येथें सहविवक्षा कशी नाही हे पूर्वी मनोरमेत सांगितलेच आहे ) वरील उदाहरणात देखील विभक्तिप्रत्ययाचा लुक् झाला असता, समुदायापुढें विभक्ति-प्रत्यय राहत नसल्यामुळे, म्हणजे 'पयस् अम् पयस् अम्' या स्थली 'अम्' या दोन्ही विभक्तीप्रत्ययाचा 'स्वमोर्नपुंसकात्' सू ३११ या सूत्रानें लुक् होऊन कोणताहि विभक्तिप्रत्यय समुदायापुढें राहत नसल्यामुळे, या स्थली एकशेषाची प्राप्तीच होत नाही आणि ही अडचि मनात धरूनच दीक्षितानी मनोरमेंत 'देवदेव' हे दुसरे उदाहरण दिले आहे सहविवक्षा नसता देखील एकशेष होतो असे मानल तर तत्पुरुष इत्यादि समासाच्या विषयात देखील एकशेष होण्याची आपत्ति यईल असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे, कारण देवदेव ' या उदाहरणात देखील 'देवदेव' या समुदायापुढें 'सु' हा विभक्तिप्रत्यय आहे ('देवाना देव देवदेव =देव आम् देव सु सु' या स्थली 'सुपो धातुप्रातिपदिकयो' सू ६५० या सूत्रानें 'आम' व सु या दोन अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाचा लुक् होऊन 'देव देव सु अशी स्थिति झाली असता, 'एकविभक्तौ परत' हा पक्ष मानला असता, येथें 'देव देव या समुदायापुढें 'सु' हा एकच विभक्तिप्रत्यय असल्यामुळे, हे उदाहरण षष्ठीतत्पुरु-षाचा विषय असून देखील, या स्थली एकशेष होण्याची आपत्ति येते परंतु 'एकविभक्तौ परत' हा पक्ष न मानता 'सह-विवक्षायामेकशेष हा पक्ष मानल्यास, पूर्वी मनोरमेंत सांगितल्या-प्रमाणे प्रकृत उदाहरणात सहविवक्षा नसल्यामळे, ती आपत्ति टळते ) अनेकभिक्षाव्यक्तिबोधक 'भिक्षा' या एकाच शब्दाहून 'अण्' प्रत्यय केला असता 'भैक्ष' हे रूप सिद्ध होऊ शकत असे कोणी म्हटल्यास, त्याचे उत्तर 'तथा हि भिक्षा इ अ इति स्थिते ' या मनोरमेंतील पक्तीत दिले आहे प्रकृत सूत्रानें एकशेषाचा आरंभ केला असल्यामुळें, एकशेष केल्याशिवाय 'भिक्षा'

हा शब्द अनेक भिक्षारूप व्यक्तींचा वाचक आहे असे ज्ञान होऊ शकत नाही असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. ( शब्द हा जातीचा वाचक नसून व्यक्तीचा वाचक आहे असे मानूनच पाणिनीनें एकशेषाचे प्रकृत सूत्र केले आहे त्यामुळें 'भिक्षा' या शब्दानें एकाच भिक्षाव्यक्तीचा बोध होऊ शकतो, अनेक भिक्षाव्यक्तींचा बोध होऊ शकत नाही. अनेक भिक्षाव्यक्तींचा बोध करणे असल्यास, जितक्या भिक्षाव्यक्तींचा बोध करणे आहे तितके भिक्षाशब्द, 'यावतामभिधान तावता प्रयोगो न्याय्य.' या वचनान्वयें, उच्चारणें आवश्यक आहे व तितके भिक्षाशब्द उच्चारल्यानतर एकशेष केला असता जो एक भिक्षाशब्द अवशिष्ट राहतो तो तेवढ्या सर्व भिक्षाव्यक्तींचा 'य. शिष्यते स लुप्यमानार्थाभिधायी' या न्यायान्वयें, वाचक होत असल्यामुळे, त्याहून बहुवचनाचा प्रत्यय होऊ शकतो. एक भिक्षाव्यक्तिवाचक एकाच 'भिक्षा' शब्दाहून एकवचनाचाच प्रत्यय होऊ शकतो. अशी स्थिति असल्यामुळें, एकशेष केल्याशिवाय एक भिक्षा शब्द अनेक भिक्षा व्यक्तींचा वाचक होऊ शकत नाही. जातिपक्ष मानला तर एक भिक्षाशब्दाने अनेक भिक्षाव्यक्तींचा बोध होऊ शकतो पण तो पक्ष मानल्यास, प्रकृत सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. म्हणून पाणिनीनें प्रकृत सूत्र आरभिले असल्यामुळे हे स्पष्ट होत की, व्यक्तिपक्षाला धरूनच पाणिनीनें प्रकृत सूत्र केले आहे, व त्या पक्षामध्यें 'भिक्षाणा समूहो भैक्षम्' हे रूप, 'भिक्षा' हा शब्द अलौकिक प्रक्रियावाक्यात तीनदा उच्चारल्याशिवाय, सिद्ध होऊ शकत नाही. आता 'भिक्षा इ अण्' हा जो तद्धितान्त समुदाय 'कृत्तद्धितसमासाश्च' या सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञक होतो त्यापुढे विभक्तिप्रत्यय राहत नसल्यामुळे एकशेष न होण्याची आपत्ति येते याचे 'विभक्तिपरत्वाभावादेकशेषो न स्यात्' हे जे मनोरमेंत कारण दिलें आहे त्या सेरीज हे देखील कारण देता येते की, 'तद्धितेष्वचामादेः' सू. १०७५ हे आदिवृद्धीचे सूत्र प्रकृत सूत्राच्या मानाने

परसूत्र असल्यामुळें व तसच त्या सूत्रानें होणारे वृद्धिकार्य नित्य असल्यामुळें, म्हणजे एकशेष प्रथम केला किंवा मागून केला तरी ते वृद्धिकार्य अवश्य होणारे असल्यामुळें,) परत्वामुळें व नित्यत्वामुळे आदिवृद्धिकाय प्रथम केल्यावर ('भिक्षा भिक्षा भिक्षा' हा समुदाय 'भैक्षा भिक्षा भिक्षा' असा झाल्यानें या समुदायातील 'भिक्षा' या तीन अवयवाचे) सारूप्य—समान रूप—नाहीसे होत असल्यामुळें एकशेप न होण्याची आपत्ति येते (परतु 'एकविभक्तौ परत' हा पक्ष न मानता तीन 'भिक्षा' या प्रातिपदिकाचा सुबुत्पत्ति करण्या पूर्वी प्रातिपदिकावस्थेंतच एकशेप होऊन जो एक 'भिक्षा' शब्द अवशिष्ट राहतो त्याहून 'आम्' प्रत्यय करून नतर समूहार्थक 'अण्' प्रत्यय केला जातो असें मानल्यास, त्या तद्धितान्त समुदायाला प्रातिपदिकसज्ञा होऊन 'आम्' या अन्तर्वर्ति विभक्तिप्रत्ययाचा 'सुपो धातुप्रातिपदिकयो' सू ६५० या सूत्रानें लुक् होऊन व 'तद्धितेष्वचामादे' सू १०७५ या सूत्रानें, णित्प्रत्यय पुढें असल्या-मुळें, 'भिक्षा' यातील आद्य अचाची वृद्धि होऊन आणि 'यस्येति च' सू. ३११ या सूत्रानें 'भिक्षा' यातील अन्त्य आकाराचा लोप होऊन 'भैक्ष हे इष्ट रूप सिद्ध होण्यात काही अडचण येत नाही आता कित्येक वैयाकरण असे म्हणतात की, अनेकार्थवाचक म्हणजे अथतन्त्रान्वयें अनेकभिक्षाव्यक्तिप्रतिपादक, 'भिक्षा' या शब्दाच्या षष्ठीच्या बहुवचनाहूनच 'भिक्षाणा समूह' या अर्थामध्यें 'अण्' प्रत्यय होत असतो व एकशेपनिष्पन्न 'भिक्षा' शब्दाहून 'अण्' प्रत्यय होत नाही आणि त्याच ते वैयाकरण 'अनभिधानात्' असें कारण देतात व म्हणतात की, असें समाधान मानलें असता, एकशेपाची प्राप्तीच होत नसल्यामुळें 'भैक्षम्' हे रूप सिद्ध होऊ शकत नाही असी जी आपत्ति मनोरमेंत दिली आहे ती मुळीच उद्भवत नाही आणि 'भिक्षा आम् अण्' अशी स्थिति झाली असता, या तद्धितान्ताला पूर्वी सांगितल्याप्रमाणे प्रातिपदिकसज्ञा होऊन व 'आम्' या अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाचा लुक् होऊन आणि

आधचाची वृद्धि व अन्त्य आकाराचा लोप होऊन 'भैक्षम्' हे रूप सिद्ध होण्यात कोणतीहि अडचण येत नाही. यावर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, त्या वैयाकरणांनी सांगितलेले) वरील समाधान लक्षणैकचक्षुष्क पुरुषाच्या ध्यानात येणे, अविरविकन्यायाप्रमाणे अशक्य आहे. ('द्विगोर्लुगनपत्ये' ४-१-८८ या सूत्रावरील भाष्यात अविरविकन्यायाचा उल्लेख केला आहे त्या भाष्यात भाष्यकार म्हणतात 'इहाऽस्माभिस्त्रैशब्द्यं साध्यं-पञ्चसु कपालेषु संस्कृत । पञ्चकपाल्या संस्कृत पञ्चकपाल: इति । तत्र द्वयो:शब्दयो: समानार्थयोरेकेन विग्रहोऽपरस्मादुत्पत्तिर्भविष्यत्यव्यविकन्यायेन । तद्यथा, अवेर्मांसमिति विगृह्य अविकशब्दादुत्पत्तिर्भवति-आविकमिति । एवं-पञ्चसु कपालेषु संस्कृत: इति विगृह्य पञ्चकपाल इति भविष्यति । पञ्चकपाल्या संस्कृत इति विगृह्य वाक्यमेव त्रैशब्द्यं चेह साध्यं, तच्चैवं सति सिद्धं भवति ।' या भाष्यात भाष्यकार असे म्हणतात की, 'संस्कृतं भक्षाः' सू. १२१७ या सूत्राने 'संस्कृत' या अर्थामध्ये सप्तम्यन्ताहून होणारा 'अण्' प्रत्यय 'पञ्चकपाल्याम्' या सप्तम्यन्ताहून नसून होत 'पञ्चसु कपालेषु' या सप्तम्यन्ताहून होतो, त्याच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, असेच अभिधान आहे, म्हणजे भाषेत वर सांगितल्याप्रमाणेच होत असते. आणि याच्या समर्थनार्थ ते दृष्टान्तरूपाने अव्यविकन्यायाचे उदाहरण देतात. 'अवि' शब्दाहून 'अवे: क:' सू. २०९६ या सूत्राने स्वार्थे 'क' प्रत्यय होऊन 'अविक' असा जो शब्द सिद्ध होतो त्याहून 'तस्येदम्' किंवा 'तस्य विकार:' या अर्थामध्ये 'अण्' प्रत्यय होऊन व 'तद्धितेष्वचामादे:' या सूत्राने आद्यचाची वृद्धि होऊन 'आविक' असे रूप होते. जरी 'अवेर्मांसम्' असे विग्रहवाक्य होते तरी, 'अवि' शब्दाहून 'अण्' प्रत्यय होत नाही व 'आवम्' असे रूप होत नाही. याचे कारण 'अनभिधान' हे होय, म्हणजे भाषेत 'अवि' या शब्दाहून 'अण्' प्रत्यय होत नसून 'अविक' या शब्दाहूनच तो प्रत्यय होत असतो. त्याचप्रमाणे जरी 'पञ्चकपाल्यां

सस्कृत.' असे विग्रहवाक्य होते तरी ते वाक्यरूपानेंच कायम राहते व अनभिधानामुळें 'पञ्चकपाल्याम्' याहून वर सांगितल्याप्रमाणे 'अण्' प्रत्यय न होता 'पञ्चसु कपालेषु' याहूनच तो प्रत्यय होतो. भाष्यकारानी 'अव्यविकन्याय' या शब्दानें वरील भाष्यात त्या न्यायाचा निर्देश केला आहे. पण कैयटाच्या टीकेवरून असे दिसून येते की, भाष्याच्या काही प्रतीत 'अविरविकन्याय' असा निर्देश आढळतो व शब्दरत्नकारानी त्या न्यायाचा निर्देश करतेवेळी 'अविरविकन्याय' हाच शब्द वापरला आहे. कैयटानें प्रदीपात 'अव्यविकन्यायेनेति' हे प्रतीक घेऊन 'अव्यविकशब्दयोर्यो न्यायस्ते-नेत्यर्थ.। क्वचिदविरविकन्यायेनेति पाठस्तत्र च दृष्टान्तत्वेनोपन्यासः। अवि.अविकन्यायेन, तद्द्वारेण, यथा प्रत्ययमुत्पादयति न तु स्वय तथाऽयमपीत्यर्थ । अथवाऽविरित्यस्य विभक्त्यन्तस्यानुकरणमविरिति। ततोऽनुकार्येणार्थेनार्थवत्त्वाद्या विभक्तिरुत्पद्यते तस्या द्वन्द्वान्तर्भावा-ल्लोपः, न तु पूर्वस्या., अनुकरणत्वात्सुप्त्वाभावात्। यथाऽ-स्यवामीयमिति षष्ठ्या लुगभावः। अथवा भाष्यकारवचन प्रामाण्यादस्य साधुत्वम्। एवमिति। पञ्चकपालीशब्दात्त्वनभिधानात्त-द्धितानुत्पत्तिरिति भाव.।' असे म्हटले आहे. साराश जेथे दोन समानार्थक शब्दापैकी एकानें विग्रह केला जातो व दुसऱ्याहून तद्धि-तप्रत्ययोत्पत्ति होते त्यालाच अव्यविकन्याय म्हणतात. या अविरविक-न्यायाचा आश्रय घेऊन कित्येक वैयाकरण पूर्वी सांगितल्याप्रमाणे असे म्हणतात की, अनेकार्थप्रतिपादक 'भिक्षा' या शब्दाहून 'अण्' प्रत्यय होत असून एकशेषनिष्पन्न 'भिक्षा' या शब्दाहून तो प्रत्यय अनभिधानामुळें होत नाही. यावर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, या लक्षणैकचक्षुष्क वैयाकरणाना 'अनभिधानात्' हे कारण देऊन अशा तऱ्हेचें प्रतिपादन करण्याचा अधिकार मुळीच नाही. तसा अधिकार सर्वत्र भाष्यकारादि लक्ष्यैकचक्षुष्क आचार्यानाच आहे. त्याचे भाषेवर विलक्षण प्रभुत्व असून सर्व प्रचलित रूपे त्याच्या डोळ्यासमोर सदैव खेळत असल्यामुळें व भाषेत प्रचलित

या स्थली प्रथम एकशेष होऊन 'भिक्षा आम्' असे परिनिष्ठित रूप झाल्यावरच त्याहून समूहार्थक तद्धित 'अण्' प्रत्यय होतो व तसे मानले असता, सारूप्य नष्ट झाल्यानें एकशेष होऊ शकत नाही अशी जी वर आपत्ति दिली आहे ती मुळीच येत नाही. त्याच्या म्हणण्याचा भावार्थ हा आहे की, 'समर्थाना प्रथमाद्वा' या सूत्रात 'समर्थ' या पदाचे ग्रहण केले असल्यामुळें व ते सूत्र 'ङ्याप्-प्रातिपदिकात्' या अधिकारात पठित असल्यामुळें त्या सूत्रातील 'समर्थ' हे पद त्या सूत्रात अनुवृत्त होणाऱ्या 'प्रातिपदिक' या शब्दाचे विशेषण होते आणि 'समर्थ' या पदाचा 'परिनिष्ठित प्रयोगार्ह–रूप' असा अर्थ मानला असल्यामुळें आणि जोपर्यंत एकशेष होत नाही तोपर्यंत प्रातिपदिकाचे ठिकाणी परिनिष्ठितत्व येत नसल्यामुळें, 'भिक्षा भिक्षा भिक्षा आम्' या स्थली तीन 'भिक्षा' या प्रातिपदिकाचा एकशेष करून जेंव्हा 'भिक्षा आम्' अशी स्थिति होते तेव्हा त्याहूनच 'अण्' प्रत्यय करता येतो व त्यामुळें वर दिलेली आपत्ति येत नाही व पूर्वी सांगितल्याप्रमाणे 'भैक्षम्' हे रूप सिद्ध होण्यात काही अडचण येत नाही. या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, 'समर्थानां प्रथमाद्वा' ४. १. ८२ या सूत्रातील 'समर्थानाम्' या पदाचा 'कृतसन्धिकार्याणाम्' असा अर्थ आहे. त्या सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात 'अर्थंतःसमर्थ-ग्रहण नैव कर्तव्यम्? । कर्तव्य च । किं प्रयोजनम्? । समर्थाद्रुत्पत्तिर्यथा स्यादसमर्थान्मा भूदिति । किं पुनः समर्थम्? । अर्थाऽभिधाने यत्समर्थम् । किं पुनस्तत्? । कृतवर्णानुपूर्वीक पद,– मौदियतिः, वैक्षमाणिरिति ।' या भाष्यातील 'कृतवर्णानुपूर्वीकम्' या पदाचा एवढाच अर्थ आहे की, प्रातिपदिकावयवभूत वर्णांमध्यें जें सन्धिकार्य त्या प्रातिपदिकान्तार्गत वर्णांच्या निमित्तामुळें प्राप्त होतें ते सन्धिकार्य केल्यानतर प्रातिपदिकाचे स्वरूप होते त्याला परिनिष्ठित स्वरूप म्हणतात व तशा परिनिष्ठित शब्दाहूनच तद्धितप्रत्ययोत्पत्ति होते. उदाहरणार्थ 'सु+उत्थित'

किंवा 'वि+ईक्षमाण' याहून 'अत इञ्' सू. १०९५ या सूत्रानें अपत्यार्थक तद्धित 'इञ्' प्रत्यय करणें झाल्यास, या वरील दोन प्रातिपदिकांतील वर्णांमध्यें 'अकः सवर्णे दीर्घः' सू ८५ या सूत्रानें जें सवर्णदीर्घरूप सन्धिकार्य प्राप्त आहे तें करून 'सुथित' व 'वीक्षमाण' अशी परिनिष्ठित—कृतसन्धिकार्य—रूपें झाल्यावरच त्याहून 'इञ्' प्रत्यय करता येतो व तो केला असता, 'तद्धितेष्व-चामादेः' सू. १०७५ या सूत्रानें आद्यचाची वृद्धि होऊन 'सौथिति:' व 'वैक्षमाणि:' हीं इष्ट रूपें सिद्ध होतात. सन्धिकार्य करण्यापूर्वी 'इञ्' प्रत्यय केल्यास 'सो + उत्थितिः = सावुत्थिति' व 'वै + ईक्षमाणिः = वायीक्षमाणिः' अशी अनिष्ट रूपें होण्याची आपत्ति येईल. परंतु एकशेष करणें हें सन्धिकार्य नव्हे. त्यामुळें 'भिक्षा भिक्षा भिक्षा आम्' याहूनच तद्धितोत्पत्ति होते. सारांश एकशेष करण्यापूर्वी तद्धितोत्पत्ति होत असल्यामुळें, वर 'साकल्याभावात्' ही जी आपत्ति दिली आहे ती योग्य ठरते असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.) म्हणूनच, म्हणजे प्रातिपदिकान्तर्गत वर्णांना प्रातिपदिकांत असणाऱ्या वर्णांच्याच निमित्तामुळें जें सन्धिकार्य पावलें आहे तें केल्यावर जें रूप सिद्ध होतें तें परिनिष्ठित रूप होय व तशा परिनिष्ठित रूपाहून तद्धितोत्पत्ति होते असा 'समर्थानां प्रथमाद्वा' या सूत्राचा अर्थ असल्यामुळेंच, 'अश्विमानण्' सू. ३४७२ या सूत्रांतील 'अश्विमान्' हा निर्देश योग्य ठरतो. 'परिनिष्ठित' या शब्दाचा वर जसा अर्थ केला आहे तो बरोबर न मानल्यास 'अश्विमान्' यांत 'अश्विन्' ही जी मतुप्प्रत्ययाची प्रकृति आहे त्या प्रकृतीत दीर्घ ईकाराचें श्रवण होण्याची आपत्ति येते ('अश्विशब्दः विद्यते यस्मिन् मन्त्रे स अश्विमान् = अश्विन् + मु + मतुप्' या स्थळीं 'मु' हा प्रत्यय असून 'अश्विन्' या प्रातिपदिकाचा अवयव नसल्यामुळें, 'मु' या प्रत्ययाच्या निमित्तामुळें 'सौ च' सू. ३५७ या सूत्रानें 'अश्विन्' या नकारान्त प्रकृतीला जें उपधा-दीर्घकार्य पावलें आहे तें न होता 'मतुप्' हा तद्धित प्रत्यय होतो.

हे उपधादीर्घकार्य सन्धिकार्य नसून प्रातिपदिकात असणाऱ्या वर्णाच्या निमित्तानें होणारे नसल्यामुळें, ते न करिता 'अश्विन्' हे परिनिष्ठित रूप ठरतेच व त्यामुळें 'अश्विन सु मतुप्' या तद्धितान्ताला प्रातिपदिकसंज्ञा होऊन व 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू. ६५० या सूत्रानें 'सु' या अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाचा लुक् होऊन आणि 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' सू २३६ या सूत्रानें 'अश्विन्' यातील अन्त्य नकाराचा लोप होऊन 'अश्विमान' असे इष्ट रूप सिद्ध होण्यात काही अडचण येत नाही. सारांश 'समर्थपरिनिष्ठित' या शब्दाचा 'कृतसन्धिकार्य' एवढाच अर्थ होत असल्यामुळें व केवळ सन्धिकार्य केल्यानंतर जे परिनिष्ठित रूप होतें त्याहून तद्धितोत्पत्ति होत असल्यामुळें, 'भैक्षम्' या रूपासबधानें वर जो आपत्ति दिली आहे ती यात्य ठरते.)

शब्दरत्न–उभयत इति । विभक्तौ परतो यतः प्रत्ययविधिस्तस्यैकदेश इत्यर्थात्तदाश्रयणमिति भावः । 'अचः परस्मिन्' इति स्थानिवत्त्वं तु न । लोकसिद्धतन्त्रानुवादकत्वादस्य शास्त्रस्यानुवादसामर्थ्यविव इन्द्रनियर्तकस्य शास्त्रीयविधित्वाभावात् । अनयाऽपि रीत्याऽन्तवद्भावाप्रवृत्तिरित्यन्यत् । यदि स्वैकदेशविकृतन्यायेन "प्राग्दीव्यतोऽण्" इति सूत्रस्यभाष्यप्रामाण्यात्स्थानषष्ठ्यबोधितविकारस्यापि ग्रहणमशास्त्रीयस्य च तेनातिदेशस्तदा मास्तस्य तेन न्यायेन तत्प्रकृतितया औ इत्यस्य च प्रत्ययत्वेनादोषः । अतएव तस्य परत्वसिद्धिः । अतएव श्रायसावित्यत्रैकादेशे कृते नुममाशङ्क्य "अचः परस्मिन्:" इति स्थानिवत्त्वेन परिहृतं भाष्ये इत्युच्यते तर्हि वैरूप्यादेकशेषो न स्यात् । "विरूपाणाम्" इत्यनेन तत्साधने तु न दोष इत्यलम् ॥

'उभयत आश्रयणेऽन्तादिद्भावाभावात्' असे जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, विभक्तिप्रत्यय पुढें असताना ज्याहून तो विभक्तिप्रत्यय होतो त्याचा एकदेश होतो असा

('एकविभक्तौ परतः' या पक्षात) प्रकृतसूत्रा चा अर्थ होत असल्यामुळें, पूर्वान्तवद्भाव व परादिवद्भाव या दोहोंचाहि युगपत् आश्रय करणे भाग पडते. ('एकविभक्तौ यानि सरूपाण्येव तेषामेकशेषः एकविभक्तौ परतः' या पक्षाचे जे वैयाकरण प्रतिपादन करितात त्यावर दीक्षितानीं मनोरमेंत असा दोष दिला आहे की, 'राम राम औ' या स्थलीं एकशेष करण्यापूर्वी 'वृद्धिरेचि' सू. ७२ या पर व नित्य सूत्रानें प्राप्त झालेले वृद्धिरूप एकादेशकार्य प्रथम केल्यावर 'रामरामौ' अशी स्थिति झाली असता, विभक्तिप्रत्यय एकादेशानें नाहींसा होऊन पुढें तो प्रत्यय राहत नसल्यामुळें, त्या पक्षात एकशेष होऊ शकत नाही यावर ते वैयाकरण असें उत्तर देतात की, परादिवद्भावानें विभक्तिप्रत्यय कायम आहे असें मानता येत असल्यामुळें एकशेष होण्यात काही अडचण येत नाहीं. पण 'औ' प्रत्यय कायम आहे असें मानण्याकरिता परादिवद्भाव केल्यास, ज्या 'राम राम' समुदायाहून तो 'औ' प्रत्यय झाला आहे तो समुदाय 'राम राम' असा होत असल्यामुळें व अशा रीतीनें समुदायातील दोन 'राम' शब्दांचे साम्य नष्ट होत असल्यामुळें एकशेष न होण्याची जी पुन्हा आपत्ति येते ती टाळण्याकरिता व त्याचे साम्य कायम राहावे, म्हणजे 'राम राम' अशी प्रकृति पूर्ववत् कायम राहावी, याकरिता पूर्वान्तवद्भाव देखील मानणे आवश्यक आहे. सारांश 'राम राम + औ = रामरामौ' या स्थलीं प्रकृति व प्रत्यय पूर्ववत् कायम आहेत असें मानण्याकरिता पूर्वान्तवद्भाव व परादिवद्भाव या दोहोंचाहि युगपत् आश्रय करावा लागतो व तसें करणें हे 'उभयत आश्रयणे नान्तादिवत्' या भाष्यवचनाविरुद्ध आहे असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे असें शब्दरत्नकार म्हणतात. यावर पुन्हा 'एकविभक्तौ परतः' हा पक्ष मानणारा असें म्हणतो की, 'राम राम औ' या स्थलीं 'रामराम' यातील अन्त्य अकार व त्यापुढील 'औ' हा प्रत्यय या दोहोंचे जागीं 'वृद्धिरेचि' सू. ७२ या सूत्रानें

प्रथम वृद्धिरूप एकादेश होऊन 'रामरामौ' अशी स्थिति झाली असता, 'औ' हा वृद्धिरूप एकादेश 'रामराम' या प्रकृतीचा अन्तावयव 'अ' आहे व 'औ' हा प्रत्ययच आहे असे जे आम्ही मानतो ते 'अन्तादिवच्च' सू ७५ या सूत्रान्वयें मानत नसून, 'अच परस्मिन् पूर्वविधौ' सू ५० या सूत्रान्वयें मानतो, कारण त्या सूत्रान्वयें स्थानिभूत अचाच्या पूर्व भागाचे ठिकाणी कार्य कर्तव्य असता अचाचे जागी झालेला आदेश स्थानिवद्भावानें स्थानिरूप मानता येतो आम्हाला प्रकृत स्थली 'औ' या प्रत्ययापूर्वी असणाऱ्या 'रामराम' या समुदायाचे ठिकाणी एकशेषरूप कार्य करणे असल्यामुळें, 'अ' व 'औ' प्रत्यय याचे जागी झालेला 'औ' हा वृद्धिरूप एकादेश स्थानिवद्भावानें 'अ+औ' च आहे, म्हणजे 'रामराम' अशीच प्रकृति असून त्या प्रकृतीपुढें 'औ' हा प्रत्यय कायम आहे, असे मानता येतें व त्यामुळें आमच्या पक्षात देखील एकशेष होण्यात काही अडचण येत नाही व दीक्षितानी मनोरमेंत दिलेली आपत्ति देखील येत नाही. यावर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की,) 'अच परस्मिन्' सू ५० या सूत्रान्वयें येथें स्थानिवद्भाव करता येत नाही, कारण लौकिक प्रयोगात प्रसिद्ध असलेल्या तन्त्राचेच-अर्थतन्त्राचेच-अनुवादक हे एकशेषशास्त्र असल्यामुळें, म्हणजे लौकिक प्रयोगात जितक्या व्यक्तींचा बोध करणे अभिप्रेत आहे तितके व्यक्तिवाचक शब्द न उच्चारता अर्थतन्त्रान्वयें अनेक व्यक्तींचा बोधक एकच शब्द उच्चारून त्याहून इष्ट विभक्तिप्रत्यय केला जातो याचा केवळ अनुवाद करणारे हे एकशेषशास्त्र असल्यामुळें, त्याच्या अनुवादकत्वरूप सामर्थ्यामुळेंच हे द्वन्द्वाची निवृत्ति करणार सूत्र शास्त्रीय कार्याच सूत्र-अपूर्वविधि-ठरत नाही (व 'अच परस्मिन्' हे सूत्र शास्त्रीय कार्य करतानाच लागू पडत असल्यामुळें, असे एकशेषरूप अशास्त्रीय कार्य करतेवेळी त्या सूत्राची प्रवृत्ति होऊ शकत नाही आणि त्यामुळें 'अ+औ' याचे जागी झालेला 'औ' हा वृद्धिरूप एकादेश, पूर्व समुदायाचे

ठिकाणी एकादेश करतेवेळी 'अ+औ' च आहे असे स्थानिवद्भावानें मानता येत नाही ) अशा रीतीनें हा एकादेशरूप कार्य अशास्त्रीय ठरत असल्यामुळें (शास्त्रीय कार्यालाच लागू पडणारे) 'अन्तादिवच्च' हें सूत्र देखील या स्थळीं लागू पडत नाही, म्हणजे वृद्धिरूप एकादेश केल्यावर 'रामराम औ = रामरामौ' अशी स्थिति झाली असता 'रामराम औ' अशीच स्थिति आहे असे 'अन्तादिवच्च' या सूत्रानें देखील मानता येत नाही, ही गोष्ट वेगळी (सारांश 'रामराम औ= रामरामौ' या स्थळीं 'अन्तादिवच्च' व तसेच 'अचः परस्मिन्' या दोन्ही सूत्रांची, अशास्त्रीय एकादेश-कार्य करतवेळीं, प्रवृत्ति करता येत नाही, कारण तीं दोन्ही सूत्रें शास्त्रीय कार्य कर्तव्य असतानाच प्रवृत्त होऊं शकतात ) पण 'प्राग्दीव्यतोऽण्' ४-१-८३ या सूत्रावरील प्रमाणभूत भाष्याच्या आधार 'एकदेशविकृतमनन्यवत्' – परि ३७ – ही परिभाषास्थान-षष्ठीनें बाधित नसलेल्या विकाराला देखील लागू पडते व तसच ती परिभाषा अशास्त्रीय कार्य करतेवेळीं देखील लागू पडते असे मानल्यास, 'रामराम' हा मकारान्त समुदाय 'औ' या विभक्ति-प्रत्ययाची प्रकृति आहे व 'औ' हा विभक्तिप्रत्यय त्या प्रकृतीपुढें विद्यमान आहे असे मानता येत असल्यामुळें, प्रकृत स्थळी एकादेश करण्यात काही दोष – अडचण – येत नाही ('ऋलृक्' या शिव-सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात – 'यद्येकदेशविकृतमनन्यव-द्भवतीत्युच्यते, राज्ञ. क च राजकीयम् अल्लोपोऽन इति लोप प्राप्नोति । एकदेशविकृतमनन्यवत् षष्ठीनिर्दिष्टस्येति वक्ष्यामि ।' या भाष्याचा भावार्थ हा आहे की, 'एकदेशविकृतमनन्यवत्', म्हणजे एका भागात विकृत झालेला शब्द निराळा न मानता मूळ शब्दाहून भिन्न नाहीं असे मानावे, ही परिभाषा मानल्यास, 'राज्ञ क च' सू. १३६४ या सूत्रानें 'राजन्' या वृद्धसंज्ञक प्रातिपदिकाहून 'छ' प्रत्यय केला असता 'राजन्' यातील नकाराचे जागीं ककार हा आदेश झाल्यावर 'राजक्' अशी स्थिति झाली असता 'अक्' हा

एकदेशविकृत भाग 'अन्' च आहे असे मानल्यानें, 'अल्लोपोऽनः' सू. २३४ या सूत्रानें त्या 'अक्' मधील अकाराचा लोप होण्याची आपत्ति येईल ही आपत्ति टाळण्याकरिता भाष्यकार असे सुचवितात की, जेथे सूत्रात स्थानषष्ठीचा निर्देश आहे व त्या स्थानषष्ठीमुळें एखादा शब्द एकदेशविकृत झाला असला तर, तसा एकदेशविकृत शब्द मूळ शब्दाहून भिन्न नाही असे मानावे. 'राज्ञः क च' या सूत्रात 'राज्ञः' ही स्थानषष्ठी असल्यामुळें जरी 'राजक्' हा शब्द 'राजन्' आहे असे मानता येईल तरी त्या सूत्रात 'अन.' असा स्थानषष्ठीनिर्देश नसल्यामुळें, 'अक्' हा 'अन्'च आहे असे एकदेशविकृतन्यायानें मानता येऊ शकत नाही व त्यामुळें 'राजकीयम्' यातील 'राजक्' या भागातील 'अक्' मधील अकाराचा लोप होण्याची आपत्ति टळते. पण पुढें भाष्यकार असे म्हणतात की, 'एकदेशविकृतमनन्यवत् षष्ठीनिर्दिष्टस्य' असे वचन पठित केल्यास इतर दोष उत्पन्न होण्याची आपत्ति येते. म्हणून अखेरीस भाष्यकार म्हणतात-'अथवा पुनरस्त्वविशेषेण', म्हणजे वरील वचनातून 'षष्ठीनिर्दिष्टस्य' हे पद गाळून 'एकदेशविकृतमनन्यवत्' असाच साधारण नियम मानावा, व हाच वास्तविक सिद्धान्तभूत नियम आहे हे प्राग्दीव्यतोऽण् या सूत्रावरील भाष्यावरून स्पष्ट होते. त्या भाष्यात भाष्यकार म्हणतात- 'अयुक्तोऽयं निर्देशः । न हि तत्र भविष्यद्दीव्यच्छब्दः पठ्यते । कस्तर्हि ? । दीव्यतिशब्दः । कथन्तर्हि निर्देशः कर्तव्यः ? । प्राग्दीव्यतेरिति । स तर्हि तथा निर्देशः कर्तव्यः-प्राग्दीव्यतेरिति ? । न कर्तव्य । दीव्यतिशब्दे च दीव्यच्छब्दोऽस्ति तस्मादेषा पञ्चमी । किं पुन.कारण विकृतनिर्देशः क्रियते ? । एतज्ज्ञापयत्याचार्यो भवत्येषा परिभाषा एकदेशविकृतमनन्यवद्भवतीति।' या भाष्याचा भावार्थ हा आहे की, 'प्राग्दीव्यतोऽण' या सूत्रात केलेला 'दीव्यतः' हा पञ्चमीनिर्देश अयोग्य आहे. वास्तविक 'दीव्यतेः' असा 'दीव्यति' या शब्दाच्या पञ्चमीचा निर्देश वरील सूत्रात करावयास पाहिजे

होता; कारण 'तेन दीव्यति खनति जयति जितम्' सू. १५५० या सूत्रात 'दीव्यति' असा शब्द पठित असून 'दीव्यत्' असा शब्द पठित नाही. 'दीव्यत्' हा शब्द 'दीव्यति' या शब्दाच्या एकदेशाचें अनुकरण आहे. म्हणून 'दीव्यते' असा निर्देश प्रकृत सूत्रात करावयास पाहिजे होता. पण पुढें भाष्यकार असें म्हणतात की, आचार्य पाणिनींनें 'दीव्यते.' असा निर्देश न करिता 'दीव्यत' असा जो एकदेशविकृत निर्देश मुद्दाम केला आहे तो अशा हेतूनें केला आहे की, 'एकदेशविकृतमनन्यवत्' असा न्याय आहे हें ज्ञापित व्हावें या स्थली 'दीव्यति' या शब्दाचे जागी पाणिनीनें 'दीव्यत्' असा जो एकदेशविकृत शब्द पठित केला आहे तो कोणत्याहि पाणिनीय सूत्रात निर्दिष्ट असलेल्या स्थानषष्ठीच्या आधारें आलेला नाही असें असून देखील तशा एकदेशविकृत 'दीव्यत' शब्दाला भाष्य-कारानी एकदेशविकृतमनन्यवत्' ही परिभाषा लावली असल्यामुळें त्यावरून हें सिद्ध होतें की, स्थानषष्ठीनिर्देशानें होणाऱ्या व तसेंच इतर कोणत्याहि रीतीनें होणाऱ्या विकाराना ती परिभाषा सारखीच लागू पडते व त्यामुळें 'राम राम औ = रामरामौ' या स्थली झालेला 'औ' हा वृद्धिरूप एकादेश परादिवद्भावानें 'औ' प्रत्ययच आहे असें मानल्यानें जरी 'रामराम' या प्रकृतीचे 'रामराम्' असें एकदेशविकृत स्वरूप होतें व तसें स्वरूप जरी पाणिनीयसूत्रनिर्दिष्ट स्थानषष्ठीच्या आधारें होत नाही तरी, वरील परिभाषा येथें प्रवृत्त होऊन 'रामराम्' ही एकदेशविकृत प्रकृति 'राम राम' अशी मूळची प्रकृति आहे असें मानता येऊ शकतें अशा रीतीनें 'राम राम' या समुदायापुढें 'औ' हा विभक्तिप्रत्यय आहे असें मानता येत असल्यामुळें, 'एकविभक्तौ परतः' या पक्षात देखील 'राम-राम' याचा एकशेष होण्यात व 'रामौ' असें इष्ट रूप सिद्ध होण्यात काही अडचण येत नाही. दुसरें असें की, एकशेष करणें हें जरी अशास्त्रीय कार्य आहे तरी, 'प्राग्दीव्यतोऽण्' या सूत्रात 'दीव्यति' या शब्दाचे जागी पाणिनीनें 'दीव्यत्' असा

जो शब्द पठित केला आहे तो कोणत्याहि सूत्राचे आधारे झालेला आदेश नसून देखील त्याला भाष्यकारानी वरील परिभाषा लावली असल्यामुळें हे स्पष्ट होतें की, अशास्त्रीय कार्य करतेवेळीं देखील ती परिभाषा लागू पडते. आणखी असे की, 'छिन्नपुच्छे शुनि श्वत्वव्यवहार.' या लौकिक न्यायाच्या आधारावर ती परिभाषा रचले असल्यामुळें, अशास्त्रीय कार्य कर्तव्य असता देखील ती प्रवृत्त होऊ शकतेच. म्हणून अशास्त्रीय एकशेष करतेवेळी 'राम राम्' ही एकदेशविकृत प्रकृति 'राम राम' ही मूळचीच प्रकृति आहे असे वरील परिभाषान्वयें मानण्यात कोणताहि प्रत्यवाय येत नाही.) म्हणूनच, म्हणजे पाणिनीय सूत्रातील स्थानषष्ठीनिर्देशानें न झालेल्या व तसेच अशास्त्रीय विकाराला देखील 'एकदेशविकृतमनन्यवत्' ही परिभाषा लागू पडत असल्यामुळेच, (कार्यकालपक्षात देखील 'रामौ' या शब्दाला) पदसंज्ञा होते. (यथोद्देशपक्षात 'राम राम' या दोन प्रातिपदिकाचा एकशेष होऊन अवशिष्ट राहिलेल्या व्यक्तिद्वयवाचक 'राम' या शब्दाहून 'औ' प्रत्यय केल्यावरोवर 'राम औ' या सुबन्त समुदायाला 'सुप्तिङन्तं पदम्' सू २९ या सूत्रानें पदसंज्ञा होते व 'वृद्धिरेचि' सू ७२ या सूत्रानें वृद्धिरूप एकादेश केल्यावर 'रामौ' असें जें रूप होतें त्याला ती संज्ञा स्थानिवद्भावानें प्राप्त होते पण कार्यकालपक्षातील गोष्ट अगदीं वेगळी आहे. 'यत्र कार्यं तत्र संज्ञापरिभाषम्' असे त्या पक्षाचे स्वरूप असल्यामुळें 'रामौ पश्य' या वाक्यातील 'पश्य' या तिङन्ताला, 'अतिङन्तात् पदात् परं तिङन्तं निहन्यतेय' या अर्थाच्या वाक्य 'तिङ्ङतिङः' सू ३९३५ या सूत्रानें अनुदात्त स्वर करतेवेळीं 'रामौ' हा शब्द सुबन्त पद आहे आहे काय यावद्दल विचार करावा लागतो. त्यावेळी त्या सूत्राजवळ 'सुप्तिङन्तं पदम्' हे पदसंज्ञाविधायक सूत्र उपस्थित होते. पण 'वृद्धिरेचि' या सूत्रानें पूर्वीच वृद्धिरूप एकादेश होऊन गेला असल्यामुळें व प्रकृति आणि प्रत्यय हे आपापल्या स्वरूपात उपलब्ध नसल्यामुळें, 'रामौ' याला सुबन्त

पद मानावे कसे ? 'औ' या वृद्धिरूप एकादेशाला 'राम' या पदाचा तो अन्तावयव 'अ' च आहे व तो 'औ' प्रत्यय देखील आहे असे, 'उभयत आश्रयणे नान्तादिवत्' हे भाष्यवचन असल्यामुळें, मानता येत नाही, तो वृद्धिरूप एकादेश परादिवद्भावानें 'औ' प्रत्यय आहे असे मानल्यास, 'राम्' असे 'राम' या मूळ प्रकृतीचे एकदेशविकृत रूप होते. हे विकृत रूप कोणत्याहि पाणिनीय सूत्रातील षष्ठीनिर्देशानें होणाऱ्या आदेशानें झाले नसून, 'रामौ' यातील 'औ' हा प्रत्यय पृथक् केल्यानें झाले आहे अशाहि अशास्त्रीय विकृत स्वरूपाला 'एकदेशविकृतमनन्यवत्' या परिभाषान्वयें मूळ प्रकृति मानता येत असल्यामुळे आणि अशा रीतीनें 'राम' या मूळ प्रकृतीपुढें 'औ' हा 'सुप्' प्रत्यय आहे असे मानता येत असल्यामुळेंच, 'रामौ' याला 'सुप्तिङन्तं पदम्' या सूत्रानें होणारी पदसंज्ञा कार्यकालपक्षात देखील होते. या विषयाचे विस्तृत विवेचन परिभाषेन्दुशेखराच्या मराठी भाषान्तरात पान १२९–३० मध्ये केले आहे व ते वाचल्यास हा समग्र विषय उत्तम रीतीनें ध्यानात येईल.) स्थानषष्ठीनें न होणाऱ्या अशास्त्रीय आदेशाला देखील वरील परिभाषा लागू पडत असल्यामुळेंच, 'श्रायसौ' या स्थली वृद्धिरूप एकादेश केल्यावर नुमागम का होऊ नये अशी शंका भाष्यात उपस्थित केली आहे व 'अचः परस्मिन्' सू. ५० या सूत्रानें स्थानिवद्भाव होतो असे सांगून भाष्यकारानी त्या शंकेचे निवारण केले आहे. ('अचः परस्मिन्' १–१–५७ या सूत्रावरील भाष्यात 'एकादेशस्योपसङ्ख्यानम्' हे वार्तिक पठित करून या वार्तिकाचे व्याख्यान करिताना भाष्यकार म्हणतात–'एकादेशस्योपसङ्ख्यानं कर्तव्यम्। श्रायसौ गौमतौ चातुरौ आनडुहौ पादे उदवाहे। एकादेशे कृते नुमामौ पद्भाव ऊडित्येते विधयः प्राप्नुवन्ति।'.

'द्विवचनविभज्योपपदे तरबीयसुनौ' सू. २००५ या सूत्रानें 'प्रशस्य' या शब्दाहून 'ईयसुन्' हा उगित् प्रत्यय करते वेळी 'प्रशस्यस्य श्रः' सू. २००९ या सूत्रानें 'प्रशस्य' या शब्दाचे जागीं 'श्र' असा

आदेश होऊन 'श्र+ईयस्' अशी स्थिति झाली असता, 'आद्गुणः' सू. ६९ या सूत्रानें गुणरूप एकादेश होऊन 'श्रेयस्' असें रूप होतें. 'श्रेयस्' या शब्दाहून 'तत्र भवः' सू. १४२८ या अर्थामध्यें 'अण्' प्रत्यय केला असता, 'देविकाशिंशपा' सू. १४३९ या सूत्रानें 'श्रेयस्' यातील आद्यच् जो एकार त्याची वृद्धि न होता, त्याचे जागी आकारादेश होऊन 'श्रायस्+अण् = श्रायस' असें रूप होतें. या 'श्रायस' शब्दाहून 'औ' हा विभक्तिप्रत्यय केला असता, 'वृद्धिरेचि' सू ७२ या सूत्रानें वृद्धिरूप एकादेश होऊन 'श्रायसौ' असें रूप होतें कार्यकालपश्चात 'श्रायसौ' या सिद्धरूपाचें अन्वाख्यान करतेवेळीं 'औ' हा वृद्धिरूप एकादेश परादिवद्भावानें 'औ' हा सर्वनामस्थान विभक्तिप्रत्ययच आहे असें मानल्यास, 'श्रायस्+औ' अशी स्थिति होते. भाष्यकार म्हणतात की, अशा स्थितींत 'श्रायस्' हा एकदेशविकृत शब्द 'श्रेयस्' हा उगित् शब्दच आहे असें 'एकदेशविकृतमनन्यवत्' या परिभाषान्वयें मानता येऊं शकत असल्यामुळें, या शब्दाला 'उगिदचां सर्वनामस्थाने' सू. ३६१ या सूत्रानें नुमागम का होऊं नये ? या स्थलीं वास्तविक 'श्रेयस्' चे जागीं 'श्रायस्' असा कोणत्याहि पाणिनीय सूत्रनिर्दिष्ट स्थानषष्ठीनें आदेश झाला नाहीं 'देविकाशिंशपा' या सूत्रानें 'श्रेयस्' यातील केवळ एकाराचे जागी आकारादेश झाला आहे असें असून देखील भाष्यकारानीं या स्थलीं एकदेशविकृतपरिभाषान्वयें 'श्रायस्' हा शब्द 'श्रेयस्' च आहे असें मानून वर सांगितल्याप्रमाणें नुमागम होण्याची शंका उपस्थित केली असल्यामुळें त्यावरून हें स्पष्ट होतें की, स्थानषष्ठीनें न होणाऱ्या विकाराला–आदेशाला–देखील 'एकदेशविकृतमनन्यवत्' ही परिभाषा लागू पडते. म्हणून 'रामरामौ' या स्थलीं 'औ' हा वृद्धिरूप एकादेश परादिवद्भावानें 'औ' हा विभक्तिप्रत्ययच आहे असें मानल्यास 'राम राम्' ही जी एकदेशविकृतप्रकृति होते ती जरी कोणत्याहि पाणिनीय सूत्रातील स्थानषष्ठीनिर्देशानें होत नाहीं तरी

ती 'रामराम' अशी मूळ प्रकृति आहे असे वरील भाष्याच्या आधारें मानता येत असल्यामुळें, एकशेष होण्यात काही अडचण येत नाही असे 'एकविभक्तौ परत.' हा पक्ष मानणाऱ्याच म्हणणे आहे 'यदि ह्येकदेशविकृतन्यायेन.... परिहृत भाष्ये' हा शकाग्रन्थ आहे हे लक्षात ठेवावे. आता या शकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की,) जर शकाकाराचे वरप्रमाणे म्हणणे असेल तर, त्यावर असे उत्तर आहे की, या स्थळी वैरूप्यामुळें एकशेष होऊ शकत नाही (कारण 'रामरामौ' या स्थली 'औ' हा वृद्धिरूप एकादेश पराविवद्भावाने 'औ' हा विभक्तिप्रत्ययच आहे असे मानल्यास, 'राम राम' अशी जी प्रकृति होते तीत अदन्त व मान्त 'राम' व 'राम्' हे शब्द समानरूप राहत नसल्यामुळें, प्रकृत सूत्रान्वये एकशेष होऊ शकत नाही.) परतु 'एकार्थानामपि विरूपाणाम्' या वार्तिकाच्या आधारें एकशेष केला तर मात्र एकशेष होण्यात काही दोष–प्रत्यवाय–येत नाही. (कारण 'राम व राम्' हे शब्द जरी समानरूप नसून विरूप आहेत तरी ते दोन्ही शब्द एकाच अर्थाचे वाचक आहेत असे मानल्याने, वरील वार्तिकान्वयें एकशेष करण्यात काही अडचण येत नाही परतु या पक्षांत 'तु' हे अरुचिप्रदर्शक पद घातले असल्यामुळें भैरवीकार व भावप्रकाशकार असे म्हणतात की, या पक्षांत जे मत प्रदर्शित केले आहे ते शब्दरत्नकाराना मान्य नाही, कारण 'राम' हा अदन्त शब्द जरी 'राम' या व्यक्तीचा वाचक आहे तरी 'राम्' हा मकारान्त शब्द 'राम' या व्यक्तीचा वाचक नसल्यामुळें, हे दोन शब्द समानार्थक मानता येत नाहीत व त्यामुळें वरील वार्तिकान्वयें एकशेष होऊ शकत नाही. भावप्रकाशकार तर म्हणतात– 'वस्तुतस्तु तुनाऽस्यारुचिर्ध्वनिता, तदभावात्तदप्राप्तिरूपा । नतु कावत्वाम् । तथा च तदा न दोष इति न, अपि तु स दोष एवेति बोध्यम् ।') या विषयासबधानें एवढें पुरे.

शब्दरत्न – युगपदधिकरणेति । युगपदधिकरणानां द्रव्याणां वचनं यैः पदैस्तद्द्वारा इत्यर्थस्तदाह – एकैकमित्यादि । अलौकिके इति । तत्रैव द्वन्द्वादिप्रवृत्तिसत्त्वात् । तत्रापि तत्कल्पनादिति भाव । रामकृष्णावित्यादौ "विरूपाणामपि" इत्येकशेषस्तु न । द्वन्द्वविधान-सामर्थ्येन तत्प्राक्कालिकस्यैव समग्नार्थत्वस्य तत्र निमित्तत्वात् । एवं चैकस्य विभक्त्यन्तस्य निवृत्तावपरस्य यद्विशिष्टस्य श्रवणमिति भाव । पक्षान्तरेऽपीति । अयं भाव – अलौकिके तत्कल्पनेऽपि प्रत्येक मुत्पत्त्यनन्तरमेव तत्कल्पना, तदनन्तरमेव तत्कल्पकद्वन्द्वकार्यप्रयो प्रवृत्ते । एवं चान्तरङ्गत्वादुत्पन्नैकवचनत्यागेन द्विवचनाद्युत्पत्तौ मानाभाव इति । इतरपदार्थे उपसङ्क्रमेणेति । उपसङ्क्रमश्चतदा-लिङ्गितस्यैव स्वार्थस्योपस्थितिः । सा च विभक्त्यर्थसम्बन्धाद्यन्तर्भा-वेणैवेति तस्यौपनतया तदनापत्तौ तदुच्छेद इति भाव । वृत्ता चेति । वृद्धव्यवहारस्य शब्दार्थनिश्चयहेतुत्वम् । न च प्लक्षशब्दस्य न्यग्रोधा-भिधायित्वं वृद्धव्यवहारे दृश्यते । न्यग्रोधशब्देन तल्लाभश्च न लक्षणयापि, प्लक्षन्यग्रोधावित्यादौ बोधावृत्त्यननुभवाच्च । वृत्तपादा चेति । न च द्विवचनाद्यनुपपत्तिस्तदुपपादिका, समासस्योद्भूतावयव-भेदसमुदायाभिधायित्वमस्याद् द्विवचनादिसिद्धया तदनुपपत्तेस्तदुप-पादकत्वाभावात् । समुच्चयान्वाचययोः समासस्यासामर्थ्येनैव वार-यिष्यमाणतया न तदापत्तिरेतदुपपादिका । न चान्यतरपदार्थानुम-शासनेऽपि एकशेषे कस्य शेष इत्यत्र विनिगमकाभावात्सर्वेषां सर्वार्थत्वमावश्यकम् । तथा सत्येकशेषस्यैव वैयर्थ्यापत्ते । तस्मादेक-शेषमानोत्तर शास्त्रवासनावतां तच्छक्तिज्ञानं न तु तत प्रागपीति न दोष ।

मनोरमेत 'युगपदधिकरणवचनतायाम्' असा जो शब्द पाणिनी आहे त्याचा 'युगपत् अधिकरणानां – द्रव्याणां व्यक्तीनां वा – वचन यैः पदैः तानि युगपदधिकरणवचनानि, तेषां भाव युगपदधिकरण-वचनता' असा विग्रह आहे (व या पदाचा 'समासादि वृत्तिविषय-पदानि परस्परसमभिव्याहारात् समानवाचकानि । तथा च द्विशब्द-

ख्याविशिष्टार्थबोधकत्वे द्विवचनं, बहुत्वसङ्ख्याविशिष्टार्थकत्वे बहु-वचनमेव तेभ्यो, नत्वेकवचनमिति भावः' असा सरळेत अर्थ दिला आहे) आणि म्हणूनच, म्हणजे त्या शब्दाचा असा अर्थ होत असल्यामुळेच, 'एकैकमनेकार्थाभिधायि परस्परसमभिव्याहारात्' असे मनोरमेंत म्हटले आहे. (या पक्तीचे विवरण मनोरमेत केलेच आहे) 'अलौकिके द्वन्द्वैकशेषयोः प्रक्रियावाक्ये द्विवचनबहुवचनयोरेव प्रवेशात्' असें जें मनोरमेंतील शब्दग्रन्थात म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, युगपदधिकरणवचनता असल्यासच, म्हणजे समुदायातील प्रत्येक अवयव स्वतःचा व समुदायातील इतर शब्दाचा वाचक मानल्यासच, तशाच ठिकाणीं द्वन्द्व व एकशेष होऊं शकतात आणि तशा ठिकाणी देखील समुदायातील प्रत्येक अवयव समुदायातील सर्व अवयवाचा बोधक आहे असे कल्पिले जाते परतु 'रामकृष्णौ' इत्यादि स्थली (जरी 'राम' व 'कृष्ण' हे दोन्ही अवयव समुदायाचे, म्हणजे 'राम, कृष्ण' या दोहोंचेहि, वाचक कल्पिले जातात आणि अशा रीतीने दोन्ही अवयव एकप्रकारे समानार्थक मानता येतात तरी) 'विरूपाणामपिसमानार्थानाम्' या वार्तिकान्वयें एकशेष होऊं शकत नाही, कारण ('चार्थे द्वन्द्वः' या) द्वन्द्वविधायक सूत्राच्या सामर्थ्यानें, ज्याचा एकशेष कर्तव्य आहे ते शब्द एकशेष करण्यापूर्वी समानार्थक असणे हे निमित्त त्या वार्तिकाच्या प्रवृत्तीला आवश्यक आहे, म्हणजे त्या वार्तिकांत 'समानार्थानाम्' हे पद घातले असल्यामुळे त्यावरूनच हें स्पष्ट होते की, एकशेषवृत्ति करण्यापूर्वी जे विरूप शब्द समानार्थक आहेत त्याचाच त्या वार्तिकान्वयें एकशेष होऊ शकतो. ('रामकृष्णौ' या स्थलीं जरी 'राम' व 'कृष्ण' हे शब्द वृत्तिकरतेवेळी उभयार्थाचे—समुदायाचे—वाचक आहेत असे मानले तरी, वृत्ति करण्यापूर्वी 'राम' हा कृष्णाचा किंवा 'कृष्ण' हा रामाचा वाचक नसल्यामुळें, येथें वरील वार्तिक लागू पडत नाही व तशा विरूप व भिन्नार्थक असलेल्या शब्दाचा एकशेष होऊ शकत नाही

आणि द्वन्द्वविधायक सूत्राच्या सामर्थ्याने द्वन्द्वच होतो. अशा ठिकाणी द्वन्द्व न करिता एकशेष केल्यास, वरील वार्तिकातील 'समानार्थानाम्' हे पद व 'चार्थे द्वन्द्वः' हे द्वन्द्वविधायक सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते ) अशा रीतीने (अलौकिकप्रक्रियावाक्यातच द्वन्द्वाचा व एकशेषाच्या विषयात त्यातील प्रत्येक अवयवाहून द्विवचनाचा अथवा बहुवचनाचाच प्रत्यय उत्पन्न होत असल्यामुळे) एक विभक्त्यन्त अवयवाची निवृत्ति होऊन द्वितीय विभक्त्यन्त अवयवाचे श्रवण होते असा 'विभक्त्यन्तानामेकशेषः' असे म्हणणाऱ्याचा भावार्थ आहे. (युगपदधिकरणवचनता मानली असता, अजहत्स्वार्थावृत्तिपक्षात द्वन्द्वसमासातील व एकशेषातील प्रत्येक अवयव अलौकिकप्रक्रियावाक्यात केवळ स्वार्थाचा बोधक होत नसून समुदायार्थाचा बोधक होत असल्यामुळे, प्रत्येक अवयवाहून द्विवचनाचा किंवा बहुवचनाचाच प्रत्यय उत्पन्न करता येतो व एकवचनाचा प्रत्यय मुळीच उत्पन्न करता येत नाही. म्हणून 'राम औ राम औ' किंवा 'राम जस् राम जस् राम जस्' असे अलौकिकप्रक्रियावाक्य तयार झाल्यावर एकशेषवृत्तीने एक प्रत्ययान्त अवयव शिल्लक राहून बाकीच्या प्रत्ययान्त अवयवाची निवृत्ति होत असल्यामुळे, 'राम औ' किंवा 'राम जस्' अशी स्थिति होऊन 'रामौ, रामाः' अशी इष्ट रूपे सिद्ध होतात असा 'विभक्त्यन्तानामेकशेषः' या पक्षाचा पुरस्कार करणाऱ्याच्या म्हणण्याचा भावार्थ आहे )

'पक्षान्तरेऽपि प्रथमप्रवृत्तस्यैकवचनस्य त्यागायोगात्' असे जे मनोरमेत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, अलौकिक प्रक्रियावाक्यात जरी समुदायातील ( वृत्तिविषयभूत ) प्रत्येक शब्द समुदायाच्या अर्थाचा वाचक मानला जातो तरी, समुदायातील प्रत्येक शब्दाहून सुबुत्पत्ति केल्यानंतरच तो शब्द समुदायाच्या अर्थाचा वाचक मानला जाऊ शकतो आणि त्यानंतरच युगपदधिकरणवचनतेमुळे होणारे द्वन्द्व व एकशेष होऊ शकतात आणि म्हणून समुदायातील प्रत्येक शब्दाहून अन्तरङ्गत्वामुळे जो एकवचनाचा

विभक्तिप्रत्यय प्रथम उत्पन्न होतो त्याचा त्याग होऊन, म्हणजे तो नाहींसा होऊन किंवा तो न करिता, द्विवचनादि विभक्तिप्रत्यय उत्पन्न होतो असे मानण्यास काहीच प्रमाण नाही ('रामश्च रामश्च रामौ' या स्थळीं एकशेष करण्यापूर्वी प्रत्येक 'राम' शब्द एकेक व्यक्तीचाच वाचक असल्यामुळें, त्याहून प्रथम एकवचनाचा 'सु' प्रत्ययच करता येतो, व त्या प्रत्यय केल्यानंतर एकशेष करतेवेळीं जेव्हा प्रत्येक 'राम' शब्द दोन्ही 'राम' व्यक्तींचा वाचक मानला जातो तेव्हा त्या प्रत्येक 'राम' शब्दाहून 'औ' हा द्विवचनाचा प्रत्यय उत्पन्न करता येतो अशा रीतीनें एकवचनाचा प्रत्यय होणें हें कार्य प्रथमोपस्थित व तसेंच स्वार्थमात्रसापेक्ष, म्हणजे त्या शब्दाच्या केवळ अर्थाला धरून होणारें, असल्यामुळें अन्तरङ्ग ठरतें व त्याच्या मानानें द्विवचनादि प्रत्यय होणें या कार्याला स्वार्थाची व तसेंच समुदायार्थाची अपेक्षा असल्यामुळें, हें अनन्तरोपस्थित बह्वपेक्ष कार्य बहिरङ्ग ठरतें आणि 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे'—परि. ५०—या परिभाषान्वयें एकवचनप्रत्ययोत्पत्तिरूप जें अन्तरङ्गकार्य प्रथम प्राप्त होतें त्याचा त्याग करता येणें कसें शक्य आहे? तें अन्तरङ्गकार्य प्रथम केलेंच पाहिजे व तें कार्य केल्यानंतर बहिरङ्ग द्विवचनोत्पत्तिरूप कार्य करता येऊं शकत नसल्यामुळें, 'रामौ' असें इष्ट रूप सिद्ध होऊं शकत नाही.) 'उत्तरपदार्थे उपसङ्क्रमेण षष्ठ्यापाययोगात्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे की, ('राज्ञ पुरुषः राजपुरुषः' या षष्ठीसमासातील 'राजन्' या शब्दाच्या षष्ठीचा संबंधरूप) अर्थ 'पुरुषः' या उत्तरपदाच्या अर्थामध्यें उपसंक्रमित होऊन, म्हणजे त्या अर्थाशीं संबद्ध होऊन, आपला अर्थ सांगत असल्यामुळें, म्हणजे 'राजसम्बन्धी पुरुषः' अशा अर्थाचा बोध उत्तर पद करीत असल्यामुळें व अशा रीतीनें षष्ठीविभक्तीचा जो संबंधरूप अर्थ आहे तो उत्तर पदाच्या अर्थामध्येंच अन्तर्भूत झाल्याकारणानें उक्त होत असल्यामुळें, म्हणजे 'पुरुष'

या उत्तरपदानेंच 'राजसम्बन्धिपुरुषः' असा अर्थ सांगितला जात असल्यामुळे, ('उक्तार्थानामप्रयोग.' या न्यायान्वयें 'राजन्' या शब्दाहून) षष्ठीविभक्तीचा प्रत्यय उत्पन्न न होण्याची व षष्ठीसमासाचा उच्छेद होण्याची आपत्ति येते, म्हणजे असे मानल्यास कोठेंहि षष्ठीसमास होऊ शकणार नाही (या विषयाचे विस्तृत विवेचन पूर्वी मनोरमेत केलेच आहे) 'सेय युगपदधिकरणवचनता दु खा च दुरुपपादा च' या भाष्याच्या पक्तीत 'दु खा' असे जें म्हटले आहे त्याचें कारण हे आहे की, कोणत्याहि शब्दाचा अर्थ वृद्धाच्या व्यवहारावरून निश्चित होत असतो 'प्लक्ष' —पाकर— हा शब्द न्यग्रोधाचा —वटवृक्षाचा— वाचक आहे असे वृद्धव्यवहारात आढळून येत नाही. 'प्लक्ष' हा शब्द लक्षणेनें न्यग्रोधाचा वाचक आहे असे देखील मानता येत नाही, कारण न्यग्रोध शब्दाहून न्यग्रोध या अर्थाचा बोध होतोच. 'प्लक्षन्यग्रोधौ' इत्यादि स्थली समासातील प्रत्येक अवयवाहून 'प्लक्ष' व 'न्यग्रोध' या दोन्ही अर्थाचा आवृत्तीनें-दोनदा-बोध होण्याचा कोणासहि अनुभव नाही ('प्लक्ष' हा शब्द प्लक्ष व न्यग्रोध याचा वाचक आहे व 'न्यग्रोध' हा शब्द न्यग्रोध व प्लक्ष याचा वाचक आहे असे मानल्यास, 'प्लक्षन्यग्रोधौ' या सामासिक शब्दानें दोन प्लक्ष व दोन न्यग्रोध याचा बोध व्हावयास पाहिजे पण तसा बोध होत नाही. साराश द्वन्द्व किंवा एकशेष करतेवेळी अलौकिक प्रक्रियावाक्यातील प्रत्येक अवयव समुदायाच्या अर्थाचा वाचक आहे हे म्हणणे बुद्धीला पटत नाही आणि म्हणूनच भाष्यात युगपदधिकरणवचनता ही 'दु खा,' म्हणजे 'प्रतीतावनुपारोहाद्दोपान्तरत्वाच्च दुष्टा,' असे म्हटले आहे आहे आता तिला 'दुरुपपादा' असे का म्हटले आहे याचे कारण शब्दरत्नकार पुढील पक्तीत सागतात.) युगपदधिकरणवचनतापक्ष मानल्याशिवाय (द्वन्द्वसमास किंवा एकशेष केल्यावर) जो द्विवचनाचा किंवा बहुवचनाचा प्रत्यय करावा लागतो त्याची उपपत्ति लावता येणे शक्य नसल्यामुळें तो पक्ष मानणे आवश्यक आहे असे

कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाही; कारण (इतरेतरयोगद्वन्द्व) समास केल्यावर समाससामर्थ्यें त्यातील घटक पदाच्या अर्थाचा भेदानें-वेगवेगळा–बोध करून देण्याचें 'समुदायघटितरूप सामर्थ्य असल्या-मुळें, तसा अभिधानसामर्थ्यानेंच द्विवचनादिकाची सिद्धि होते, म्हणजे सामासिक शब्दाहून द्विवचनाचा किंवा बहुवचनाचा इष्ट प्रत्यय करता येतो. (सारांश इतरेतरयोगद्वन्द्वानें जरी समुदायाचा बोध होतो तरी त्यात अवयवाची भेदानें प्रतीति होत असल्यामुळें, अवयव-संख्येच्या अनुरोधानें द्विवचनबहुवचनाची उत्पत्ति करण्यात काही अडचण येत नाही) आणि म्हणून द्विवचनबहुवचनाची उपपत्ति लागत नाही याकरिता तो पक्ष मानणें आवश्यक आहे अशा रीतीनें त्या पक्षाचें समर्थन करता येत नाही. समुच्चय व अन्वाचय याच्या विषयात (परस्परान्वयाभावरूप) असामर्थ्यामुळेंच द्वन्द्वसमास होऊ शकत नाही असे पुढें सांगण्यात येणार असल्यामुळें, त्या दोन स्थली द्वन्द्वसमास होण्याची आपत्ति टाळण्या-करिता वरील पक्ष मानणें भाग आहे असेंहि म्हणता येत नाही. द्वन्द्वसमासाच्या विषयात वरील पक्षाची उपपत्ति लावणें अशक्य नसले तरी, म्हणजे वरील पक्ष मानणें आवश्यक नसले तरी, एकशेष करतेवेळी कोणता अवयव अवशिष्ट ठेवावा हे ठरविण्यास कोण-तीहि युक्ति उपलब्ध नसल्यामुळें, समुदायातील प्रत्येक अवयव समुदायातील सर्व अवयवाच्या अर्थाचा वाचक आहे असें मानणें भाग आहे असें म्हणणें असल्यास, तें म्हणणें देखील बरोबर नाही, कारण तें म्हणणें बरोबर मानल्यास, एकशेषशास्त्रच व्यर्थ ठरण्याची-आपत्ति येते. म्हणून एकशेषशास्त्र व्यर्थ न ठरावें याकरिता ज्याची पाणिनीय शास्त्रावर श्रद्धा आहे त्यानें हे मानणें आवश्यक आहे की, एकशेष होण्यापूर्वी समुदायातील प्रत्येक अवयव समुदायाच्या अर्थाचा वाचक होत नसून एकशेष केल्यानंतर जो अवशिष्ट राहतो तो ('य. शिष्यते सलुप्यमानार्थाभिधायी' या न्यायान्वयें) समुदायाच्या अर्थाचा वाचक होतो व तसें मानलें असता, (एकशेषशास्त्र चरितार्थ ठरते

आणि) काही दोष येत नाही. (युगपदधिकरणवचनतापक्ष, म्हणजे समुदायातील प्रत्येक अवयव समुदायाच्या अर्थाचा बोधक असतो व त्यामुळें समुदायातील प्रत्येक अवयवाहून एकवचनाच्या प्रत्ययाची उत्पत्ति करण्याची गरज न पडता द्विवचनबहुवचनाच्या इष्ट प्रत्ययाची एकदम उत्पत्ति करता येते, हा पक्ष दु:खद–बुद्धीला पटण्यास अशक्यप्राय व दोषमुक्त–असून दुरुपपाद आहे, म्हणजे त्याची उपपत्ति लावणें अशक्य आहे असें जें भाष्यात म्हटले आहे त्याचेंच विवरण शब्दरत्नातील वरील पक्तीत केले आहे. 'रामकृष्णौ, प्लक्षन्यग्रोधौ' इत्यादि सामासिक शब्दातील प्रत्येक अवयव संपूर्ण समुदायाच्या अर्थाचा वाचक आहे हें बुद्धीला पटत नाही. 'शक्तिग्रह व्याकरणोपमान' या मार्गें सांगितलेल्या कारिकेंत शब्दार्थबोध होण्याची जी अनेक साधनें सांगितली आहेत त्या सर्व साधनांचा उपयोग केला तरी, 'राम' किंवा 'कृष्ण' हा शब्द केवळ स्वार्थाचा बोधक ठरतो, 'रामकृष्ण' या समुदायाच्या अर्थाचा मुळीच बोधक ठरत नाही. तसेंच 'प्लक्षो जटी पर्कटीस्यान्न्यग्रोधो बहुपाद्वटः' या अमरकोशातील श्लोकावरून हें स्पष्ट होतें की, प्लक्ष व न्यग्रोध हे भिन्नार्थवाचक शब्द आहेत. प्लक्ष, जटी, पर्कटी हे तीन समानार्थक शब्द एकाच प्रकारच्या झाडाचे, म्हणजे पिंपरी या झाडाचे, वाचक असून, न्यग्रोध, बहुपाद्, वट हे तीन समानार्थक शब्द वटवृक्षाचे वाचक आहेत. शब्दार्थबोध होण्याची जी वरील कारिकेंत अनेक साधनें सांगितली आहेत त्यांपैकी वृद्धव्यवहार हें जें प्रधान साधन मानले जाते त्या वृद्धव्यवहाराच्यायोगें देखील प्लक्ष व न्यग्रोध हे केवळ स्वार्थाचे वाचक ठरत असून, 'प्लक्षन्यग्रोध' या समुदायाचे वाचक ठरत नाहीत अशी स्थिति असता, 'प्लक्षन्यग्रोधौ' या समुदायातील प्रत्येक अवयव समुदायाच्या अर्थाचा वाचक आहे हें म्हणणें बुद्धीला पटेल कसें? प्रकृत सूत्रावरील भाष्यांत या विषयासंबंधानें भाष्यकार म्हणतात – 'यदि तर्ह्येकेनानेकस्याभिधानं भवति प्लक्षन्यग्रोधौ एकेनोक्तत्वादपरस्य प्रयोगोऽनुपपन्नः। एकेनोक्तत्वात्तस्यार्थ-

स्यापरस्य प्रयोगेण न भवितव्यम् । किं कारणम् ? । उक्तार्थानामप्रयोग इति ।' या भाष्याचा अर्थ असा आहे की, जर एका शब्दानें अनेक शब्दांच्या अर्थाचे प्रतिपादन केले जाते हा पक्ष मानला तर, 'प्लक्षन्यग्रोधौ' या स्थली 'प्लक्ष' या एका शब्दानें प्लक्ष व न्यग्रोध या दोन्ही शब्दांच्या अर्थाचे प्रतिपादन होत असल्यामुळें, 'न्यग्रोध' या दुसऱ्या पदाचा 'उक्तार्थानामप्रयोगः' या न्यायान्वयें प्रयोग करता येऊं शकणार नाही. या भाष्यावरून हे स्पष्ट होतें की, इतरेतरयोगद्वन्द्वांतील प्रत्येक शब्द स्वार्थाचा वाचक ठरत असून समुदायाच्या अर्थाचा वाचक ठरत नाही. युगपदधिकरणवचनतापक्ष मानल्यास, 'प्लक्षन्यग्रोधौ' या समुदायांतील प्रत्येक अवयव प्लक्ष व न्यग्रोध या दोहोंचाहि वाचक ठरत असल्यामुळें, 'प्लक्षन्यग्रोधौ' या शब्दानें दोन प्लक्ष व दोन न्यग्रोध यांचा बोध व्हावयास पाहिजे. पण तसें होत नसून एक प्लक्ष व न्यग्रोध यांचाच बोध होत असतो. यावरून हे सिद्ध होतें की वरील पक्ष बुद्धीला पटणारा नसून दोषयुक्त देखील आहे मग असा दुर्बोध व दोषयुक्त पक्ष मानण्याची गरज काय ? तो पक्ष मानल्या. शिवाय जर इष्ट रूपाची सिद्धि होऊं शकत नसेल तर तो पक्ष अगतिकगतिन्यायानें मानणें भाग आहे. पण तशी खरोखर वस्तुस्थिति आहे काय? त्या पक्षाचा पुरस्कर्ता असें म्हणतो की, तो पक्ष न मानल्यास 'प्लक्षन्यग्रोध हा समुदाय एकत्वसंख्याविशिष्ट-समुदायाचा बोधक असल्यामुळें, त्याहून द्विवचनाचा प्रत्यय कसा होऊं शकणार? त्या समुदायांतील प्रत्येक अवयव प्लक्ष व न्यग्रोध या दोन व्यक्तींचा वाचक आहे असें मानलें तरच समुदायाहून द्विवचनाचा प्रत्यय करता येतो व अशा रीतीनें त्या पक्षाची उपपत्ति लावता येते व तो पक्ष मानणें आवश्यक ठरतें. यावर शब्दरत्नकार असें उत्तर देतात की, इतरेतरयोगद्वन्द्वसमासांत समुदायांतील अवयवांमधील भेद स्पष्टपणें बाधित होत असल्यामुळें, म्हणजे प्लक्ष वेगळा व न्यग्रोध वेगळा व ही भिन्न आहे असून यांचा एकंदर

सख्या दोन आहे असा स्पष्ट बोध होत असल्यामुळें, तशा द्वित्व-सख्याविशिष्टार्थबोधक समुदायाहून द्विवचनाचाच प्रत्यय होऊ शकतो व त्याकरिता वरील पक्ष मानण्याची मुळीच आवश्यकता नाही. साराश इतरेतरयोगद्वन्द्व व समाहारद्वन्द्व या दोन द्वन्द्व-समासात हाच फरक आहे की, इतरेतरयोगद्वन्द्वसमासातील अवयवाचा भेद स्पष्टपणे बोधित होत असल्यामुळे, त्याहून द्विवचनाचा किंवा बहुवचनाचा इष्ट प्रत्यय होण्यात काहीच अडचण येत नाही. पण समाहारद्वन्द्वातील अवयवाच्या भेदाची प्रतीति होत नसून एकत्व-सख्याविशिष्ट समुदायाचाच बोध होत असल्यामुळें, त्याहून द्विवचनाचा किंवा बहुवचनाचा प्रत्यय न होता, एकवचनाचाच प्रत्यय होतो यावर त्या पक्षाचा पुरस्कर्ता असे म्हणतो की, जरी इतरेतरयोगद्वन्द्वाच्या विषयात वरील पक्ष मानण्याची आवश्यकता नसली तरी, एकशेषाच्या विषयात तो पक्ष मानणे आवश्यक आहे, कारण 'राम राम औ = रामौ' या स्थली पहिला 'राम' शब्द परशु-रामाचा व दुसरा 'राम' शब्द दाशरथि रामाचा वाचक आहे असे मानल्यास, एकशेष करतेवेळी कोणता 'राम' शब्द नाहीसा करून कोणता शिल्लक ठेवावा हे काहींहि व्याकरणशास्त्रात सांगितले नसल्यामुळें, प्रथम 'राम' शब्द नाहीसा केल्यास केवळ दाशरथि रामाचा बोध होईल व दुसरा 'राम' शब्द नाहीसा केल्यास केवळ परशुरामाचा बोध होईल व त्यामुळे अवशिष्ट राहिलेल्या 'राम' शब्दानें एकच व्यक्तीचा बोध होऊ शकत असल्यामुळें, त्याहून द्विवचनाचा प्रत्यय करता येऊ शकणार नाही. तसा प्रत्यय करण्याकरिता हे मानणे आवश्यक आहे की, एकशेष करण्याकरिता जें अलौकिक प्रक्रिया-वाक्य तयार केले जाते त्या वाक्यरूप समुदायातील प्रत्येक 'राम' शब्द दोन्ही रामव्यक्तीचा वाचक आहे व तसे मानले असताच, अवशिष्ट 'राम' शब्दाहून द्विवचनाचा प्रत्यय करता येतो. यावर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, समुदायातील प्रत्येक 'राम' शब्द दोन्ही व्यक्तीचा वाचक आहे हे मानणें कोण-

त्याहि रीतीनें बुद्धीला पटत नसल्यामुळें तसें न मानता, 'यः शिष्यते स लुप्यमानार्थाभिधायी' या न्यायान्वयें जो अवशिष्ट राहतो तो स्वतःच्या व तसेच जो लुप्त झाला आहे त्याच्याहि अर्थाचा बोधक होत असल्यामुळें, वरील पक्ष न मानता देखील अवशिष्ट राहिलेल्या 'राम' शब्दाहून द्विवचनाचा प्रत्यय करण्यात काही अडचण येत नाही. सारांश एकशेष करतेवेळी जो अवशिष्ट राहतो त्याहून द्विवचनाचा किंवा बहुवचनाचा प्रत्यय होण्याकरिता वरील पक्ष मानणें आवश्यक आहे हें म्हणणें चूक ठरतें हे उघड आहे. दुसरें असें की, एकच 'राम' शब्द अनेक राम व्यक्तींचा प्रतिपादक आहे असें मानलें तर, 'मूले कुठारः' या न्यायान्वयें एकशेषशास्त्रच व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. परंतु भाष्यकारांनी तर ठिकठिकाणी असें म्हटलें आहे की, पाणिनीय सूत्रांतील एक अक्षर देखील व्यर्थ मानता येत नाही. मग पाणिनीकृत संपूर्ण एकशेषशास्त्र व्यर्थ मानता येत नाही हें सांगण्याची गरज काय ? म्हणून ज्याची पाणिनीय शास्त्रावर पूर्ण श्रद्धा आहे ते वरील पक्षाचा कोणत्याहि रीतीनें स्वीकार करू शकत नाहीत. आता वरील पक्षाचा पुरस्कर्ता असें म्हणतो कीं, समुच्चय व अन्वाचय यांच्या विषयांत जो द्वन्द्वसमास होण्याची आपत्ति येते ती टाळण्याकरिता वरील पक्ष मानणें आवश्यक आहे. पण या म्हणण्यांत देखील काही अर्थ नाही. 'चार्थे द्वन्द्व.' सू. १०१ या सूत्रानें 'च' च्या अर्थामध्यें द्वन्द्व होणें सांगितलें आहे 'च' या शब्दाचे समुच्चय, अन्वाचय, इतरेतरयोग व समाहार असे त्या सूत्रावरील कौमुदींत दीक्षितांनी चार अर्थ सांगितले आहेत व त्यांनी असेंहि म्हटलें आहे की समुच्चय व अन्वाचय यांच्या विषयांत असामर्थ्यामुळें द्वन्द्वसमास होऊं शकत नाहीं. समुच्चयाच्या विषयांत परस्परसाहचर्य नसून प्रत्येक शब्द परस्परनिरपेक्ष असतो उदाहरणार्थ 'ईश्वर गुरू च भजस्व' या स्थली 'ईश्वर' व 'गुरु' या दोहोंचाहि 'भजस्व' या क्रियेंत अन्वय आहे तरी, दोन क्रिया एकच नसून पृथक् आहेत व हें वाक्य वास्तविक एक वाक्य नसून

'ईश्वरं भजस्व, गुरू च भजस्व' या दोन वाक्याचे प्रतिपादक वाक्य आहे. परंतु 'रामकृष्णौ पश्य' या इतरेतरयोगद्वन्द्वाच्या विषयात एकच दर्शनक्रिया विवक्षित असून त्या एकाच क्रियेनें राम व कृष्ण या दोहोंचे युगपत् अवलोकन केले जाते. सारांश समुच्चयाच्या विषयात परस्परान्वयाभाव असून परस्परसाहचर्य नसल्यामुळें, त्या स्थली असामर्थ्यामुळें द्वन्द्वसमासाचो प्राप्तीच होत नाहीं. जेथें वाक्यात एक प्रधान क्रिया करणें सांगितलें असून दुसरी आनुषंगिक क्रिया करणें सांगितले आहे त्याला अन्वाचय म्हणतात. उदाहरणार्थ 'भिक्षामट गा चानय' या वाक्याचा 'भिक्षार्थमट, तदागो मिलिता चेत् तामप्यानय' असा अर्थ आहे. येथें भिक्षा मिळविण्याकरिता भ्रमण करणे ही प्रधान क्रिया असून तिच्या अनुषगानें करण्यास सांगितलेली गवानयनक्रिया अप्रधान आहे आणि 'भिक्षा' या पदाचा अटनरूप क्रियेंत अन्वय असून 'गो' या पदाचा आनयनरूप क्रियेंत अन्वय आहे व 'भिक्षा' आणि 'गो' या दोन शब्दामध्यें परस्परान्वय नाहीं. म्हणून परस्परान्वयरूप सामर्थ्य नसल्यामुळें 'भिक्षा' व 'गो' या दोन शब्दाचा द्वन्द्वसमास होऊं शकत नाही. सारांश समुच्चय व अन्वाचय या दोहोंच्याहि विषयात वर सांगितल्याप्रमाणे सामर्थ्याभावामुळेंच द्वन्द्वाचे आपोआप निवारण होत असल्यामुळें ते निवारण होण्याकरिता युगपदधिकरणवचनतापक्ष मानण्याची काहीच गरज नाही. अशा रीतीनें त्या पक्षाची कोणत्याहि रीतीनें उपपत्ति लागू शकत नसल्यामुळें व तो पक्ष बुद्धीला न पटणारा आणि दोषयुक्त असल्यामुळें त्याज्य आहे असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे असें शब्दरत्नकार म्हणतात.)

शब्दरत्न–आकृत्य विनाभूतेति । नियमेनाकृतिसम्बद्धेत्यर्थः । ब्राह्मणशब्देनैवेति भावः । नहि तत्रैकशेषः । तावद्ब्राह्मणशब्दजाना- सम्भवात् । तस्मात्तत्र जातिपक्षेण तन्त्रेण वा यथा निर्वाहस्तथा- न्यत्रापीति भावः । न ब्राह्मणमित्येकवचनं स्वार्थम् । तन्त्रेण सुवचत्वादिति । अयं भावः–आष्येर्यार्थवर्या प्रति मदर्यानर्याप्रति

च यत्तदपि प्रत्ययंमेवेति उक्तम् । एवं च एकेनानेकार्थबोधनमपि प्रत्ययंमेवेति एकेनैव ब्राह्मणपदेनानेकार्थबोधनं तत्र । अन्यथाऽविद्यमानायाः शक्तेरेकशेषशास्त्रसहस्रेणापि उपपादयितुमशक्यतया बोधानुपपत्तिरेव स्यात् । तन्त्रंचात्रार्थतन्त्रम् । एकस्यैव शब्देऽनेकार्थानां सत्त्वात् । शब्दस्य पर्यायपरिवृत्तिसहत्वयाऽयंतन्त्रमेवं तत् । अक्षा इत्यादौ तु तदसहत्वया शब्दतन्त्रमेव । अन्यथा–तन्त्रानङ्गीकारे । क्षमाशब्दः क्षान्तिभूम्योर्वाचकः । नानार्थानुरोधेनेति । सूत्रमावश्यकं तत्रैमि शेषः । न्यायप्राप्तत्वादिति । अनभिधानमाश्रित्य तु भाष्ये पक्षद्वयेऽपि सूत्रं प्रत्याख्यातमित्यन्यत् । अनेकघटादिपदानां चार्थे वृत्तिरेव नानभिधानादिति द्वन्द्वाप्राप्तिरेवेति तदाशयः । आवश्यकमिति अनभिधानाभावे इति शेषः ।

मनोरमेंतील 'आकृत्यविनाभूता' या पदाचा 'नियमेनावृतिसम्बद्धा' असा अर्थ आहे. (याचा अर्थ असा की, जाति व व्यक्ति या दोहोंमध्यें अविनाभावसंबंध असल्यामुळें, म्हणजे एक दुसऱ्याशिवाय राहूं शकत नसल्यामुळें, जातिवाचक शब्द उच्चारला असतां त्याहून अनेक व्यक्तींचा आपोआपच बोध होतो.) उदाहरणार्थ ('न ब्राह्मणं हन्यात्') या स्थलीं 'ब्राम्हण' हा शब्द उच्चारला असतां, ब्राम्हण जातीचा व त्याबरोबर अनेक ब्राम्हणव्यक्तींचा बोध होतो. ('न ब्राह्मण हन्यात्' या वाक्यांत निर्दिष्ट असलेला) 'ब्राम्हण' हा शब्द एकशेषानें सिद्ध झालेला शब्द नव्हे; कारण (ज्यांचा एकशेष करणें आहे त्यांची संख्या, तितके शब्द उच्चारण्याकरितां, माहीत असणें आवश्यक असल्यामुळें व जगांत किती ब्राम्हण आहेत हें माहीत होऊं शकत नसल्यामुळें) किती 'ब्राम्हण' शब्दाचा उच्चार करून एकशेष करावा हें ठरवितां येणें अशक्य आहे. म्हणून ह्या ठिकाणीं जसा जातिपक्ष किंवा अर्थतन्त्र मानून निर्वाह करून घ्यावा लागतो त्याचप्रमाणे 'रामौ' इत्यादि स्थलीं देखील जातिपक्ष किंवा अर्थतन्त्र मानून निर्वाह करून घेतला पाहिजे असा प्रकाशकारांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे.)

पण 'न ब्राह्मणं हन्यात्' या वाक्यातील 'ब्राह्मणम्' हा एकवचनाचा प्रयोग आर्ष आहे. (या पक्तीचे व्याख्यान करिताना भावप्रकाशकारानी 'तुना चात्रारुचि. सूचिता भाष्यविरोधरूपा। तत्र व्यक्तिपक्षे य कश्चिद् ब्राह्मणमहत्वा कृतो स्यादिति दोष दत्वा अत्र जातिपक्षेणैव निर्वाह इत्युक्तम्' असे म्हटले आहे, व हेंच शब्देन्दुशेखरात देखील म्हटले आहे.) 'व्यक्तिपक्षेऽपि.... तन्त्रेण सूत्रत्वात्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, प्रकृत सूत्रावरील भाष्यात 'अर्थां अर्थां प्रति यत्, अर्थान् अर्थान् प्रति च यत् तदपि प्रत्यर्थमेव' असे म्हटले असल्यामुळें, एका शब्दानें अनेक अर्थांचे प्रतिपादन करणें हें देखील प्रत्यर्थच ठरतें व त्यामुळें 'न ब्राह्मण हन्यात्' या वाक्यात 'ब्राह्मण' या पदानें अनेक व्यक्तींचा बोध होतो (प्रकृत सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात–'ननु चोक्त प्रत्यर्थं शब्दनिवेशान्नैकेनानेकस्याभिधानमिति। यदि चैकेन शब्देनानेकस्यार्थस्याभिधान स्यान्न प्रत्यर्थं शब्दनिवेशः कृत स्यात्। यद्यप्येकेनानेकस्याभिधान भवति तदपि प्रत्यर्थमेव। यदपि ह्यर्थावर्थौ प्रति तदपि प्रत्यर्थमेव। यदपि ह्यर्थानर्थान्प्रति तदपि प्रत्यर्थमेव।' या भाष्याचा अर्थ असा आहे की, प्रत्येक अर्थाचा बोध होण्याकरिता एकेक शब्दाचा प्रयोग करावा लागत असल्यामुळें एका शब्दानें अनेक अर्थ दाखविले जाऊ शकणार नाहीत, याकरिता एकशेष सांगितला पाहिजे. जर एका शब्दानें अनेकार्थ दाखविले जात असतील तर त्या ठिकाणीं तो शब्दाचा प्रयोग प्रत्यर्थ आहे असें म्हणता येणार नाहीं पण जसें जरी वर म्हटलें आहे तरी एका शब्दानें अनेक अर्थ दाखविणे हे देखील प्रत्यर्थच होय एका शब्दानें दोन दोन अर्थ दाखविणे हेंहि प्रत्यर्थच होय आणि तसेच एका शब्दानें दोनपेक्षा अधिक अर्थ दाखविणे हे देखील प्रत्यर्थच होय. सारांश भाष्यकारांच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं, जो शब्द जितके अर्थ दाखवितो तितक्या सर्व अर्थांकरिता तो एकच शब्द वापरणें असा 'प्रत्यर्थ' या शब्दाचा अर्थ आहे. म्हणून

एकाच शब्दाचे ठिकाणीं व्यर्थता व बव्हर्थप्रतिपादकता ही मूळचीच स्वाभाविक असल्यामुळें, एकशेष करण्याची काही गरज नाही असा भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय आहे हें शब्दरत्नकार पुढें सांगणार आहेत. या वरील भाष्यावरून हें सिद्ध होतें कीं, जो शब्द अनेक अर्थांचा बोध करतो त्याचा प्रयोग देखील प्रत्यर्थंच म्हणविला जातो व त्यामुळें 'न ब्राह्मण हन्यात्' या वाक्यातील 'ब्राह्मणम्' या एकवचनाच्या प्रयोगानें देखील अनेक ब्राम्हणव्यक्तींचा बोध होतो.) शब्दामध्यें अनेक अर्थांचें अभिधान करण्याचें सामर्थ्य नसतें असें मानल्यास, हजारो एकशेषशास्त्रानी देखील एका शब्दानें अनेक अर्थांचें अभिधान करण्याची उपपत्ति लागू शकणार नाहीं व त्यामुळें एका शब्दाहून अनेक अर्थांचा बोध होऊं शकणार नाहीं (शब्दामध्यें अनेक अर्थांचें प्रतिपादन करण्याची शक्ति नाहीं व एक शब्द एकाच अर्थाचा बोध करू शकतो असें मानलें तर, एकशेष केल्यावर जो एक शब्द अवशिष्ट राहतो तो लुप्त झालेल्या शब्दाच्या अर्थांचें, जरीहि एकशेषशास्त्रानें केली तरी, कसें प्रतिपादन करूं शकणार? म्हणून एकशेषशास्त्र सार्थक ठरण्याकरिता देखील प्रत्येक शब्दामध्यें अनेक अर्थांचें अभिधान करण्याची स्वाभाविक शक्ति आहे हें मानणें आवश्यक आहे व हें अर्थतन्त्राच्या साह्यानें मानता येऊं शकतें.) 'तन्त्रेण मुक्तसंशयात्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्यांतील 'तन्त्र' या शब्दानें अर्थतन्त्राचें ग्रहण होतें; कारण एकाच शब्दांत अनेक अर्थ असतात, म्हणजे अनेक अर्थांचा बोध करण्याचें त्यांत सामर्थ्य-शक्ति-असतें (तसें सामर्थ्य 'न ब्राह्मण हन्यात्' या वाक्यातील 'ब्राह्मण' शब्दांत असल्यामुळें, त्या एकाच शब्दाहून अनेक ब्राह्मणव्यक्तींचा बोध होतो.) 'न ब्राह्मण हन्यात्' या स्थलीं अर्थतन्त्र आहे व असें म्हणण्याचें कारण हें कीं, येथें 'ब्राह्मण' या शब्दाऐवजी त्याचा पर्यायवाचक ('विप्र' इत्यादि) शब्द उच्चारला तरी, तसाच अर्थ होऊं शकतो. परंतु 'अक्षाः' इत्यादि स्थलीं (जसा 'अक्ष' शब्द उच्चारल्यानें

द्यूत खेळण्याचे फासे, आस्कूड, बिब्बा इत्यादि अर्थांचा बोध होतो तसा 'अक्ष' या शब्दाचा) पर्यायवाचक शब्द उच्चारल्यानें बोध होत नसल्यामुळे, ते शब्दतन्त्राचे उदाहरण ठरतें. (साराश जेथें पर्यायवाचक शब्दाचा उपयोग केल्यानें देखील सारखाच अनेकार्थबोध होतो त्याला अर्थतन्त्र म्हणतात. पण जेथें मूळ शब्दाऐवजी पर्यायवाचक शब्द उच्चारला असता तसा अनेकार्थबोध होत नाही त्याला शब्दतन्त्र म्हणतात.) मनोरमेंतील 'अन्यथा जातिपक्षेऽपि' या पक्तीतील 'अन्यथा' या पदाचा 'तन्त्रानङ्गीकारे', म्हणजे तन्त्र न मानल्यास, असा अर्थ आहे. 'क्षमा' हा शब्द क्षान्ति व भूमि या दोन्ही अर्थांचा वाचक आहे. ('क्षमा' या शब्दाचे वर जे दोन अर्थ सागितले आहेत त्याची जाति भिन्न असल्यामुळें या स्थली जातिपक्ष मानल्यानें काम भागत नसून शब्दतन्त्र मानल्यानेंच निर्वाह लागू शकतो.) मनोरमेंतील 'नानार्थानुरोधेन' या पदापुढें 'सूत्रमावश्यक तत्र' ही पदें अध्याहृत आहेत. ('क्षमयो' या रूपाची सिद्धि होण्याकरिता प्रकृत सूत्र आवश्यक आहे असे जें या पक्तीत म्हटले आहे त्याचे कारण हे की, 'क्षमा' शब्दाचे क्षाति व भूमि हे जे दोन अर्थ होतात त्याच्या जाति भिन्न असल्यामुळें, येथें शब्दतन्त्र मानल्याशिवाय गत्यन्तर नाही व 'क्षमा' हा शब्द दोनदा उच्चारून प्रकृत सूत्रानें एकशेष करणें आवश्यक आहे. तसे केल्याशिवाय द्विवचनाचा प्रत्यय करता येत नाही असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे.) 'द्वन्द्वस्य न्यायप्राप्तत्वात्' असें जरी (एकशेषशास्त्र आवश्यक आहे असें गृहीत धरून) मनोरमेंत म्हटले आहे तरी, अनभिधानाचा आश्रय करून, म्हणजे भाषेंत अनेक व्यक्तींचा बोध करण्याकरिता तोच शब्द अनेकदा उच्चारला जात नसून एकदाच उच्चारल्यानें अनेक व्यक्तीचा बोध होऊ शकत असल्यामुळें, भाष्यकारानी जातिपक्ष व व्यक्तिपक्ष या दोन्ही पक्षात देखील प्रकृत सूत्राचे प्रत्याख्यान केले आहे ही गोष्ट वेगळी. (हें भाष्य नुकतेंच वर दिले आहे. त्या भाष्यानें भाष्यकार असें सूचवितात

की, व्यक्तिपक्षात देखील एका शब्दाचे ठिकाणी व्द्यर्थता व बह्वर्थ प्रतिपादकता असल्यामुळें, एकशेषाचे प्रकृत सूत्र असण्याची काही गरज नाही. 'चार्थे द्वन्द्व.' सू ९०१ या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या) 'च' या पदाचा जो (इतरेतरयोगरूप व समाहाररूप) अर्थ आहे तो अर्थ, 'घट' हा शब्द अनेकदा उच्चारला तरी त्या अनेकदा उच्चारलेल्या 'घट' शब्दानें, बोधित होत नसल्यामुळें, तशा स्थली, म्हणजे 'घट घट घट' अशा स्थली-अनभिधानामुळें, म्हणजे भाषेंत तसा शब्दप्रयोग होत नसल्यामुळें, द्वन्द्वसमासाची प्राप्तीच होत नाही (व त्यामुळें द्वन्द्वाचें निवारण होण्याकरिता प्रकृत एकशेषशास्त्र आरंभिण्याची काहीच गरज नव्हती) असा भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय आहे (इतरेतर-योगद्वन्द्वसमासाच्या विषयातच एकशेषाची प्राप्ति होते असे दीक्षिताचे म्हणणे आहे पण वर सांगितल्याप्रमाणे इतरेतरयोगरूप अर्थबोधित करण्याकरिता जर 'घट' हा शब्द अनेकदा उच्चारलाच जात नाही व अशा रीतीनें द्वन्द्वाची प्राप्तीच होत नाही तर द्वन्द्वनिवार-णार्थ एकशेषशास्त्र आरंभिण्याची गरज काय असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.) 'पक्षद्वयेऽपि सूत्रमावश्यकम्' या मनो-रमेच्या पक्तीतील 'आवश्यकम्' या पदापुढें 'अनभिधानाज्ञाने,' म्हणजे अनेक घटव्यक्तीचा बोध करण्याकरिता भाषेंत 'घट' हा शब्द अनेकदा उच्चारला जात नसून एकदाच उच्चारला जातो या ज्ञानाच्या अभावी, हे पद अध्याहृत आहे. ('घट' शब्द एकदा उच्चारला तरी त्यापासून अनेक घटाचा बोध होत असल्यामुळें, 'घट' हा शब्द अनेकदा उच्चारून द्विवचनबहुवचनाची उपपत्ति लावण्याकरिता एकशेष करण्याची काही गरज नाही प्रकृत सूत्रावरील भाष्यात पठित केलेल्या 'अभिधानं पुन स्वाभाविकम्' या वचनान्वयें एक शब्द सजातीय अनेक व्यक्तींचा स्वभावत च व्यक्तिपक्षात देखील बोधक होत असल्यामुळें, सजातीय अनेक व्यक्तींचा बोध करण्याकरिता

तो शब्द अनेकदा उच्चारण्याची काहींच गरज राहत नाही व त्यामुळें एकशेषाची वास्तविक प्राप्तीच होत नाही. परतु प्रकृत सूत्रावरील भाष्यात प्रकृत सूत्राचें भाष्यकारानी स्पष्टपणें प्रत्याख्यान केलेलें आढळत नसल्यामुळें व प्रत्याख्यानसमर्थनार्थ ज्या भाष्याचा वर दाखला दिला आहे ते एकदेशि भाष्य आहे असे कित्येक वैयाकरणाचे मत असल्यामुळें आणि पाणिनीय सूत्राचें यावच्छक्ति समर्थन करणें हें वृत्तिकाराचें कर्तव्य असल्यामुळें, त्या कर्तव्याला अनुसरून दीक्षितानी प्रकृत सूत्राची आवश्यकता दाखविण्याकरिता अनेक कारणें दिली आहेत व हें त्याचे करणें अगदी योग्य ठरत.)

शब्दरत्न–नानेनैकशेषो विधीयते इति । "किं तु न्यायसिद्ध एवानूद्यते" इति एतच्छेषस्तद्ग्रन्थे । प्रयुक्तानामिति । अय भावः–वृध्यादिप्रवृत्तावेकशेषशास्त्राप्रवृत्त्या नित्यविदध्युद्देश्यतावच्छेदकानाक्रान्तत्वेन तदेव परिनिष्ठितं स्यात्तच्च न लोके प्रयुज्यते प्रयुक्तानां चेदमन्वाख्यानमिति न तत्प्रक्रियावाक्ये वृध्यादिप्राप्तिरिति । सन्दर्भविरुद्धमिति । एकस्यैव प्रयोगो यथा स्यादिति, सूत्रमिति, समुदायादेकविभक्ताविति पक्षः प्रत्याख्यात इति च सन्दर्भ इत्यर्थः । न्यायविरोधमाह–प्रयुक्तानेवेति । न च यद्यादृशशास्त्रीयकार्यप्रवृत्त्या परिनिष्ठितं सल्लोके प्रयोगार्हं कल्पिते तदीयालौकिके तच्छास्त्रप्रवृत्तावपि अत्र वृध्यादिप्रवृत्तिर्नोचिता वैषम्यादिति वाच्यम् कृतद्वन्द्वानामेकशेष इति पक्षे नावौ अनड्वाहावित्यादौ परत्वादिना आवादौ कृते एकशेषानापत्तेरिति दूषणदानपरभाष्यवार्तिकासङ्गत्यापत्तेरित्यलम् ।

'नानेनैकशेषो विधीयते' असें जें प्रकाशकारानी म्हटलें आहे त्या पुढें 'किन्तु न्यायसिद्ध एवानूद्यते' अशी पंक्ति आहे. (प्रकाशग्रन्थ येथें उपलब्ध नाहीं परंतु भैरवीवरून व तसेंच भावप्रकाशावरून असें दिसून येतें कीं, 'नानेनैकशेषो विधीयते' या प्रकाशग्रन्थांतील पंक्तीपुढें वास्तविक 'किं तु वृत्तिविषये एकस्याप्यने-

कार्याभिधानशक्तिरस्तीति ज्ञाप्यते' ही पक्ति आहे व शब्दरत्नातील पक्ति त्या वरील पंक्तीचा भिन्न शब्दात अनुवाद करणारी आहे. प्रकाशकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, जर एका शब्दानें एकाच अर्थाचा—व्यक्तीचा—बोध होऊ शकतो असे मानले तर एकशेष करून जो एक शब्द अवशिष्ट राहतो त्याहून अनेक व्यक्तींचा बोध कसा होऊं शकणार ? जर एक शब्द स्वभावत च अनेक व्यक्तींचा बोध करू शकतो तर प्रकृत एकशेषाचें सूत्र अनावश्यक ठरतें, आणि हा आशय मनात धरूनच त्यानी 'नानेनैकशेषो विधीयते' इत्यादि पक्ति प्रकृत सूत्रावरील आपल्या टीकेत लिहिली आहे.) 'प्रयुक्तानामेवान्वाख्यानात्' इत्यादि जें प्रकाशकारानी आपल्या ग्रन्थात म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे की, ('राम राम औ' या अलौकिक प्रक्रियावाक्यातच) वृद्धिरूप एकादेश इत्यादि कार्यें केली तर ('रामरामौ' अशी स्थिति होईल व या समुदायातील 'राम' व 'रामौ' हे अवयव विरूप झाल्याकारणानें) एकशेषाचे प्रकृत सूत्र प्रवृत्त होणार नाही (व एकशेष न होण्याची आपत्ति येईल. म्हणून अलौकिक प्रक्रियावाक्यात वृद्धिरूप एकादेश इत्यादि कार्ये करणे योग्य नाहीं; कारण तसे केल्यास) कोणतेंहि नित्य कार्य करणे बाकी राहत नसल्यामुळें, म्हणजे ज्या ज्या नित्यकार्यांची प्राप्ति झाली आहे ती सर्व कार्यें अलौकिकप्रक्रियावाक्यातच होऊन गेली असल्यामुळें, 'रामरामौ' हेच परिनिष्ठित रूप होईल. पण भाषेंत तर तशा रूपाचा —'रामरामौ' या रूपाचा — प्रयोग होत नसतो आणि भाषेंत ज्याचा प्रयोग होतो त्याचेच अन्वाख्यान केलें जातें, म्हणजे तशा रूपाचाच प्रकृतिप्रत्ययरूप विभाग करून तीं रूपें पाणिनीय शास्त्रान्वयें कशी सिद्ध होतात याचे व्याख्यान केले जातें. म्हणून अलौकिकप्रक्रियावाक्यात वृद्धिरूप एकादेश इत्यादि कार्यांची वास्तविक प्राप्तीच होत नाहीं. असा प्रकाशकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. (साराश प्रयोगार्ह रूपाच्या सिद्धीकरिताच अलौकिकप्रक्रियावाक्य तयार केले जात असल्यामुळें, जो कार्य केल्यानें प्रयोगार्ह रूप सिद्ध

होते तशीच कार्ये अलौकिकप्रक्रियावाक्यात करता येतात व जी कार्ये केल्यानें प्रयोगार्ह रूप सिद्ध न होता तद्विपरीत–अनिष्ट व अशुद्ध–रूप होण्याची आपत्ति येते तशीं कार्ये अलौकिकप्रक्रिया-वाक्यात करता येत नाहीत. प्रकृत उदाहरणात 'वृद्धिरेचि' सू. ७२ या सूत्रानें वृद्धिकार्य केल्यानें 'राम राम औ = रामरामौ' अशी स्थिति झाली असता, 'राम, रामौ' अशी दोन असमान रूपें होत असल्यामुळें व समुदायापुढील 'औ' हा विभक्तिप्रत्यय नाहीसा होत असल्यामुळें, एकशेषाची प्राप्ति होत नाही व 'रामौ' हें प्रयोगार्ह रूप सिद्ध न होता, 'रामरामौ' असे अनिष्ट व अप्रयोगार्ह रूप होऊं पाहते. म्हणून प्रकृत स्थली अलौकिकप्रक्रियावाक्यात वृद्धिकार्य करणे अयोग्य आहे असा प्रकाशकाराच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. यावर मनोरमेंत उत्तर दिलेच आहे व त्याचें विवरण मनोरमेंत पूर्वी केलेच आहे ) 'तत्सर्वं सन्दर्भविरुद्धम्' असें जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा अर्थ हा आहे की, (समानरूप अनेक शब्दापुढें एकच विभक्तिप्रत्यय आला असता, त्या सर्व शब्दाचा प्रयोग न होता त्याऐवजी) एकाच शब्दाचा प्रयोग व्हावा याकरिता प्रकृत सूत्र केले असे प्रथम सांगून, नंतर प्रकाशकारानी 'समुदाया-देकविभक्तौ परत' या पक्षाचें प्रत्याख्यान केले आहे असा सदर्भ आहे. (साराश प्रकाशकारानी प्रथम प्रकृत सूत्राची उपयुक्तता प्रतिपादित करून आणि 'एकविभक्तौ परतः' हा पक्ष स्वीकारून नतर त्या पक्षाचे व तसेच प्रकृत सूत्राचे प्रत्याख्यान केले आहे व अशा रीतीनें त्याच्या म्हणण्यात परस्परविरोध येतो हे उघड आहे.) प्रकाशकाराचें म्हणणें कसं न्यायविरुद्ध आहे हें सिद्ध करण्याकरितां. 'प्रयुक्तानेवह्यन्वाख्यातुमलौकिकमुत्प्रेक्ष्यते' इत्यादि दीक्षितानी मनोरमेंत म्हटले आहे. (याचें विवरण पूर्वी मनोरमेंत केलेच आहे.) ज्या प्रकारचीं शास्त्रीय कार्यें केल्यानें परिनिष्ठित रूप होऊन तें भाषेंत प्रयोग करण्यालायक होतें त्याच प्रकारच्या शास्त्रीय कार्याचीं, तें रूप सिद्ध करण्याकरितां कल्पिलेल्या अलौकिक

प्रक्रियावाक्यात, जरी प्रवृत्ति होते तरी, 'राम राम औ' या स्थली वृद्धिरूप एकादेशकार्याची प्रवृत्ति करणे योग्य नाहीं, कारण तसे केल्यास वैषम्य येईल, म्हणजे जें परिनिष्ठित रूप होईल ते भाष्यंत प्रयोगार्ह असलेल्या रूपाहून भिन्न होईल, असे कोणी म्हटल्यास, ते म्हणणे बरोबर नाहीं, कारण 'कृद्वद्वन्द्वानामेकशेष' हा पक्ष मानल्यास 'नावौ, अनड्वाहौ' इत्यादि स्थली परत्व इत्यादि कारणामुळे आवादेश इत्यादि कार्यें केल्यास एकशेष न होण्याची आपत्ति येईल असे जें दूषणपर भाष्यांत व वार्तिकात म्हटले आहे ते विसंगत ठरण्याची आपत्ति येते (शंकाकाराचे असे म्हणणे आहे कीं, अलौकिकप्रक्रियावाक्यात अशी कार्यें करू नये कीं, जी केल्यानें परिनिष्ठित रूप प्रयोगार्ह होऊ शकणार नाही उदाहरणार्थ 'राम राम औ' या अलौकिकप्रक्रियावाक्यात जर 'वृद्धिरेचि' सू ७२ या पर व नित्य सूत्रानें वृद्धिरूप एकादेशकार्य प्रथम केले तर, 'रामरामौ' असे रूप होऊन त्यात 'राम, रामौ' असे दोन विरूप अवयव होतील व त्यामुळें एकशेष होणार नाही आणि 'रामौ' असे प्रयोगार्ह परिनिष्ठित रूप सिद्ध होणार नाहीं म्हणून अशा स्थली अलौकिकप्रक्रियावाक्यात वृद्धिरूप एकादेशकार्य न करिता केवळ एकशेष करावा व तसे केल्यावर 'राम औ' अशी स्थिति झाली असता वृद्धिरूप एकादेश करावा तसे केल्यानें 'रामौ' असे परिनिष्ठित प्रयोगार्ह रूप सिद्ध होऊ शकते या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, शंकाकाराचे वरील म्हणणे भाष्यविरुद्ध असल्यामुळे बरोबर मानता येत नाहीं प्रकृत सूत्रावरील भाष्यात 'यदि पुन: समासे एकशेष उच्यते', म्हणजे द्वन्द्वसमास केल्यानंतर एकशेष करावा, हा पक्ष दूषित ठरवितेवेळी, 'समासे इति चेत् स्वरसमासान्तेषु दोष,' म्हणजे द्वन्द्वसमास केल्यानंतर एकशेष करावा हा पक्ष स्वीकारल्यास स्वर आणि समासान्त प्रत्यय यांच्या विषयात दोष येतो, हे वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचे व्याख्यान करिताना भाष्यकार म्हणतात – 'ऋक् च ऋक् च ऋ→

समासान्ते कृतेऽसारूप्यादेकशेषो न प्राप्नोति । इदमिह सम्प्रधार्यम् । समासान्त: क्रियतामेकशेष इति । किमत्र कर्तव्यम् ? । परत्वात्समासान्त: । समासान्ते च दोषो भवति ।' या भाष्याचा भावार्थ हा आहे की, 'ऋक् च ऋक् च' या स्थळीं प्रथम एकशेष न करितां द्वन्द्वसमास प्रथम केल्यास, 'ऋक्पूरब्धू:' सू. ९४० या सूत्रानें परत्वामुळे समासान्त 'अ' प्रत्यय करावा लागेल व तसे केल्यास समुदायातील प्रथम शब्द 'ऋच्' व द्वितीय शब्द 'ऋच' होईल व अशा रीतीने हे दोन शब्द असरूप झाल्यानें एकशेष होऊ शकणार नाही. पुढें भाष्यकार असे म्हणतात की, 'समासे कृते एकशेष:' हा पक्ष स्वीकारल्यास, 'अङ्गाश्रये चैकशेषवचनम्,' म्हणजे अङ्गाच्या आश्रयानें प्राप्त झालेले कार्य केल्यानंतर एकशेष करावा, असे वचन पठित करावें लागेल या वार्तिकाचे व्याख्यान करितांना कैयटानें 'च शब्दादनङ्गाश्रयेऽपि । यथा नौश्च नावौ चेति,' म्हणजे या या वार्तिकात जो 'च' शब्द घातला आहे त्यानें जें कार्य अङ्गाश्रय नाही तशा कार्याचे देखील ग्रहण होते, उदाहरणार्थ 'नौश्च नावौ च,' असे म्हटले आहे, व शब्दरत्नात वास्तविक या कैयटोक्तीचाच दाखला दिला आहे, कारण भाष्यात 'नावौ, अनड्वाहौ' ही उदाहरणें मुळीच दिली नसून कैयटप्रदीपातच 'नौश्च नावौ च' हे उदाहरण दिले आहे. 'नौ सु नौ औ जस्' या उदाहरणात परत्वामुळें 'नौ औ' या स्थली 'एचोऽयवायाव:' सू. ६१ या अङ्गाधिकारात पठित नसलेल्या सूत्रानें 'औ' चे जागी आवादेश केल्यावर समुदायातील प्रथम अवयव 'नौ' व द्वितीय अवयव 'नावौ' होईल व हे दोन अवयव असरूप झाल्यामुळें एकशेष न होण्याची आपत्ति येईल. त्याचप्रमाणे 'अनडुह् सु अनडुह् औ जस्' या स्थली अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाच्या निमित्तामुळें 'चतुरनडुहोरामुदात्त:' सू. ३३१, 'सावनडुह:' सू. ३३२, 'हल्ङ्याब्भ्य:' सू. २५२ व 'संयोगान्तस्य लोप:' या सूत्रान्वयें प्राप्त होणारीं कार्ये परत्वामुळें पूर्वी केल्यास, प्रथम अवयव 'अनड्वान्' ·

-

व द्वितीय अवयव 'अनड्वाही' होईल व हे दोन अवयव असरूप झाल्यानें एकशेष होऊं शकणार नाही. या वरील विवेचनावरून हें स्पष्ट होतें कीं, अङ्गाच्या आश्रयानें होणारें व तसेंच अङ्गाच्या आश्रयानें न होणारें सर्व कार्य अलौकिकप्रक्रियावाक्यांतच केलें पाहिजेत. म्हणून 'यादृशशास्त्रप्रवृत्त्या लोके प्रयोगयोग्यता तदेव शास्त्रं कल्पितं अलौकिके प्रक्रियावाक्ये प्रवर्तते' असें जें शब्दकौस्तुभकाराचें म्हणणें आहे तें भाष्यविरुद्ध व कैयटविरुद्ध ठरत असल्यामुळें चूक ठरतें असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे) या विषयासंबंधानें एवढें पुरे.

मनोरमा– ("अमि पूर्वः"॥ अम्यचीति। अमि योऽच् तस्मिन्। अमो ऽवयवेऽचीति यावत्। तेन मकारसहितस्य न पूर्वरूपम्। एवं अक्षद्युहिभ्यामित्यादावपि ऊहिभ्यां योऽच् तस्मिन्नित्यादि बोध्यम्। "इको यणचि" इत्यच्ग्रहणस्यानुवृत्तेर्नोऽविवादत्वात्। "पदास्वैरि-बाह्या–" इत्यादिनिर्देशाच्चेह लिङ्गम्।

'अमि पूर्वः' सू. १९४ या सूत्राचें व्याख्यान करितांना कौमुदींत 'अम्यचि' असें जें म्हटलें आहे त्याचा 'अमि य अच् तस्मिन्,' म्हणजे 'अमोऽवयवेऽचि,' असा अर्थ आहे (प्रकृत सूत्रांत 'इको यणचि' या पूर्व सूत्रांतून 'अचि' हें सप्तम्यन्त पद अनुवृत्त होतें व तें प्रकृत सूत्रांतील ('अमि' या पदाचें विशेष्य होत असल्यामुळें 'अमि अचि' या पदाचा 'अमि य अकाररूप अच् तस्मिन् परतः' असा अर्थ होतो 'अमि' हें पद जरी प्रकृत सूत्रांत आधारविवक्षेनें सप्तम्यन्त पठित केलें आहे तरी तें पद वास्तविक अवयवषष्ठी आहे आणि म्हणूनच 'अम्यचि' या पदाचा 'अमः अवयवः य: अकाररूप: अच् तस्मिन् परतः' असा दीक्षितांनी अर्थ केला आहे) 'अम्यचि' या पदाचा वर सांगितल्याप्रमाणें अर्थ होत असल्यामुळें, मकारसहित 'अम्' प्रत्ययाचे जागीं पूर्वरूप एकादेश होत नाही. ('अक्' व मकारसहित संपूर्ण 'अम्' प्रत्यय हे

इत्यधिकृतपरशब्देन विशेष्यत्वादजेव गृह्यतेति बोध्यम् ॥ निर्विवादत्वादिति । उत्तरत्रानुवृत्तेः सत्त्वादिति भावः । लिङ्गमिति । अनुवृत्तावनुवृत्तस्य विशेष्यत्वे चेत्यर्थः । स्पष्टं चेदम् "औतोऽम् शसोः" इत्युपक्रम्य प्रत्ययलक्षणसूत्रे भाष्ये ।

अवयवी 'अम्' चे ठिकाणीं आधारत्वाची विवक्षा करून 'वृक्षे शाखा' या प्रयोगाप्रमाणे ('विवक्षातः कारकाणि भवन्ति' या वचनान्वयें 'सप्तम्यधिकरणे च' सू. ६३३ या सूत्रानें) 'अमि' असा प्रकृत सूत्रात सप्तम्यन्त निर्देश केला आहे. ('वृक्षस्य शाखा' असा प्रयोग न करिता 'वृक्षस्य' या अवयवषष्ठीचे ठिकाणीं आधाराची विवक्षा करून ज्याप्रमाणे 'वृक्षे शाखा' असा प्रयोग केला जातो त्याचप्रमाणे 'अम.अचि' या ऐवजीं 'अमि अचि' असा प्रयोग केला आहे. पण तसा प्रयोग जरी केला आहे तरी त्याचा 'अम. अचि' असाच अर्थ होतो) आणि म्हणूनच दीक्षितांनी 'अमोऽवयवेऽचि' असे मनोरमेंत म्हटले आहे. 'पूर्वपरयोः' या अधिकारातील 'पर' या (विशेषणभूत) शब्दानें, ('एकःपूर्वपरयोः' या अधिकारात पठित असलेल्या प्रकृत सूत्रातील) अचि हें (अनुवृत) पद विशेष्य असल्यामुळें, त्या अच्चेच म्हणजे 'अमि' यातील 'अ' या अच्चेच ग्रहण होते हें लक्षात ठेवावे. 'अनुवृत्तेर्निर्विवादत्वात्' असें जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, प्रकृत सूत्राच्या पुढील सूत्रात, म्हणजे 'सम्प्रसारणाच्च' या उत्तरसूत्रात, 'इको यणचि' या सूत्रातून 'अचि' या पदाची अनुवृत्ति होते. (प्रकृत सूत्रापुढील सूत्रात त्या पदाची अनुवृत्ति होत असल्यामुळें, प्रकृत सूत्रात देखील त्या पदाची अनुवृत्ति मानणे आवश्यक आहे. नाहीं तर उत्तर सूत्रात मण्डूकप्लुतीनें अनुवृत्ति करण्याचा दोष येईल.) 'पशस्वरि' इत्यादि सूत्रातील 'अस्वरि' इत्यादि निर्देश, प्रकृत सूत्रात 'अचि' या पदाची अनुवृत्ति होणे व ते अनुवृत्त पद 'पर' या विशेषणाशीं विशेष्यरूपानें अन्वित होणे, या दोहोंच्याहि मनपानें प्रमाण आहे. 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' सू. १-१-६२ या सूत्रा-

एकादेशाचे पूर्वपर स्थानी मानले तर 'रामम्, हरिम्, भानुम्' अशी द्वितीयेच्या एकवचनाची इष्ट रूपें न होता 'राम, हरि भानु' अशी अनिष्ट रूपें होण्याची आपत्ति येईल. ती आपत्ति टाळण्याकरिता 'अक्' व 'अम्' प्रत्ययातील अकार हा अच् हे प्रकृत सूत्रानें होणाऱ्या पूर्वरूपएकादेशाचे स्थानी मानणे आवश्यक आहे ) याचप्रमाणे 'अक्षादूहिन्यामुपसङ्ख्यानम्'—सू ७३ वरील वार्तिक—इत्यादि स्थली देखील 'ऊहिन्याम्' इत्यादि पदाचा 'ऊहिन्या य अच् तस्मिन् परत:,' म्हणजे 'ऊहिन्या अवयवः यः ऊकार अच् तस्मिन् परत,' अशाच प्रकारचा अर्थ होता हे जाणावे. त्यामुळें 'अक्ष' यातील अन्त्य अकार व त्यापुढें असलेल्या 'ऊहिनी' शब्दातील आद्य ऊकार या दोहोंचे जागी वृद्धिरूप एकादेश होतो संपूर्ण 'ऊहिनी' शब्द एकादेशाचा एक स्थानी मानल्यास अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येईल हे उघड आहे.) प्रकृत सूत्रात 'इको यणचि' या पूर्व सूत्रातून 'अचि' या पदाची अनुवृत्ति होते याबद्दल कोणाचाहि वाद नाही. 'पदास्वैरिबाह्यापक्ष्येषु च' सू. २८७० इत्यादि सूत्रातील 'अस्वैरि' इत्यादि निर्देश वर जसा अर्थ केला आहे तसा अर्थ करण्याला प्रमाण आहेत. ('अस्वैरि' हा शब्द 'स्वादीरेरिणा '—सू ७३ वरील वार्तिक—या वार्तिकान्वयें सिद्ध झाला आहे या वार्तिकाचा अक्षरार्थ असा आहे की, 'स्व' शब्दापुढें 'ईर' किंवा 'ईरिन्' शब्द आल्यास दोहोंचे जागी वृद्धिरूप एकादेश होतो. परंतु येथें वास्तविक वृद्धिरूप एकादेशाचे स्थानी 'स्व' शब्दातील अन्त्य अकार आणि 'ईर' किंवा 'ईरिन्' या शब्दातील आद्य अच् ईकार आहेत व त्यामुळेंच 'स्वैरिन्' असें रूप होते. पूर्ण 'ईर' किंवा 'ईरिन्' हा शब्द वृद्धिरूप एकादेशाचा एक स्थानी असता तर 'पदास्वैरि' या सूत्रातील 'अस्वैरि' हा निर्देश चूक ठरण्याची आपत्ति आली असती.)

शब्दरत्न—अमि योऽजिति । अवयविन आधारत्वाविवक्षायां वृक्षे शाखेतिवत्सप्तमी तदाह—अमोऽवयवेऽचीति । "पूर्वपरयो:"

इत्यधिकृतपरशब्देन विशेष्यत्वादजेव गृह्यतेति बोद्धयम् । निर्विवादत्वादिति । उत्तरत्रानुवृत्तेः सत्त्वादिति भावः । लिङ्गमिति । अनुवृत्तावनुवृत्तस्य विशेष्यत्वे चेत्यर्थः । स्पष्टं चेदम् "औतोऽम् शसोः" इत्युपक्रम्य प्रत्ययलक्षणसूत्रे भाष्ये ।

अवयवी 'अम्' चे ठिकाणी आधारत्वाची विवक्षा करून 'वृक्षे शाखा' या प्रयोगाप्रमाणें ('विवक्षातः कारकाणि भवन्ति' या वचनान्वयें 'सप्तम्यधिकरणे च' सू. ६३३ या सूत्रानें) 'अमि' असा प्रकृत सूत्रात सप्तम्यन्त निर्देश केला आहे. ('वृक्षस्य शाखा' असा प्रयोग न करिता 'वृक्षस्य' या अवयविषष्ठीचे ठिकाणी आधाराची विवक्षा करून ज्याप्रमाणे 'वृक्षे शाखा' असा प्रयोग केला जातो त्याचप्रमाणे 'अम अचि' या ऐवजी 'अमि अचि' असा प्रयोग केला आहे. पण तसा प्रयोग जरी केला आहे तरी त्याचा 'अम अचि' असाच अर्थ होतो) आणि म्हणूनच दीक्षितानी 'अमोऽवयवेऽचि' असे मनोरमेंत म्हटले आहे 'पूर्वपरयोः' या अधिकारातील 'पर' या (विशेषणभूत) शब्दानें, ('एक पूर्वपरयो' या अधिकारात पठित असलेल्या प्रकृत सूत्रातील) अचि हे (अनुवृत्त) पद विशेष्य असल्यामुळें, त्या अच्‌चेच म्हणजे 'अमि' यातील 'अ' या अच्‌चेंच ग्रहण होतें हे लक्षात ठेवावें. 'अनुवृत्तेर्निर्विवादत्वात्' असें जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, प्रकृत सूत्राच्या पुढील सूत्रात, म्हणजे 'सम्प्रसारणाच्च' या उत्तरसूत्रात, 'इको यणचि' या सूत्रातून 'अचि' या पदाची अनुवृत्ति होते. (प्रकृत सूत्रापुढील सूत्रात त्या पदाची अनुवृत्ति होत असल्यामुळें, प्रकृत सूत्रात देखील त्या पदाची अनुवृत्ति मानणे आवश्यक आहे, नाही तर उत्तर सूत्रात मण्डूकप्लुतीनें अनुवृत्ति करण्याचा दोष येईल) 'पदास्वैरि' इत्यादि सूत्रातील 'अस्वैरि' इत्यादि निर्देश, प्रकृत सूत्रात 'अचि' या पदाची अनुवृत्ति होते व त अनुवृत्त पद 'पर' या विशेषणाशी विशेष्यरूपानें अन्वित होते, या दोहोच्याहि सद्‌भावानें प्रमाण आहे. 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' सू. १-१-६२ या सूत्रा-

वरील भाष्यात 'औतोऽम्शसोः' या सूत्राचा उपक्रम करून भाष्यकारानी हे स्पष्ट केले आहे, म्हणजे 'एक पूर्वपरयोः' या अधिकारात पठित असलेल्या सर्व सूत्रात 'अचि' या पदाची अनुवृत्ति होत असून ते अनुवृत्त पद 'पर' या शब्दाशी विशेष्यरूपानें अन्वित होते हे स्पष्ट केले आहे. ('प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' या सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात–'गोरात्वम्। गामिच्छति गव्यति। प्रत्ययलक्षणे न अमि औतोऽम्शसो इत्यात्व प्राप्नोति। स्थानिसज्ञाप्यभूतस्यानल्विधाविति वचनाश्च भवति।' या भाष्याचा भावार्थ हा आहे की, 'गो' शब्दाला आत्वाची प्राप्ति होण्याचे 'गामिच्छति गव्यति' हे उदाहरण आहे. येथें ओकारान्त 'गो' शब्दापुढें प्रत्ययलक्षणाने अजादि 'अम्' प्रत्यय आहे असे मानल्याने 'औतोऽम्शसो' सू. २८५ या 'एक पूर्वपूर्वपरयो' या अधिकारात पठित असलेल्या सूत्रानें 'आ' असा एकादेश प्राप्त होतो. परतु 'स्थानिसज्ञाप्यभूतस्यानल्विधौ,' म्हणजे प्रत्ययलक्षण करिताना देखील 'अनल्विधौ' हा स्थानिवद्भावाचा निषेध लागू पडतो, असे म्हटले असता एकादेश होण्याची प्राप्ति टळते 'सुप आत्मन.क्यच्' सू. २६५० या सूत्रानें 'आत्मन इच्छति' या अर्थामध्यें 'गो अम्' या द्वितीयान्ताहून 'क्यच् = य' प्रत्यय केला असता, 'गो अम् य' या समुदायाला 'सनाद्यन्ता धातव' सू २३०४ या सूत्रानें धातुसज्ञा होऊन 'सुपो धातुप्रातिपदिकयो' सू. ६५० या सूत्रानें 'अम्' या अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाचा जरी लुक् होतो तरी 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षण्' सू २६२ या सूत्रानें 'अम्' प्रत्यय कायमच आहे असे मानल्यानें, 'गो' यातील अन्त्य ओकार व 'अम्' प्रत्ययातील आद्य अकार हा अच् या दोहोचे जागी 'औतोऽम्शसो.' या सूत्रानें 'आ' असा एकादेश पावता अशी शका वरील भाष्यात भाष्यकारानीं उपस्थित करून त्या शकेचे अशा रीतीनें निवारण केले आहे की, हा अल्विधि असल्यामुळें येथें प्रत्ययलक्षणानें स्थानिवद्भाव करता येत नाही. 'अम्' हा सपूर्ण प्रत्यय जर

एकादेशाचा स्थानी असता तर अल्विधि ठरू शकला नसता. परतु 'अम्' प्रत्ययातील आद्य अकार हा अच् एकादेशाचा परस्थानी असल्यामुळें, हा अल्विधि ठरतो. या भाष्यावरून हें स्पष्ट होते कीं, '*एक: पूर्वपरयो:*' *या अधिकारात पठित असलेल्या* सूत्रात '*अचि*' या पदाची अनुवृत्ति होत असून ते अनुवृत्त पद 'पर' या अधिकार-सूत्रातील विशेषणभूत पदाचो विशेष्यरूपानें संबद्ध होते. प्रकृत सूत्रावर टीका करिताना कित्येक टीकाकारानी अशी शंका केली आहे कीं, 'विष्णु' या अर्थाच्या वाचक 'अ' या प्रातिपदिकाचे 'अम्' असें जें द्वितीयेच्या एकवचनाचे रूप होते ते 'हे राम अम् भजस्व' या वाक्यात 'राम' या अदन्त शब्दापुढें आले असल्यामुळें, येथें प्रकृत सूत्रानें पूर्वरूप एकादेश का होऊ नये, व त्या शंकेचे त्यानी असें उत्तर दिलें आहे कीं, 'वासुप्यापिशले:' या पूर्व सूत्रातून प्रकृत सूत्रात '*सुपि*' या पदाची अनुवृत्ति होऊन ते अनुवृत्त पद प्रकृत सूत्रातील 'अमि' या पदाचे विशेषण होत असल्यामुळें, त्या 'अमि' शब्दानें 'सुप्' प्रत्यय 'अम्' चेच ग्रहण होते आणि वरील वाक्यात 'अम्' हा 'सुप्' प्रत्यय नसून 'अ' या *प्रातिपदिकाचे द्वितीयेचें एकवचन असल्यामुळें, पूर्वरूप एकादेश होत* नाही. दुसरे असें कीं, '*यस्मात्प्रत्ययविधि*' सू. १९९ या सूत्रान्वयें प्रत्ययानें अङ्ग आक्षिप्त होत असल्यामुळें व तदादिविधि होत असल्यामुळें आणि वरील वाक्यात जो 'अम्' प्रत्यय झाला आहे तो तो 'राम' या अङ्गाहून झाला नसून 'अ' या अङ्गाहून झाला असल्यामुळें आणि अशा रीतीनें 'राम' हे 'अम्' प्रत्ययाचे अङ्ग नसल्यामुळें, येथें पूर्वरूप एकादेशाची प्राप्ति होत नाही. टीकाकारानी प्रकृत सूत्रावर आणखी काहीं शंका उपस्थित केल्या आहेत पण त्या महत्वाच्या नसून क्षुल्लक असल्यामुळें त्यांचा येथें निर्देश करण्याची *गरज वाटत नाही.*)

मनोरमा — "तस्माच्छस:" । तच्छब्देन संनिहित: पूर्वसवर्ण-दीर्घ: परामृश्यते । शस इत्यवयवषष्ठी । स चावयव: परत्वेन

'रास इत्यवयवषष्ठी' असे जे मनोरमेंत म्हटले आहे त्यातील 'अवयवषष्ठी' या पदाचा 'अवयवावयविभावसम्बन्धबोधिका षष्ठी', म्हणजे ज्या षष्ठीनें अवयवावयविभावरूप संबंध बोधित होतो अशा प्रकारची 'रास.' ही षष्ठी आहे असा अर्थ आहे.

मनोरमा – "अट्कुप्वाङ्" । रषाभ्यामिति पञ्चमीनिर्देशादृष्यवहितस्याप्राप्तौ वचनमिदम् । अत्र सर्वैर्व्यवायोऽसम्भवी, एकैकमात्रव्यवाय इत्यपि नार्थः । क्षुभ्नादिषु क्षुम्नशब्दपाठसामर्थ्यात्, "सर्पाणाम्" इत्यादिनिर्देशाच्चेत्यभिप्रेत्याह – व्यस्तैर्यथासम्भव मिलितैश्चेति । नन्वेवं आदर्शेनेत्यादौ अतिप्रसङ्गः । न च अडादिभिरेव व्यवधाने इति नियमः । अप्राप्ते विधिरयमित्युक्तत्वात् । सत्यम् । योगविभागोऽत्र बोध्यः । "व्यवायेऽपि" इत्येको योगो विध्यर्थः । "अट्कुप्वाङ्नुम्" इत्यन्यो नियमार्थः । छान्दसो भिसो लुक् । निषेधं बाधितुमिति । तेन पर्याणद्धमित्यत्र "उपसर्गादसमासेऽपि" इति णत्वं सिध्यतीति भावः । नुम्ग्रहणमिति । तत्स्थानिकस्य स्वाभाविकस्य चानुस्वारमात्रस्योपलक्षणमित्यर्थः । तेन "बृहि वृद्धौ" इदित्वान्नुम् । तस्यानुस्वारः । "तृंहू हिंसायां" स्वाभाविकोऽत्रानुस्वारः । बृंहणम्, तृंहणम् । उभयत्रापि णत्वं सिद्धम् । "इवि प्रीणने" प्रेन्वनम् । इह "कृत्यचः" "इजादेः सनुमः" इति णत्वं न । यथा "नक्षत्रं दृष्ट्वा वाचं विसृजेत्" इति विधौ नक्षत्रदर्शनस्य कालविशेषोपलक्षणत्वात्सत्यपि दिवा नक्षत्रदर्शने वाङ् न विसृज्यते, उपलक्षितस्य कालविशेषस्याभावात् । रात्रौ असत्यपि नक्षत्रदर्शने विसृज्यते तस्य सत्त्वात् । तथेहापि बोध्यम् ।

'रषाभ्यां नो णः.' सू २३५ या पूर्वसूत्रात 'रषाभ्याम्' हा पञ्चमीनिर्देश असल्यामुळें ('तस्मादित्युत्तरस्य' सू ४१ या सूत्रान्वयें रकाराच्या किंवा षकाराच्या लगेंच पुढें असलेल्या नकाराला णत्व पावतें. परंतु रकार किंवा षकार आणि नकार या दोहोंमध्यें इतर वर्णांचें व्यवधान असल्यास तसा ) व्यवहित नकाराला जें णत्व

पावत नाही ते व्हावे याकरिता 'अट्कुप्वाङ्नुम्व्यवायेऽपि' सू. १९७ हे प्रकृत सूत्र मुद्दाम आरंभिले आहे- रकार किंवा षकार आणि नकार या दोहोंमध्यें प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेल्या सर्व वर्णांचे एकेच वेळी व्यवधान असणे असंभवनीय आहे. तसेच प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेल्या वर्णांपैकी एकाच वर्णाचे व्यवधान असल्यास णत्व होते असा देखील प्रकृत सूत्राचा अर्थ नाही. क्षुभ्नादिगणात पठित असलेल्या 'क्षुम्न' या शब्दाच्या पाठसामर्थ्यामुळें व तसेच 'सरूपाणाम्' इत्यादि पाणिनीय निर्देश असल्यामुळें, हें सर्व लक्षात घरून 'एतैर्व्यस्तैर्यथासम्भवं मिलितैश्च व्यवधानेऽपि' असे प्रकृत सूत्राचे व्याख्यान करिताना कौमुदीत म्हटले आहे. ('क्षुम्न' या स्थली षकार व नकार या दोन वर्णांमध्यें 'उ' या 'अट्' चे व तसेच 'भ्' या पवर्गातील वर्णाचे व्यवधान आहे. प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेल्या वर्णांपैकी एकाच वर्णाचे व्यवधान असल्यास किंवा सर्व वर्णांचे मिळून व्यवधान असल्यास नकाराचे णत्व होते असा जर प्रकृत सूत्राचा अर्थ असता तर, 'क्षुम्न' या स्थली णत्वाची प्राप्तीच नव्हती व त्यामुळें णत्वनिवारणाकरिता त्या शब्दाचा क्षुभ्नादिगणात पाठ करण्याची काहीच गरज नव्हती. पण त्या शब्दाचा क्षुभ्नादिगणात पाठ केला असल्यामुळें आणि तसेच 'सरूपाणामेकशेषः' सू. १८८ या सूत्रातील 'सरूपाणाम्' या स्थली रकार व नकार या दोहोंमध्यें प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेल्या वर्णांपैकी एकच वर्णाचे व्यवधान नसून जरी काही अनेक वर्णांचे व्यवधान आहे व सर्व वर्णांचे व्यवधान नाही तरी देखील त्या निर्देशात पाणिनीनें णत्व केले असल्यामुळें हें स्पष्ट होते की, प्रकृत सूत्राचा 'एकैकमात्रव्यवाये' किंवा 'सर्वेषा मिलितानां व्यवाये' असा अर्थ न करिता, वर सांगितल्याप्रमाणे कौमुदीत असा अर्थ केला आहे तसाच अर्थ करणे योग्य ठरते असा दीक्षिताचा म्हणण्याचा आशय आहे. आता येथें शंकाकार अशी शंका करतो की, 'अट्, कु, पु, आङ्, नुम्' यांचे व्यवधान असल्यास णत्व होते असा प्रकृत सूत्राचा

अर्थ होत असल्यामुळें) 'आदर्शन' इत्यादि स्थली णत्व होण्याची आपत्ति येते; ( कारण या उदाहरणात रकार आणि नकार यांच्या-मध्यें प्रकृत सूत्रात निर्दिष्ट नसलेल्या शकाराचें जरी व्यवधान आहे तरी पण 'ए' या सूत्रनिर्दिष्ट 'अट्' चें व्यवधान आहेच. ) सूत्रनिर्दिष्ट 'अट्' इत्यादि वर्णांचेंच व्यवधान असल्यास णत्व होतें असा प्रकृत सूत्राचा नियामक अर्थ करता येत नाही, म्हणजे प्रकृत सूत्र नियमार्थ सूत्र आहे असें मानता येत नाही, कारण 'अप्राप्ते विधिरयम्–अप्राप्तौ वचनमिदम्'–असें नुकतेंच वर मनो-रमेंत म्हटलें आहे. ( टीकाकाराच्या म्हणण्याचा भावार्थ हा आहे की, 'रषाभ्यां नो णः' या पूर्व सूत्रानें जेथें णत्वाची प्राप्ति होत नाही तेथें णत्व व्हावें याकरिता मनोरमेंत मागितल्याप्रमाणें प्रकृत सूत्र मुद्दाम केलें असल्यामुळें ते विधायक सूत्र ठरतें व म्हणून तें नियमार्थ सूत्र मानता येत नाही. त्यामुळें 'आदर्शन' या उदाहरणात जरी प्रकृत सूत्रात निर्दिष्ट नसलेल्या शकाराचें व्यवधान आहे तरी, 'ए' या सूत्रनिर्दिष्ट 'अट्' चें व्यवधान असल्यामुळें, येथें वास्तविक प्रकृत सूत्रानें णत्व व्हावयास पाहिजे. प्रकृत सूत्र विधायक सूत्र असून नियमार्थ नसल्या-मुळें, त्या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या वर्णांचेंच व्यवधान असल्यास णत्व होतें व इतर वर्णांचें व्यवधान असल्यास णत्व होत नाही असा प्रकृत सूत्राचा नियामक अर्थ करता येत नाही व त्यामुळें 'आदर्शन' या स्थली णत्व होणें टाळता येत नाही. 'व्यवायेऽपि' असें स्वतंत्र णत्वविधायक सूत्र पाणिनीनें केलें असतें व नंतर प्रकृत सूत्र पठित केलें असतें तरच प्रकृत सूत्र नियामक सूत्र मानता आलें असतें व 'अडादिभिरेव व्यवायें णत्वं स्यात्' असा प्रकृत सूत्राचा नियामक अर्थ करता आला असता. 'नन्वेव आदर्शनेत्यादौ ·· ·· विधिरयमित्युक्तत्वात्' हा सर्व टीकाग्रन्थ आहे व या टीका-ग्रन्थात जी शंका केली आहे तशीच शंका प्रकृत सूत्रावरील भाष्यात देखील केली आहे व मनोरमेंतील वरील टीकाग्रन्थ त्या भाष्यातील शंकेचा अनुवादक आहे. त्या भाष्यात 'आदर्शन, आदर्शन'

या स्थली णत्व का होऊ नये अशी शंका करतेवेळी भाष्यकार असे म्हणतात–'यद्यप्यत्रान्येनव्यवायोऽटाऽपि तु व्यवायोऽस्ति । तत्रास्त्यड्व्यवाय इति प्राप्नोति ।' व या स्थली णत्वाच्या निवारणाकरिता त्यांनी प्रथम 'अड्व्यवाये णत्वेऽन्यव्यवाये प्रतिषेधः' हें वार्तिक पठित करून नंतर त्याच्या उलट 'न वाऽन्येन व्यपेतत्वात्' हे द्वितीय वार्तिक पठित केले आहे व या वार्तिकाचे व्याख्यान करिताना कैयटानें 'रषाभ्यामित्यत्र तस्मादिति परिभाषोपस्थानाद्व्यवाये णत्वाऽप्रसङ्गादेतत्सूत्रमारभ्यमाणमडादिव्यवाये णत्वमनुजानाति, नाऽन्यव्यवाये, तस्य निर्दिष्टग्रहणेन निवर्तितत्वादिति भावः ।' असे म्हटले आहे परंतु दीक्षितांनी वरील उदाहरणात णत्वाची आपत्ति टाळण्याकरिता 'न वाऽन्येनव्यपेतत्वात्' हें भाष्यात दिलेले वार्तिक पठित न करिता प्रकृत सूत्राचा योगविभाग करावा असे सुचविले आहे व याचे कारण शब्दरत्नात सांगण्यात येईल वरील शंकेसंबधानें दीक्षित असें उत्तर देतात की,) वरील शंका यथार्थ आहे व त्या शंकेचे निवारण करण्याकरिता प्रकृत सूत्राचा योगविभाग करावा. 'व्यवायेऽपि' असा एक भाग करून तें विधायक सूत्र मानावे व अवशिष्ट राहिलेले 'अट्कुप्वाङ्नुम्' हे द्वितीय सूत्र मानून तें नियामक सूत्र मानावे आणि या नियामक सूत्रात 'भिस्' प्रत्ययाचा ('छन्दोवत्सूत्राणि भवन्ति' या वचनान्वये पाणिनीय सूत्रें छन्दोवत् ठरत असल्यामुळे 'सुपां सुलुक्' सू. ३५६१ या सूत्रानें) छान्दस लुक् झाला आहे असे समजावे. (तसे मानल्यानें, 'अट्, कु, पु, आङ्, नुम्' याच वर्णांचे व्यवधान सह्य ठरतें, इतर वर्णांचे व्यवधान सह्य ठरत नाहीं आणि 'आदर्शेन' या स्थली दकार या असह्य वर्णाचे व्यवधान असल्यामुळे णत्व होत नाही. ('रषाभ्यांनो ण.' ८-४-१ या सूत्रावरील भाष्यात वर सांगितल्याप्रमाणेच योगविभाग करावा असें म्हटले आहे. त्या भाष्यात भाष्यकार म्हणतात–'एवं तर्हि योगविभागः करिष्यते–रषाभ्यां नो णः समानपदे । ततो व्यवाये । व्यवाये च रषाभ्यां नो णो भवतीति । तत अट्कुप्वाङ्-

नुम्भिरिति । इदमिदानीं किमर्थम् ? । नियमार्थम् एतैरेवाक्षर-समाम्नायिकैर्व्यवाये नान्यैरिति ।') 'पदव्यवायेऽपि इति निषेध बाधितुमाङ्ग्रहणम्' असे प्रकृत सूत्रावरील कौमुदीत म्हटले असल्या-मुळे, 'पर्याणद्धम्' या स्थली 'उपसर्गादसमासेऽपि' सू २२८७ या सूत्रानें होणारें णत्व सिद्ध होतें. (धातुपाठात 'णह् बन्धने' असा 'णोपदेश' धातु पठित केला आहे व 'णो नः' सू २२८६ या सूत्रानें धात्वादि णकाराचें नत्व होतें. 'परि आङ् नह् क्त' या स्थली 'परि' या उपसर्गामध्यें णत्वाचें रकाररूप निमित्त आहे परंतु रकार व नकार यांच्यामध्यें 'आङ्' या निपातपदाचें व्यवधान असल्यामुळें आणि समानपदात-एकाच अखण्ड पदात-प्रकृत सूत्रानें णत्व होणें लागितलें असल्यामुळें 'पदव्यवायेऽपि' सू १०५३ या णत्वनिषेधक सूत्राप्रमाणें णत्व न होण्याची आपत्ति येते परंतु प्रकृत सूत्रातील 'अट्' ग्रहणानें 'आङ् = आ' चें ग्रहण होत असून देखील पुन्हा या सूत्रात 'आङ्' चें ग्रहण मुद्दाम केले असल्यामुळें, त्या आङ्ग्रहणानें 'पदव्यवायेऽपि' या सूत्राचा बाध होतो व वरील उदाहरणात 'आङ्' या पदाचें व्यवधान असून देखील 'उपसर्गाद-समासेऽपि' या सूत्रानें होणारें णत्व होतें ) प्रकृत सूत्रातील 'नुम्' हे पद 'नुम् = न' चे जागी ('नश्चापदान्तस्य झलि' सू १२३ या सूत्रानें) होणाऱ्या व तसेच स्वाभाविक अनुस्वारमात्राचें-केवळ अनुस्वाराचें-उपलक्षण आहे, म्हणजे 'नुम्' नें 'नुम्' चें ग्रहण न होता वरील दोन्ही प्रकारच्या अनुस्वाराचेंच ग्रहण होतें त्यामुळें 'बृहि वृद्धौ' या स्थली 'बृहि' हा धातु इदित् असल्या-मुळें ('इदितो नुम् धातोः' सू २२६२ या सूत्रानें) जो नुमागम होतो त्याचे जागी ('नुम् = न्' या पुढें 'ह्' हा झल् असल्यामुळें 'नश्चापदान्तस्य झलि' या सूत्रानें) अनुस्वार होतो. 'तृहू हिंसायाम्' या धातूत स्वाभाविक अनुस्वार आहे. दोन्ही स्थली णत्व होऊन 'बृहणम्, तृहणम्' अशी रूपें होतात. (या दोन्ही उदाहरणात 'ल्युट् = अन' प्रत्यय झाला आहे. या दोन्ही

स्थली रकार किंवा षकार या वर्णापुढें नकार नसून तो ऋकारापुढें आहे व दोहोमध्यें 'अट्' प्रत्याहारान्तर्गत अकार व हकार या वर्णांचे व्यवधान आहे. पण ऋवर्णापुढें देखील नकार आल्यास त्याचे णत्व व्हावें याकरिता 'रषाभ्यां नो णः' या सूत्रावरील भाष्यांत 'रषाभ्यां णत्वे ऋकारग्रहणम्' हे वार्तिक पठित केलें आहे व या वार्तिकान्वयें वरील दोन्ही उदाहरणांत णत्व झालें आहे. या विषयाचें अधिक विवरण शब्दरत्नांत करण्यांत येईल. साराश 'बृहणम्' या प्रथम उदाहरणांत ऋकार व नकार या दोहोमध्यें 'नुम्' चे जागी झालेल्या अनुस्वाराचें व्यवधान असून, 'तृहणम्' या द्वितीय उदाहरणांत स्वाभाविक अनुस्वाराचें व्यवधान आहे व 'नुम् चे व्यवधान नाही तरी, 'नुम्' हा केवळ अनुस्वाराचें उपलक्षण मानला असल्यामुळें णत्व झालें आहे.) 'प्र' या उपसर्ग-पूर्वक 'इवि प्रीणने' या धातूचें 'प्रेन्वनम्' असें रूप होतें. या उदाहरणांत 'कृत्यच' सू. २८३५ व 'इजादे- सनुम' सू. २८३८ या सूत्रानें होणारें णत्व होत नाही. 'नक्षत्रं दृष्ट्वा वाचं विसृजेत्' हा जो (वेदांत यज्ञदीक्षा घेतलेल्या यजमानाकरितां) विधि सांगि-तला आहे त्यांत नक्षत्रदर्शन हें कालविशेषाचें--रात्रिकालाचें--उपलक्षण असल्यामुळें, ज्याप्रमाणें दिवसा नक्षत्रदर्शन झालें तरी त्यावेळी उपलक्षित रात्रिकालाचा अभाव असल्याकारणानें मौनाचा त्याग करता येत नाही व रात्री नक्षत्रदर्शन न झालें तरी उपलक्षित रात्रिकाल विद्यमान असल्यामुळें मौनत्याग करता येतो त्याचप्रमाणें प्रकृत सूत्रांतील 'नुम्' निर्देशासबधानें जाणावें, म्हणजे प्रकृत सूत्रांतील 'नुम्' यानें वास्तविक 'नुम्' चें ग्रहण होत नसून अनुस्वाराचें ग्रहण होत असल्यामुळें, मग तो अनुस्वार 'नुम्' चे जागी झालेला असो किंवा स्वाभाविक अनुस्वार असो, अनुस्वाराचें व्यवधान असलें तर णत्व होतें पण 'नुम्' चें व्यवधान असलें तर णत्व होत नाही. ('इवि प्रीणने' हा धातु इदित् असल्यामुळें 'इदितो

नुम् धातोः' सू. २२६२ या सूत्रानें नुमागम होतो व 'प्र' या उपसर्गपूर्वक त्या धातूहून 'ल्युट् = अन' हा कृत् प्रत्यय केल्यास 'प्रेन्वनम्' असे रूप होते. या उदाहरणात 'प्र' या उपसर्गातील रकार णत्वाचें निमित्त आहे. येथें 'नुम् = न्' या पुढें जो वकार आहे तो झल् नसल्यामुळें, 'नश्चापदान्तस्य झलि' सू. १२३ या सूत्रानें होणारा नकाराचा अनुस्वार झाला नाही. या उदाहरणात रकार व 'ल्युट् = अन' या कृत् प्रत्ययातील नकार या दोहोंमध्यें 'नुम्' स्थानिक अनुस्वाराचें किंवा स्वाभाविक अनुस्वाराचें व्यवधान नसून साक्षात् 'नुम्' चें व्यवधान आहे आणि प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेला 'नुम्' हा केवळ अनुस्वाराचें उपलक्षण असल्यामुळें, म्हणजे या 'नुम्' नें साक्षात् नुमचें ग्रहण होत नसून नुम् स्थानिक अनुस्वाराचें व तसेंच स्वाभाविक अनुस्वाराचेंच ग्रहण होत असल्यामुळें, येथें नुमचें व्यवधान असून देखील णत्व झालें नाही हें लक्षात ठेवावें. प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेला 'नुम्' हा अनुस्वारमात्राचें उपलक्षण असल्यामुळें नुमचें व्यवधान सहन होत नसून अनुस्वाराचें व्यवधान सहन होत याला दीक्षितांनी 'नक्षत्रं दृष्ट्वा वाचं विसृजेत्' हा समर्पक दृष्टान्त दिला आहे व त्या दृष्टान्ताचें वर विवरण केलेंच आहे.)

मनोरमा– नन्वेवं नुम्ग्रहणं व्यर्थम् अनुस्वारत्वादेवैव सङ्ग्रहात् । उरः । केणेत्यादौ विसर्गजिह्वामूलीयादिव्यवधाने ह्यपेव गतिरिति चेत्सत्यमित्याह–सच्चेति । स्यादेतत् । उक्तरीत्या "नुम्विसर्जनीय" इति सूत्रेऽपि नुम्ग्रहणं त्याज्यं स्यात् । तत्राप्यनुस्वारस्य लक्षणीमत्वात् । अन्यथाऽसम्भवात् । न हि षत्वप्रवृत्तिवेलायां सर्पीयोत्पादौ नुम् लभ्यते । षत्वस्यासिद्धत्वेन ततः प्रागेवानुस्वारप्रवृत्तेः । यद्यपि सुहिन्सु इत्यत्र सम्भवत्येव, तथापि तत्रंवातिव्याप्तिं वारयितु लक्ष्यानुरोधान्नुम्स्थानिकेऽनुस्वारे लक्षणाऽऽश्रयणीयेव, व्याख्यानात् । तस्य च शर्त्वेन तद्व्यवाये षत्वस्य सिद्धत्वादिति चेत् । मैवम् । उक्तरीत्या तत्रत्यविसर्गग्रहणस्य प्रत्याख्यानसम्भवेऽपि नियमार्थं

नुम्ग्रहणम् । तथा हि–अनुस्वारेण व्यवधाने चेत् यत्वं तर्हि नुम्स्थानि-केनैवेति नियम्यते, तेन पुंस्त्वियादौ यत्वं नेति दिक् ।

अशा रीतीनें प्रकृत सूत्रांतील नुम्ग्रहण केवळ अनुस्वाराचें उपलक्षण मानलें असल्यामुळें व प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'अट्' प्रत्याहारात अनुस्वाराचा समावेश होत असल्यामुळें, प्रकृत सूत्रांतील 'नुम्' ग्रहण व्यर्थ ठरतें व 'उर केण' इत्यादि उदाहरणांत विसर्ग, जिव्हामूलीय इत्यादिकांचें व्यवधान असून णत्व होतेंच, अशी कोणी शंका केल्यास, त्या शंकेंतील आशय मनांत धरूनच 'तच्चाकर्तुं शक्यम्,' म्हणजे प्रकृत सूत्रांतून 'नुम्' हें पद गाळतां येतें, असें प्रकृत सूत्रावरील कौमुदींत म्हटलें आहे. ('नुम्ग्रहणमनुस्वारोपलक्षणार्थम् । तच्चाकर्तुं शक्यम् । अयोगवाहानामट्सूपदेशस्योक्तत्वात् ।' असें प्रकृत सूत्रावरील कौमुदींत म्हटलें आहे. याचा भावार्थ हा आहे की, नुम्नें नुम्चें ग्रहण होत नसून नुम्स्थानिक किंवा स्वाभाविक अनुस्वाराचेंच ग्रहण होत असल्यामुळें व 'अयोगवाहानामकारोपरि शर्षु च पाठात्,' म्हणजे अनुस्वार, विसर्ग, जिव्हामूलीय, उपध्मानीय व अनुनासिक यांचा अक्षरसमाम्नायांत अकारापुढें व 'शर्' प्रत्याहारांत पाठ मानला आहे, असें 'हयवरट्' या शिवसूत्रावरील भाष्यांत म्हटलें असल्यामुळें आणि अशा रीतीनें प्रकृत सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या 'अट्' प्रत्याहारानें अनुस्वाराचें ग्रहण होऊं शकत असल्यामुळें, प्रकृत सूत्रांत 'नुम्' चें ग्रहण असण्याची कांहीं गरज नाहीं व तें पद प्रकृत सूत्रांतून गाळतां येतें. जर 'नुम्' नें 'नुम्' चें किंवा नुम्स्थानिक अनुस्वाराचेंच ग्रहण होत असतें तर प्रकृत सूत्रांत नुम्ग्रहण आवश्यक ठरलें असतें. प्रकृत सूत्रावरील भाष्यांत देखील 'एवं तर्ह्ययोगवाहानामविशेषेणोपदेशश्चोदितस्तत्रानुस्वारे कृतेऽड्व्यवाये इत्येव सिद्धम् । यद्येव नार्थो नुम्ग्रहणेन । अनुस्वारे कृतेऽड्व्यवाय इत्येव सिद्धम् ।' असेंच म्हटलें आहे व त्याचाच अनुवाद कौमुदींत केला आहे. 'अट्' प्रत्याहारानें अयोगवाहांचें ग्रहण होत असल्यामुळेंच,

'उर केण' या स्थली रकार व नकार या दोहोमध्ये विसर्गाचे किंवा 'कुप्वोः' सू. १४२ या सूत्रानें विसर्गाचे जागी विकल्पेंकरून होणाऱ्या जिव्हामूलीयाचे जरी व्यवधान होते तरी नकाराचे णत्व होतेच आता येथें शंकाकार अशी शंका करतो की,) जर प्रकृत सूत्रातून 'नुम्' हे पद वर सांगितलेल्या कारणामुळें गाळता येऊं शकते तर त्याच कारणामुळें 'नुम्विसर्जनीयशर्व्यवायेऽपि' सू. ४३४ या सूत्रातून देखील 'नुम्' हे पद गाळावे लागेल कारण त्या सूत्रात देखील 'नुम्' हा लक्षणेनें अनुस्वाराचाच वाचक आहे तो अनुस्वाराचा वाचक नाही असे मानल्यास ( नुम्' च्या पुढें सकार आला असता, 'नश्चापदान्तस्य झलि' सू. १२३ या सूत्राने 'नुम् = न्' चा अवश्य अनुस्वार होणारच व त्यामुळें 'नुम्' कायम राहून त्यापुढें सकार सापडणे) हे असंभवनीय आहे. 'सर्पींषि' इत्यादि स्थली षत्वकार्य करतेवेळी 'नुम्' ची उपलब्धि होत नाही, कारण (अनुस्वारकार्याच्या दृष्टीनें) षत्वकार्य असिद्ध ठरत असल्यामुळें, अनुस्वारकार्य पूर्वीच होत ('सर्पिस् + जस्' या स्थली 'जश्शसो शि' सू. ३१२ या सूत्रानें 'जस्' चे जागी 'शि = इ' असा आदेश होतो व 'शि सर्वनामस्थानम्' सू. ३१३ या सूत्रान्वयें 'शि' ला सर्वनामस्थानसंज्ञा असल्यामुळें, 'नपुंसकस्य झलच' सू. ३१४ या सूत्रानें 'सर्पिस्' याला नुमागम झाल्यावर 'सर्पिन् स् इ' अशी स्थिति झाली असता, 'सान्तमहत संयोगस्य' सू. ३१७ या सूत्रानें उपधा दीर्घ होऊन 'सर्पीन्स् इ' अशी स्थिति होते अशा स्थितीत 'नश्चापदान्तस्य झलि' या त्रैपादिक पूर्व सूत्रानें नकाराचा प्रथम अनुस्वार होऊन 'सर्पींस् इ' अशी स्थिति झाल्यावरच 'नुम्विसर्जनीयशर्व्यवायेऽपि' या त्रैपादिक उत्तर सूत्रानें षत्वकार्याची प्राप्ति होते सारांश षत्वकार्य करतेवेळी 'नुम्' उपलब्ध होत नसून अनुस्वारच उपलब्ध होतो, कारण षत्वकार्य करण्यापूर्वी वर सांगितल्याप्रमाणे अनुस्वारकार्याची प्रथम प्रवृत्ति होते आणि म्हणून त्या सूत्रातील 'नुम्' या पदाचा

अनुस्वार असाच अर्थ करणे भाग आहे ) जरी 'सुहिन्सु' या उदाहरणात 'नुम्' सापडणे सभवते हे खरे आहे तरी, त्या उदाहरणातच अतिव्याप्तिरूप दोष येण्याचे म्हणजे षत्व होण्याचे, निवारण करण्याकरिता व इष्ट रूपाच्या सिद्धीकरिता त्या सूत्रातील 'नुम्' या शब्दाचा 'नुम्स्थानिक अनुस्वार' असाच लक्षणेनें अर्थ करणे भाग आहे, कारण भाष्यकारादिकानी तसेच व्याख्यान केले आहे, व अनुस्वार हा 'शर्' ठरत असल्यामुळें, त्याचे व्यवधान असले तरी षत्वकार्याची सिद्धि होते ("स्यादेतत्' पासून 'षत्वस्य सिद्धत्वात्' येथपर्यंत शकाग्रन्थ आहे या शकेवर उत्तर देताना दीक्षित असे म्हणतात की,) ही शका बरोबर नाही, त्या सूत्रात 'विसर्जनीय' या पदाचे जें ग्रहण केले आहे त्याचे वरील रीतीनें जरी प्रत्याख्यान करता येऊ शकते तरी, त्या सूत्रातील 'नुम्' ग्रहण नियमार्थ आहे व त्या नियमाचे स्वरूप असे आहे की, जर अनुस्वाराचे व्यवधान असल्यास षत्वकार्य होऊ शकत तर तो अनुस्वार 'नुम्' चे जागी झालेला अनुस्वार असल्यासच होऊ शकते त्यामुळें 'पुसु' इत्यादि स्थली षत्व होत नाही ('सु' या उपसर्गपूर्वक 'हिसि हिंसायाम्' या धातूहून क्विप्प्रत्यय केला असता व 'इदितो नुम् धातो' सू २२६२ या सूत्रानें धातूला नुमागम केला असता, 'वेरपृक्तस्य' सू ३७५ या सूत्रानें 'क्विप् = व' या प्रत्ययाचा लोप होऊन 'सुहिन्स्' असे कृदन्त प्रातिपदिक सिद्ध होते या प्रातिपदिकाहून 'सु' हा सप्तमीच्या बहुवचनाचा प्रत्यय केला असता, 'स्वादिष्वसर्वनामस्थाने' सू २३० या सूत्रानें 'सुहिन्स्' याला पद्सज्ञा होत असल्यामुळें, 'सयोगान्तस्य लोप' सू ५४ या सूत्रानें 'सुहिन्स्' या सयोगान्त पदातील अन्त्य सकाराचा लोप होऊन 'सुहिन सु= सुहिन्सु' असे रूप सिद्ध होत या रूपामध्यें 'सुहिन्' यातील नकार, म्हणजेच 'इदितो नुम् धातो' या सूत्रानें धातूला झालेला नुमागम, अपदान्त नसून पदान्ती असल्यामुळें, "नश्चापदान्तस्य झलि' सू १२३ हे सूत्र प्रवृत्त होऊ शकत नाही व त्या नकाराचा=

'नुम्' चा अनुस्वार होऊ शकत नाही; आणि अशारीतीनें या उदाहरणात सकार या क्षल्पूर्वी 'नुम् =न्' सापडतो या स्थलीं 'हि' यातील 'इ' या इण्पुढें 'सु' प्रत्ययातील सकार असून दोहों-मध्यें नुम्चें व्यवधान आहे व त्यामुळें 'नुम्विसर्जनीय' सू. ४३४ या सूत्रानें 'सु'प्रत्ययातील सकाराचें षत्व होण्याची व 'सुहिन्षु' असें अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते ती आपत्ति टाळण्याकरिता त्या सूत्रातील 'नुम्'चा 'अनुस्वार' असा लक्षणेनें अर्थ करणें भाग आहे तसा अर्थ केल्यास, त्या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'शर्' प्रत्याहारानें अनुस्वार, विसर्ग इत्यादि अयोगवाहांचें ग्रहण होऊ शकत असल्यामुळें, त्या सूत्रात केलेले नुम्ग्रहण देखील व्यर्थ ठरत असें शकाकाराचें म्हणणें आहे या शकेवर दीक्षित असे उत्तर देतात की, त्या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'शर्'प्रत्याहारानें विसर्ग या अयोगवाहाचें ग्रहण होऊ शकत असल्यामुळें जरी त्या सूत्रातून 'विसर्जनीय' हे पद गाळता येऊ शकतें तरी, त्या सूत्रातून 'नुम्' हे पद गाळता येणें शक्य नाही, कारण त्या पदाचें ग्रहण नियमार्थ केलें आहे व तो नियम असा की, कोणत्याही अनुस्वाराचें व्यवधान असल्यास सकाराचें षत्व होत नसून नुस्स्थानिक अनुस्वाराचेंच व्यवधान असल्यास षत्व होऊ शकत जर त्या सूत्रातील 'नुम्' नें कोणत्याहि प्रकारच्या अनुस्वाराचें ग्रहण करता येऊ शकलें असत तरच, या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'शर्' प्रत्याहारानें अनुस्वार या अयोगवाहाचें ग्रहण होत असल्याकारणानें त्या सूत्रातून 'नुम्' हे पद गाळता येऊ शकलें असत पण नुम्ग्रहण नियमार्थ केलें असल्यामुळें, ते पद त्या सूत्रातून गाळता येत नाहीं आणि त्या 'नुम्' ग्रहणानें वर जसा नियम सांगितला आहे तसा प्रकारचा नियम सिद्ध होत असल्यामुळें, 'पुंसु' इत्यादि स्थलीं प्रत्ययातील सकाराचें षत्व होण्याची आपत्ति टळते 'पुम्स्+सु' या स्थलीं 'स्वादिष्वसर्वनामस्थाने' सू २३० या सूत्रानें 'पुम्स्' याला पदसंज्ञा होत असल्यामुळें, 'संयोगान्तस्य लोप.' सू. ५४ या सूत्रानें 'पुम्स्'

यातील अन्त्य सकाराचा लोप होऊन 'पुम् सु' अशी स्थिति झाली असता, 'मोऽनुस्वार.' सू. १२२ या सूत्रानें मकाराचे जागी अनुस्वार होऊन 'पुंसु' असे सप्तमीच्या बहुवचनाचे रूप सिद्ध होते. या स्थली 'पु' यातील उकार हा 'इण्' व 'सु' प्रत्ययातील सकार या दोहोंमध्यें जरी अनुस्वाराचे व्यवधान आहे तरी, तो अनुस्वार 'नुम्' चे जागी झाला नसून मकाराचे जागी झालेला असल्यामुळें, नुम्ग्रहणानें जो नियम वर सांगितल्याप्रमाणें सिद्ध होतो त्या नियमान्वयें, प्रत्ययातील सकाराचे षत्व होत नाही. सारांश 'सुहिन्सु, पुम्सु' इत्यादि उदाहरणात प्रत्ययातील सकाराचे षत्व होणे इष्ट नसल्यामुळें, वरील सूत्रातील 'नुम्' या पदाचा 'नुम्स्थानिक अनुस्वार' असाच लक्षणेनें संकुचित अर्थ करणे भाग आहे, व तसा त्या पदाचा संकुचित अर्थ करावा लागत असल्यामुळें, वरील सूत्रातून 'नुम्' हे पद गाळतां येऊं शकत नाही असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे. 'हयवरट्' या शिवसूत्रावरील भाष्यात भाष्यकार असे म्हणतात की, अयोगवाहांचा 'शर्' प्रत्याहारात पाठ केल्यास, 'नुम्विसर्जनीय' या सूत्रात 'विसर्जनीय' हे पद घालण्याची जरूर राहत नाही. पण त्या सूत्रातून 'नुम्' हे पद मात्र गाळतां येऊं शकत नाही, कारण ते पद अनुस्वाराचे विशेषण आहे असे मानले पाहिजे. तसे मानले असता 'नुम्' चे जागी झालेला जो अनुस्वार त्याचेच व्यवधान असतांना षत्व होईल व 'पुंसु' इत्यादि उदाहरणात इतर प्रकारच्या अनुस्वाराचे व्यवधान असल्यामुळें षत्व होणार नाही. त्या भाष्यात भाष्यकार म्हणतात–'नुम्विसर्जनीयशर्व्यवायेऽपि इति विसर्जनीयग्रहणं न कर्तव्यं भवति । नुमश्चापि तर्हि ग्रहणं शक्यमकर्तुम् । कथं सर्पीषि धनूषि । अनुस्वारे कृते शर्व्यवाय इत्येव सिद्धम् । अवश्यं नुमो ग्रहणं कर्तव्यम् । अनुस्वारविशेषणं नुम्ग्रहणं, नुमो योऽनुस्वारस्तत्र यथा स्यादिह मा भूत् । पुंस्विति।' या भाष्याचाच अनुवाद मनोरमेंत केला आहे )

शब्दरत्न—निर्देशाच्चेति । नुम्ग्रहणाच्चेत्यपि बोद्धव्यम् । नियमार्थं इति । स च साजात्यावाक्षरसमाम्नायिकविषयकः । अतो नृणामित्यादावुत्तराग्भागेन व्यवधानेऽपि णत्वसिद्ध्या "ऋवर्णान्नस्य" इति वचनं न कार्यमिति भावः । इदं प्रत्याहाराह्निके प्रकृतसूत्रे च भाष्ये स्पष्टम् । यद्यपि "रषाभ्याम्" इति पञ्चम्योपस्थितनिर्दिष्टपदस्य "व्यवाये" इत्यनेनाविरोधायाऽऽद्यतिरिक्ताव्यवहितपरत्वाऽदर्शनेत्यादौ णत्वं दुःशकवारणम् । ध्वनितं चेदं प्रकृतसूत्रे वार्तिककृता, तथाऽपि तदनुणामित्यर्थे वचनारम्भे गौरवमितीदमेवादृतं मूलकृता । स्वाभाविकस्येति । तद्भिन्नस्थानिकस्य पाणिन्युच्चारितस्येत्यर्थः । तृह्र इत्यादेरपि "नकारजावनुस्वार" इति वृद्धोक्तेर्नस्थानिकत्वात्, अत एव तृह्र इत्यस्य नलोपे तृढ इत्यस्य सिद्धिः । इवि प्रीणने इति । हिविदिवीतिदण्डकपठितस्यैव निष्कृष्य ग्रहणम् । प्रीन्वनमित्यादौ नुमो नस्य क्षुभ्नादित्वाण्णत्वाभावः । इति दिगिति । तद्वदत्र तु न वक्तुं शक्यं तृह्र इत्यस्य तृंहणमित्यसिद्धेः स्पष्टं चेदं भाष्ये ।

(प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेल्या वर्णांपैकी एक वर्णाचे व्यवधान असले तरच णत्व होऊ शकते असे नसून तथा अनेक वर्णांचे व्यवधान असले तरी देखील णत्व होऊ शकते हे सिद्ध करण्याकरिता दीक्षितांनी मनोरमेत 'क्षुभ्नादिषु क्षुभ्नशब्दपाठसामर्थ्यात्, सरूपाणामित्यादि निर्देशाच्च' ही जी दोन कारणे दिली आहेत त्यांखेरीज) 'नुम्ग्रहणाच्च,' म्हणजे प्रकृत सूत्रात जें 'नुम्' चे ग्रहण केले आहे तें, हा देखील एक अधिक हेतु देता येतो हे जाणावे. ('नुम्' हा मित् आगम असल्यामुळें व 'मिदचोऽन्त्यात्परः' सू. ३७ या सूत्रान्वयें ज्याला तो मित् आगम होणे सांगितले आहे त्या शब्दाच्या अन्त्य अचापुढें होत असल्यामुळें, जेथें 'नुम्' चे व्यवधान होते तेथें ज्या अन्त्य अचाला तो आगम होतो त्या अचाचे व्यवधान असलेच पाहिजे हें उघड होतें. त्यामुळें प्रकृत सूत्रातील नुम्ग्रहणानेच हें स्पष्ट होतें की, 'एकैकमात्रव्यवायेऽपि' एवढाच प्रकृत सूत्राचा अर्थ होत नसून 'अनेकव्यवायेऽपि' असा देखील अर्थ होतो. म्हणून प्रकृत

सूत्रातील 'नुम्' ग्रहणानेंच हा इष्ट अर्थ सिद्ध होत असल्यामुळें त्या अर्थाच्या सिद्धीकरिता पाणिनीय निर्देशाची मदत घेण्याची काही गरज नाही असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा गूढ आशय आहे ) 'अट्कुप्वाङ्नुम्' हा भाग नियमार्थ मानावा असें मनोरमेंत म्हटले आहे नियम हा नेहमी सजातीयाच्याच विषयात होणारा असल्यामुळे 'अट्कुप्वाङ्नुम्' हा नियम अक्षरसमाम्नायात निर्दिष्ट असलेल्या वर्णाच्याच विषयात लागू पडतो त्यामुळें 'नृणाम्' इत्यादि स्थळी ऋवर्णाच्या उत्तर अज्भागाचें व्यवधान असून देखील णत्व होत आणि म्हणून 'ऋवर्णान्नस्य णत्वं वाच्यम्' हें वार्तिक असण्याची काही गरज नाही असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे प्रत्याहाराह्निकात, म्हणजे 'एओङ् ऐऔच्' या शिवसूत्रावरील भाष्यात, व तसेंच प्रकृत सूत्रावरील भाष्यात, म्हणजे 'रषाभ्यां नो णः' ८-४-१ या सूत्रावरील भाष्यात, हे स्पष्ट केले आहे (ऋवर्णाचे तीन अवयव कल्पिले आहेत प्रथम व तृतीय अवयव अज्भाग असून त्या दोहोंच्या मध्यें असणारा द्वितीय अवयव रेफ-रकार-आहे त्यामुळे 'नृणाम्' या उदाहरणात जो ऋकार आहे त्याचे वरप्रमाणे तीन भाग कल्पिल्यास, द्वितीय भाग जो रकार त्यात व नकारात अज्भागरूप तृतीय अवयवाचे व्यवधान होते 'रषाभ्यां नो णः' या सूत्रान्वयें रकाराच्या किंवा षकाराच्या लगेंच पुढें नकार आल्यास त्याचे णत्व होते पण 'नृणाम्' या स्थली रकार व नकार या दोहोत वर सांगितल्याप्रमाणे अज्भागाचें व्यवधान असल्यामुळें, त्या सूत्रान्वयें णत्व होऊ शकत नाही ज्या अज्भागाचे वरील उदाहरणात व्यवधान आहे तो अज्भाग आक्षरसमाम्नायिक, म्हणजे माहेश्वर सूत्रात जे वर्ण पठित केले आहेत त्यापैकी कोणताहि, वर्ण नसून पूर्ण ऋवर्ण हा आक्षरसमाम्नायिक वर्ण असल्यामुळें, प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'अट्' प्रत्याहारानें त्या अज्भागाचे ग्रहण होऊ शकत नाही व त्यामुळें 'अट्कुप्वाङ्नुम्व्यवायेऽपि' हे यथापठित

प्रकृत सूत्र देखील या स्थली लागू पडत नाही. म्हणून भाष्यकारांनी प्रकृत सूत्राचा 'व्यवायेऽपि' असा एक भाग करून तो विधायक मानला आहे व 'अट्कुप्वाङ्नुम्' हा अवशिष्ट सूत्रभाग नियमार्थ मानला आहे. 'व्यवायेऽपि' या योगविभागानें पृथक् केलेल्या सूत्राचा 'व्यवायेऽपि णत्व भवति' असा अर्थ होत असल्यामुळें, त्या अर्थान्वयें 'नृणाम्' या स्थली अज्भागाचे व्यवधान असून देखील णत्व होतें. 'अट्कुप्वाङ्नुम्' हा जो अवशिष्ट भाग नियामक मानला आहे त्याचा अर्थ करतेवेळी हे लक्षात ठेवले पाहिजे की, नियम हा नेहमी सजातीयाच्याच विषयात होत असल्यामुळें व या सूत्रात —भागात— आक्षरसमाम्नायिक वर्णांचा निर्देश असल्यामुळें, तो नियम आक्षर-समाम्नायिक वर्णांनाच लागू पडतो व त्यामुळें त्या नियामक भागाचा असा अर्थ होतो की, जर आक्षरसमाम्नायिक वर्णांचे व्यवधान असून णत्व होणे असेल तर ते व्यवधान 'अट्, कु, पु'. या आक्षर-समाम्नायिक वर्णांचेच व्यवधान असले पाहिजे. या अर्थान्वयें 'नृणाम्' या उदाहरणात नकाराचे णत्व होण्यात काही बाध येत नाही, कारण येथें रकार व नकार या दोहोंत वर सांगितल्याप्रमाणें आक्षर-समाम्नायिक वर्णांचे व्यवधान नसून ज्या अज्भागाचे व्यवधान आहे तो आक्षरसमाम्नायिक वर्ण नाही. म्हणून 'व्यवायेऽपि' या योग-विभागानें पृथक् केलेल्या सूत्रानेंच 'नृणाम्' या स्थली णत्व होऊ शकतें, व आक्षरसमाम्नायिक वर्णांचे व्यवधान या स्थली नसल्या-मुळें, नियमार्थ सूत्र —भाग— णत्व होण्याच्या आड येत नाही. सारांश अशा रीतीनें ऋकारापुढें येणाऱ्या नकाराचे णत्व 'व्यवायेऽपि' या भागानेंच होऊं शकत असल्यामुळें, 'ऋवर्णान्नस्य णत्व वाच्यम्' हें वार्तिक पठित करण्याची काहीं गरज राहत नाही. 'एओङ्' या शिवसूत्रावरील भाष्यात भाष्यकार असें म्हणतात कीं, 'वर्णैकदेशा वर्णग्रहणेन न गृह्यन्ते,' म्हणजे वर्णांचे अवयव स्वतन्त्र वर्णांसारखे समजू नये, असें मानल्यास, 'नुट्' आगम सांगणाऱ्या सूत्रांत, लकारादेश सांगणाऱ्या सूत्रात, आणि विनाम — णत्व—

सागणाऱ्या सूत्रात ऋकाराचे ग्रहण करावे लागेल णत्वाच्या सवधानें व्याख्यान करिताना भाष्यकार म्हणतात –' विनामे ऋकारग्रहण कर्तव्यम् । रषाभ्यां नो णः समानपदे, ऋकाराच्चेति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । मातॄणाम्, पितॄणाम् इति । यस्य पुनर्गृह्यन्ते रषाभ्यामित्येव तस्य सिद्धम् । न सिध्यति । यत्तद्रेफात्परं भक्तेस्तेन व्यवहितत्वान्न प्राप्नोति । मा भूदेवम् । अड्व्यवाये इत्येव सिद्धम् । न सिध्यति । वर्णैकदेशा के वर्णग्रहणेन गृह्यन्ते ? । ये व्यपवृक्ता अपि वर्णा भवन्ति । यच्चापि रेफात्परं भक्तेर्न तत्क्वचिदपि व्यपवृक्तं दृश्यते । एवं तर्हि योगविभागः करिष्यते । रषाभ्यां नो णः समानपदे । ततो व्यवाये । व्यवाये च रषाभ्यां नो णो भवतीति । ततोऽट्कुप्वाङ्नुम्भिरिति । इदमिदानीं किमर्थम् ? । नियमार्थम् । एतैरेवाक्षरसमाम्नायिकैर्व्यवाये नान्यैरिति ॥' 'रषाभ्यां नो णः' या सूत्रावरील भाष्य देखील वरील भाष्यासारखेंच आहे व या दोन्ही भाष्यांचा आशय वरील विवरणात दिलाच आहे या दोन्ही भाष्यावरून हे स्पष्ट होते की, रषाभ्यां नो णः ' या सूत्रात ऋकारग्रहण करण्याची, म्हणजेच 'ऋवर्णान्नस्य णत्वं वाच्यम्' हें वार्तिक पठित करण्याची, काही आवश्यकता नाही.) ' रषाभ्यां नो णः ' या सूत्रात 'रषाभ्याम्' हा पञ्चमीनिर्देश असल्यामुळें (व त्यामुळें 'तस्मादित्युत्तरस्य' सू ४१ या परिभाषान्वयें रकाराच्या किंवा षकाराच्या लगेंच पुढें असणाऱ्या नकाराचे णत्व होतें असा त्या सूत्राचा अर्थ होत असल्यामुळें ) प्रकृत सूत्रात 'व्यवायेऽपि' हें जे पद आहे त्याशी विरोध न यावा याकरिता ( असेच प्रकृत सूत्राचे व्याख्यान केले पाहिजे की, 'अट्' इत्यादि प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेले वर्ण खेरीज करून इतर आक्षरसमाम्नायिक वर्णांचे व्यवधान असल्यास नकाराचे णत्व होत नाही, आणि असा अर्थ केल्यानें 'आदर्शेन' इत्यादि स्थळी प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेल्या ) वर्णाखेरीज इतर ( आक्षरसमाम्नायिक ) वर्णांचे–शकाराचे–व्यवधान असल्यामुळें, 'आदर्शेन' इत्यादि ' उदाहरणात

णत्व होण्याची आपत्ति प्रकृत स्थळी येऊ शकते. ('अट्कुप्वाङ्नुम्व्य' हे नियामक सूत्र मानल्याने, त्या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या वर्णांखेरीज येथें इतर आभ्यन्तराप्रयत्नाश्रित वर्णांचे व्यवधान आहे तेथें णत्व होऊ शकत नाही असा त्या सूत्राचा अर्थ होत असल्यामुळें आणि 'आदर्शेन' या स्थळी प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेल्या वर्णांहून भिन्न अशा आभ्यन्तराप्रयत्नाश्रित दकाराचे व्यवधान असल्यामुळें, या उदाहरणात णत्व होण्याची आपत्ति आपोआपच टळू शकते असा ग्रन्थकाराच्या म्हणण्याचा आशय आहे ) प्रकृत सूत्रावर वार्तिककाराने जें वार्तिक पठित केलें आहेत त्यात हें ध्वनित केले आहे. तरी पण 'नृणाम्' या उदाहरणात णत्व होण्याकरिता जें वचन म्हणजे 'ऋवर्णान्नस्य णत्वम्' हे वार्तिक, पठित केले आहे तसे वचन पठित करण्यात गौरव आहे [illegible] आशय मनात धरून दीक्षितानी प्रकृत सूत्राचा योगविभाग करणें व उत्तर भाग नियमार्थ मानणें हाच पक्ष स्वीकारला आहे. ( प्रकृत सूत्रावर 'अट्व्यवाये णत्वेऽन्यव्यवाये प्रतिषेध' असे वार्तिक प्रथम पठित करून नंतर वार्तिककाराने 'न वाऽन्येन व्यपेतत्वात्' असें दुसरें उलट अर्थाचे वार्तिक पठित केले आहे. या दुसऱ्या वार्तिकाचा अर्थ असा आहे कीं, प्रथम वार्तिक पठित करण्याची काही गरज नाही; कारण प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेल्या अडादि वर्णांनीच इतर वर्णांची निवृत्ति होते व त्यामुळें इतर वर्णांचे व्यवधान असल्यास णत्व होऊच शकत नाही. अशा रीतीनें इतर वर्णांचे व्यवधान असताना णत्वाची प्राप्ति होत नसून देखील जो योगविभाग केला आहे त्याचा मूळ हेतु हा की, 'नृणाम्' इत्यादि स्थळी णत्व व्हावें. योगविभाग केल्याशिवाय त्या उदाहरणात णत्व होऊ शकत नसल्यामुळें व त्या स्थळी णत्व होण्याकरिता स्वतंत्र वार्तिक पठित करण्यात गौरव असून तो हेतु साधण्याकरिता पाणिनीय सूत्राचा योगविभाग करण्यात लाघव असल्यामुळें, दीक्षितानी 'ऋवर्णान्नस्य णत्वं वाच्यम्' हे वार्तिक न स्वीकारता योगविभागपक्ष अधिक

उचित मानून स्वीकारला आहे असे शब्दरत्नकाराचे म्हणणे आहे) 'स्वाभाविकस्य चानुस्वारमात्रस्योपलक्षणम्' या मनोरमेच्या पक्तीतील 'स्वाभाविकस्य' या पदाचा 'तद्भिन्नस्थानिकस्य पाणिन्युच्चारितस्य,' म्हणजे 'नुम्भिन्न इतर कोणत्याहि स्थानीचे जागी झालेला व पाणिनीनें उच्चारलेला अनुस्वार,' असा अर्थ आहे 'तृहू' इत्यादि स्थली देखील, 'नकारजावनुस्वारपञ्चमौ झलि धातुषु' या वृद्धोक्तीप्रमाणे, नकाराचे जागी झालेला अनुस्वार आहे आणि त्यामुळेच ('अनिदिता हल उपधाया' सू ४१५ या सूत्रानें तृह् क्त' या स्थली 'क्त' हा कित्प्रत्यय पुढें असल्यामुळें 'तृन्ह्' याच्या उपधेंतील) नकाराचा लोप होऊन 'तृढ' असे इष्टरूप सिद्ध होते ('तृंह' या स्थली जो अनुस्वार आहे तो देखील स्वाभाविक अनुस्वार नसून 'नश्चापदान्तस्य झलि' सू १२३ या सूत्राने नकाराचे जागी झालेला अनुस्वार आहे, पण तो नुम्स्थानिक अनुस्वार नाही व पाणिनीनें धातुपाठात अनुस्वाररूपाने उच्चारला आहे तो जर स्वाभाविक अनुस्वार असता तर त्याचा लोप होऊ शकला नसता व 'तृढ' असे अनिष्ट रूप होण्याची आपत्ति आली असती परंतु तो अनुस्वार वर सांगितल्याप्रमाणे 'नश्चापदान्तस्य झलि' या त्रैपदिक सूत्रानें नकाराचे जागी झाला असल्यामुळें व 'अनिदिता हल उपधाया' या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें तो अनुस्वार असिद्ध ठरत असल्यामुळें, म्हणजें अनुस्वार झाला नसून नकारच विद्यमान आहे असे मानाव लागत असल्यामुळें, नकाराचा लोप होऊन 'तृढ' असे इष्ट रूप सिद्ध होते) 'इवि प्रीणने' असा जो मनोरमेंत पाठ दिला आहे तो 'इवि हिवि दिवि धिवि जिवि प्रीणनार्था' या दण्डक पाठातून 'इवि' धातु वेगळा काढून दिला आहे (माधवादिकानी तसा दण्डक पाठ स्वीकारला आहे परंतु धातुपाठात 'इवि व्याप्तौ, हिवि दिवि धिवि जिवि प्रीणनार्था' असा पाठ आढळतो दीक्षितानीं प्रकृत स्थली माधवानें दिलेला पाठ स्वीकारून व त्यातून 'इवि' वेगळा काढून 'इवि प्रीणने' असा धातु मनोरमेंत पठित केला आहे

असे शब्दरत्नकाराचे म्हणणे आहे.) 'प्रेन्वनम्' इत्यादि स्थली नुम्च्या नकाराचे जें णत्व झाले नाहीं त्याचे कारण हे की, 'प्रेन्वनम्' इत्यादि शब्द गणपाठात क्षुम्नादिगणात पठित आहेत (वास्तविक 'प्रेन्वन' हा शब्द क्षुम्नादिगणात पठित केलेला आढळत नाही, पण क्षुम्नादिगण हा आकृतिगण असल्यामुळें व 'प्रेन्वन' इत्यादि स्थली णत्व झाले नसल्यामुळें, त्या शब्दाचा पाठ क्षुम्नादिगणात मानला असावा असे दिसते.) 'इति दिक्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की 'ज्याप्रमाण 'नुम् विसर्जनीयशर्व्यवायेऽपि' सू ८३४ या सूत्रातील 'नुम्' चा नुम्स्थानिक अनुस्वार असा अर्थ केला आहे तसा प्रकृत सूत्रातील 'नुम्' चा अर्थ करणे शक्य नाही, कारण तसा अर्थ केल्यास, 'तृह्' या धातूत नकाराचे जागी झालेला अनुस्वार असून नुम्चे जागी झालेला अनुस्वार नसल्यामुळें) 'तृह्' धातूचा 'तृह्णम्' या रूपात णत्वाची सिद्धि न होण्याची आपत्ति येते आणि हे (प्रकृत सूत्रावरील) भाष्यात स्पष्ट केले आहे. ('तृह्णम्' या स्थली ह्कार व नकार या दोन वर्णांमध्ये नुम्स्थानिक अनुस्वाराचे व्यवधान नसून नकारस्थानिक अनुस्वाराचे व्यवधान आहे. म्हणून प्रकृत सूत्रातील 'नुम्' चा नुम्स्थानिक अनुस्वार असा संकुचित अर्थ केल्यास, 'तृह्णम्' या स्थली णत्व न होता 'तृह्नम्' असे अनिष्ट रूप होण्याची आपत्ति [illegible] 'काकेभ्यो दधि रक्ष्यताम्' या

ग्रहणाचे प्रत्याख्यान केले आहे हे भाष्य पूर्वी मनोरमेंत दिलेच आहे )

**मनोरमा–"यस्मात्प्रत्ययविधि."।** अत्र प्राचोक्तम्–यस्माद्धातोः प्रातिपदिकाद्वेति। तन्न। तिङन्तादीनामपि तरबादिक प्रत्यङ्गत्वात्। सङ्कोचस्य निर्मूलत्वात्। आमुष्यायण इत्यादौ वृद्धयभावापत्तेश्च। न हि प्रातिपदिकादय तद्धित किं तु सुबन्तादिति दिक्।

'यस्मात्प्रत्ययविधिस्तदादि प्रत्ययेऽङ्गम्' सू १९९ या सूत्रातील 'यस्मात्' या पदाचा प्रसादकारानी 'यस्माद्धातो प्रातिपदिकाद्वा असा जो अर्थ केला आहे तो बरोबर नाही, कारण तिङन्त इत्यादि देखील 'तरप्' इत्यादि प्रत्ययाची अङ्गें होतात आणि म्हणून त्या पदाचा तसा सकुचित अर्थ करण्यास काहीच प्रमाण नाही. 'यस्मात्' या पदाचा तसा सकुचित अर्थ केल्यास 'आमुष्यायण' इत्यादि स्थली वृद्धि न होण्याची आपत्ति येते 'आमुष्यायण' या उदाहरणात जो तद्धित प्रत्यय झाला आहे तो प्रातिपदिकाहून झाला नसून सुबन्ताहून झाला आहे (प्रक्रियाकौमुदीकारानी प्रकृत सूत्राचा 'प्रत्ययः यस्मात् क्रियते तदादिशब्द प्रत्यये परेऽङ्गसज्ञ स्यात्' असाच दीक्षितासारखा अर्थ केला आहे यावरून हे स्पष्ट होतें की, त्यानी प्रकृत सूत्रातील 'यस्मात्' या पदाचा 'यस्मात् शब्दात्' असा सामान्य अर्थच केला आहे परतु प्रसादकारानी आपल्या टीकेत 'यस्मात्' या पदाचा 'यस्माद्धातो प्रत्ययाद्वा' असा सकुचित अर्थ केला आहे 'ङ्याप् प्रातिपदिकात्' व 'धातो' ही अधिकारसूत्रें असल्यामुळें त्यानी असे गृहीत घेतलेले दिसते की, धातु व प्रातिपदिक याहूनच प्रत्ययोत्पत्ति होते पण तसे वास्तविक नसून क्वचित् स्थली तिङन्ताहून व सुबन्ताहून देखील प्रत्ययोत्पत्ति होते उदाहरणार्थ 'तिङ' सू २००२ या सूत्रानें 'अतिशायने' या अर्थात तिङन्ताहून 'तमप्' प्रत्यय होणे सांगितले आहे तसेच 'किमेत्तिङ्' सू २००४ या सूत्रानें तिङन्ताहून

'तरप् तमप्' प्रत्यय होणें व त्या प्रत्ययांना 'आम्' होणें सांगितलें आहे 'सुबन्तात्तद्धितोत्पत्तिः' हें वचन व्याकरणशास्त्रांत प्रसिद्धच आहे. म्हणून प्रसादकारांनी 'यस्मात्' याचा जसा संकुचित अर्थ केला आहे तसा अर्थ केल्यास, अङ्गसंज्ञेच्या निमित्तामुळें होणारी कार्यें होऊं शकणार नाहींत. 'अमुष्य' हा सुबन्त-षष्ठ्यन्त-शब्द नडादिगणांत पठित आहे व 'नडादिभ्यः फक्' सू. ११०१ या सूत्रानें 'अमुष्य' या शब्दाहून 'गोत्रापत्य' या अर्थामध्यें 'फक्' प्रत्यय केल्यास तो प्रत्यय कित् असल्यामुळें, 'किति च' सू. १०७६ या अङ्गाधिकारांत पठित असलेल्या व त्यांत 'अङ्गस्य' या पदाची अनुवृत्ति होणाऱ्या सूत्रानें अङ्गाच्या आद्य अचाला वृद्धि पावते. 'अमुष्य' हें प्रातिपदिक नसून सुबन्त असल्यामुळें त्याला अङ्गसंज्ञा न झाल्यास, त्याच्या आद्य अचाची वृद्धि होणार नाहीं व 'आमुष्यायणः' हें इष्ट रूप सिद्ध होणार नाहीं. म्हणून 'यस्मात्' या पदाचा 'धातोः प्रातिपदिकाद्वा' असा संकुचित अर्थ न करितां 'शब्दस्वरूपात्' असा सामान्य अर्थच करणें योग्य आहे असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे.)

शब्दरत्न – अङ्गत्वादिति । तदनङ्गीकारे ह्यपाचितरामित्यादौ चिणो लुगापादनादिपरभाष्यविरोधः । चिण. परस्याङ्गसंज्ञानिमित्तस्य प्रत्ययस्य लुगित्यर्थात् । दिगिति । दिगर्थस्तु याथाकथाचमित्यादौ "यथाकथाचहस्ताभ्यां ण्यतौ" इत्यनेन वचनसामर्थ्येन निपातसमुदायात्प्रत्ययेऽङ्गत्वानापत्तौ वृद्ध्यनापत्तेरित्यलम् ।

'तिङन्तादीनामपि तरबादिकं प्रत्यङ्गत्वात्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे तें बरोबर न मानल्यास, 'अपाचितराम्' इत्यादि स्थलीं 'चिणो लुक्' सू. २३२९ ६·४·१०४ या सूत्रानें प्रत्ययाचा लुक् होण्याची ज्या ज्या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनी आपत्ति दिली आहे त्या भाष्याशी विरोध येईल; कारण 'चिणो लुक्' या सूत्राचा असा अर्थ आहे कीं, 'चिण्' च्या पुढें असणारा जो प्रत्यय अङ्गसंज्ञा

होण्यास कारणीभूत होतो त्या प्रत्ययाचा लुक् होतो. ( 'अ पच् चिण् त तराम् = अपाचि त तराम्' या उदाहरणात 'त' या प्रत्ययाच्या निमित्तामुळें 'अपाचि' याला अङ्गसंज्ञा होते व तो प्रत्यय 'चिण्' च्या पुढें असल्यामुळें त्याचा 'चिणो लुक्' या सूत्रानें लुक् होऊन 'अपाचितराम्' असे रूप होते. 'अपाचितराम्' या स्थली 'अपाचि' या तिङन्तापुढें 'तराम्' हा 'त' नें सुरु होणारा प्रत्यय आला असल्यामुळें व तो प्रत्यय देखील, 'त' चा लुक् झाल्याकारणानें, चिण्च्या लगेंच पुढें येत असल्यामुळें, त्या प्रत्ययातील 'त' चा देखील 'चिणो लुक्' या सूत्रानें लुक् का होऊ नये अशी त्या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी शंका केली आहे व त्या शंकेचे अशा रीतीने निवारण केले आहे की, 'त' प्रत्ययाचा जो पूर्वी लुक् झाला आहे तो 'असिद्धवदत्राभात्' सू. २१८३ या सूत्राने 'तराम्' यातील 'त' चा लोप करतेवेळी असिद्ध ठरत असल्यामुळें आणि अशारीतीनें 'चिण्' व 'तराम्' या दोहो मध्यें 'त' प्रत्यय विद्यमान आहे असे मानावे लागत असल्यामुळें, 'तराम्' यातील 'त' चा लुक् होऊ शकत नाही. या भाष्यावरून हें स्पष्ट होतें की भाष्यकारानी तिङन्त शब्दस्वरूप अङ्ग मानले आहे म्हणून प्रसादकारानी प्रकृत सूत्रातील 'यस्मात्' या शब्दाचा जसा संकुचित अर्थ केला आहे तो बरोबर मानल्यास, वरील भाष्याशी विरोध येतो ) 'इति दिक्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्यातील 'दिक्' या शब्दाचा भावार्थ हा आहे की, 'याथाक-थाचम्' इत्यादि स्थली 'यथाकथाच' या तीन निपाताच्या समुदायाहून 'यथाकथाचहस्ताभ्यां ण्यतौ' सू. १७६२ या सूत्राच्या सामर्थ्यानें 'ण' प्रत्यय केला असता, वृद्धि न होण्याची आपत्ति येते ('यथाकथाच' या तीन निपाताच्या समुदायातील प्रत्येक निपात अर्थवान् आहे व अशा रीतीनें जरी हा समुदाय अर्थवान् आहे तरी तो समासरूप समुदाय नसल्यामुळें, 'कृत्तद्धितसमासाश्च' सू. १७९ या सूत्रातील 'समासग्रहणकृत नियमान्वयें त्याला प्राति-

पदिकसंज्ञा होऊं शकत नाही. म्हणून प्रकृत सूत्रातील 'यस्मात्' या पदाचा प्रसादकारानीं 'धातोः प्रातिपदिकाद्वा' असा जो अर्थ केला आहे तो बरोबर मानल्यास, 'तद्धितेष्वचामादेः' सू. १०७५ या अङ्गाधिकारात पठित असलेल्या सूत्रानें अङ्गाच्या आद्य अचाला होणारी वृद्धि होणार नाही व 'याथाकथाचम्' असे इष्ट रूप सिद्ध होऊं शकणार नाही.) या विपयासंबधानें एवढें पुरे.

मनोरमा–"अतो भिस ऐस" ॥ नन्वेस् इत्येवास्तु । न च "अतो गुणे" इति पररूपापत्तिः । एकारोच्चारणवैयर्थ्यापत्तेः । अन्यथा इसमेव विदध्यादिति चेत्सत्यम्–एवं तर्ह्यि मात्रयाविशेषेण गौरवाभावादेस् कृतः । एवं च पररूपशङ्कैव नास्तीति महल्लाघवम् । यत्त्वाहुः–ऐस्करणं निर्जरसैरित्यैकारश्रवणार्थमिति । तद्भाष्यविरुद्धम् । सन्निपातपरिभाषया जरसादेशाप्रवृत्तेर्निर्जरैरित्येव भाष्ये सिद्धान्तितत्वात् ।

('अतो भिस ऐस्' सू. २०३ या सूत्रासंबधानें शंकाकार अशी शंका करतो की, या सूत्रात 'ऐस्' चे जागी) 'एस्' असे पठित केले असते तरी देखील चालले असत. 'एस्' असे पठित केले असते तर 'अतो गुणे' सू. १९१ या सूत्रानें गुणरूप एकादेश होण्याची आपत्ति आली असती हे म्हणणे बरोबर नाही, कारण गुणरूप एकादेश केल्यानें 'एस्' यातील एकाराचे उच्चारण व्यर्थ ठरण्याची आपत्ति आली असती. गुणरूप एकादेश होणे इष्ट असते तर प्रकृत सूत्रात 'इस्' असाच आदेश होण्याचे विधान केले असते (व 'इस्' असा आदेश पठित केला असता तरी 'आद्गुणः' सू. ६९ या सूत्रानें गुणरूप एकादेश होऊं शकलाच असता. सारांश शंकाकार असे म्हणतो की, प्रकृत सूत्रात 'ऐस्' चे ऐवजी 'एस्' असा आदेश पठित केला असता तरी त्या आदेशातील एकारग्रहणाच्या सामर्थ्यानें 'अतो गुणे' या सूत्राचा बाध होऊन 'वृद्धिरेचि' सू. ७२ या सूत्रानें वृद्धिरूप एकादेश होऊं शकलाच असता व 'राम

भिस् = राम एस् = रामैः' असे इष्ट रूप सिद्ध होऊ शकलेच असते. या शकेवर दीक्षित असे उत्तर देतात की,) वरील शका योग्य आहे. पण 'ए' व 'ऐ' हे दोन्ही वर्ण सारखेच द्विमात्रिक असल्यामुळें, 'एस्' च्या ऐवजी 'ऐस्' पठित करण्यात गौरवदोष येत नाही, म्हणजे मात्राधिक्य होत नाही, आणि म्हणून 'ऐस्' असाच आदेश पठित केला आहे. तसा आदेश पठित केल्यानें पररूप एकादेश होण्याची शकाच उद्भवू शकत नाही आणि अशा रीतीनें 'ऐस्' असा आदेश पठित करण्यात मोठें लाघव आहे. प्रकाशकाराचें असे म्हणणे आहे की, प्रकृत सूत्रात 'ऐस्' असा आदेश पठित करण्याचे कारण हे आहे की, 'निर्जरसैः' या रूपात ऐकाराचे श्रवण व्हावें. (प्रकृत सूत्रावरील काशिकेत देखील असेच म्हटले आहे व प्रकाशकारानी काशिकेचा अनुवाद केला आहे असे दिसते. काशिकाकार म्हणतात–'अतिजरसैः । जरामतिक्रान्तैरिति विगृह्य समासे कृते ह्रस्वत्वे च भिस ऐसादेशो भवति । एकदेशविकृतमनन्यवद्भवति । जरशब्दस्य जरसादेश । सन्निपातलक्षणो विधिरनिमित्त तद्विघातस्येति परिभाषेयमनित्या, कष्टाय क्रमणे इति निर्देशात् ।' निरादय क्रान्ताद्यर्थे पञ्चम्या'–सू. ७८० वरील वार्तिक–या वार्तिकान्वयें 'जराया. निष्क्रान्तो निर्जरा' या स्थली 'गोस्त्रियो.' सू ६५६ या सूत्राने ह्रस्व होऊन, 'निर्जर' असा सामासिक शब्द सिद्ध होतो. 'निर्जर भिस्' या स्थली अदन्त अङ्गापुढें 'भिस्' प्रत्यय असल्यामुळें प्रकृत सूत्रानें 'भिस्' प्रत्ययाचे जागी 'ऐस्' असा आदेश होतो आणि 'निर्जर ऐस्' अशी स्थिति होते. या स्थली 'जरा' या शब्दाचे 'जर' हे ह्रस्वकार्य केल्यामुळें झालेले एकदेशविकृत रूप असल्यामुळें, 'एकदेशविकृतमनन्यवत्' प. ३७ या परिभाषान्वयें 'जर' हा शब्द 'जरा' च आहे असे मानले असता, त्यापुढें 'ऐस्' हा अजादि विभक्तिप्रत्यय असल्यामुळें, 'जराया जरसन्यतरस्याम्' सू. २२७ या सूत्राने 'जर' चे जागी 'जरस्' असा आदेश होऊन 'निर्जरस्

ऐस् ' निर्जरसैः ' असे रूप होतें व हें रूप सिद्ध होण्याकरिताच प्रकृत सूत्रात ' एस् ' च्या ऐवजीं 'ऐस्' असा आदेश पठित केला आहे असे प्रकाशकाराचे म्हणणे आहे. यावर दीक्षित असे म्हणतात कीं, प्रकाशकाराचे ) हें म्हणणे भाष्यविरुद्ध आहे सन्निपातपरिभाषान्वयें ' जरस् ' या आदेशाची वरील उदाहरणांत प्रवृत्ति होऊ शकत नाही व त्यामुळें 'निर्जरैः' असेच रूप होऊ शकतें असे ( 'जराया जरसन्यतरस्याम्' ७-२-१०१ या सूत्रावरील ) भाष्यात सिद्धान्तरूपानें सांगितलें आहे ( ' निर्जर भिस् ' या स्थली अदन्त अङ्ग व त्यापुढील 'भिस्' हा प्रत्यय या दोहोंच्या सन्निपातामुळे 'अतो भिस ऐस्' या प्रकृत सूत्रानें 'भिस्' प्रत्ययाचे जागी 'ऐस्' असा आदेश होतो. हा आदेश अजादि असल्यामुळें व 'एकदेशविकृतमनन्यवत्' – प. ३७ – या परिभाषान्वयें 'जर' हा शब्द 'जरा' च आहे असे मानता येत असल्यामुळें 'जराया जरस्' सू २२७ या सूत्रानें 'निर्जर' यातील 'जर' चे जागी 'जरस्' असा आदेश केल्यास, 'निर्जर' हें अदन्त अङ्ग नष्ट होऊन 'निर्जरस्' असे हलन्त अङ्ग होईल व त्यामुळे अदन्त अङ्ग व 'ऐस्' याचा सन्निपात नष्ट होईल. म्हणून ज्या सन्निपातामुळें 'ऐस्' असा आदेश झाला आहे त्या सन्निपाताचा नाश करण्याकरिता 'ऐस्' हा आदेश, ' सन्निपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्य ' – प. ८६ – या परिभाषान्वयें, कारणीभूत होऊ शकत नाही व त्यामुळें 'जर' चे जागी 'जरस्' असा आदेश होऊ शकत नाही. म्हणून वरील उदाहरणात 'जरस्' आदेश न होता 'निर्जरैः' असेच रूप सिद्ध होतें. 'जराया जरस्' या सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात–'सन्निपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्येति । यद्येवमतिजरसमतिजरसैरित्यत्र (जरसादेशो) न प्राप्नोति । अतिजरमतिजरैरिति भवितव्यम् । गोनर्दीय आह इष्टमेवैतत्सङ्गृहीतं भवति । अतिजरमतिजरैरिति भवितव्य सत्यामेतस्यां 'परिभाषायां – सन्निपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्येति ।' या भाष्यावरून हें स्पष्ट होतें की,

निर्जर अति जर इत्यादि स्थली 'जरस्' आदेश होणे भाष्यकाराच्या मते मुळीच इष्ट नाही. म्हणून 'निर्जरसैः' इत्यादि रूपें सिद्ध होण्याकरिता प्रकृत सूत्रात 'ऐस्' असा आदेश पठित केला आहे असें जें प्रकाशकाराचे म्हणणे आहे तें भाष्यविरुद्ध असल्यामुळें बरोबर मानता येत नाही )

शब्दरत्न—ऐस्कृत इति । नद्यैरित्यादिसिद्धयें उत्तरार्थं तदित्यन्ये ।

इतर वैयाकरणाचे असे म्हणणे आहे की, उत्तर सूत्रात, म्हणजे 'बहुल छन्दसि' या सूत्रात, 'ऐस्' या पदाची अनुवृत्ति व्हावी व त्या योगानें 'नद्यैः' इत्यादि वैदिक रूपाची सिद्धि व्हावी याकरिता प्रकृत सूत्रात 'ऐस्' या पदाचे ग्रहण केले आहे ('बहुल छन्दसि' या सूत्रात 'बहुलम्' या पदाचे ग्रहण केले असल्यामुळें, जें अङ्ग अदन्त नाही तशा अङ्गापुढील 'भिस्' प्रत्ययाचे जागी विकल्पेंकरून वैदिक प्रयोगात 'ऐस्' आदेश होतो व त्यामुळें वेदात 'नदीभि, नद्यै' अशी पाक्षिक रूपें होतात. जर प्रकृत सूत्रात 'एस्' असा आदेश पठित केला असता तर वरील उत्तर सूत्रात त्या आदेशाची अनुवृत्ति झाली असती व त्यामुळें 'नद्यैः' अस पाक्षिक इष्ट वैदिक रूप सिद्ध न होता, 'नद्यै' असे अनिष्ट रूप होण्याची आपत्ति आली असती ती टाळण्याकरिता प्रकृत सूत्रात 'ऐस्' असा आदेश पठित केला आहे असे इतर वैयाकरणाचे म्हणणे आहे )

मनोरमा—"नामि" । परिभाषाविरोधादिति । एतच्च "रुधादिभ्यः श्नम्" इति सूत्रे "श्नान्नलोपः" इति सूत्रे च भाष्यकैयटयोः स्पष्टम् । आरम्भसामर्थ्यादिति । "सुपि च" इत्यस्य तु न सामर्थ्यम् रामाभ्यामित्यादौ सावकाशत्वादिति भावः । एव च रामशब्दे "नामि" इत्यस्योपन्यासो लेखकप्रमादादिति यदूचुस्तच्चिन्त्यम् ।

'नामि' सू. २०९ या सूत्रावरील कौमुदीत 'सुपि च इति दीर्घो यद्यपि परस्तथापीह न प्रवर्तते सन्निपातपरिभाषाविरोधात्' असें जें म्हटलें आहे तें 'रुधादिभ्यः श्नम्' सू. ३-१-७८ व श्नान्नलोपः' सू. ६-४-२२ या सूत्रावरील भाष्यात व कैयटाच्या वृत्तीत सांगितलें आहे. 'नामि इत्यनेन त्वारम्भसामर्थ्यात् परिभाषा बाध्यते' असें जें प्रकृत सूत्रावरील कौमुदीत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे की, ( ज्याप्रमाणें 'नामि' या सूत्राच्या आरम्भसामर्थ्यानें तें सूत्र सन्निपातपरिभाषेचा बाध करून प्रवृत्त होऊं शकतें तसें ) 'सुपि च' सू. २०२ या सूत्रात सामर्थ्य नाहीं, म्हणजें तें सूत्र सन्निपातपरिभाषेचा बाध करू शकत नाही; कारण 'रामाभ्याम्' इत्यादि स्थली तें सूत्र सावकाश ठरतें. ('राम आम्' या स्थलीं 'ह्रस्वनद्यापो नुट्' सू. २०८ या सूत्रानें 'आम्' प्रत्ययाला 'नुट्–न्' आगम होऊन 'राम नाम्' अशी स्थिति झाली असता, 'यदागमा '-परि.११-या परिभाषान्वयें नुडागम 'आम्' प्रत्ययाचा अवयव होत असल्यामुळें, 'नाम्' हा 'सुप्' प्रत्यय मानता येतो. हा प्रत्यय यञादि असल्यामुळें 'सुपि च' या सूत्रानें 'राम' या अदन्त अङ्गाला दीर्घकार्य पावलें आहे व तसेंच 'नामि' या प्रकृत सूत्रानें देखील 'राम' या अजन्त अङ्गाला दीर्घ कार्य पावलें आहे. 'नामि' हें प्रकृत सूत्र 'अग्नीना, वायूनाम्' इत्यादि स्थलीं सावकाश ठरत असून 'सुपि च' हें सूत्र 'रामाभ्याम्' इत्यादि स्थली सावकाश ठरतें. अशा रीतीनें हीं दोन्ही सूत्रें आपापल्या विषयात सावकाश ठरून तुल्यबल ठरत असल्यामुळें, 'विप्रतिषेधे परं कार्यम्' सू. १७५ या सूत्रान्वयें 'रामाणाम्' या स्थली दीर्घकार्य करतेवेळीं 'नामि' या पूर्व सूत्राची प्रवृत्ति न करिता 'सुपि च' या उत्तर सूत्राची प्रवृत्ति करणें योग्य आहे असे शङ्काकाराचें म्हणणें आहे. यावर दीक्षित असें उत्तर देतात की, सन्निपातपरिभाषा-परि ८६-असल्यामुळें, 'सुपि-च' हें सूत्र 'रामाणाम्' या स्थली दीर्घ कार्य करण्याकरिता प्रवृत्त

होऊ शकत नाही. 'रामाणाम्' या स्थली ऱ्हस्वान्तअङ्गाच्या निमित्तामुळें 'आम्' प्रत्ययाला जो नुडागम होतो तो नुडागम 'सुपि च' या सूत्राच्या प्रवृत्तीचे निमित्त होऊ शकत नाही; कारण 'सुपि च' हे सूत्र प्रवृत्त झाल्यास नुडागमाचे निमित्त जें अदन्त ऱ्हस्वाङ्ग ते नष्ट होईल व अशा रीतीनें ऱ्हस्व अङ्ग व त्या पुढील प्रत्यय यांच्या सन्निपाताचा नाश होईल. यावर शकाकार असे उत्तर देतो की, 'नामि' हे सूत्र प्रवृत्त केल्याने देखील ऱ्हस्वान्त अङ्ग नष्ट होऊन सन्निपाताचा विघात होणारच आणि अशा रीतीनें वरील दोन सूत्रांपैकी कोणतेंहि सूत्र प्रवृत्त केल्यास सन्निपातपरिभाषा सारखीच आड येत असल्यामुळें, 'रामाणाम्' या स्थली इष्ट दीर्घकार्य करण्याकरिता 'सुपि च' या उत्तर सूत्राने सन्निपातपरिभाषेचा बाध करून त्या सूत्राची प्रवृत्ति करणे उचित आहे. यावर दीक्षित असें उत्तर देतात. की, 'नामि' हे जरी पूर्व सूत्र आहे तरी ते सूत्र मुद्दाम आरभिलें असल्यामुळें, आरंभसामर्थ्यानें ते सूत्र सन्निपातपरिभाषेचा बाध करून प्रवृत्त होते. सन्निपातपरिभाषेचा बाध केल्याशिवाय तें सूत्र प्रवृत्त होण्यास कोणतेंहि उदाहरण मिळू शकत नाही आणि ते निरवकाश व व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. ते व्यर्थ न ठरावे याकरिता हे मानणे आवश्यक आहे की, निरवकाशत्वामुळें सन्निपातपरिभाषेचा बाध करून ते प्रवृत्त होते. 'सुपिच' या सूत्राची अशी स्थिति नाहीं, म्हणजे सन्निपातपरिभाषेचा बाध केल्याशिवाय तें सूत्र प्रवृत्त होऊं शकत नाहीं अशी वस्तुस्थिति नाही; कारण 'रामाभ्याम्' इत्यादि स्थली तें सूत्र सावकाश व चरितार्थ ठरतें. अशा रीतीनें तें सूत्र निरवकाश ठरत नसल्यामुळें, 'रामाणाम्' या स्थली दीर्घकार्य करते वेळी ते सूत्र सन्निपातपरिभाषेचा बाध करून प्रवृत्त होऊ शकत नाहीं. 'रामाम' या स्थलीं सन्निपातपरिभाषा अनित्य मानून जरी त्या सूत्राची प्रवृत्ति केली जाते तरी इतर स्थली ते सूत्र, सन्निपातपरिभाषा अनित्य मानून, प्रवृत्त करता येऊ शकत नाहीं असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे. या विषयासंबधानें

बालमनोरमेंत 'यद्यत्र नामीति दीर्घो न स्यात् तर्हि तदारम्भो व्यर्थः स्यात्। तस्माच्च निरवकाशत्वाद्रामाणामित्यादौ नामीति दीर्घः सन्निपातपरिभाषां बाधित्वा प्रवर्तते। सुपि चेति दीर्घस्तु रामाभ्या-मित्यादौ सावकाशत्वाद्रामाणामित्यादौ नामि परे सन्निपात-परिभाषां न बाधितुमर्हति। तस्माद्रामाणामित्यादौ नामि परे दीर्घप्रवृत्तौ सन्निपातपरिभाषां बाधितुं नामीति दीर्घा-रम्भः' असे स्पष्ट म्हटले आहे. 'ह्लान्नलोपः' व 'इयादिभ्य-दनम्' या दोन्ही सूत्रावरील भाष्यात भाष्यकारांनी 'यज्ञानाम्, यत्नानाम्' या उदाहरणांत 'सुपि च' या परसूत्राची प्रवृत्ति न करिता, 'नामि' या पूर्व सूत्राचीच प्रवृत्ति करून दीर्घकार्याची सिद्धि केली आहे. आणि या दोन्ही सूत्रावरील भाष्याच्या वृत्तीत कैयटानें 'यत्तु सुपि चेति दीर्घत्वं तत् सन्निपातलक्षणपरिभाषा-बाधान्न प्रवर्तते' असे स्पष्ट म्हटले आहे ) असे असल्यामुळें, प्रक्रिया-कौमुदींत 'राम' या शब्दाच्या विभक्तिरूपाची सिद्धि करतेवेळीं 'नामि' या सूत्राचा जो उपन्यास केला आहे तो ग्रंथकाराच्या प्रमादा-

'रामाणाम्' हे रूप सिद्ध करतेवेळी 'नामि' या सूत्राचा जो उपन्यास केला आहे तो विचारपूर्वक व यथायोग्य केला आहे; कारण त्या सूत्राची प्रवृत्ति केल्याशिवाय 'रामाणाम्' या रूपाची सिद्धि होणे शक्य नाही. म्हणून तो उपन्यास लेखकाच्या प्रमादामुळें केला गेला असावा हें म्हणणे चूक ठरते.)

शब्दरत्न–स्पष्टमिति । "सुपि च" इत्यपेक्षया "नामि" इति तत्र नित्यमपि ध्वनितम् ।

'सुपि च' या सूत्राच्या मानानें 'नामि' हे सूत्र नित्य आहे हें देखील वरील दोन्ही सूत्रावरील भाष्यात ध्वनित केले आहे. ('नामि' हे प्रकृत सूत्र 'सुपि च' या सूत्राच्या मानानें नित्य नसते तर दीर्घकार्याच्या सिद्धीकरिता त्या पूर्व सूत्राचा भाष्यकारानी वरील भाष्यात निर्देश न करिता 'सुपि च' या उत्तर सूत्राचा निर्देश केला असता. 'रामाणाम्' या स्थली दीर्घकार्य करण्याकरिता 'सुपि च' हें सूत्र, सन्निपातपरिभाषा असून देखील, प्रथम प्रवृत्त केले तरी 'नामि' हे सूत्र आरंभसामर्थ्यामुळें 'पर्जन्यवल्लक्षण प्रवृत्ति.' प. १२० या 'इको झल्' १–२–९ या सूत्रावरील भाष्यात सांगितलेल्या न्यायान्वयें पुन्हा प्रवृत्त होऊं शकतच व अशा रीतीने ते कृताकृतप्रसङ्गि सूत्र 'सुपि च' या सूत्राच्या मानानें नित्य ठरते व 'परान्नित्य बलवत्' या न्यायान्वये तेच सूत्र प्रवृत्त होते असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे )

मनोरमा–"आदेशप्रत्यययोः" एकाऽपि षष्ठी विषयभेदाद्भिद्यते इत्याशयेन व्याचष्टे–आदेश- प्रत्ययावयवश्चेति । यदि तु आदेशा- वयवो गृह्येत तर्हि तिसृणामित्यादौ दोषः । यदि च प्रत्यययोः यः सकार इति तर्हि रामेष्वित्यादौ न स्यात् । यद्यप्येवं वैरूप्येण व्याख्याने सहविवक्षाविरहात् द्वन्द्वो न युज्यते, तथाऽपि सौत्रत्वाद् बोध्यः ॥ विवृताघोषस्येति । यत्तु वदन्ति–सकारस्य सोष्मणोऽघोषस्यान्तरतमः

ष एव मूर्धन्य इति तन्न्यूनम्, ठकारेऽतिप्रसङ्गात् । तथा च प्रातिशाख्यम् । —

"वर्गे वर्गे च प्रथमावघोषौ युग्मौ सोष्माणावनुनासिकोऽन्त्य." इति । ननु दधिसेच इत्यादौ प्राक् सुबुत्पत्तेः समासे पत्वं वारयितुं पदादादिः पदादिरिति पञ्चमीसमासो भाष्ये उक्तः । ततश्चेहापि "सात्पदाद्योः" इति निषेधः स्यादिति चेत् । मैवम् । स्वादिष्विति या पदसंज्ञा तामाश्रित्योक्तनिषेधो न प्रवर्तते इति सातिग्रहणेन ज्ञापितत्वात् ।

'आदेशप्रत्यययोः' सू. २१२ या सूत्राचे व्याख्यान करिताना 'आदेशः प्रत्ययावयवश्च यः सकारः' असे जें कौमुदीत म्हटले आहे तें, 'आदेशप्रत्यययोः' ही षष्ठी एक असून देखील विषयभेदामुळें भिन्नभिन्न अर्थांची वाचक आहे असा आशय मनात धरून, म्हटले आहे. 'आदेशप्रत्यययोः' यातील 'आदेशस्य' ही अवयवषष्ठी मानून त्या शब्दाचा 'आदेशावयव' असा अर्थ केला तर 'तिसृणाम्' इत्यादि स्थली दोष येतो. तसेच 'प्रत्ययस्य' ही अभेदसंबंधबोधिका षष्ठी मानून त्या शब्दाचा 'प्रत्ययो यः सकारः' असा अर्थ केल्यास, 'रामेषु' इत्यादि स्थली षत्व न होण्याची आपत्ति येते अशा रीतीनें वर प्रमाणे व्याख्यान केल्याने 'आदेशस्य' व 'प्रत्ययस्य' या दोन षष्ठीच्या अर्थामध्यें वैरूप्य—भिन्नता—येत असल्यामुळें, सहविवक्षा राहत नाही व त्यामुळें जरी द्वन्द्वसमास होऊ शकत नाही तरी तो सौत्रद्वन्द्व मानून निर्वाह करून घेतला पाहिजे. ('आदेशप्रत्यययोः' या इतरेतर योगद्वन्द्वसमासाचा 'आदेशश्च प्रत्ययश्च तयोः' असा विग्रह आहे. या षष्ठ्यन्त सामासिक पदात आदेश व प्रत्यय हे दोन भिन्न विषय एकत्र संगृहीत केले आहेत. 'आदेशस्य' ही षष्ठी 'राहोः शिरः' या प्रयोगातील षष्ठीसारखी अभेदसंबंधबोधिका षष्ठी असून 'प्रत्ययस्य' ही अवयवावयविभावसंबंधबोधिका षष्ठी आहे. त्यामुळें

,'आदेशस्य य. सकारः' याचा 'आदेशरूपो यः सकारः' असा अर्थ होत असून, 'प्रत्ययस्य यः सकारः' याचा 'प्रत्ययरूपो यः सकार' असा अर्थ न होता, 'प्रत्ययावयवो य. सकार' असा अर्थ होतो. 'आदेशस्य' या शब्दाचा 'आदेशावयवस्य' असा अर्थ केल्यास, 'तिसृणाम्' या स्थली सकाराचे षत्व होण्याची आपत्ति येते 'त्रि' हा शब्द स्त्रीलिङ्गाचा वाचक असल्यास त्यापुढे विभक्तिप्रत्यय आला असता, 'त्रिचतुरो स्त्रियां तिसृचतसृ' सू. २२८ या सूत्रानें 'त्रि' चे जागी 'तिसृ' असा आदेश होणे सांगितले असल्यामुळें, 'त्रि आम्' या स्थली त्या सूत्रानें 'त्रि' चे जागी 'तिसृ' असा आदेश होऊन 'तिसृ आम्' अशी स्थिति होते या आदेशात 'इ' या 'इण्' पुढें सकार हा आदेशावयव असल्यामुळें, वरील अर्थान्वयें त्याचे षत्व होण्याची आपत्ति येते. पण 'आदेशरूपो य. सकारः' असा अर्थ केल्यानें, ती आपत्ति टळते, कारण येथें सकाररूप आदेश झाला नसून 'तिसृ' असा आदेश झाला आहे. त्याचप्रमाणे 'प्रत्ययो यः सकारः' असा अर्थ केल्यास, 'रामेषु' या स्थली 'सु' हा समुदाय प्रत्यय असून त्यातील अवयव सकार हा प्रत्यय नसल्यामुळें, त्याचे षत्व न होण्याची आपत्ति येते. पण 'प्रत्ययावयव. य. सकार' असे व्याख्यान केल्यानेंच ती आपत्ति टळते. पण अशा रीतीनें 'आदेशस्य' ही अभेदसबंध-बोधिकाषष्ठी व 'प्रत्ययस्य' ही अवयविषष्ठी मानल्यास, या स्थली सहविवक्षेचा अभाव होतो. याचे कारण हे कीं, प्रकृत सूत्रात 'सहेः साडः सः' या पूर्व सूत्रातून 'सः' या षष्ठ्यन्त पदाची अनुवृत्ति होते. या अनुवृत्त पदात 'आदेशस्य' या षष्ठीचा तादात्म्यसबंधानें — अभेदसबंधानें — अन्वय असून, 'प्रत्ययस्य' या षष्ठीचा अवयवावयविरूपसबंधानें अन्वय आहे असे मानले असता, या दोन षष्ठीचा 'सः' या अनुवृत्त पदात सारख्याच रीतीनें अन्वय होत नसल्यामुळें, येथें सहविवक्षेचा अभाव आहे हे स्पष्ट होते, आणि इतरेतरयोगद्वन्द्व होण्याकरिता सहविवक्षा असणे आवश्यक असल्यामुळें, 'आदेश-प्रत्यययोः' या स्थली वास्तविक इतरेतरयोगद्वन्द्व होऊं शकत नाही.

तथापि 'छन्दोवत् सूत्राणि भवन्ति' या भाष्यवचनान्वयें हा सौत्र-प्रयोग वैदिकप्रयोग ठरतो व 'दृष्टानुविधिश्छन्दसि' या वचनान्वयें तो साधु मानला पाहिजे ) प्रकृत सूत्रावरील कौमुदीत 'विवृताघोषस्य सस्य तादृश एव षः' असें म्हटलें आहे परतु प्रकृत सूत्रावरील टीकेंत प्रकाशकारानी 'रामेषु' या स्थली जें षत्व झालें आहे त्या सबंधानें 'सकारस्य सोष्मणोऽघोषस्यान्तरतम्यात् तादृश एव षकारो भवति मूर्धन्यः' असें जें म्हटलें आहे तें अपुरें आहे. हें त्याचें म्हणणें बरोबर मानल्यास, सकाराचे जागी ठकारादेश देखील होण्याची आपत्ति येते. ( प्रसादकारानी देखील प्रकाशकारासारखेंच आपल्या टीकेंत म्हटलें आहे आणि प्रकाशकारानी त्याच्याच म्हणण्याचा अनुवाद केला आहे असें दिसते. ) प्रातिशाख्यात असें म्हटलें आहे की, प्रत्येक वर्गांतील पहिले दोन वर्ण अघोष असून द्वितीय व चतुर्थ वर्ण सोष्म असतात व अन्त्यवर्ण अनुनासिक असतो ( या प्रातिशाख्यान्वयें टवर्गातील द्वितीय वर्ण ठकार हा अघोष व सोष्म ठरतो षकार देखील अघोष असून ऊष्मवर्ण आहे. म्हणून 'स्थानेऽन्तरतम' सू ३९ या सूत्रान्वयें अन्तरतम्य ठरविण्याकरिता प्रकृत स्थली अघोष व सोष्म हे दोन बाह्य यत्नरूप हेतु पुरेसे मानले तर, सकाराचा अन्तरतम जसा षकार ठरतो तसा ठकार देखील ठरतो व त्यामुळें सकाराचे जागी 'रामेषु' या स्थली ठकारादेश देखील होण्याची आपत्ति येते. ती आपत्ति टाळण्याकरिता प्रकृत सूत्रावरील कौमुदीत 'विवृताघोषस्य सस्य तादृश एव षः' असें दीक्षितानी म्हटलें आहे. ठकार या स्पर्श वर्णाचा आभ्यन्तरप्रयत्न 'स्पृष्टं प्रयतनं स्पर्शानाम्' या वचनान्वयें स्पृष्ट असून सकार व षकार या दोन्हीं ऊष्मवर्णांचा आभ्यन्तरप्रयत्न 'विवृतमूष्मणा स्वराणां च' या वचनान्वयें विवृत आहे. त्यामुळें सकाराचा ठकार हा आभ्यन्तरप्रयत्नभेदामुळें अन्तरतम ठरत नसून, षकार हा आभ्यन्तरप्रयत्नसाम्यामुळें 'स्थानेऽन्तरतमः' सू. ३९ या सूत्रान्वयें व तसेच 'यत्रानेकविधमान्तर्यं तत्र स्थानत आन्तर्यं बलीयः' प. १३ या परिभाषान्वयें अन्तरतम्

व बलवत्तर ठरतो व सकाराचे जागी ठकारादेश होण्याची आपत्ति टळते आणि षकारादेशच होतो. आता येथें शकाकार अशी शका करतो की,) 'दधिसेचः' इत्यादि स्थली सुबुत्पत्ति होण्यापूर्वी समास केल्यानें जी षत्वाची प्राप्ति होते तिचे निवारण करण्याकरिता भाष्यकारानी 'सात्पदाद्योः' सू. २१२३ या सूत्रातील 'पदादि' या शब्दाचा 'पदात् आदिः' असा पञ्चमीसमास केला असल्या-मुळे, 'सात्पदाद्योः' या निषेधान्वयें 'रामेषु' या स्थली देखील षत्व न होण्याची आपत्ति येते. ('दधिसेचः' या स्थली 'गतिकार-कोपपदानां कृद्भिः सह समासवचनं प्राक्सुबुत्पत्तेः'-परि. ७६-या परिभाषान्वयें 'सेच्' या कृदन्त प्रातिपदिकाहून सुबुत्पत्ति होण्या-पूर्वी समास केल्यानें 'सेच्' याला पदसज्ञा होत नसल्यामुळें व अशा रीतीनें 'सेच्' यातील सकार पदाचा आदि ठरत नसल्यामुळें, 'सात्पदाद्यो.' या षत्वनिषेधक सूत्रातील 'पदादि' या शब्दाचा 'पदस्य आदिः पदादिः' असा षष्ठीसमास केल्यास ते षत्वनिषेधक-सूत्र पदसज्ञक नसलेल्या 'सेच्' ला लागू पडत नाही व त्यामुळें 'सेध्' यातील आद्य सकाराचे षत्व होण्याची आपत्ति येते. ती आपत्ति टाळण्याकरिता भाष्यकारानी 'न लुमताङ्गस्य' १-१-६३ या सूत्रावरील भाष्यात 'पदात् आदिः पदादिः' असा पञ्चमी-समास केला आहे व 'दधिसेच्' या स्थली 'दधि' या पदाच्या लगेंच पुढें 'सेच्' यातील सकार असल्यामुळे त्या सकाराचे, पञ्चमीसमास मानून, षत्व होणे टाळले आहे. म्हणून भाष्यसमत पञ्चमीसमासपक्ष मानल्यास, 'राम सु = रामेषु' या स्थली 'राम' याला 'स्वादिष्वसर्वनामस्थाने' सू २३० या सूत्रानें पदसज्ञा होत असल्यामुळें आणि 'बहुवचने झल्येत्' सू. २०५ या सूत्रानें 'राम' यातील अन्त्य अकाराचे एत्व केल्यावर 'रामे' याला स्थानिवद्भावानें• पदसज्ञा होत असल्यामुळें व त्या पदाच्या लगेंच पुढें 'सु' प्रत्यया-तील सकार असल्यामुळें, त्या सकाराचे षत्व होऊ शकत नाही व 'रामेषु' असे रूप सिद्ध होऊ शकत नाही असे शकाकाराचे

म्हणणे आहे. या शंकेवर दीक्षित असे उत्तर देतात की,) ही शंका बरोबर नाही; कारण 'स्वादिष्वसर्वनामस्थाने' सू. २३० या सूत्राने जेथे पदसंज्ञा केली जाते तथा ठिकाणी 'सात्पदाद्योः' सू. २१२३ हा निषेध प्रवृत्त होत नाही, म्हणजे लागू पडत नाही, हे त्या सूत्रात केलेल्या 'सात्' या प्रत्ययाच्या ग्रहणाने ज्ञापित होते. ('अग्निसात्' या स्थली 'अग्नि' या पुढे 'सात्' प्रत्यय आला असल्यामुळे 'स्वादिषु' सू. २३० या सूत्राने 'अग्नि' याला पदसंज्ञा होते व त्याच्या लगेच पुढे 'सात्' यातील सकार आल्यामुळे, 'पदादेः' एवढेच जरी सूत्र असले तरी, पञ्चमीसमासपक्षात या उदाहरणात षत्वाचे निवारण होऊ शकतेच व अशा रीतीने त्या सूत्रातील 'सात्' या प्रत्ययाचे ग्रहण व्यर्थ ठरू पाहते. पण त्या सूत्रात 'सात्' ग्रहण मुद्दाम केले असल्यामुळे हे ज्ञापित होते की, जेथे 'सुप्तिङन्तं पदम्' सू. २९ या सूत्राने पदसंज्ञा होत नसून 'स्वादिषु' या सूत्राने पदसंज्ञा होते तेथे वरील षत्वनिषेधक सूत्र प्रवृत्त होत नाही. त्यामुळे 'अग्निसात्' या स्थली 'सात्' यातील सकाराचे षत्व होण्याची जी आपत्ति येत होती ती टाळण्याकरिता त्या सूत्रात 'सात्' या प्रत्ययाचे ग्रहण करावे लागले. 'रामेषु' या स्थली देखील 'रामे' याला वर सांगितल्याप्रमाणे 'स्वादिषु' या सूत्रानेच पदसंज्ञा होत असल्यामुळे, या उदाहरणात देखील 'सात्पदाद्योः' या निषेधक सूत्राची प्रवृत्ति होत नाही व त्यामुळे 'सु' प्रत्ययातील सकाराचे षत्व होऊन 'रामेषु' असे इष्ट रूप सिद्ध होते. 'न लुमताङ्गस्य' सू. १-१-६३ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात–'इह तर्हि दधिसेचौ दधिसेचः सात्पदाद्योरिति पदादिलक्षणः षत्वप्रतिषेधो न प्राप्नोति। मा भूदेव पदस्यादिः पदादिः पदादेरिति। कथं तर्हि?। पदादादिः पदादिः पदादेरित्येवं भविष्यति। नैवं शक्यम्। इहापि प्रसज्येत। ऋक्षु वाक्षु त्वक्षु कुमारीषु किशोरीष्विति। सात् प्रतिषेधो ज्ञापकः स्वादिषु पदत्वेन येषां पदसंज्ञा न तेभ्यः प्रतिषेधो भवतीति।').

व बलवत्तर ठरतो व सकाराचे जागी ठकारादेश होण्याची आपत्ति टळते आणि षकारादेशच होतो आता येथें शकाकार अशी शका करतो की,) 'दधिसेच' इत्यादि स्थली सुबुत्पत्ति होण्यापूर्वी समास केल्यानें जो षत्वाची प्राप्ति होत तिचे निवारण करण्याकरिता भाष्यकारानी 'सात्पदाद्यो' सू. २१२३ या सूत्रातील 'पदादि' या शब्दाचा 'पदात् आदि' असा पञ्चमीसमास केला असल्यामुळें, 'सात्पदाद्यो' या निषेधान्वयें 'रामेषु' या स्थली देखील षत्व न होण्याची आपत्ति येते ('दधिसेच' या स्थली 'गतिकारकोपपदाना कृद्भि सह समासवचन प्राक्सुबुत्पत्ते.'-परि ७६-या परिभाषान्वयें 'सेच्' या कृदन्त प्रातिपदिकाहून सुबुत्पत्ति होण्यापूर्वी समास केल्यानें 'सेच्' याला पदसज्ञा होत नसल्यामुळें व अशा रीतीनें 'सेच्' यातील सकार पदाचा आदि ठरत नसल्यामुळें, 'सात्पदाद्यो' या षत्वनिषेधक सूत्रातील 'पदादि' या शब्दाचा 'पदस्य आदि पदादि' असा षष्ठीसमास केल्यास ते षत्वनिषेधकसूत्र पदसज्ञक नसलेल्या 'सेच्' ला लागू पडत नाही व त्यामुळें 'सेच्' यातील आद्य सकाराच षत्व होण्याची आपत्ति येते ती आपत्ति टाळण्याकरिता भाष्यकारानी 'न लुमताङ्गस्य' १-१-६३ या सूत्रावरील भाष्यात 'पदात् आदि. पदादि' असा पञ्चमीसमास केला आहे व 'दधिसेच्' या स्थली 'दधि' या पदाच्या लगेंच पुढें 'सेच्' यातील सकार असल्यामुळे त्या सकाराचे, पञ्चमीसमास मानून, षत्व होणे टाळले आहे म्हणून भाष्यसमत पञ्चमीसमासपक्ष मानल्यास, 'राम सु = रामेषु' या स्थली 'राम' याला 'स्वादिष्वसर्वनामस्थाने' सू २३० या सूत्रानें पदसज्ञा होत असल्यामुळें आणि 'बहुवचने झल्येत' सू २०५ या सूत्रानें 'राम' यातील अन्त्य अकाराचे एत्व केल्यावर 'रामे' याला स्थानिवद्भावानें पदसज्ञा होत असल्यामुळे व त्या पदाच्या लगेंच पुढें 'सु' प्रत्ययातील सकार असल्यामुळें, त्या सकाराचे षत्व होऊ शकत नाहीं व 'रामेषु' असे रूप सिद्ध होऊ शकत नाही असे शकाकाराचे

स्थली षत्वाचे निवारण करणे अशक्य आहे. व्यपदेशिवद्भावानें 'से' हे तिङन्त मानून ते पद आहे (व त्यामुळें 'से' या पदातील आद्य सकाराचे षत्व होणें 'सात्पदाद्यो' या निषेधान्वयें टाळता येत) हे म्हणणे बरोबर नाही; कारण 'प्रत्ययग्रहणे यस्मात्सविहितस्तदादे'– परि–२३–या परिभाषान्वयें, ज्याहून प्रत्यय झाला आहे अशा तदादि समुदायाचे प्रत्ययग्रहणानें ग्रहण होत असते (शकाकार असं म्हणतो की, 'व्यतिसे'या उदाहरणातील 'से' हें पद नसून केवळ प्रत्यय आहे आणि 'पदादादिः पदादि' हा पञ्चमीसमासपक्ष मानल्यानें जरी 'से' यातील आद्य सकाराचे षत्व टाळता येते तरी, 'पदस्य आदिः पदादिः' हा षष्ठीसमासपक्ष मानल्यास, प्रकृत सूत्रानें गावलेले 'से' यातील सकाराचे षत्व टाळता येत नाही ज्या 'अस्' धातूहून 'से' हा प्रत्यय झाला आहे त्या सपूर्ण 'अस्' प्रकृतीचा 'श्नसोरल्लोप.' सू. २४६९ व 'तासस्त्योर्लोप' सू २१९१ या दोन सूत्रानीं लोप होऊन 'से' एवढाच प्रत्ययरूप भाग अवशिष्ट राहत असल्यामुळें, 'व्यपदेशिवदेकस्मिन्' – परि. ३० – या परिभाषान्वयें 'से' हे तिङन्त आहे व त्यामुळें पदसज्ञक आहे असे मानता येते आणि त्यामुळे षष्ठीसमासपक्षात देखील 'सात्पदाद्यो' हा निषेध येथें लागू पडता आणि 'से' या पदातील आद्य सकाराचे षत्व होत नाही असे कोणी म्हटल्यास, त्यावर शकाकार असें उत्तर देतो की, प्रत्ययग्रहणपरिभाषान्वयें ज्या प्रकृतीहून प्रत्यय झाला आहे त्या प्रकृतिप्रत्ययसमुदायालाच 'सुप्तिङन्त पदम्' सू २९ या सूत्रानें होणारी पदसज्ञा होते. 'व्यतिसे' या उदाहरणात ज्या 'अस्' प्रकृतीहून 'से' हा प्रत्यय झाला आहे ती सपूर्ण प्रकृति नाहीशी होऊन 'से' हा प्रत्ययच अवशिष्ट राहिला असल्यामुळें, अशा अवशिष्ट राहिलेल्या प्रकृतिरहित 'से' प्रत्ययाला पदसज्ञा होऊ शकत नाही.) जर प्रत्ययाला देखील पदसज्ञा होते असे मानले तर 'रामेषु' इत्यादि स्थळीं देखील षत्वाचा निषेध होण्याची आपत्ति येईल, म्हणजे 'सात्पदाद्योः' हा निषेध प्रवृत्त होऊन 'सु'

मनोरमा—यत्त्वाहु. । प्रत्ययविषये नायं निषेध इति ज्ञाप्यत इति । तन्न । व्यतिसे इत्यादौ षत्वापत्तेः । ननु पदस्यादिरिति पक्षे 'व्यतिसे' इत्यत्र षत्वं दुर्वारम् । न च व्यपदेशिवद्भावेन से इत्यस्यापि तिङन्तत्वात्पदत्व शङ्क्यम् । प्रत्ययग्रहणे यस्मात्स विहितस्तदादेरेव ग्रहणात् अन्यथा 'रामेषु' इत्यादावपि षत्वनिषेधापत्तिरिति चेत्सत्यम् । न वय प्रत्ययमात्रस्य तदन्तता ब्रूमः, किंतु प्रकृतिप्रत्ययसमुदाये प्रवृत्ता पदसंज्ञामेकदेशविकृतन्यायेन लुप्तप्रकृतिके प्रत्ययेऽप्यानयामः । 'रामौ' 'रामा' इत्यादावपि हि एकदेशविकृतन्यायेनैव पदत्वम्, एकादेशात्प्रागेव पदसंज्ञाप्रवृत्तेः । न ह्येकादेशे कृते "सुप्तिङन्तम्" इत्यस्य प्राप्तिरस्ति । उभयत आश्रयणे नान्तादिवदिति सिद्धान्तात् ।

यत्तु वदन्ति । प्रकृतिसन्निधाने प्रत्ययस्य पदत्वं नास्ति । "मन्त्रेषु" "सर्वेषाम्" इत्यादिनिर्देशादिति । तन्मन्दम् । उक्तरीत्या पदत्वाभावे न्यायसिद्धे ज्ञापनस्यासम्भवादनुपयोगाच्च ।

प्रकाशकाराचे असे म्हणणे आहे की, 'सात्पदाद्योः' हा निषेध प्रत्ययाच्या विषयात, म्हणजे प्रत्ययातील आद्य सकाराचे षत्व करतेवेळी, लागू पडत नाही हे (त्या सूत्रातील 'सात्' प्रत्ययाच्या ग्रहणानें) ज्ञापित होते. पण हे म्हणणे बरोबर नाही ते म्हणणे बरोबर मानल्यास, 'व्यतिसे' इत्यादि स्थली षत्व होण्याची आपत्ति येते. ('व्यतिसे' या स्थली 'व्यति' हे पद असून त्याच्या लगेच पुढें 'से' हा सकारानें सुरु होणारा प्रत्यय आहे. तो प्रत्यय असल्यामुळें 'सात्पदाद्योः' हा निषेध त्याला लागू पडत नाही असे मानले तर, 'व्यतिषे' असे अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते. म्हणून प्रकाशकाराचे म्हणणे अयोग्य ठरते. आता येथें शंकाकार अशी शंका करतो की,) 'सात्पदाद्योः' या सूत्रातील 'पदादि' या शब्दाचा 'पदस्य आदिः पदादि.' असा जो षष्ठीसमास केला आहे तो षष्ठीसमासपक्ष मानल्यास, 'व्यतिसे' या

प्रत्ययातील सकाराचे षत्व न होण्याची आपत्ति येईल. ('ननु पदस्यादि·· ··· षत्वनिषेधापत्तिः' हा सर्व शकाग्रन्थ आहे या शकेवर दीक्षित असे उत्तर देतात की) शकाकाराचे म्हणणें ठीक आहे, पण आम्ही 'से' या केवळ प्रत्ययाला तिङन्त म्हणत नसून ('अस् से' या प्रकृतिप्रत्ययसमुदायाचे ठिकाणी प्रवृत्त झालेली पदसंज्ञा 'अस्' या प्रकृतीचा लोप होऊन जो 'से' हा प्रत्यय अवशिष्ट राहतो त्या प्रत्ययाचे ठिकाणी एकदेशविकृतन्यायानें आणतो. 'रामौ रामाः' इत्यादि स्थली देखील एकदेशविकृतन्यायानेच पदसंज्ञा होते, कारण एकादेश होण्यापूर्वीच पदसंज्ञा प्रवृत्त होते. एकादेश केल्यावर 'सुप्तिङन्त पदम्' सू २९ या सूत्रानें पदसंज्ञेची प्राप्ति होत नाही, कारण 'उभयत आश्रयणे नान्तादिवत्' असा भाष्यसिद्धान्त आहे ('अस्' या धातूहून 'से' हा प्रत्यय केला असता, 'अस से' या प्रकृतिप्रत्ययसमुदायाला 'सुप्तिङन्त पदम्' सू. २९ या सूत्रानें पदसंज्ञा होते व ती संज्ञा त्या समुदायाला झाल्यावर जरी नंतर पूर्वी सांगितल्याप्रमाणे 'अस्' या प्रकृतीचा लोप होऊन 'से' एवढाच प्रत्ययरूप भाग अवशिष्ट राहतो तरी, 'एकदेशविकृतमनन्यवत्' –परि ३७–या परिभाषान्वयें अवशिष्ट एकदेशविकृत 'से' याला स्थानिवद्भावानें पदसंज्ञा होते, व्यपदेशिवद्भावाने, म्हणजे 'व्यपदेशिवदेकस्मिन्'–परि.३०–या परिभाषान्वयें ती संज्ञा होते असे आमचे मुळीच म्हणणे नाही असे दीक्षित म्हणतात. अशा रीतीनें 'से' हा अवशिष्ट भाग पदसंज्ञक ठरत असल्यामुळें, 'पदस्य आदिः पदादिः असा षष्ठीसमासपक्ष मानला तरी, 'से' या पदातील आद्य सकाराचे, 'सात्पदाद्यो' हें षत्वनिषेधक सूत्र असल्यामुळें, षत्व होत नाही. एकदेशविकृत शब्दस्वरूपाला 'एकदेशविकृतमनन्यवत्' या न्यायाची प्रवृत्ति करून पदसंज्ञा करता येते हे सिद्ध करण्याकरिता दीक्षितांनी मनोरमेंत 'रामौ, रामाः' ही उदाहरणें दिली आहेत. त्यापैकी आपण 'रामौ' हे उदाहरण घेऊ. 'राम' या प्रातिपदिकाहून 'औ' हा प्रत्यय केला

असता, 'राम औ' या प्रकृतिप्रत्यय समुदायाला 'सुप्तिङन्तं पदम्' या सूत्रानें पदसंज्ञा होणें व 'वृद्धिरेचि' या सूत्रानें वृद्धिरूप एकादेश होऊन 'रामौ' असें रूप झालें असता, त्याला ती संज्ञा स्थानिवद्भावानें प्राप्त होतें. 'रामौ' या स्थलीं जो वृद्धिरूप एकादेश झाला आहे तो पूर्वान्तवद्भावानें प्रकृतीचा अवयव मानल्यास, प्रकृतीपुढें प्रत्यय राहत नसल्यामुळें, 'रामौ' याला पदसंज्ञा होऊं शकत नाहीं. 'औ' हा वृद्धिरूप एकादेश परादिवद्भावानें प्रत्यय मानल्यास, 'राम' अशी जी मूळ प्रकृति होती ती तशी न राहता 'राम्' अशी एकदेशविकृत प्रकृति होते व या स्थलीं एकदेशविकृतन्यायाची प्रवृत्ति करून 'राम्' ही एकदेशविकृतप्रकृति 'राम'च आहे असें मानलें तरच 'रामौ' याला पदसंज्ञा होऊं शकते. सारांश 'रामौ' याला कार्यकालपक्षात पदसंज्ञा होण्याकरितां एकदेशविकृतन्यायाचा आश्रय केल्याशिवाय गत्यन्तर नाहीं, कारण 'उभयत्र आश्रयणे नान्तादिवत्' असा भाष्यसिद्धान्त असल्यामुळें, 'औ' या वृद्धिरूप एकादेशाला एकेच वेळीं 'राम' या प्रकृतीचा अन्त्य व 'औ' या प्रत्ययाचा आदि मानतां येत नाहीं.) प्रकाशकार असें म्हणतात कीं, प्रकृतीचें सान्निध्य असतां, म्हणजे ज्या प्रकृतीहून प्रत्यय झाला आहे ती प्रकृति प्रत्ययापूर्वीं विद्यमान असतां, प्रत्ययाला पदसंज्ञा होऊं शकत नाहीं आणि हें 'सन्त्रेषु, सर्वेषाम्' इत्यादि (पाणिनीय) निर्देशावरून सिद्ध होतें. पण हें म्हणणें बरोबर नाहीं, कारण वर सांगितल्याप्रमाणें केवळ प्रत्ययाला प्रत्ययग्रहणपरिभाषान्वयें पदसंज्ञेची प्राप्तीच होत नसल्यामुळें, वरील निर्देश ज्ञापक मानतां येणें असमंजनीय आहे व ते निर्देश ज्ञापक मानले तरी (पूर्वी जें सिद्ध नव्हतें असें काहीं अधिक सिद्ध होत नसल्यामुळें) ते निर्देश ज्ञापक मानून काहींच फायदा नाहीं. ('रामेषु, सन्त्रेषु, सर्वेषाम्' इत्यादि स्थलीं प्रत्ययग्रहणपरिभाषान्वयें परि २३ केवळ प्रत्ययाला पदसंज्ञा होत नसून प्रकृतिप्रत्ययसमुदायालाच ती संज्ञा होत असल्यामुळें, प्रत्ययाला पदसंज्ञा होत नाहीं हें सिद्ध करण्याकरितां पाणिनीय

प्रत्ययातील सकाराचे षत्व न होण्याची आपत्ति येईल. ('ननु पदस्यादि · ··· षत्वनिषेधापत्तिः' हा सर्व शकाग्रन्थ आहे. या शकेवर दीक्षित असे उत्तर देतात की) शकाकाराचे म्हणणें ठीक आहे, पण आम्ही 'से' या केवळ प्रत्ययाला तिङन्त म्हणत नसून ('अस् से' या प्रकृतिप्रत्ययसमुदायाचे ठिकाणी प्रवृत्त झालेली पदसंज्ञा 'अस्' या प्रकृतीचा लोप होऊन जो 'से' हा प्रत्यय अवशिष्ट राहतो त्या प्रत्ययाचे ठिकाणी एकदेशविकृतन्यायानें आणतो. 'रामौ रामा.' इत्यादि स्थली देखील एकदेशविकृतन्यायानेच पदसंज्ञा होते, कारण एकादेश होण्यापूर्वीच पदसंज्ञा प्रवृत्त होते. एकादेश केल्यावर 'सुप्तिङन्तं पदम्' सू २९ या सूत्रानें पदसंज्ञेची प्राप्ति होत नाही, कारण 'उभयत आश्रयणे नान्तादिवत्' असा भाष्यसिद्धान्त आहे ('अस्' या धातूहून 'से' हा प्रत्यय केला असता, 'अस से' या प्रकृतिप्रत्ययसमुदायाला 'सुप्तिङन्तं पदम्' सू २९ या सूत्रानें पदसंज्ञा होते व ती संज्ञा त्या समुदायाला झाल्यावर जरी नतर पूर्वी सांगितल्याप्रमाणे 'अस्' या प्रकृतीचा लोप होऊन 'से' एवढाच प्रत्ययरूप भाग अवशिष्ट राहतो तरी, 'एकदेशविकृतमनन्यवत्' –परि. ३७–या परिभाषान्वयें अवशिष्ट एकदेशविकृत 'से' याला स्थानिवद्भावाने पदसंज्ञा होते, व्यपदेशिवद्भावाने, म्हणजे 'व्यपदेशिवदेकस्मिन्'–परि.३०–या परिभाषान्वयें ती संज्ञा होते असे आमचे मुळीच म्हणणे नाही असे दीक्षित म्हणतात. अशा रीतीनें 'से' हा अवशिष्ट भाग पदसंज्ञक ठरत असल्यामुळें, 'पदस्य आदि. पदादि. असा षष्ठीसमासपक्ष मानला तरी, 'से' या पदातील आद्य सकाराचे, 'सात्पदाद्यो' हे षत्वनिषेधक सूत्र असल्यामुळे, षत्व होत नाही. एकदेशविकृत शब्दस्वरूपाला 'एकदेशविकृतमनन्यवत्' या न्यायाची प्रवृत्ति करून पदसंज्ञा करता येते हे सिद्ध करण्याकरिता दीक्षितानी मनोरमेत 'रामौ, रामा.' ही उदाहरणें दिली आहेत. त्यापैकी आपण 'रामौ' हे उदाहरण घेऊ. 'राम' या प्रातिपदिकाहून 'औ' हा प्रत्यय केला

असता, 'राम औ' या प्रकृतिप्रत्यय समुदायाला 'सुप्तिङन्तं पदम्' या सूत्रानें पदसंज्ञा होते व 'वृद्धिरेचि' या सूत्रानें वृद्धिरूप एकादेश होऊन 'रामौ' असे रूप झाले असता, त्याला ती संज्ञा *स्थानिवद्भावानें प्राप्त होते. 'रामौ' या स्थलीं जो वृद्धिरूप एकादेश* झाला आहे तो पूर्वान्तवद्भावानें प्रकृतीचा अवयव मानल्यास, प्रकृती-पुढें प्रत्यय राहत नसल्यामुळें, 'रामौ' याला पदसंज्ञा होऊं शकत नाहीं. 'औ' हा वृद्धिरूप एकादेश *परादिवद्भावानें प्रत्यय मानल्यास,* 'राम' अशी जी मूळ प्रकृति होती ती तशी न राहता 'राम्' अशी एकदेशविकृत प्रकृति होते व या स्थली एकदेशविकृतन्यायाची प्रवृत्ति करून 'राम्' ही एकदेशविकृतप्रकृति 'राम'च आहे असें मानले तरच 'रामौ' याला पदसंज्ञा होऊं शकते. सारांश 'रामौ' याला कार्यकालपक्षांत पदसंज्ञा होण्याकरिता एकदेशविकृतन्यायाचा आश्रय केल्याशिवाय गत्यन्तर नाहीं, कारण 'उभयत्र आश्रयणे नान्तादिवत्' असा भाष्यसिद्धान्त असल्यामुळें, 'औ' या वृद्धिरूप एकादेशाला एकेच वेळी 'राम' या प्रकृतीचा अन्त्य व 'औ' या प्रत्ययाचा आदि मानता येत नाहीं.) प्रकाशकार असें म्हणतात की, प्रकृतीचें सांनिध्य असता, म्हणजे ज्या प्रकृतीहून प्रत्यय झाला आहे ती प्रकृति प्रत्ययापूर्वीं विद्यमान असता, प्रत्ययाला पदसंज्ञा होऊं शकत नाहीं आणि हें 'मन्त्रेषु, सर्वेषाम्' इत्यादि (पाणिनीय) निर्देशावरून सिद्ध होतें पण हें म्हणणें बरोबर नाहीं, कारण वर सांगितल्याप्रमाणें केवळ प्रत्ययाला प्रत्ययग्रहणपरिभाषान्वयें पद-संज्ञेची प्राप्तीच होत नसल्यामुळें, वरील निर्देश ज्ञापक मानता येणें असंभवनीय आहे व ते निर्देश ज्ञापक मानले तरी (पूर्वीं जें सिद्ध नव्हतें असें काहीं अधिक सिद्ध होत नसल्यामुळें) ते निर्देश ज्ञापक मानून काहींच फायदा नाहीं. ('रामेषु, मन्त्रेषु, सर्वेषाम्' इत्यादि स्थलीं प्रत्ययग्रहणपरिभाषान्वयें परि २३ केवळ प्रत्ययाला पदसंज्ञा होत नसून प्रकृतिप्रत्ययसमुदायालाच ती संज्ञा होत असल्यामुळें, प्रत्ययाला पदसंज्ञा होत नाहीं हें सिद्ध करण्याकरिता पाणिनीय

सूत्रातील निर्देश ज्ञापक देण्याची गरज काय ? जर कोणत्याहि रीतीनें प्रत्ययाला पदसंज्ञेची प्राप्ति असती तर त्या संज्ञेचे निवारण करण्याकरिता ज्ञापक देणे उचित झाले असते सारांश जें पूर्वी सिद्ध नव्हते ते ज्ञापकाच्या आधारे सिद्ध होणे अशी येथें वस्तुस्थिति नसल्यामुळें, प्रत्ययाला पदसंज्ञा होत नाही ही सिद्ध वस्तु सिद्ध करण्याकरिता पाणिनीय निर्देशाचा आधार देण्याची खटपट करणं निरर्थक आहे असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे प्रकाशकारानी ज्या दोन निर्देशाचा आधार दिला आहे ते 'हलि सर्वेषाम्' सू १७१ या सूत्रातील 'सर्वेषाम्' व 'मन्त्रेष्वाङ्यादेरात्मन' सू ३५५४ या सूत्रातील 'मन्त्रेषु' हे निर्देश होत या दोन्ही निर्देशात 'साम्' व 'सु' या दोन्ही प्रत्ययातील सकाराचे पाणिनीनें षत्व केले असल्यामुळें हे ज्ञापित होते की, प्रत्ययाला पदसंज्ञा होत नाही. कारण जर प्रत्ययाला पदसंज्ञा झाली असती तर वरील दोन्ही निर्देशात सकार हा पदाचा आद्य अवयव मानला जाऊ शकला असता व त्यामुळे 'सात्पदाद्यो' या निषेधक सूत्रान्वयें षत्व होऊ शकले नसते असा प्रकाशकाराच्या म्हणण्याचा आशय आहे यावर दीक्षितानी जें उत्तर दिले आहे त्याचे विवरण वर केलेच आहे )

शब्दरत्न— विषयभेदादिति । तन्त्रेण षष्ठीद्वयोच्चारणात् आदेशरूपसस्य स्थाने प्रत्ययावयवसस्य स्थाने च षो भवतीत्येवरूप षष्ठीभेद इत्यर्थ । ओससबन्धद्वयार्थक इत्यभिमान । तिसृणामिति । तिस्त्रादेशे सकारोच्चारणन्तु तिस्र इत्यत्र "नरपर" इति षत्वनिषेधे चरितार्थमिति भाव । ठकारेऽतिप्रसङ्गादिति । "सोष्मण. सोष्माण इति द्वितीया" इति "स्थानेऽन्तरतम-" सूत्रस्थभाष्येण तस्यापि सोष्मत्वबोधनात् । सोष्मण इत्यस्योष्मत्वसहितस्येत्यर्थ. । अत्रार्थे ऋप्यन्तरसवादमप्याह-तथा चेति ।

'एकाऽपि षष्ठी विषयभेदाद्भिद्यते' असे जें मनोरमेंत म्हटले त्याचा भावार्थ हा आहे की, तन्त्रानें 'आदेशस्य' व 'प्रत्ययस्य' या

दोन षष्ठीचे उच्चारण केल्यानें, आदेशरूप सकाराचे जागी व प्रत्ययाचा जो अवयव सकार त्याचे जागी षकार होतो असा अर्थ होऊन षष्ठीचे दोन भिन्न अर्थ होतात. ('आदेशप्रत्यययो.' या द्वन्द्वसमासात 'आदेश' व 'प्रत्यय' या दोन शब्दांच्या षष्ठीचे भिन्न संबंधरूप अर्थ होत असल्यामुळें, त्या दोन शब्दांपैकी प्रत्येक शब्दाहून 'ङस्' प्रत्यय करून 'आदेशस्य' व 'प्रत्ययस्य' अशी दोन षष्ठीची पृथक् पदें उच्चारावयास पाहिजे होतीं व इतरेतरयोगद्वन्द्व करावयास नको होता. पण पाणिनीनें प्रकृत सूत्रात 'आदेशप्रत्यययो.' असा द्वन्द्वसमासनिर्देश केला असल्यामुळें व त्या द्विवचनान्त सामासिक पदाच्या अन्तीं दोन 'ङस्' प्रत्यय उच्चारणे अशक्य असल्यामुळें, 'ओस्' हा षष्ठीच्या द्विवचनाचा एकच प्रत्यय उच्चारला आहे व त्या 'ओस्' प्रत्ययानें दोन 'ङस्' प्रत्ययाच्या अर्थांचा, म्हणजे अभेदसंबंध व अवयवावयविभावसंबंध या दोन भिन्न संबंधांचा, बोध केला आहे असे तन्त्रानें मानता येते. याचा अर्थ हाच की, 'आदेशस्य सस्य षो भवति, प्रत्ययावयवस्य सस्य च षो भवति' अशी दोन भिन्न वाक्यें तयार करून प्रकृत सूत्राचा अर्थ करावा.) सारांश 'आदेशप्रत्यययो.' यातील 'ओस्' हा प्रत्यय दोन भिन्न प्रकारच्या संबंधाचा बोधक आहे असें मानून दीक्षितांनी प्रकृत सूत्राचा अर्थ केला आहे. (या पक्तींत 'इत्यभिमान.' ही अरुचिप्रदर्शक पदें घातली असल्यामुळें हें स्पष्ट होतें की, दीक्षितांचे म्हणणे शब्दरत्नकाराना मान्य नाही व त्याचे कारण 'प्रत्ययमात्रे तन्त्रेणोच्चारण लोके न दृष्टम्' असें भैरवीत दिले आहे व 'वस्तुतस्तु उभयोरपि अभेदेनैवान्वयः, प्रत्ययपद च प्रत्ययावयवपरमिति नात्र षष्ठीभेदाश्रयणम्। लोपे प्रत्ययलक्षणमित्येव सिद्धे प्रत्ययग्रहणेन प्रत्ययपदस्य प्रत्ययावयवपरत्वबोधनात्।' असे सरलेत म्हटले आहे. प्रकृत सूत्रावरील शब्देन्दुशेखरात देखील 'प्रत्ययशब्दस्तदवयवपरो व्याख्यानात्, सातेः पत्वनिषेधाल्लिङ्गाच्च।' असेच म्हटले आहे. सारांश 'आदेशप्रत्यययो:' या सामासिक

पदातील ' प्रत्यय ' हा शब्द ' प्रत्ययावयव ' या अर्थाचा वाचक आहे असे मानले असता, ' आदेशस्य ' व ' प्रत्ययस्य ' या दोन्ही षष्ठीचा 'स.' या अनुवृत्त पदाशी अभेदरूपसंबंधानें सारखाच अन्वय होत असल्यामुळें, येथे सहविवक्षा आहे हे सिद्ध होते व त्यामुळें इतरेतर-योगद्वन्द्व होण्यात कोणतीहि अडचण येत नाही आणि सौत्र प्रयोग मानून कशी तरी उपपत्ति लावण्याची काहीच आवश्यकता राहत नाही असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.) 'त्रिचतुरोः स्त्रियां तिसृचतसृ' सू. २९८ या सूत्रात 'तिसृ' या आदेशामध्यें जें सकाराचे उच्चारण केले आहे तें 'तिस्रः' या स्थली 'न रपर' सू. ३१६८ या सूत्रानें होणारा षत्वनिषेध व्हावा याकरिता केले असल्यामुळें चरितार्थ ठरते. (आदेशप्रत्यययो ' या सूत्रातील 'आदेशस्य' ही अवयवषष्ठी मानल्यास 'तिसृणाम्' या स्थली 'तिसृ' या आदेशाचा अवयव जो सकार त्याचे षत्व होण्याची आपत्ति येते असे जे दीक्षितानी मनोरमेंत म्हटले आहे त्यावर शकाकार असे म्हणतो की, 'त्रिचतुरो.' सू. २९८ या सूत्रात 'तिषृ' असा आदेश पठित न करिता पाणिनीनें 'तिसृ' असा सकारयुक्त आदेश मुद्दाम पठित केला असल्यामुळें, त्या आदेशपाठाच्या सामर्थ्यानेंच 'तिसृणाम्' या स्थली षत्व होण्याची आपत्ति येत नाही या शकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, 'त्रि' चे जागी 'तिसृ' असा जो आदेश होणें सांगितले आहे तो अशाकरिता की, 'तिस्रः' या स्थली रेफपरक सकाराचे 'न रपर' या षत्वनिषेधक सूत्रान्वयें षत्व होणे टळावे. 'त्रिचतुरो.' या सूत्रात 'तिषृ' असा आदेश पठित केला असता तर, 'न रपर' हा निषेध लागू पडला नसता व 'तिष्रः' असे अनिष्ट रूप होण्याची आपत्ति आली असती. अशा रीतीनें 'तिसृ' असा आदेश पठित करणे चरितार्थ ठरत असल्यामुळें, त्या आदेशपाठाच्या सामर्थ्यानें 'तिसृणाम्' या स्थली षत्व होत नाही हे शकाकाराचे म्हणणे चूक ठरत.) 'ठकारेऽतिप्रसङ्गात्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचे कारण हे की, 'स्थानेऽन्तरतमः'

सू. १-१-५० या सूत्रावरील भाष्यात "सोष्माणः सोष्मणः इति द्वितीयाः' असे म्हटले असल्यामुळें, टवर्गातील ठकार हा द्वितीय वर्ण देखील सोष्म ठरतो. (त्या भाष्यात भाष्यकारानी असा प्रश्न केला आहे की, 'स्थानेऽन्तरतमः' या सूत्रात 'तमप्' ग्रहण का केले आहे व त्या प्रश्नाचे असे उत्तर दिले आहे की, झयो होऽ' न्यतरस्याम्' सू. ११९ या सूत्रानें हकाराचे जागी पूर्वसवर्ण आदेश होणें सागितले असल्यामुळें व हकार हा ऊष्म वर्ण असून वर्गातील दुसरा वर्ण ऊष्म असल्यामुळें आणि तसेच हकाराचा 'नाद' हा बाह्य यत्न असून वर्गातील तृतीय वर्णाचा 'नाद' हाच बाह्ययत्न असल्यामुळें, वर्गातील दुसरा व तिसरा वर्ण हे भिन्न भिन्न प्रकारे हकाराची समान ठरतात आणि म्हणून त्याची प्राप्ति होते. परतु वर्गातील द्वितीय व तृतीय वर्णापेक्षा चतुर्थ वर्ण हा अन्तरतम – अत्यन्त सदृश – आहे; कारण तो ऊष्म वर्ण असून त्याचा 'नाद' हाच बाह्य यत्न आहे आणि म्हणून हकाराचे जागीं आन्तरतम्यानें 'वाक् हरि.' या स्थली चवथा वर्ण घकार होतो. त्याचप्रमाणे 'रामेषु' इत्यादि स्थलीं, मनोरमेंत सागितल्याप्रमाणे, सकाराचे जागी ठकार न होता' आन्तरतम्यानें षकारच होतो. ) मनोरमेंतील 'सोष्मण' 'या पदाचा 'ऊष्मत्वसहितस्य' असा अर्थ आहे. ( 'शषसहा उष्माण.' या वचनान्वयें हकार हा ऊष्मवर्ण असल्यामुळें व प्रत्येक वर्गातील द्वितीय व चतुर्थ वर्ण हकारयुक्त असल्यामुळें, ते द्वितीय व चतुर्थ वर्ण सोष्म–ऊष्मवर्णयुक्त–ठरतात हे स्पष्ट होतें ) प्रत्येक वर्गातील द्वितीय व चतुर्थ वर्ण सोष्म असतात हे सिद्ध करण्याकरिता दीक्षितानी मनोरमेंत 'वर्गे वर्गे प्रथमावघोषौ' ही आश्वलायनऋषिप्रणीत प्रातिशाख्यातील कारिका पठित केली आहे.

शब्दरत्न–प्राक् सुबुत्पत्तेरिति । सोपपदात्क्विर्वर्जिति भावः । केवलात्क्विर्वाचि दम्न. सेवाविति समासे तु "उत्तरपदत्वे च" इत्यस्य "अपदादिविधौ" इति निषेधेन प्रत्ययलक्षणेन पदत्वसत्त्वात्पदस्यादिरिति पदेऽपि सिद्धिरिति भावः । यद्यपि कैयटेन सोपपदात्क्विर्वर्जेव नाननियानादित्युक्तं, तथापि "यचि भम्"

इत्यत्र "सुप्तिङन्तम्" इत्यतः "सुब्" इत्यनुवर्त्य यजादौ असर्वनामस्थाने तत्प्रकृतेर्भसंज्ञा भवति, यजाद्यसर्वनामस्थानपरं सुबन्त यद्यस्ति तदपि भसंज्ञम्, तेन सुवाचेत्यादौ न कुत्वम् । अत्र तत्प्रकृतेः संज्ञा प्रधानशिष्टा अवयवसुबन्तस्य त्वन्वाचयशिष्टा । एवं "स्वादिषु" इति योगं विभज्य स्वादिषु पूर्वस्य पदत्वं विधाय "असर्वनामस्थाने" इत्यत्र सुबन्तमित्यनुवर्त्य "यचि" इत्यपकृष्य प्रसज्यप्रतिषेधमाश्रित्य यजादौ सर्वनामस्थाने परत पूर्वं पद न, तत्परं यदि सुबन्तमस्ति तदपि पदं नेत्यर्थः । सुबन्तं च यजादिप्रत्ययाव्यवहितमेवबातो राजपुरुषादौ पूर्वपदे नलोपादिसिद्धिः । तत्र समुदायस्य "स्वादिषु" इति प्राप्ता, अवयवस्य सुबन्तमिति प्राप्ता, श्रूयमाणे सौ पूर्वपदस्य सञ्ज्ञेत्यर्थं, तेन सुवाचावित्यादिसिद्धिरित्येवम् "उत्तरपदत्वे च" इत्यस्य प्रत्याख्याने दध्नः सेचाविति षष्ठीतत्पुरुषेऽपि पदत्वनिषेधाय पञ्चमीसमास आवश्यक इत्यनभिधाने न मानमिति तात्पर्यम् । प्रत्याख्याने पञ्चमीसमासे बहुसेचावित्याद्यर्थं बहुच्पूर्वस्य पदत्वं नेति वचन कार्यं, वार्तिकारम्भे तत्रैव कुत्ववारणाय "बहुच्पूर्वस्य चापदाविविधौ न" इतिवत् । इदमपि योगविभागस्येष्टसिद्ध्यर्थतया यत्रोत्तरपदस्य कार्यित्व तद्विषय एव, पदान्तत्वप्रयुक्तकार्ये एव च बोद्धयमित्यन्यत्र विस्तरः । या पदसंज्ञेति । न च राजपुरुषेष्वित्यत्र दोषः, अन्तर्वर्तिविभक्त्या सुबन्तमिति पदत्वमाश्रित्य निषेधापत्तेरिति वाच्यम्, सातिग्रहणेन "स्वादिषु" इति यस्य पदसंज्ञा तदुत्तरस्य पदत्वनिषेधो नेति ज्ञाप्यते इति तात्पर्यात् । प्रत्याख्यानरीत्या तस्यापि "स्वादिषु" इति पदत्वाच्च । सर्वं चेद "न लुमता–" इति सूत्रे भाष्ये स्पष्टम् ।

'दधिसेच इत्यादौ प्राक्सुबुत्पत्तेः समासे' असे जें मनोरमेंतील टीकाग्रन्थात म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, ('दधिसेचः' हा उपपदसमास असून या स्थली ) सोपपद 'सिच्' धातूहून 'विच्' प्रत्यय झाला आहे. केवळ 'सिच्' धातूहून 'विच्' प्रत्यय केल्यास, 'दध्न. सेचौ दधिसेचौ' या समासात, 'पदस्य आदि. पदादि' हा षष्ठी-

समासपक्ष मानला तरी देखील, इष्ट रूपाची सिद्धि होते, म्हणजे पत्व होण्याची आपत्ति टळते, कारण 'उत्तरपदत्वे चापदादिविधौ' या वार्तिकात 'अपदादिविधौ' हा निषेध असल्यामुळें, त्या निषेधान्वयें 'सेचौ' या समासातील उत्तर पदाला प्रत्ययलक्षणानें पदसंज्ञा होते. ('अन्येभ्योऽपि दृश्यन्ते' सू. २९८० या सूत्रानें केवळ 'सिच्' धातूहून 'विच्' प्रत्यय केल्यास, 'पुगन्तलघूपधस्य च' सू. २१८९ या सूत्रानें उपधेतील इकाराचा गुण होऊन 'सेच्' असे विच्प्रत्ययान्त रूप होते. 'दध्नः सेचौ = दधि ङस् सेच् औ औ' या स्थली 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू. ६५०या सूत्रानें जरी 'ङस्' व 'औ' या दोन अन्तर्वर्तिविभक्ति-प्रत्ययाचा लुक् होतो तरी, 'औ' हा लुप्त प्रत्यय कायम असं आहे 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' सू २६२या सूत्रानें मानल्यानें, 'सेच्' ला पदसंज्ञा होते व या उत्तर पदातील आद्य सकाराचे पत्व करणे असल्यामुळें, म्हणजेच उत्तरपदादिविधि करणे असल्यामुळें 'उत्तर-पदत्वे चापदादिविधौ'–सू. ४४२ वरील वार्तिक–हें निषेधक वार्तिक आड येत नाहीं. मागें सांगितल्याप्रमाणे या वार्तिकाचा असा अर्थ आहे की, 'समासे उत्तरखण्डस्य पदसंज्ञाया कर्तव्यामन्तर्वर्तिविभक्ति-लोपे प्रत्ययलक्षणप्रतिषेधो वक्तव्य , पदादिविधिं वर्जयित्वा.' असा रीतीनें 'सेच्' हे पदसंज्ञक ठरत असल्यामुळें, 'पदस्य आदिः पदादिः' असा षष्ठीसमासपक्ष मानला तरी, 'सात्पदाद्योः' सू २१२३ या निषेधक सूत्रान्वयें 'सेच्' या उत्तरपदातील आद्य सकाराचे षत्व होत नाही. दीक्षितांनी 'दधिसेचौ' या स्थली षष्ठीसमास न मानता 'दधि सिञ्चत इति दधिसेचौ' असा जो उपपदसमास मानला आहे त्याचे कारण हें कीं, त्यान्चा मते सोपपद 'सिच्' धातूहूनच 'विच्' प्रत्यय होतो. त्यामुळें 'दधिसेचौ" हा उपपद समास मानल्याशिवाय 'सिच्' धातूहून 'विच्' प्रत्यय होऊ शकत नाही आणि 'गतिकारकोपपदाना कृद्भिः सह समासवचनं प्राक् सुबुत्पत्ते.' –परि. ७६ – या परिभाषान्वयें कृदन्ताहून सुबुत्पत्ति

होण्यापूर्वी उपपदसमास होत असल्यामुळें, 'सेच्' या कृदन्ताला पदसंज्ञा होऊ शकत नाही आणि म्हणूनच 'पदादादि पदादि' हा पञ्चमीसमासपक्ष मानून दीक्षितानी 'दधिसेचौ' या स्थली षत्वाचें निवारण केलें आहे पण कैयटाचे म्हणणे दीक्षिताच्या म्हणण्याविरुद्ध असल्यामुळें, शब्दरत्नकार कैयटमताचा उपन्यास करून त्या मताचे खण्डन करण्याकरिता पुढील पंक्ति लिहितात.) जरी कैयटानें असे म्हटलें आहे की, सोपपद 'सिच्' धातूहून 'विच्' प्रत्यय होण्याचें अभिधान नसल्यामुळें, म्हणजे कोठेंहि सांगितलें नसल्यामुळें, सोपपद 'सिच्' धातूहून 'विच्' प्रत्यय होऊच शकत नाही तरी, तसं अभिधान नाही असे म्हणण्यास काहीच प्रमाण नसल्यामुळें, कैयटाचे म्हणणे बरोबर आहे असं मानता येत नाही (या पक्तीतील 'तथापि' या पदाचा 'अनभिधाने न मानम्' या वरेच पुढें असणाऱ्या पदाशी अन्वय होत असल्यामुळें, वर प्रमाणें या पक्तीचा अर्थ केला आहे 'न लुमताङ्गस्य' १-१-६३ या सूत्रावराल भाष्यात 'अपदादिविधाविति किमर्थम् ? । दधिसेचौ दधिसेच — सात्पदाद्योरिति प्रतिषेधो यथा स्यात्' असे जें भाष्यकारानी म्हटलें आहे त्यातील दधिसेचाविति' हें प्रतीक घेऊन कैयटानें 'दध्न सेचाविति षष्ठीसमास । उपपदसमासे तु प्राक् सुबुत्पत्तेः समासविधानात् सेच्शब्दस्य पदसंज्ञाया अभावात् पदादित्व सकारस्य न स्यात् । अनभिधानाच्च सोपपदाद्विजभावात् दधिषेचावित्यादिप्रयोगाभावात् ।' असे व्याख्यान केलें आहे या कैयटपक्तीत 'अनभिधानाच्च' इत्यादि जें म्हटलें आहे तसं म्हणण्यास वास्तविक काही प्रमाण नाही हें सिद्ध करण्याकरिता शब्दरत्नकार पुढील पंक्ति लिहितात )
'यचि भम्' सू २३१ या सूत्रात 'सुप्तिङन्तं पदम्' या पूर्व सूत्रातून 'सुप्' या पदाची अनुवृत्ति केल्यानें (व त्या अनुवृत्त 'सुप्' शब्दाचा प्रत्ययग्रहणपरिभाषान्वयें 'सुबन्तम्' असा अर्थ होत असल्यामुळें, 'यचि भम्' या सूत्राचा असा अर्थ होतो कीं,) यकारादि किंवा अजादि असर्वनामस्थानप्रत्यय पुढें असता, त्या

प्रत्ययाच्या प्रकृतीला–अङ्गाला–भसंज्ञा होते आणि तसेंच तशा यजादि असर्वनामस्थानप्रत्ययापूर्वी 'सुप् = सुबन्त' असल्यास, त्या सुबन्ताला देखील भसंज्ञा होते. अशा त्या सूत्राचा अर्थ केल्याने, 'सुवाचा' इत्यादि स्थलीं कुत्व होत नाहीं. ('सुष्ठु वाक् यस्य सः सुवाक् तेन सुवाचा = सु वाच् सु टा' या स्थलीं 'सुपो धातुप्राति-पदिकयोः' सू ६५० या सूत्रानें 'वाच्' पुढें असणाऱ्या 'सु' या अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाचा जरी लुक् होतो तरी, त्याला प्रत्ययलक्षणानें पदसंज्ञा केल्यास, 'चो. कु' सू ३७८ या सूत्रानें 'वाच्' यातील चकाराचें कुत्व होऊन, 'सुवाचा' असें इष्ट रूप न होता, 'सुवाका' असें अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते. ती आपत्ति टाळण्याकरिताच 'उत्तरपदत्वे चापदादिविधौ' हें वार्तिक पठित केलें आहे. 'सुवाचा' या स्थलीं 'वाच्' या उत्तरपदाच्या आद्य वर्णाला कार्य करणें नसून 'च्' या अन्त्य वर्णाला कार्य करणें असल्यामुळें, म्हणजेच येथें पदादिविधि करणें नसून पदान्तविधि करणें असल्यामुळें, वरील वार्तिकान्वयें 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' या सूत्राची प्रवृत्ति होऊं शकत नाहीं व त्यामुळें 'वाच्' या उत्तर पदाला पदसंज्ञा होऊं शकत नाहीं आणि अशा रीतीनें 'वाच्' यातील चकाराचें कुत्व होण्याची आपत्ति टळते. परंतु 'यचि भम्' या सूत्राचा जसा वर अर्थ केला आहे त्या अर्थान्वयें देखील 'सुवाच्' यातील 'वाच् सु' या सुबन्ताला, त्याच्या पुढें 'टा = आ' हा अजादि असर्वनामस्थानप्रत्यय असल्यामुळें, भसंज्ञा होते आणि अशा रीतीनें त्याला पदसंज्ञा होत नसल्यामुळें, वरील वार्तिक न मानलें तरी, 'वाच्' यातील अन्त्य चकाराचें कुत्व होण्याची आपत्ति टळते)

'यचि भम्' या सूत्रानें दोन ठिकाणीं भसंज्ञा होते असें जें वर सांगितलें आहे त्यांपैकीं यजादि असर्वनामस्थानप्रत्ययाच्या प्रकृतीला होणारी भसंज्ञा प्राधान्यानें उपदिष्ट असलेली संज्ञा असून सुबन्त अवयवाला जी भसंज्ञा होणें सांगितली आहे ती अन्वाचयशिष्टा, अनुषङ्गानें होणारी संज्ञा, होय. ('सु वाच् सु टा' या स्थलीं 'टा' प्रत्ययाची 'सुवाच्'

ही जी प्रकृति आहे त्या प्रकृतीला 'यचि भम्' या सूत्रानें भसंज्ञा होणे हे प्राधान्येंकरून सांगितले आहे व ती संज्ञा करिताना त्या अङ्गात अन्तर्भूत असलेल्या 'वाच् सु' या सुबन्तापुढें 'टा' प्रत्यय आला असल्यामुळें, त्या सुबन्ताला होणारी भसंज्ञा ही केवळ अनुषगानें होणारी संज्ञा आहे असे म्हटले आहे.) याचप्रमाणे स्वादिष्वसर्वनामस्थाने' सू. २३० या सूत्राचा 'स्वादिषु' व 'असर्वनामस्थाने' असा योगविभाग केल्यानें, 'स्वादिषु' (या भागात 'सुप्तिङन्तं पदम्' या पूर्वसूत्रातून 'पदम्' हे पद अनुवृत्त होत असून 'स्वादिषु पदम्' असे हें सूत्र होत असल्यामुळें) या पूर्व भागाचा, 'सु' इत्यादि प्रत्यय पुढें असता त्याच्या प्रकृतीला पदसंज्ञा होते, असा अर्थ होतो. 'असर्वनामस्थानें' या द्वितीय भागात ('सुप्तिङन्तं पदम्' या पूर्व सूत्रातून 'सुप्' ची, म्हणजेच) 'सुबन्तम्' या पदाची अनुवृत्ति केल्यानें व 'यचि भम्' या उत्तर सूत्रातून 'यचि' या पदाचे अपकर्षण केल्याने आणि 'असर्वनामस्थाने' हा (पर्युदास न मानता) प्रसज्यप्रतिपेध मानल्यानें, 'असर्वनामस्थाने' या द्वितीय भागाचा असा अर्थ होतो की, यकारादि किंवा अजादि सर्वनामस्थानप्रत्यय पुढें असता त्याच्या प्रकृतीला पदसंज्ञा होत नाही व तशा प्रत्ययापूर्वी सुबन्त असल्यास त्या सुबन्ताला देखील पदसंज्ञा होत नाही. ('सुडनपुंसकस्य' सू. २२९ या सूत्रान्वयें 'सु, औ, जस्, अम् औट्' या पुल्लिङ्ग किंवा स्त्रीलिङ्ग प्रकृतीहून होणाऱ्या पाच प्रत्ययांना सर्वनामस्थानसंज्ञा होते. 'स्वादिष्वसर्वनामस्थाने' या सूत्राचा वरप्रमाणे योगविभाग करून जसा वर अर्थ केला आहे त्या अर्थान्वयें, 'सु' हा सर्वनामस्थान-प्रत्यय पुढें असता त्याच्या प्रकृतीला पदसंज्ञा होते, पण 'औ, जस्, अम्, औट्' हे चार अजादि सर्वनामस्थानप्रत्यय पुढें असता त्याच्या प्रकृतीला पदसंज्ञा होत नाही, आणि तसेच त्याच्या लगेच पूर्वी असलेल्या सुबन्ताला देखील पदसंज्ञा होत नाही.) 'असर्वनामस्थाने' या द्वितीय भागानें ज्या सुबन्ताला पदसंज्ञा न

होणे सांगितले आहे ते सुबन्त यजादि सर्वनामस्थानप्रत्ययाच्या लगेच पूर्वी असले पाहिजे, व असा अर्थ केल्यानें 'राजपुरुषौ' इत्यादि स्थली पूर्वपदातील नकाराचा लोप होणे इत्यादि कार्यांची सिद्धि होते. ('राजन् ङस् पुरुष औ औ' या स्थलीं 'औ' हा अजादि सर्वनामस्थानप्रत्यय पुढें असल्यामुळें, त्याच्या प्रकृतीला, म्हणजे 'राजन् ङस् पुरुष औ' या प्रकृतीला, वरील अर्थान्वियें पदसंज्ञा होत नाही आणि त्याचप्रमाणें त्या अजादि सर्वनामस्थानप्रत्ययाच्या लगेच पूर्वी असलेल्या 'पुरुष औ' या अन्तर्भूत सुबन्ताला देखील, 'औ' या अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाचा लुक् झाल्यावर प्रत्ययलक्षणानें होणारी, पदसंज्ञा होत नाहीं. पण 'राजन् ङस्' हा समासातील पूर्व अवयव त्या अजादिसर्वनामस्थान 'औ' प्रत्ययाच्या लगेच पूर्वी नसल्यामुळें, त्याला 'ङस्' प्रत्ययाचा लुक् झाल्यावर प्रत्ययलक्षणानें पदसंज्ञा होतेच, आणि त्यामुळें 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' सू. २३६ या सूत्रानें 'राजन्' या पूर्व पदातील अन्त्य नकाराचा लोप होऊन 'राजपुरुषौ' असें इष्ट रूप सिद्ध होतें.) अशा रीतीनें योग विभाग करून ज्याप्रमाणें वर अर्थ केला आहे त्या अर्थान्वियें प्रथमेच्या एकवचनाचा 'सु' हा प्रत्यय (जरी सर्वनामस्थानप्रत्यय आहे तरी तो यजादि नसल्यामुळें) पुढें असतां, त्याच्या समुदायरूप प्रकृतीला 'स्वादिषु' या भागानें जो पदसंज्ञा प्राप्त होते व त्या 'सु' प्रत्ययाच्या लगेच पूर्वी समुदायांत सुबन्त अवयव असल्यास त्या सुबन्त अवयवाला ('असर्वनामस्थानें' या भागानें) जी पदसंज्ञा प्राप्त होते तशी संज्ञा होणे इष्टच आहे. ('स्वादिष्वसर्वनामस्थाने' या सूत्राचा योगविभाग न केल्यास, 'सु' हा सर्वनामस्थानप्रत्यय पुढें असताना त्याच्या प्रकृतीला पदसंज्ञा होऊ शकत नाहीं. पण योगविभाग केल्यानें, 'सु' हा यजादि प्रत्यय नसल्यामुळें, जरी तो सर्वनामस्थानप्रत्यय आहे तरी, त्याच्या प्रकृतीला पदसंज्ञा होऊन, व तशी संज्ञा होणें इष्ट आहे असे म्हणण्याचें कारण हें कीं, 'सावित्ति पदम्' असे भाष्यांत ठिकठिकाणीं म्हटलें आहे.) अशा

रीतीनें 'सुवाचौ' इत्यादि रूपाची सिद्धि होते. ('सुष्ठु वाक् ययोः तौ सुवाचौ = सु वाच् सु औ' या स्थली 'औ' हा अजादि सर्वनामस्थानप्रत्यय पुढें असल्यामुळें जशी त्या प्रत्ययाच्या 'सुवाच्' या समुदायरूप प्रकृतीला पदसंज्ञा होत नाही त्याचप्रमाणें त्या 'औ' प्रत्ययाच्या लगेंच पूर्वी असलेल्या 'वाच्' या समुदायान्तर्भूत सुबन्ताला, 'सु' या अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाचा लुक् झाल्यावर प्रत्ययलक्षणानें प्राप्त होणारी, पदसंज्ञा होत नाही व अशा रीतीनें 'वाच्' हें पदसंज्ञक ठरत नसल्यामुळें, 'चो कुः' सू ३७८ या सूत्रानें पदान्ती असलेल्या चवर्गाचे होणारे कुत्व न होता, 'सुवाचौ' हे इष्ट रूप सिद्ध होते.) अशा रीतीनें 'उत्तरपदत्वे चापदादिविधौ' हें वार्तिक अनावश्यक ठरत असल्यामुळें त्या वार्तिकाचें प्रत्याख्यान केल्यास, 'दध्न सेचौ दधिसेचौ' या षष्ठीतत्पुरुषसमासात देखील षत्व न व्हावे याकरिता 'सात्पदाद्योः' सू. २१२३ या सूत्रातील 'पदादि' या शब्दाचा पञ्चमीसमास मानणे आवश्यक आहे. ('दध्नः सेचौ = दधि ङस् सेच् औ औ' या स्थली 'औ' हा सर्वनामस्थान अजादि प्रत्यय पुढें असल्यामुळें, वर जसा 'स्वादिषु' सू. २३० या सूत्राचा योगविभाग करून अर्थ केला आहे त्या अर्थान्वयें, 'दधिसेच्' या समुदायाला पदसंज्ञा होत नाहीं व त्याचप्रमाणे त्या प्रत्ययाच्या लगेंच पूर्वी असलेल्या 'सेच् औ' या अन्तर्भूत सुबन्ताला, 'औ' प्रत्ययाचा लुक् झाल्यावर प्रत्ययलक्षणानें प्राप्त होणारी पदसंज्ञा होत नाही त्यामुळें 'सात्पदाद्योः' या सूत्रातील 'पदादि' या शब्दाचा 'पदस्य आदिः' असा षष्ठीतत्पुरुष समास केल्यास, 'सेच्' हे वर सांगितल्याप्रमाणे पदसंज्ञक ठरत नसल्यामुळें, त्या षत्वनिषेधक सूत्राची प्रवृत्ति येथें होऊ शकत नाही आणि 'सेच्' यातील आद्य सकाराचे षत्व होण्याची आपत्ति येते ती आपत्ति टाळण्याकरिता 'सात्पदाद्योः' या सूत्रातील 'पदादि' या शब्दाचा 'पदात् आदिः पदादिः' असा पञ्चमीसमास करणे आवश्यक आहे. तसा समास केला असता, 'औ' या अजादि

सर्वनामस्थान प्रत्ययाच्या लगेच पूर्वी 'दधि ङस्' हे सुबन्त नसल्यामुळें, 'ङस्' या अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाचा लुक् झाल्यावर 'दधि' या शब्दाला प्रत्ययलक्षणानें प्राप्त होणारी पदसंज्ञा कायम राहतेच व त्या 'दधि' पदाच्या लगेच पुढें 'सेच्' यातील सकार असल्यामुळें, त्या सकाराचे षत्व होण्याची आपत्ति टळते. अशा रीतीनें 'दधिसेचौ' इत्यादि स्थली 'सेच्' याला पदसंज्ञा होत नसली तरी देखील षत्वाचे निवारण होऊ शकत असल्यामुळें,) 'सोपपदात् सिचेर्विजेव न, अनभिधानात्' असं जें कैयटानें म्हटलें आहे तें बरोबर आहे असें मानता येत नाहीं असा वरील विवेचनाचा तात्पर्यार्थ आहे (कैयटानें वरप्रमाणें जें म्हटलें आहे त्याचें कारण हें कीं, 'दधिसेचौ' या स्थली उपपदसमास केल्यास, तो समास 'गतिकारकोपपदानाम्' — परि. ७२ — या परिभाषान्वयें 'सेच्' या कृदन्ताहून सुबुत्पत्ति होण्यापूर्वी होत असल्यामुळें, 'सेच्' याला पदसंज्ञा होऊ शकत नाही व त्यामुळें 'सात्पदाद्योः' या सूत्रातील 'पदादि' या शब्दाचा 'पदस्य आदि पदादिः' असा षष्ठीसमास त्याच्या मतें मानणेंच उचित असल्यामुळें, 'सेच्' यातील सकाराचें प्रकृत सूत्रानें षत्व होण्याची आपत्ति येते. ती आपत्ति कैयटाच्या मतें टाळणें अशक्य असल्यामुळें, कैयटानें 'सोपपदात् सिचेर्विजेव न, अनभिधानात्' असें म्हटलें आहे दुसरें असें की, 'अन्येभ्योऽपि दृश्यन्ते' सू. २९८० या सूत्रात 'विजुपे छन्दसि' सू. ३४१३ या पूर्व सूत्रातून 'छन्दसि' या पदाची कैयटानें अनुवृत्ति मानली असल्यामुळें, जरी सोपपद 'सिच्' धातूहून वैदिक प्रयोगात 'विच्' प्रत्यय होतो तरी मार्गेत सोपपद 'सिच्' धातूहून त्याच्या मतें 'विच्' प्रत्यय होऊ शकत नाहीं परतु काशिका इत्यादि ग्रन्थात सांगितल्याप्रमाणे 'अन्येभ्योऽपि दृश्यन्ते' या सूत्रात 'छन्दसि' या पदाची निवृत्ति होत असल्यामुळें, सोपपद 'सिच्' धातूहून लौकिक प्रयोगात देखील 'विच्' प्रत्यय होऊ शकतो हें उघड होतें. त्यामुळें 'दधिसेचौ' या स्थली उपपदसमास मानला तरी, 'पदादादिः

पदादि ' असा 'पदादि' शब्दाचा पञ्चमीसमास केल्यानें 'सेच्' यातील सकाराचे षत्व होण्याची आपत्ति टळत असल्यामुळें, 'अनभिधानात्' इत्यादि जें कैयटानें म्हटले आहे तें बरोबर मानता येत नाहीं असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा तात्पर्यार्थ आहे ) 'उत्तरपदत्वे चापदादिविधौ' हे वार्तिक मानल्यास 'बहुसेचौ' या स्थली कुत्वाचे निवारण होण्याकरिता ज्याप्रमाणे 'बहुच्पूर्वस्य चापदादिविधौ न' असे वचन पठित करावे लागत त्याचप्रमाणे त्या वार्तिकाचे प्रत्याख्यान केल्यास व 'सात्पदाद्यो' या सूत्रातील 'पदादि' हा पञ्चमीतत्पुरुषसमास मानल्यास, 'बहुसेचौ' इत्यादि स्थली षत्वाचे निवारण होण्याकरिता 'बहुच्पूर्वस्य षत्व न' असे वचन पठित केले पाहिजे इष्ट रूपाची सिद्धि होण्याकरिता योगविभाग केला जात असल्यामुळें, स्वादिष्वसर्वनामस्थाने' या सूत्राचा वर योग-विभाग करून ज्या भसंज्ञा व पदसंज्ञा होणे सांगितल्या आहेत त्या संज्ञा देखील, जेथें उत्तर पदाला कार्य करणे असेल व तें कार्य त्या उत्तर पदाला पदान्तत्वरूप निमित्तामुळें होणारे कार्य असेल, तथाच ठिकाणी कराव्या असे इतर ग्रन्थात विस्तारपूर्वक सांगितले आहे ('विभाषा सुपो बहुच् पुरस्तात् तु' सू. २०२३ या सूत्रानें सुबन्ता हून 'ईषदसमाप्त' या अर्थामध्यें 'बहुच्' प्रत्यय होणे सांगितले आहे व या सूत्रात 'पुरस्तात' हे पद घातले असल्यामुळें, 'प्रत्यय, परश्च' सू. १८०,१८१ या सूत्रान्वयें 'बहुच' प्रत्यय प्रकृतीच्या पुढें न होता, प्रकृतीच्या पूर्वी होतो म्हणून 'सेच् औ' या सुबन्ताहून 'बहुच् = बहु' हा प्रत्यय केला असता, 'बहु सेच् औ' अशी स्थिति झाल्यावर हा समुदाय तद्धितान्त नसून तद्धितादि असल्यामुळें, 'कृत्तद्धितसमासाश्च' सू. १७९ या सूत्रानें त्याला प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकत नाहीं. तथापि हा समुदाय अर्थवान असल्यामुळें, 'अर्थवदधातु' या सूत्रान्वयें त्याला प्राति-पदिकसंज्ञा होते व या समुदायाचे अन्ती असलेला 'औ' प्रत्यय समुदायाहून झाला नसून 'सेच्' या शब्दाहून झाला असल्यामुळें, या

समुदायाला प्रातिपदिकसंज्ञा करतेवेळी 'अप्रत्ययः' हा निषेध आड येत नाही. अशा रीतीनें हा समुदाय प्रातिपदिकसंज्ञक ठरत असल्यामुळें 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू. ६५० या सूत्रानें 'औ' या अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाचा लुक् होतो व तो प्रत्ययलक्षणानें विद्यमान आहे असे मानले तरी, 'औ' हा अजादि सर्वनामस्थान-प्रत्यय असल्यामुळें 'सेच्' याला, योगविभाग करून वर जो अर्थ केला आहे त्या अर्थान्वयें, पदसंज्ञा होऊं शकत नाही. त्यामुळें 'पदस्य आदि. पदादि.' असा षष्ठीसमासपक्ष मानला तरी, 'सेच्' हें पदसंज्ञक ठरत नसल्यामुळें, 'सात्पदाद्योः' या षत्वनिषेधक सूत्राची प्रवृत्ति होऊं शकत नाहीं व 'सेच्' यातील सकाराचे षत्व होण्याची आपत्ति येते. 'पदादादि-पदादिः' असा पञ्चमीसमासपक्ष मानला तरी, 'बहुसेचौ' या स्थली 'बहुच्' हा प्रत्यय असून पद नसल्यामुळें व अशा रीतीनें 'सेच' हा शब्द पदाच्या पुढें नसल्यामुळें, वरील षत्वनिषेधक सूत्र प्रवृत्त होऊं शकत नाही व 'सेच्' यातील सकाराचे या पक्षात देखील षत्व होण्याची आपत्ति येते. धातुपाठात 'षिच क्षरणे' धा. न. १४३४ असा षकारादि धातु पठित केला असून 'धात्वादेः षः सः' सू. २२६४ या सूत्रानें त्या धातूतील षकाराचे जागी सकारादेश झाला असल्यामुळें, प्रकृत सूत्रातील 'आदेश' या शब्दानें त्या आदेशरूप सकाराचे ग्रहण होतें व तो सकार 'बहु' यातील 'उ' या 'इण' पुढें असल्यामुळें, त्याचे प्रकृत सूत्रानें षत्व होण्याची आपत्ति येते. ती आपत्ति टाळण्याकरिता 'बहुच्पूर्वस्य षत्व न' म्हणजे ज्या सकारादि शब्दापूर्वी 'बहुच्' प्रत्यय लागलेला असेल त्या शब्दातील आद्य सकाराचे षत्व होऊं नये, असें वचन पठित केले पाहिजे असें शब्दरत्नकार म्हणतात, आणि तसें वचन पठित करणें योग्य आहे याचे समर्थन करण्याकरिता त्यांनी 'वार्तिकारम्भे तत्रैव ··· इतिवत्' ही पंक्ति लिहिली आहे. वार्तिकारम्भपक्षात 'स्वादिषु' या सूत्राचा वरप्रमाणे योगविभाग करण्याची काही गरज नाहीं. 'उत्तर-

पदत्वे चापदादिविधौ' या वार्तिकाचे प्रत्याख्यान करणे असल्यास तसा योगविभाग करावा लागत असल्यामुळें, वार्तिकारभपक्षामध्ये 'बहुसेच् औ' यातील 'औ' या अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाचा लुक् केल्यावर जरी तो अजादि सर्वनामस्थानप्रत्यय आहे तरी तो प्रत्ययलक्षणानें विद्यमान् आहे असे मानल्यानें 'सेच्' याला, योग विभागाच्या अभावी, 'सुप्तिङन्तं पदम्' या सूत्रानें पदसंज्ञा होते व 'सेच्' याला पदादिविधि करणे नसून पदान्तविधि करणे आहे तरी, म्हणजे 'सेच्' यातील आद्य वर्णाला कार्य करणे नसून 'च्' या अन्त्य वर्णाला कु त्वकार्य करणे आहे तरी, 'बहुसेच्' यातील 'बहु' हे पूर्व पद नसून प्रत्यय असल्यामुळें व 'उत्तरपद' याचा 'समासातील चरमावयव' असा रूढ अर्थ असून येथें समास झाला नसल्यामुळें आणि अशा रीतीनें 'सेच्' हे उत्तरपद ठरत नसल्यामुळें, या स्थितीत 'उत्तरपदत्वे' हे निषेधक वार्तिक प्रवृत्त होऊ शकत नाही त्यामुळें 'सेच्' याला प्रत्ययलक्षणाने प्राप्त झालेल्या पदसंज्ञेचा बाध न होता त्याची पदसंज्ञा कायम राहते व त्यामुळें त्या पदातील अन्त्य चकाराचे कुत्व होण्याची आपत्ति येते ती आपत्ति टाळण्याकरिता वार्तिकारभपक्षात 'बहुच्पूर्वस्य चापदादिविधौ न,' म्हणजे 'पदादिविधिभिन्ने पदान्तस्य बहुच्पूर्वस्य कार्यं कर्तव्ये प्रत्ययलक्षणं न,' हें वचन पठित करावे लागते या वचनान्वयें 'बहुच्' प्रत्ययापुढें असलेल्या 'सेच्' याला पदान्तविधि करणें असल्यामुळें, त्याला प्रत्ययलक्षणानें पदसंज्ञा करता येत नाही त्यामुळें 'सेच्' हे पदसंज्ञक ठरत नसल्यामुळें, त्यातील अन्त्य चकाराचे कुत्व होण्याची आपत्ति टळते म्हणून शब्दरत्नकार म्हणतात की, ज्याप्रमाणे वार्तिकारभपक्षात 'बहुसेचौ' या स्थली कुत्वाचे निवारण होण्याकरिता 'बहुच्पूर्वस्य चापदादिविधौ न' हे वचन पठित करावे लागते त्याचप्रमाणें वार्तिकप्रत्याख्यानपक्षात 'सात्पदाद्यो' या सूत्रातील 'पदादि' हा पञ्चमीसमास मानल्यास, 'बहुसेचौ' या स्थली जी षत्व होण्याची आपत्ति येते ती टाळण्याकरिता 'बहुच्पूर्वस्य षत्व न' हे वचन पठित करावे लागते.

साराश वार्तिकारमपक्ष व वार्तिकप्रत्याख्यानपक्ष हे दोन्ही सदोष ठरतात. तथापि 'योगविभागादिष्टसिद्धिः'—परि. १२३—या परिभाषान्वयें इष्ट रूपाची सिद्धि करण्याकरिताच योगविभाग केला जात असल्यामुळें, वर जो योगविभाग केला आहे त्या योगविभागान्वयें अनिष्ट रूपें सिद्ध न होता इष्ट रूपें सिद्ध व्हावी याकरिता हें मानणें आवश्यक आहे की, जेथें उत्तरपदाला कार्य करणें आहे व तें कार्य त्या उत्तरपदाच्या अन्त्यवर्णाला करणें आहे तेथेंच ठिकाणी त्या योगविभागान्वयें होणाऱ्या भसंज्ञा व पदसंज्ञा इष्टसिद्ध्यर्थ कराव्या. 'बहुसेचौ' या स्थली 'सेच्' हें वर सांगितल्याप्रमाणें उत्तरपद नाही व तसेंच 'सेच्' यातील अन्त्य वर्णाला कार्य करणें नसून आद्य वर्णाला षत्वकार्य करणें आहे. म्हणून वरील नियमान्वयें 'बहुसेचौ' यातील 'सेच्' याला प्रत्ययलक्षणानें प्राप्त होणाऱ्या पदसंज्ञेचा योगविभागानें प्राप्त होणाऱ्या भिन्न संज्ञेनें बाध न करिता ती पूर्व संज्ञा जशीची तशीच अबाधित कायम ठेविली पाहिजे. तसें केलें असता, 'सेच्' हें पदसंज्ञक ठरतें व 'सात्पदाद्योः' या सूत्रातील 'पदादि' या शब्दाचा षष्ठीसमास मानल्यानें तें षत्वनिषेधक सूत्र प्रवृत्त होऊन 'बहुसेचौ' या स्थली षत्वाचें निवारण करता येतें व षत्वनिवारणार्थ 'बहुच्पूर्वस्य षत्व न' हें वचन पठित करण्याची गरज पडत नाहीं. अशा रीतीनें वर जो नियम सांगितला आहे तो मानल्यास, वार्तिकप्रत्याख्यानपक्ष सदोष ठरत नाही असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे ) मनोरमेंत 'स्वादिष्विति या पदसंज्ञा तामाश्रित्योक्तनिषेधा न प्रवर्तते' असें जें म्हटलें आहे तें बरोबर मानल्यास, 'राजपुरुषेषु' या स्थली दोष येतो, कारण अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययवाला मानून सुबन्तत्वामुळें होणाऱ्या पदसंज्ञेचा आश्रय केल्यास 'सात्पदाद्योः' हें निषेधक सूत्र प्रवृत्त होण्याची आपत्ति येते असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाही; कारण 'सात्पदाद्योः' या सूत्रात 'सात्' या प्रत्ययाचें ग्रहण केलें असल्यामुळें त्यावरून हें ज्ञापित होतें की, जेथें 'स्वादिषु' सू. २३० या सूत्रानें

पदसंज्ञा होते तेथें त्या पदसंज्ञक होणाऱ्या शब्दापुढें असलेल्या सकाराला 'सात्पदाद्यो:' हा निषेध लागू पडत नाही असें भाष्य-काराच्या म्हणण्याचें तात्पर्य आहे. (शंकाकार असें म्हणतो की, 'राज्ञ: पुरुषा राजपुरुषा: तेषु = राजन् ङस् पुरुष जस् सुप्' या स्थली 'सुपो धातुप्रातिपदिकयो:' सू. ६५० या सूत्रानें 'ङस्' व जस या अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययांचा लुक् केला असता, 'जस्' हा प्रत्यय प्रत्ययलक्षणानें विद्यमान आहे असें मानल्यानें 'पुरुष' या उत्तर-पदाला 'सुप्तिङन्तं पदम्' सू. २९ या सूत्रानें पदसंज्ञा होते व जेथें उत्तरपदाला कार्य करणे आहे तशाच ठिकाणी 'उत्तरपदत्वे चापदादि विधौ' हें निषेधक वार्तिक लागू पडत असल्यामुळें व वरील उदाहरणांत 'पुरुष' या उत्तरपदाला कोणतेंहि कार्य करणें नसून त्या पुढील 'सु' प्रत्ययाला षत्वनिषेधरूप कार्य करणें असल्या-मुळें, 'पुरुष' या उत्तरपदाला पदसंज्ञा करितांना तें वार्तिक आड येत नाही म्हणून 'सात्पदाद्यो:' सूत्रांतील 'पदादि' या पदाचा 'पदात् आदि: पदादि' असा पञ्चमीसमास केल्यास, 'स्वादिषु' या सूत्रानें पदसंज्ञक न ठरणाऱ्या व 'सुप्तिङन्तं पदम्' या सूत्रानें पदसंज्ञक ठरणाऱ्या 'पुरुष' या उत्तरपदापुढें 'सुप्' प्रत्ययांतील सकार येत असल्यामुळें, 'सात्पदाद्यो' या निषेधक सूत्रानें त्या सकाराचें षत्व न होण्याची आपत्ति येते आणि म्हणून पञ्चमीसमासपक्ष मानणें अयोग्य ठरतें या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात की, वरील उदाहरणांत 'पुरुष' या उत्तर-पदाला 'सुप्तिङन्तं पदम्' या सूत्रान्वयें प्रत्ययलक्षणानें पदसंज्ञा होऊं शकते असें मानलें तरी, सप्तमीच्या बहुवचनाचा 'सु' हा प्रत्यय 'राजपुरुष' या संपूर्ण समुदायाहून झाला असल्यामुळें, त्या समुदायाला 'स्वादिषु' सू. २३० या सूत्रानेंच पदसंज्ञा होते व त्या सूत्रानें पदसंज्ञक ठरण्याऱ्या 'राजपुरुष' या शब्दापुढें 'सु' प्रत्यया-तील सकार आला असल्यामुळें, पञ्चमीसमासपक्षांत देखील, 'सात्पदाद्यो' हा निषेध प्रवृत्त होऊं शकत नाही; कारण 'न

लुमताङ्गस्य' सू. १-१-६३ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारांनी असे स्पष्ट म्हटले आहे की, 'सात्प्रतिषेधो ज्ञापकः स्वादिषु पदत्वेन येषां पदसंज्ञा न तेभ्यः प्रतिषेधो भवतीति,' म्हणजे 'सात्पदाद्योः' या सूत्रात 'सात्' या प्रत्ययाचे ग्रहण केले असल्यामुळे त्यावरून हे ज्ञापित होते की 'स्वादिषु' सू. २३० या सूत्राने पदसंज्ञक होणाऱ्या शब्दापुढे सकार आल्यास ते निषेधक सूत्र प्रवृत्त होत नाही. म्हणून शंकाकारानें केलेली शंका चूक ठरते असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.) वार्तिकप्रत्याख्यान पक्षात देखील वरील उदाहरणातील 'पुरुष' या उत्तरपदाला 'स्वादिषु' या सूत्रानेंच पदसंज्ञा होते ('उत्तरपदत्वे चापदादिविधौ' या वार्तिकाचें प्रत्याख्यान करण्याकरिता 'स्वादिष्वसर्वनामस्थाने' या सूत्राचा पूर्वी सांगितल्याप्रमाणे योगविभाग करून जो अर्थ केला आहे त्या अर्थान्वयें 'स्वाद्यनन्तरसमुदायावयवसुबन्त यदस्ति तदपि पदसंज्ञं भवति' असा अर्थ निष्पन्न होत असल्यामुळें, 'राजपुरुष' या समुदायातील 'पुरुष' या सुबन्त अवयवाला देखील 'स्वादिषु' या योगविभागानेंच पदसंज्ञा होते व 'स्वादिषु' या सूत्रान्वयें पदसंज्ञक ठरणाऱ्या 'पुरुष' या शब्दापुढें 'सु' प्रत्ययातील सकार आला असल्यामुळें, वर सांगितलेल्या भाष्यसिद्धान्तान्वयें 'सात्पदाद्योः' हा निषेध येथें प्रवृत्त होऊ शकत नाही आणि त्यामुळें त्या प्रत्ययातील सकाराचे षत्व होण्यात काही अडचण येत नाही.) 'न लुमताङ्गस्य' १-१-६३ या सूत्रावरील भाष्यात हे सर्व स्पष्टपणे सांगितले आहे. (ते भाष्य वर दिलेच आहे व त्याचे विवरण पूर्वी केलेच आहे.)

शब्दरत्न—व्यतिसे इति । यद्यपि व्यतिहारस्यानेकर्तृकक्रिया- विषयत्वादेकवचनस्य तत्रासम्भवस्तथाऽपि विश्वामित्राश्रमे मारीचं प्रति किमर्थं ब्रह्मवधं करोषीति पृष्टे ममायं धर्म इति तेनोत्तरिते ।

"धर्मोऽस्ति सत्यं तव राक्षसायमन्यो व्यतिस्ते तु ममापि धर्मः । ब्रह्मद्विषस्ते प्रणिहन्मि येन"—(भट्टि का.)

इति भट्टिकाव्यस्थरामवाक्ये तव धर्मेण ममान्यो धर्मस्तपोरूपो व्यत्यासेन भवति येन धर्मेण त्वत्सम्बन्धिनो निहन्मीत्यर्थके एकवचनदर्शनाच्च दोषः । अद्यारभ्य त्वद्धर्मः क्रौर्यं मयि भवति, मद्धर्मोऽक्रौर्यं च त्वयि । "वर्तमानसामीप्ये" लट् । रामबाणपातेन समुद्रसमीपे पतितो मारीचस्तपश्चचारेति रामायणे प्रसिद्धम् । अन्यसम्बन्धिक्रियामितरः करोति, इतरसम्बन्धिनीमन्य इति कर्मव्यतिहारसम्भवादिति जयमङ्गला । व्यतिसे इत्यस्य हे चैत्र मैत्रेण सह व्यत्यस्तो भवसीत्यर्थः । यद्देशे मैत्रसत्ता तद्देशे चैत्रस्य सा, यद्देशे चैत्रस्य सा तद्देशे मैत्रस्य सेति फलति । यद्यपि व्यपदेशिवद्भावेनैकाच्त्वादेरिवास्याप्यशास्त्रीय स्यातिदेशो वक्तु शक्यः । रामेऽव्वित्यादौ त्वसहायत्वाभावाच्च तत्प्रवृत्तिस्तथाऽपि पूर्वपक्ष्युक्तमभ्युपेत्यापि समाधातुमुपक्रमतेनवमिस्यादिना । सिद्धान्तादिति । "सुप्तिङन्तम्" इत्यत्र "यस्मात्प्रत्ययविधिः" इत्यनुवृत्तेरिति भावः । अत्र कृतेऽप्येकादेशे एकदेशविकृतन्यायेनोक्तरीत्या मान्तस्य प्रकृतित्वात् औ इत्यस्य पदावित्व साधितम् ।

अनुपयोगाच्चेति । येन ससहाये व्यपदेशिवद्भावाप्रवृत्त्या तत्सन्निधाने तेषा पदत्व नास्तीति सूचितम् । "आद्यन्तवत्-" सूत्रस्थभाष्योक्तैकपुत्रादिदृष्टान्तबलेन तथैव लाभादिति दिक् ।

व्यत्यासेन भवति येन धर्मेण त्वत्सम्बन्धिनो निहन्मि' म्हणजे तुझा ब्राम्हणहननरूप धर्म व माझा तपाचरणरूप धर्म या दोन धर्मांत आता विनिमय होणार व तुझ्या धर्माचा अङ्गिकार करून मी तुझ्या स्वबंधिजनाचा वध करणार, या अर्थामध्ये 'व्यतिस्ते' असा एकवचनाचा प्रयोग केला असल्यामुळे, काही दोष येत नाही. (रामाच्या म्हणण्याचा भावार्थ हा आहे की,) आजपासून तुझे ठिकाणी असणारा क्रौर्यरूप धर्म माझे ठिकाणी येणार व माझे ठिकाणी असणारा कापराहित्यरूप धर्म तुझे ठिकाणी येणार या स्थली 'वर्तमानसामीप्ये वर्तमानवद्वा' सू. २७८९ या सूत्राने लट्लकाराचा प्रयोग केला आहे. रामाचा बाण लागून मारीच समुद्राजवळ पडला व त्याने तपश्चर्या केली हे रामायणात प्रसिद्ध आहे. एकाची क्रिया दुसऱ्याने करणे व दुसऱ्याची क्रिया त्या पहिल्या पुरुषाने करणे अशा प्रकारचा क्रियाविनिमय संभवतो असे वरील श्लोकावरील जयमङ्गला टीकेत म्हटले आहे (शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे की 'तव धर्मेण मम धर्मो व्यतिस्ते' या अर्थामध्ये 'व्यतिस्ते' हा जो एकवचनाचा प्रयोग भट्टिकाव्यात केला आहे तो व्याकरणरीत्या शुद्ध ठरत असल्यामुळे, दीक्षितानी मनोरमेंत 'व्यतिसे' असा जो मध्यम पुरुषाच्या एकवचनाचा प्रयोग केला आहे तो देखील शुद्ध ठरतो.) 'हे चैत्र मैत्रेण सह व्यतिसे-व्यत्यस्तो भवसि' अशा प्रकारच्या वाक्यात असणाऱ्या 'व्यतिसे' या क्रियापदाचा प्रयोग मनोरमेंत उदाहरणरूपाने दिला आहे व त्या वाक्याचा असा अर्थ फलित होतो की, ज्या देशामध्ये मैत्राची सत्ता होती तेथें आता चैत्राची सत्ता झाली असून ज्या देशात चैत्राची सत्ता होती तेथें मैत्राची सत्ता झाली आहे, म्हणजे चैत्र व मैत्र या दोघानी आपसात आपल्या स्थानाचा विनिमय केला आहे 'व्यतिसे' या स्थली ('पदस्य आदिः पदादि' या षष्ठीसमासपक्षात 'से' या प्रत्ययाचा अवयव जो सकार त्याचे षत्व होण्याची शंकाकाराने जी आपत्ति दिली होती त्या आपत्तीचे निवारण करण्याकरिता)

दीक्षितांना असे जरी म्हणता येणे शक्य होते की, 'व्यपदेशिवदे-कस्मिन्'–परि. ३०–या परिभाषान्वयें ज्याप्रमाणे एकात्त्व इत्यादि अशास्त्रीय धर्मांचा (जेथें समुदायात इतर वर्ण नसून केवळ एकच अच् आहे अशा ठिकाणी देखील, ती परिभाषा केवळ लौकिक न्यायाच्या आधारावर रचली असल्यामुळें,) अतिदेश करता येतो (आणि अशा रीतीनें व्यपदेशिवद्भावानें 'व्यतिसे' यातील 'से' हे पदसंज्ञक मानता येते व त्यामुळें 'सात्पदाद्योः' हा निषेध प्रवृत्त होऊन, पदस्य आदि पदादि.' या षष्ठीसमासपक्षास देखील 'से' या पदातील आद्य सकाराचे षत्व होत नाही,) आणि तसेच 'रामेषु' या उदाहरणासबधानें दीक्षितांना जरी असे म्हणता येणे शक्य होतें की, 'रामेषु' या स्थली 'सु' हा प्रत्यय ('व्यतिसे' या उदाहरणातील 'से' या प्रत्ययासारखा असहाय नसून) ससहाय असल्यामुळें, त्याचे ठिकाणी व्यपदेशिवद्भावाची प्रवृत्ति करता येत नाही (व त्यामुळें 'सु' हा प्रत्यय पदसंज्ञक ठरत नसल्यामुळें त्याला, षष्ठीसमासपक्ष मानला असता, 'सात्पदाद्योः' हा निषेध लागू पडत नाही आणि त्यामुळें त्या प्रत्ययातील सकाराचे षत्व होण्यात काहीं अडचण येत नाही, ) तरी दीक्षितांनी तसे म्हटले नाही याचे कारण हें की, शंकाकारानें ( 'व्यतिसे' या उदाहरणात 'से' या प्रत्ययाला व्यपदे-शिवद्भावानें पदसंज्ञा होऊ शकत नाही असे ) जें म्हटले आहे तें त्याचे म्हणणें ( वादाकरिता तेवढ्यापुरते ) स्वीकारून, त्याच्या शंकेवर 'न वयं प्रत्ययमात्रस्य तदन्तता ब्रूमः' इत्यादि मनोरमेंत उत्तर दिले आहे, म्हणजे 'व्यपदेशिवदेकस्मिन्' ही परिभाषा वरील उदाहरणात लागू पडत नाही हें जें शंकाकाराचे म्हणणे आहे ते तात्पुरते स्वीकारून दीक्षितांनी त्याच्या शंकेचे, एकदेशविकृतन्यायाची

ज्या 'अस्' धातूहून 'से' हा प्रत्यय झाला आहे त्या 'अस्' प्रकृतीचा पूर्वी सांगितल्याप्रमाणे लोप होऊन 'से' हा प्रत्ययच अवशिष्ट राहिला आहे व अशा रीतीनें त्याला त्याच्या प्रकृतीचे जें सहाय होतें तें नाहीसे झाल्यामुळें, तो असहाय ठरतो. परंतु 'रामेषु' या स्थलीं ज्या 'राम' प्रकृतीहून 'सु' हा प्रत्यय झाला आहे त्या प्रकृतीचा लोप झाला नसून ती विद्यमान असल्यामुळें, त्या 'सु' प्रत्ययाला त्याच्या प्रकृतीचे सहाय व सांनिध्य आहे आणि अशा रीतीनें तो 'सु' प्रत्यय ससहाय ठरतो. 'व्यपदेशिवदेकस्मिन्' ही परिभाषा ससहायाला लागत नसून असहायालाच लागत असल्यामुळें, 'अस् से' या प्रकृतिप्रत्ययसमुदायाला 'सुप्तिङन्तं पदम्' सू. २९ सूत्रानें जी पदसंज्ञा झाली होती तिचा 'से' या अवशिष्ट असहाय अवयवाचे ठिकाणी अतिदेश होऊन 'से' याला पदसंज्ञा होते. पण 'रामेषु' यातील 'सु' हा प्रत्यय वर सांगितल्याप्रमाणे, ससहाय असल्यामुळें, त्या प्रत्ययाचे ठिकाणी व्यपदेशिवद्भावानें पदसंज्ञेचा अतिदेश करता येत नाही व त्यामुळें 'सु' हे पदसंज्ञक ठरत नाही. आता कोणी, असे म्हणेल की, 'व्यतिसे' यातील 'से' या प्रत्ययाला 'व्यति' याचे सहाय असल्यामुळें, तो प्रत्यय देखील ससहाय ठरतो, पण हें म्हणणें बरोबर नाहीं, कारण 'प्रथमं धातुः साधनेन युज्यते पश्चादुपसर्गेण' या न्यायान्वयें 'से' हा प्रत्यय 'अस्' धातूहून झाला असून 'व्यति अस्' या समुदायाहून तो प्रत्यय झाला नसल्यामुळें, *'व्यति' हा समुदाय विजातीय–प्रकृतिभिन्न–ठरतो व तशा विजातीय* समुदायाच्या संनिध्यानें 'से' हा प्रत्यय ससहाय ठरत नाही. 'अस्' धातूचें त्याला सांनिध्य असतें तरच तो ससहाय ठरला असता, पण त्याला तसे सांनिध्य नसल्यामुळें तो असहाय ठरतो व त्याला व्यपदेशिवद्भावानें पदसंज्ञा होते आणि त्यामुळें षष्ठीसमासपक्षात देखील त्याच्या आद्य सकाराचे षत्व होत नाहीं.) 'न त्वेकादेशे कृते ......इति सिद्धान्तात्' असें जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, 'सुप्तिङन्तं पदम्' या सूत्रात 'यस्मात्प्रत्यय-

दीक्षितांना असे जरी म्हणता येणे शक्य होतें की, 'व्यपदेशिवदेकस्मिन्'–परि ३०–या परिभाषान्वये ज्याप्रमाणे एकाच्त्व इत्यादि अशास्त्रीय धर्मांचा (जेथें समुदायांत इतर वर्ण नसून केवळ एकच अच् आहे अशा ठिकाणी देखील, ती परिभाषा केवळ लौकिक न्यायाच्या आधारावर रचली असल्यामुळें,) अतिदेश करता येतो (आणि अशा रीतीनें व्यपदेशिवद्भावानें 'व्यतिसे' यातील 'से' हे पदसंज्ञक मानता येते व त्यामुळें 'सात्पदाद्योः' हा निषेध प्रवृत्त होऊन, पदस्य आदि पदादि' या षष्ठीसमासपक्षांत देखील 'से' या पदातील आद्य सकाराचे षत्व होत नाहीं,) आणि तसेच 'रामेषु' या उदाहरणासंबधानें दीक्षितांना जरी असे म्हणता येणे शक्य होतें की, 'रामेषु' या स्थली 'सु' हा प्रत्यय ('व्यतिसे' या उदाहरणातील 'से' या प्रत्ययासारखा असहाय नसून) ससहाय असल्यामुळें, त्याचे ठिकाणी व्यपदेशिवद्भावाची प्रवृत्ति करता येत नाही (व त्यामुळे 'सु' हा प्रत्यय पदसंज्ञक ठरत नसल्यामुळें त्याला, षष्ठीसमासपक्ष मानला असता, 'सात्पदाद्योः' हा निषेध लागू पडत नाही आणि त्यामुळे त्या प्रत्ययातील सकाराचे षत्व होण्यात काही अडचण येत नाही, ) तरी दीक्षितांनी तसे म्हटले नाही याचे कारण हे की, शंकाकारानें ( 'व्यतिसे' या उदाहरणात 'से' या प्रत्ययाला व्यपदेशिवद्भावानें पदसंज्ञा होऊ शकत नाही असे ) जें म्हटले आहे ते त्याचे म्हणणे ( वादाकरिता तेवढ्यापुरते ) स्वीकारून, त्याच्या शंकेवर 'न वयं प्रत्ययमात्रस्य तदन्तता ब्रूमः' इत्यादि मनोरमेंत उत्तर दिले आहे म्हणजे 'व्यपदेशिवदेकस्मिन्' ही परिभाषा वरील उदाहरणात लागू पडत नाही हें जें शंकाकाराचें म्हणणें आहे तें तात्पुरते स्वीकारून दीक्षितांनी त्याच्या शंकेचे, एकदेशविकृतन्यायाची प्रवृत्ति करून, निरसन केले आहे ( 'व्यतिसे' व 'रामेषु' या दोन उदाहरणात अत्यन्त महत्त्वाचा फरक आहे व तो हा कीं, 'व्यतिसे' यातील 'से' हा प्रत्यय असहाय असून 'रामेषु' यातील 'सु' हा प्रत्यय ससहाय आहे असे म्हणण्याचे कारण हे की,

ज्या 'अस्' धातूहून 'से' हा प्रत्यय झाला आहे त्या 'अस्' प्रकृतीचा पूर्वी सांगितल्याप्रमाणे लोप होऊन 'से' हा प्रत्ययच अवशिष्ट राहिला आहे व अशा रीतीनें त्याला त्याच्या प्रकृतीचें जें सहाय होतें तें नाहीसें झाल्यामुळें, तो असहाय ठरतो. परतु 'रामेषु' या स्थलीं ज्या 'राम' प्रकृतीहून 'सु' हा प्रत्यय झाला आहे त्या प्रकृतीचा लोप झाला नसून ती विद्यमान असल्यामुळें, त्या 'सु' प्रत्ययाला त्याच्या प्रकृतीचें सहाय व सान्निध्य आहे आणि अशा रीतीनें तो 'सु' प्रत्यय ससहाय ठरतो. 'व्यपदेशिवदेकस्मिन्' ही परिभाषा ससहायाला लागत नसून असहायालाच लागत असल्यामुळें, 'अस् से' या प्रकृतिप्रत्ययसमुदायाला 'सुप्तिङन्तं पदम्' सू. २९ सूत्रानें जी पदसंज्ञा झाली होती तिचा 'से' या अवशिष्ट असहाय अवयवाचे ठिकाणी अतिदेश होऊन 'से' याला पदसंज्ञा होते. पण 'रामेषु' यातील 'सु' हा प्रत्यय वर सांगितल्याप्रमाणें, ससहाय असल्यामुळें, त्या प्रत्ययाचे ठिकाणी व्यपदेशिवद्भावानें पदसंज्ञेचा अतिदेश करता येत नाही व त्यामुळें 'सु' हे पदसंज्ञक ठरत नाही आता कोणी असे म्हणेल की, 'व्यतिसे' यातील 'से' या प्रत्ययाला 'व्यति' याचे सहाय असल्यामुळें, तो प्रत्यय देखील ससहाय ठरतो, पण हे म्हणणें बरोबर नाही; कारण 'प्रथमं धातुः साधनेन युज्यते पश्चादुपसर्गेण' या न्यायान्वयें 'से' हा प्रत्यय 'अस्' धातूहून झाला असून 'व्यति अस्' या समुदायाहून तो प्रत्यय झाला नसल्यामुळें, 'व्यति' हा समुदाय विजातीय–प्रकृतिभिन्न-ठरतो व तशा विजातीय समुदायाच्या सन्निध्यानें 'से' हा प्रत्यय ससहाय ठरत नाही. 'अस्' धातूचे त्याला सान्निध्य असतें तरच तो ससहाय ठरला असता, पण त्याला तसं सान्निध्य नसल्यामुळें तो असहाय ठरतो व त्याला व्यपदेशिवद्भावानें पदसंज्ञा होते आणि त्यामुळें षष्ठीसमासपक्षात देखील त्याच्या आद्य सकाराचें षत्व होत नाही. ) 'न त्वेकादेशे कृते ......इति सिद्धान्तात्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे की, 'सुप्तिङन्तं पदम्' या सूत्रात 'यस्मात्प्रत्यय-

विधि 'या पूर्व सूत्राची अनुवृत्ति होते। ( त्यामुळें त्या सूत्राचा असा अर्थ होतो की, ज्या प्रकृतीहून 'सुप्' किंवा 'तिङ्' प्रत्यय झाला आहे ती प्रकृति ज्याच्या पूर्वी आहे व तो प्रत्यय ज्याच्या अन्ती आहे अशा तदादितदन्त समुदायाला पदसंज्ञा होते ) 'राम औ' या स्थली वृद्धिरूप एकादेश केल्यावर देखील तो एकादेश परादिवद्भावाने 'औ' हा प्रत्ययच आहे असे मानले असता, 'राम' अशी जी मकारान्त प्रकृति अवशिष्ट राहते ती एकदेशविकृतन्यायानें 'राम' अशी मूळची प्रकृति आहे असे मानता येते ( त्यामुळें 'रामौ' हा शब्द तदादितदन्त ठरून त्याला पदसंज्ञा होण्यात काही अडचण येत नाही ) 'अनुपयोगाच्च' या स्थली 'च' हे पद घातले असल्यामुळे दीक्षित असे सुचवितात की, ससहायाच ठिकाणी व्यपदेशिवद्भाव करता येत नसल्यामुळें, प्रकृतीहून झालेल्या व त्या प्रकृतीच्या सान्निध्यात त्या प्रकृतीच्या लगेंच पुढें असलेल्या प्रत्ययाला पदसंज्ञा होऊ शकत नाही (कारण तसा प्रत्यय, त्याची प्रकृति विद्यमान असल्यामुळें व तो तिच्या सान्निध्यात असल्यामुळें, ससहाय ठरतो व ससहायाचे ठिकाणीं 'व्यपदेशिवदेकस्मिन्' ही परिभाषा वर सांगितल्याप्रमाणे प्रवृत्त होत नसल्यामुळें, 'रामेषु' या स्थली 'सु' या ससहाय प्रत्ययाला व्यपदेशिवद्भावानें पदसंज्ञा होऊ शकत नाही ) 'आद्यन्तवदेकस्मिन्' सू १–१–२१ या सूत्रावरील भाष्यात 'एकपुत्र' इत्यादि जे दृष्टान्त दिले आहेत त्या दृष्टान्ताच्या सामर्थ्यानें वर जसा ('व्यपदेशिवदेकस्मिन्' या परिभाषेचा) अर्थ केला आहे तसाच अर्थ होतो, म्हणजे ससहायाचे ठिकाणी व्यपदेशिवद्भाव करता येत नसून असहायाचेच ठिकाणी व्यपदेशिवद्भाव करता येतो हा अर्थ सिद्ध होतो ('आद्यन्तवदेकस्मिन्' या सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात–'यथा तर्हि बहुषु पुत्रेष्वेतदुपपन्नं भवत्यय मे ज्येष्ठोऽय मे मध्यमोऽय मे कनीयानिति। भवति चैतदेकस्मिन्नप्ययमेव मे ज्येष्ठोऽयमेव मे मध्यमोऽयमेव मे कनीया-

निति । तथोऽभूतायामसोष्यमाणाया च भवति प्रथमगर्भेण हृतेति । तथाऽन्येत्याऽनाजिगमिषु राहेद मे प्रथममागमनमिति ।' या वरील भाष्यात तीन दृष्टान्त दिले आहेत. पहिला दृष्टान्त एकपुत्राचा, म्हणजे ज्याला एकच पुत्र आहे अशा पुरुषासंबधानें, असून दुसरा दृष्टान्त प्रथमच प्रसूत झालेल्या व लगेच मेलेल्या स्त्रियेचा आहे; व तिसरा दृष्टान्त अशा पुरुषासंबधानें आहे कीं, जो प्रथमच एखाद्या दूर देशात आला आहे व पुढें त्याचें तेथें येणे कधीहि संभवनीय नाही. पहिल्या दृष्टान्तात एकाच मुलाला ज्येष्ठ, मध्यम, कनिष्ठ हे शब्द, तो एकटाच असल्यामुळें, लावले जातात दुसऱ्या व तिसऱ्या दृष्टान्तात पुढें गर्भ होणें किंवा पुन्हा आगमन होणें संभवनीय नसल्यामुळें, तथा असहाय गर्भाला व आगमनाला 'प्रथम' हा शब्द व्यपदेशिवद्भावानें लावला जातो या तीन्ही दृष्टान्तावरून हे स्पष्ट होत की, असहायाचेच ठिकाणी व्यपदेशिवद्भाव करता येतो.)

---

विद्वानांनी प्रशंसिलेलें

नागेशभट्टकृत

परिभाषेन्दुशेखरांचें

# मराठी भाषांतर

(विस्तृत विवरणासह व प्रक्रियेसह)

कागदी बांधणीच्या प्रतीची किंमत रु. ५–०–०

कापडी बांधणीच्या प्रतीची किंमत रु. ६–०–०

टपालखर्च सुमारे ७५ नये पैसे, निराळा.

अनुवादक व प्रकाशक

**रा. ब. नारायण दाजीबा वाडेगांवकर, एम्. ए.**

रिटायर्ड डिस्ट्रिक्ट व सेशन्स जज्ज, नागपूर.

खास विद्यार्थ्यांच्या उपयोगाकरिता हे भाषांतर तयार करण्यात आले आहे. विद्यार्थ्यांना कंटाळवाणे होऊ नये म्हणून फक्त महत्वाच्या विषयाचेच यात विवेचन केले आहे. महाराष्ट्रीय विद्यार्थीवर्गाने प्रस्तुत ग्रंथापासून अवश्य लाभ घ्यावा शिवाय शास्त्री–पंडितांना तसेच संस्कृत–भाषाभिमानी लोकांनाहि हे पुस्तक उपयुक्त वाटेल असा विद्वानाचा अभिप्राय आहे.

–पुस्तके मिळण्याचा पत्ता–

सौ. ता. वाडेगांवकर, रा. ब. वाडेगांवकर यांचा बंगला,

धन्तोली, नागपूर.